सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुष्प २४ वें

# सत्याग्रही महाराष्ट्र

लेखिका : प्रेमा कंटक



ऑक्टोबर १९४०



[ प्रथमावृत्ति ]



मूल्य ३ रु.

# प्रयोजन



हें पुस्तक वाचणाऱ्या सर्व समालोचकांचें ध्यान एका खास गोष्टीकडे वेधूं इच्छितें; ती गोष्ट म्हणजे पुस्तक वाचतांना तें एका स्त्रीनें लिहिलें आहे याचें विस्मरण त्यांनीं स्वतःस होऊं देऊं नये.

याचा अर्थ असा नव्हे कीं, लेखिकेला समालोचकांनीं स्त्रीदाक्षिण्य दाखवावें. माझा हेतु एवढाच आहे कीं, जीवनाकडे पाहाण्याची पुरुषाची दृष्टि व स्त्रीची दृष्टि यांत फरक आहे. ही गोष्ट वाचकांनीं व समालोचकांनीं लक्षांत घ्यावी.

साहित्य-प्रदेशांत प्रवेश करणाऱ्या स्त्रिया अगोदरच थोड्या; त्यांतही राजकारणासारख्या विषयावर लिहिणाऱ्या नाहींतच. माझ्या माहितीप्रमाणें महाराष्ट्राबाहेरील वाङ्मय तर सोडाच, खुद्द मराठी वाङ्मयांतसुद्धां, राजकारणावर आजपर्यंत कोणाही लेखिकेनें पुस्तक कदाचित् लिहिलें नसावें.

हा पहिलाच प्रसंग आहे आणि पुस्तकांतील कालमानही ताजेंच आहे. भूत आणि वर्तमान यांतील रेषा अस्पष्ट आहे. वीरकर्मांची समाप्ति अजून झाली नाहीं. देशसेवकांच्या तपस्येची परिणति होण्यास अवकाश आहे. अशा वेळीं हें पुस्तक लिहिण्याचें प्रयोजन काय ? असा प्रश्न वाचकांच्या मनांत उभा राहण्याचा संभव आहे; आणि विशेषतः हा प्रयत्न एका लेखिकेकडून करण्यांत आल्यामुळें विशेष कुतूहल वाटण्याचीही शक्यता आहे.

राजकारणावर लिहिण्याचें साहस करण्यांत माझी धृष्टता तर खरीच; परंतु त्याचें प्रयोजन सविस्तर सांगण्यापूर्वी एक गोष्ट सुचवावीशी वाटते. जीवनांतील सर्व क्षेत्रांत स्त्रिया प्रवेश करूं लागल्यामुळें वेगवेगळ्या क्षेत्रांतील जीवनासंबंधीं त्यांचेही अभिप्राय पुरुषांनीं जाणून घेणें इष्ट आहे. उभयतांची प्रकृति कांहीं बाबतींत भिन्न असल्यामुळें आणि नाविन्यामुळें स्त्रियांचीं मनें पुरुषांपेक्षां अधिक कोरीं असल्यामुळें स्त्रियांच्या विचारसरणीचा एकांगी का होईना, पण साक्षात्कार झाल्यास पुरुषांना स्वतःच्या जीवननिरीक्षणांत तो साहाय्यभूत झाल्याविना राहणार नाहीं. जीवनरहस्याची कल्पना स्त्रीला ज्या

पद्धतीनें स्पष्ट होते, राजकारणाच्या कर्णकठोर कोलाहलांतूनही जें भाववादी जीवनसंगीत तिला ऐकूं येतें, त्यांच्या दर्शनानें व आस्वादानें पुरुषांना 'उभयोर्विन्दते फलम् ।' या अर्थी दुहेरी श्रेय अवश्य मिळेल.

अर्थात् प्रकृतिधर्माप्रमाणें पुरुषाची तर्ककर्कश दृष्टि, सूक्ष्म चिकित्सापद्धति, किंवा मताभिनिवेश यांपैकीं कांहींच या पुस्तकांत सांपडणार नाहीं, असाही संभव आहे. हा दोष असेल तर त्याबद्दल वाचकांची क्षमा मागण्याची आवश्यकता मला वाटत नाहीं. जें इतर लेखक सांगतील तें या पुस्तकांत सांगितलें नाहीं, हेंच या पुस्तकाचें वैशिष्टय आहे; व यथामर्याद असेंही म्हणतां येईल कीं, यांतच स्त्रीच्या प्रातिनिधिक शैलीचें बीज आहे. राजकीय घडामोडींचा वेध एका स्त्रीच्या दृष्टींतून जसा घेण्यांत आला तसा तो येथें वर्णिला आहे व पुस्तकांतलि मतांबद्दल लेखिकाच जबाबदार आहे.

पुस्तकाच्या दृष्टीबाबत एवढें लिहिल्यावर प्रयोजनाकडे वळतें.

जीवनांतील भव्य, सुंदर, उदात्त, कोमल व पवित्र विभूतींच्या किंवा प्रसंगांच्या दर्शनानें मनुष्याच्या भावना पुष्कळदां उत्कट व शीघ्रचेतन बनतात. राजकीय क्षेत्र हा जीवनाचाच एक भाग आहे व त्यांत घृणास्पद अशा अनेक गोष्टी सर्वसाधारणपणें दिसण्यांत येत असल्या तरी महात्मा गांधींनीं आपल्या व्यक्तिमत्त्वानें हिंदी राजकीय क्षेत्रांत जें अद्‌भुत परिवर्तन घडवून आणून त्यांत सदाचाराचें सौंदर्य निर्माण केलें आहे, त्यामुळें कधीं कधीं हृदयाला अलौकिक अनुभव देणाऱ्या घटना आणि जीवनजागृति करणारे प्रसंग प्रतीत होत असतात. या घटनांतून व प्रसंगांतून मनुष्याच्या अंतरात्म्यांतील दिव्य शक्तीचा साक्षात्कार होतो; मन, क्षणभर होईना, आल्हादित होतें आणि जीवनाबद्दल त्याला आशा व प्रेम हीं वाटूं लागतात.

असाच एक प्रसंग सुमारें अडीच वर्षांपूर्वी आला. श्री. शंकरराव देवांचा निकट परिचय मला झाल्यास तेव्हां साडेतीन वर्षें झालीं असतील. महाराष्ट्राच्या राजकारणांतील त्यांची भूमिका व महाराष्ट्राच्या संघटनेप्रीत्यर्थ त्यांची चाललेली धडपड मी प्रत्यक्ष पाहात होतें. फैजपूरच्या कॉंग्रेसमध्यें त्यांनीं प्रचंड यश मिळविलें होतें, व त्यांचें नांव आंतरप्रांतीय ख्याति पावलें होतें. याशिवाय प्रांतीय निवडणुकींतही कॉंग्रेसनें यश मिळविलें होतें. एकाद्या पुढाऱ्याला एवढें यश मिळालें तर सामान्य लोकांच्या दृष्टीनें तें पुष्कळच म्हटलें जाईल.

परंतु त्यांत माझ्या दृष्टीनें देवांची लोकोत्तरता दिसून आली नाहीं; कारण त्यांत मानवधर्माचा उत्कर्ष प्रकट झाला नव्हता. परंतु यानंतर एक वर्षानें जेव्हां १६ जानेवारी रोजीं सान्ताक्रूझ येथें भरलेल्या महाराष्ट्र प्रांतिकच्या बैठकींत देवांनीं "काँग्रेसची व देशाची सेवा करण्यासाठीं, काँग्रेसच्या निशाणाखालीं जी शक्ति आजपर्यंत वाढविली ती अधिक वाढविण्यासाठीं व महाराष्ट्राची संघटना तुटली जाऊं नये, स्वातंत्र्याच्या लढाईत महाराष्ट्रानें आघाडीवर राहावें" म्हणून आपण होऊन प्रांताध्यक्षाच्या जागेवर पाणी सोडून श्री. जेध्यांना त्या महत्पदावर बसविलें, तेव्हां माझ्या मतें देवांच्या हृदयांतील श्रेष्ठ मानवधर्माचा आविष्कार झाला व फैजपूरच्या यशापेक्षां शेंकडोंपट अधिक यश त्यांनीं त्या समयीं प्राप्त केलें. फैजपूरच्या यशानें प्रांताचा आत्मविश्वास दृढ केला; पण या प्रसंगानें प्रांताचें हृदय उन्नत केलें. विजयापेक्षां विग्रहशांतीची किंमत केव्हांही अधिक आहे आणि शांति-प्रसंगांनींच मानवतेचा इतिहास भव्य व उज्ज्वल बनला आहे.

या प्रसंगामुळें माझ्या मनांत देवांबद्दलची आदरबुद्धि अतिशय बळावली. जीवनांतील मांगल्याची अनुभूति झाली आणि अहिंसा-सिद्धान्ताला जीवनांत आणण्याचा महाप्रयत्न करणाऱ्या या जीवननिष्ठ सेवकाचें चरित्र लिहावें अशी उत्कट इच्छा मनांत प्रादुर्भूत झाली. मीं त्यांची परवानगी मागितली, परंतु त्यांनीं दिली नाहीं. त्यांचें जीवन महाराष्ट्राच्या राजकारणाशीं एकरूप झालें असल्यामुळें त्यांचें विभक्त चरित्र लिहिणें त्यांना अयोग्य वाटलें. "महाराष्ट्र आजच्या परिस्थितीला पोंचला आहे त्याला कारण मी एकटा नसून तो शेंकडों मूक, श्रद्धाशील, सेवापरायण कार्यकर्त्यांच्या तपस्येचा प्रभाव आहे. तेव्हां चरित्र लिहावयाचें असेल तर सर्वांचेंच लिहा," असें त्यांचें म्हणणें पडलें.

अर्थात् लेखिकेला पुस्तक लिहिण्यास विषयही तसाच हवा होता. देवां-प्रमाणें माझ्या मनांत महाराष्ट्राविषयीं एकान्तिक प्रेमभावना नाहीं. यंत्रासारखें मला लिहितांही येत नाहीं. माझ्या भावना उचंबळून येण्यास कांहीं तरी आकर्षक, मोहक, रसपोषक असा विषय हवा होता. देवांची कल्पना माझ्या दृष्टीनें तसा विषय होण्यासारखी नव्हती. माझ्या अपेक्षांची पूर्ति करणारी एकच व्यक्ति माझ्या नजरेसमोर होती. ती म्हणजे आपल्या राष्ट्राचा पुण्यश्लोक नेता!

त्याच्याच नेतृत्वाचा इतिहास महाराष्ट्रापुरता वर्णन करावा असें ठरवून मीं हें काम हातीं घेतलें.

एवढें प्रयोजन सांगितल्यावर पुढचें वर्णन देण्याची आवश्यकता वाटत नाहीं. ग्रंथलेखनास अडचणी आल्या, हें सांगणें असत्यच ठरेल. खरें सांगावयाचें म्हणजे सर्व प्रकारची मदत सुरळीतपणें मिळत गेली. संदर्भासाठीं पुस्तकें मिळालीं; केसरी, नवाकाळ, चित्रमय-जगत् वगैरे संस्थांच्या व्यवस्थापकांनीं मोठ्या खुशीनें व तत्परनेनें आपल्या फायलींचा उपयोग करूं दिला; महाराष्ट्रांतील बहुतेक जुन्या नव्या कार्यकर्त्यांनीं मला मुलाखती देऊन आपलीं चरित्रें, मतें व माझ्या आडव्यातिडव्या प्रश्नांचीं सविस्तर उत्तरें देऊन मला उपकृत केलें आणि कित्येक मित्रांनीं व हितेच्छूंनीं आपल्या ग्रंथांचा मला उपयोग करूं दिला. जुन्या वयोवृद्ध व माननीय नेत्यांपैकीं श्री. न.चिं. केळकर व श्री. गंगाधरराव देशपांडे यांनीं मुलाखती देऊन मजवर केलेला अनुग्रह कधींही विसरला जाणार नाहीं. माझें वय व योग्यता लक्षांत घेतां त्यांनीं फारच वात्सल्य दाखविलें, असें म्हटलें पाहिजे. नंतर पुस्तक लिहून झाल्यावर तें पूर्णपणें वाचून दुरुस्त्या सुचविल्याबद्दल परीक्षक-चतुष्टयाचे आभार मानले पाहिजेत. महाराष्ट्रांत मी नवखी असल्यामुळें व बिननांगरलेल्या क्षेत्रांत खोदण्याचें साहस केल्यामुळें अशा कांहीं "जागविणाऱ्या संतां"ची आवश्यकता मला भासत होतीच. श्री. जावडेकर, श्री. देवगिरीकर, आचार्य भागवत व श्री. तात्या देशपांडे यांनीं तें महत्कार्य करून मला ऋणी केलें आहे. एके दिवशीं सारेच आश्रमांत जमले व पुस्तकाच्या निमित्तानें जरी परस्परांत चर्चा झाली तरी ती इतकी उद्बोधक व सुंदर होती कीं, तिचा रसास्वाद मला आणखी ग्रंथ-लेखनास उद्युक्त करील असें वाटतें. असो.

नंतर माझ्या ग्रंथलेखनासाठीं मला वेळेची सवलत देणारे माझे आश्रमीय बांधव व अनेक बारीकसारीक मदत करणारे " इतर लोक " या सर्वांबद्दल मी कृतज्ञ आहें.

*　　　*　　　*

या पुस्तकांत लो. टिळकांच्या मृत्यूपासून फैजपूर कॉंग्रेसपर्यंतच्या महाराष्ट्राच्या राजकीय जीवनाचें चित्रण आलें आहे. मात्र ज्या भव्य व सुंदर प्रसंगामुळें

मला स्फूर्ति मिळाली तो प्रसंग यांत येऊं शकला नाहीं. अगदीं अद्ययावत् इतिहास लिहिण्याचा माझा विचार होता. श्री. जावडेकरांचें म्हणणें पडलें कीं, "फैजपूर नंतर अलग कालखंड सुरू होतो. तो अजून संपला नसल्यामुळें त्याचें वर्णन येऊं नये." अधिकारी व्यक्तीचा हा निर्णय मोडण्याची माझी हिंमत नव्हती. तेव्हां मीं त्यांचा निर्णय मान्य केला व कथानक तेथेंच ठेवलें. मात्र भविष्यकालीं कथासूत्र पुढें चालविण्याची संधि मिळेल अशी आशा मनांत आहेच.

गांधी-नेतृत्वाचा उत्कर्ष महाराष्ट्रांत करण्यास राजकीय क्षेत्रांतून वा रचनात्मक कार्य करून ज्यांनीं मेहनत घेतली, त्यांचींच चरित्रें या पुस्तकांत आलीं आहेत. अर्थात् पुस्तक सर्वांगपरिपूर्ण असें नाहींच. त्यांत सुधारणा व भरती करण्यास जागा आहे. सत्याग्रही महाराष्ट्राच्या निर्मितीसाठीं आपलें आयुष्य झिजविलेल्या कित्येक कार्यकर्त्यांचीं चरित्रें यांत आलीं नसतील; पण या ठिकाणीं लेखिकेच्या शक्तीची व परिस्थितीची मर्यादा पाहिली पाहिजे.

माझ्यापेक्षां अधिक अधिकारी व्यक्तीनें याच इतिहासावर सांगोपांग व विस्तृत लिहिल्यास पहिली पायरी या रूपानें तरी या पुस्तकाचा उपयोग झाल्याबद्दल मला धन्यता वाटेल.

आपलें मूल प्रत्येक आईस आवडतें. त्याप्रमाणें माझ्या पुस्तकाची योग्यता मला अतोनात वाटल्यास आश्चर्य नाहीं. परंतु श्री. जावडेकरांसारख्या ख्यातनाम तत्त्वचिंतकानें प्रस्तावना लिहून या पुस्तकाचा जो गौरव केला त्याबद्दल त्यांना धन्यवाद देतें.

आश्रम, सासवड.
भाद्रपद वद्य १२ (चर्खाद्वादशी)
शके १८६२

प्रेमा कंटक

# प्रस्तावना



मानवी जगांत नित्य असंख्य घडामोडी होत असतात. अशा प्रत्येक घडा मोडींत कांहीं ना कांहीं अपूर्वता असते, कोठें अधिक तर कोठें कमी येवढाच फरक. ज्या घडामोडींत ही अपूर्वता जितक्या प्रमाणांत अधिक असेल तिला त्या मानानें जगाच्या इतिहासांत अधिक महत्त्वाचें स्थान मिळत असतें, कारण त्या मानानें जगाच्या इतिहासावर तिचे परिणामही अधिक होतात. आशियाच्या मध्यभागीं असणारें हिंदुस्थानासारखें एक खंड-तुल्य प्रचंड प्राचीन राष्ट्र युरोपच्या अगदीं पश्चिमेस असणाऱ्या ब्रिटनसारख्या एका छोट्या बेटांतील व्यापारी कंपनीच्या ताब्यांत जावें आणि तिनें येथील राजेरजवाड्यांसहित व बादशहासहित सर्वांना निःशस्त्र बनवून कोट्यवधि लोकांवर अप्रतिहत प्रभुत्व गाजवूं लागावें ही एक अपूर्व घडामोड अथवा दैवी चमत्कार म्हणून १९व्या शतकांत समजला जाई. बरींच वर्षें इंग्लिश इतिहासज्ञांना व राज्यशास्त्रज्ञांनाही ही अभावित घटना दैवी चमत्कारासारखीच भासत असे.

हळूहळू या घडामोडीची कारणमीमांसा करतां करतां ब्रिटिश राज्यशास्त्रज्ञांनीं असा सिद्धान्त मांडला कीं, "हिंदुस्थान हें एक राष्ट्र नाहीं व कधींही नव्हतें, म्हणूनच ही गोष्ट शक्य झाली. हिंदुस्थान हें एक खंड अथवा भौगोलिक विभाग असून त्यांत अनेक जातींचे, धर्मांचे लोक नांदतात. जसे एकाद्या वनांत अनेक जातींचे पशुपक्षी नांदत असतात तसेच. अशा पशुपक्ष्यांत जशी एकत्वाची भावना नसते व ते एकमेकांना मारण्यास वा खाण्यास टपलेले असतात, तसेच येथील लोक एकमेकांशीं भांडण्यास टपलेले असतात. त्यांच्यांत एक-राष्ट्रीयत्व नाहीं आणि म्हणून एकमेकांत झुंजवून त्यांना जिंकण्यांत कोणत्याही प्रकारचा दैवी चमत्कार नाहीं. तसेंच वन्य पशूंसारखें या लोकांत स्वातंत्र्यप्रेमही नाहीं. त्यांना राजकीय जुलूम सहन करण्याची इतकी संवय आहे कीं, परकीयांची गुलामगिरी तर त्यांच्या अंगवळणीं पडलीच आहे, पण आपल्या राज्यकर्त्यांवर टीका करण्याचेंही धैर्य त्यांच्यांत नाहीं; मग त्यांच्या-

विरुद्ध बंड किंवा क्रान्ति करण्याची तर गोष्टच उच्चारावयास नको! जर हिंदुस्थानांत एकराष्ट्रीयत्व निर्माण होईल व येथील लोकांना राजकीय जुलुमाचा कंटाळा येऊन ते एकमेकांविरुद्ध लढण्याचें सोडून देतील व परकी अमलाविरुद्ध एकदिलानें उठतील, तर त्यांच्यावर कोणतीही सत्ता राज्य करूं शकणार नाहीं. पण असें घडेल तर तोच एक मोठा दैवी चमत्कार होईल." हा दैवी चमत्कार घडवून आणण्याचें व भरतखंडाला स्वतंत्र बनविण्याचें बहुतेक श्रेय कोणाही भावी इतिहासकारास सत्याग्रही तत्त्वांसच द्यावें लागेल, याबद्दल आम्हांस शंका नाहीं. यामुळेंच आधुनिक भारतास सत्याग्रही भारत हें नांव देण्यांत अतिशयोक्ति होत नाहीं. शिवाय सत्याग्रही भारतानें आजच्या जगांत जी अपूर्व घडामोड घडवून आणली आहे आणि त्या घडामोडीपासून जगांतील दलित जनतेला जो बोध घेण्याजोगा आहे त्याचीही यथार्थ कल्पना सत्याग्रही भारत या नांवावरूनच येऊं शकते.

सत्याग्रही महाराष्ट्र हा या सत्याग्रही भारताचा एक भाग आहे. महात्मा गांधींनीं आपलें अहिंसात्मक क्रान्तीचें तत्त्वज्ञान भारतापुढें ठेवून त्याला सत्याग्रहाची दीक्षा देण्यापूर्वीं महाराष्ट्र स्वराज्य-संग्रामाच्या आघाडीवर लढत होता आणि लोकमान्य टिळक व नामदार गोखले हे महाराष्ट्रीय पुढारी अखिल भारतीय राजकारणाचीं सूत्रें हालवीत होते. स्वतः महात्मा गांधी नामदार गोखले यांना आपले गुरु मानीत असतात. तथापि महाराष्ट्रांत वा इतरत्र स्वराज्यसंग्रामांत त्यांना जें प्रथम साहाय्य मिळालें तें बहुतांशीं लोकमान्य टिळकांच्या संप्रदायांत वाढलेल्या लोकांकडूनच मिळालें आणि त्यांनीं ज्या राष्ट्रसभेला सत्याग्रहाची दीक्षा दिली ती टिळकांच्या राष्ट्रीय पक्षानें प्रागतिक पक्षाच्या हातून काबीज केलेली राष्ट्रीय संस्था होती असाच इतिहास आहे. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षानें लोकमान्यांच्या मृत्यूनंतर सुमारें वर्षभर महात्मा गांधींच्या असहकारयुद्धास एकमुखानें पाठिंबा दिला आणि त्या काळांतच महाराष्ट्रांतील सत्याग्रही कार्यकर्त्यांचा सार्वजनिक जन्म झाला.

या पहिल्या वर्षानंतर श्री. केळकर यांच्या नेतृत्वाखालीं केसरीपक्षानें नूतन जन्मास आलेल्या या सत्याग्रही महाराष्ट्रास टिळकांच्या नांवानें विरोध करण्यास प्रारंभ केला. पण त्यामुळें त्याची वाढ खुंटूं शकली नाहीं, तर केसरीपक्षच लोकमान्यांनीं कमावलेलें महाराष्ट्राचें नेतृत्व गमावून बसला. १९३०

सालीं जो जगत्प्रसिद्ध सत्याग्रह-संग्राम भरतखंडानें सुरू केला त्यांत सर्व महाराष्ट्र स्वयंप्रेरणेनें सामील झाला-— आणि १९३० व ३२ सालांत झालेल्या स्वातंत्र्यसंग्रामांतील मोहिमांत त्यानें अभिमानास्पद कार्य केलें. १९३६ सालीं फैजपूर येथें पहिली ग्रामीण राष्ट्रसभा भरवून महाराष्ट्रीय जीवनाचें गुरुत्वमध्य असा जो मराठा शेतकरीवर्ग तो सत्याग्रही बनला याचें प्रकट प्रदर्शन महाराष्ट्रानें केलें. या १५ वर्षांतील महाराष्ट्राचा इतिहास, म्हणजे सत्याग्रही महाराष्ट्राचा इतिहास, श्रीमती प्रेमाबाई कंटक यांनीं लिहून तो या पुस्तकाच्या रूपानें महाराष्ट्राला सादर केला आहे. १९२० सालीं जन्मास आलेला सत्याग्रही महाराष्ट्र आज प्रौढ झाला असून महाराष्ट्रीय जनतेचें नेतृत्व आणि प्रांतिक राजकारणाचीं सूत्रें आपल्या हातीं घेऊन तो चालवीत आहे. १९३६ पर्यंतच्या त्याच्या वाढीचा इतिहास या पुस्तकांत ग्रथित झालेला आहे. इतर प्रांतांच्या बरोबरीनें स्वातंत्र्यसंग्रामाच्या अंतिम मोहिमेंत तो सामील होत असतां आज हें पुस्तक प्रसिद्ध व्हावें हें उचितच आहे.

श्रीमती प्रेमाबाई यांचें हें पहिलेंच पुस्तक नव्हे. सुमारें तीन चार वर्षांपूर्वी "काम आणि कामिनी" या नांवाची एक कादंबरी त्यांनीं लिहिली. याशिवाय सासवड आश्रमांतील एक ग्रामसेविका, फैजपूर येथील राष्ट्रसभेच्या स्वयंसेविकांच्या प्रमुख, पंढरपूरच्या यात्रांच्या वेळीं स्वयंसेविकांची प्रथमच संघटना करणाऱ्या, कल्पक, उत्साही व कार्यकुशल संचालिका, रामगडच्या स्वयंसेविकांच्या एक प्रमुख संघटक आणि महात्मा गांधींच्या एकनिष्ठ भक्त अशा अनेक नात्यांनीं महाराष्ट्राला त्यांचा परिचय झालेला आहे. आज "सत्याग्रही महाराष्ट्र" या सुंदर पुस्तकाच्या रूपानें त्या एका निराळ्या स्वरूपांत महाराष्ट्रापुढें येत आहेत. अशा प्रसंगीं त्यांच्या पूर्वायुष्याचा अल्प परिचय वाचकांस करून दिला तर तें अनुचित होणार नाहीं.

प्रेमाबाईचा जन्म मुंबईस राहणाऱ्या एका कारवारी कुटुंबांत १९०६ सालीं झाला आणि तेथेंच त्यांचें बालपण व शिक्षण झालें. प्राथमिक व दुय्यम शाळेंत असतांना कांहीं चांगल्या शिक्षकांशीं त्यांचा संबंध येत गेला आणि त्यांच्या सान्निध्यांत व सहवासांत प्रेमाबाईची अध्यात्म-प्रवण लोकसेवा-वृत्ति वाढत गेली. महाराष्ट्राच्या इतिहासांतील वीर महिला लक्ष्मीबाई आणि भक्त मंडळीपैकीं मीराबाई यांच्या चरित्रांचें आकर्षण आपणांस बाळपणापासूनच वाटूं

लागलें असें त्या सांगतात. प्राथमिक शाळेंतील शिक्षक श्रीयुत मुळे यांच्यामुळें शिवाजी-रामदासांच्यासंबंधीं पूज्यभाव वाटूं लागला. दुय्यम शाळेंत गेल्यावर श्रीयुत गजानन भास्कर वैद्य या थोर हिंदुधर्म-सुधारकाशीं त्यांचा परिचय झाला. त्या ज्या शाळेंत जात तिचे ते प्रमुख होते. आणि त्यांच्यापासून स्वामी विवेकानंद, रामतीर्थ इत्यादींच्या कार्याची महती, हिंदुधर्माचें श्रेष्ठत्व आणि आर्य संस्कृतीचा अभिमान या भावना त्यांच्या अंतःकरणांत दृढमूल झाल्या. याच शाळेंतील शिक्षक श्रीयुत धुरंधर आणि श्रीयुत गजेंद्रगडकर यांच्यापासून आपणांस अनुक्रमें तत्त्वज्ञान आणि वाङ्मय यांच्या वाचनाची गोडी लागली असें त्या म्हणतात. याच शाळेंतून त्या १९२३ सालीं मॅट्रिक होऊन विल्सन कॉलेजांत गेल्या.

१९२४ सालीं मुंबई कॉर्पोरेशननें महात्मा गांधींना मानपत्र दिलें तेव्हांच त्यांना गांधीजींचें प्रथम दर्शन झालें व तेव्हांपासून त्यांच्या विभूतिमत्त्वासंबंधींचा त्यांचा आदर एकसारखा वाढत गेला. १९२७ मध्यें वाङ्मय विषय घेऊन त्या बी. ए. झाल्या. त्यावेळीं सुरू असलेल्या युवक संघाच्या चळवळींतही त्या भाग घेत असत. पण १९२८ च्या बार्डोलीच्या लढ्यानें त्यांचें चित्त पुन्हा गांधीजींच्याकडे अधिक वेधलें गेलें. या वेळीं त्या बार्डोलीस गेल्या होत्या व तेथून साबरमतीस जाऊन महात्मा गांधींनाही त्या भेटून आल्या. याच वेळीं आपण आश्रमांत येऊन राहणार आहों असें त्यांनीं सांगितलें; पण गांधीजींनीं त्यांना या कामीं फारसें प्रोत्साहन दिलें नाहीं. १९२९ सालीं त्या वाङ्मय विषय घेऊन एम्. ए. च्या परीक्षेस बसल्या पण उत्तीर्ण झाल्या नाहींत. यानंतर पुन्हा परीक्षेस न बसतां साबरमती-आश्रमांत जाऊन त्या दाखल झाल्या. येथून त्यांच्या सार्वजनिक जीवनास प्रारंभ झाला असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

१९२९ पासून १९३३ पर्यंतचा त्यांचा काल या आश्रमांतच गेला. तेथें गेल्यापासून बालवर्गाला चित्रकला शिकविण्याचें काम त्यांना देण्यांत आलें व त्या खादीशास्त्राच्या विद्यार्थिनीही बनल्या. गुजराथी व ऊर्दू भाषांचें ज्ञान त्यांनीं लवकर संपादन केलें आणि आहारादिसंबंधींचीं व्रतें सुरू करून सत्याग्रही जीवनाची त्यांनीं दीक्षा घेतली. महात्मा गांधी हे संतश्रेष्ठ राजकीय कर्मयोगी आहेत. त्यांच्या तत्त्वज्ञानांत निर्भय वीरवृत्ति आणि निर्मल संतवृत्ति

यांचा समन्वय झालेला आहे. प्रेमाबाईंच्या अंतःकरणांत या दोन्ही वृत्तींचे अंकुर असल्यामुळेंच त्यांना लक्ष्मीबाई आणि मीराबाई यांच्या चरित्रांचें आकर्षण वाटत असलें पाहिजे. गांधीजींच्या ठिकाणीं क्रांतिकारक राजकीय नेतृत्व व पवित्र आध्यात्मिक भगवद्भक्ति यांचा समन्वय पाहून त्या त्यांच्या एकनिष्ठ शिष्या अथवा भक्त बनल्या हें यथोचितच झालें.

त्या आश्रमांत गेल्यानंतर थोड्याच दिवसांत दांडी-कूच होऊन आधुनिक भारताचा स्वातंत्र्यसंग्राम सुरू झाला. त्यांत भाग घेण्याची प्रथमपासूनच त्यांची उत्कट इच्छा होती. पण त्यांना छात्रालयाच्या प्रमुख बनवून गांधीजींनीं आश्रमाची व्यवस्था पाहण्यास सांगितलें. ही त्यांची आज्ञा व कामगिरी त्यांनीं एकनिष्ठेनें पार पाडली. १९३१ सालीं गांधी-आयर्विन करार होऊन कराची येथें राष्ट्रसभेचें अधिवेशन झालें. या दोनही प्रसंगीं त्या गांधीजींच्या-समवेत होत्या. पुन्हा १९३२ सालीं सत्याग्रह-संग्राम सुरू झाला तरीही त्यांना आश्रमांत राहण्याचीच आज्ञा गांधीजींनीं दिली होती. पुढें १९३३ सालीं सार्वत्रिक सत्याग्रह बंद करून महात्मा गांधींनीं वैयक्तिक सत्याग्रह सुरू केला आणि साबरमतीच्या आश्रमाचें विसर्जन केलें. यानंतर प्रेमाबाईंना कायदेभंग करून स्वराज्य-आश्रमांत ( बंदीखान्यांत ) प्रवेश करण्याची संधि मिळाली. प्रत्येक वेळीं सहा सहा महिने अशा शिक्षा होऊन त्या दोनदां तुरुंगांत गेल्या. १९३४ सालीं वैयक्तिक सत्याग्रहही थांबला आणि तुरुंगांतून बाहेर पडल्यावर काय करावें हा प्रश्न त्यांच्यापुढें येऊन उभा राहिला.

या वेळीं महात्मा गांधींनीं ग्रामोद्धाराची चळवळ सुरू केली होती. तेव्हां आपणही महाराष्ट्रांत जाऊन कोठें तरी ग्रामसेवेचें कार्य करूं लागावें असें त्यांच्या मनानें घेतलें. आतांपर्यंत महाराष्ट्रांतील राजकीय कार्यकर्त्यांशीं त्यांचा परिचय झाला नव्हता. या वेळीं त्यांचे पूर्वींचे शिक्षक आणि आजचे " नवाकाळ "चे उपसंपादक श्री. धुरंधर यांनीं त्यांची श्री. शंकरराव देव यांच्याशीं गांठ घालून दिली. श्री. देव यांनीं ता. ५ ऑगस्ट १९३४ रोजीं सासवड येथें आचार्य भागवत यांच्या साहाय्यानें एक आश्रम सुरू केला. तेव्हांपासून प्रेमाबाई सासवड-आश्रमांत येऊन राहिल्या. यानंतरचें त्यांचें जीवन महाराष्ट्राच्या परिचयाचें आहे. येथें त्याचा विस्तार करण्याचें कारण नाहीं.

महाराष्ट्रांत आल्यानंतर महाराष्ट्रांतील सत्याग्रही चळवळीचा व कार्यकर्त्यांचा परिचय करून घेण्यास त्यांनीं सुरुवात केली. सत्याग्रही महाराष्ट्राचे नेते श्री. देव यांची व इतरांची माहिती मिळवून त्यांनीं हें पुस्तक तयार केलें आहे. महात्मा गांधींचा सत्याग्रही संप्रदाय हिंदी राजकारणांत आला तेव्हां महाराष्ट्राची राजकीय परिस्थिति कशी होती, लोकमान्य टिळकांच्या मृत्यूपर्यंतच्या राजकारणांत महाराष्ट्रानें अग्रेसरत्व कसें पटकाविलें होतें, त्यांच्या मृत्यूनंतर सत्याग्रही तत्त्वज्ञानासंबंधीं टिळकपक्षांत दोन पक्ष कसे झाले, यांपैकीं प्रत्येक पक्षाची विचारभूमिका कोणती होती, टिळकांच्या राजकारणांतील बहिष्कार-योगाचेंच सूत्र गांधींनीं पुढें कसें चालविलें, या कार्यास अहिंसक सर्वांगीण क्रांतिशास्त्राचें स्वरूप दिल्यानें सत्याग्रहानें जनतेच्या अंतःकरणाचा ठाव एकदम कसा घेतला, महाराष्ट्रांतील टिळकसंप्रदायाप्रमाणें ब्राह्मणेतरपक्षांतील उत्साही लढाऊ पक्षही सत्याग्रहांत कसा व केव्हां सामील झाला, महाराष्ट्रीय जनतेचें गुरुत्वमध्य असा जो शेतकरीसमाज त्याला १९३० च्या स्वातंत्र्य-संग्रामानें कसें खेचून घेतलें, याच वेळीं रशियांतून व युरोपांतून येणाऱ्या समाजवादी क्रांतिशास्त्राचे संस्कार सुशिक्षित तरुणांवर कसे होत होते, १९३० व ३२ च्या मोहिमांत हा तरुणवर्ग कसा आकर्षित झाला, या तरुण सुशिक्षित वर्गांतूनच १९३४ नंतर राष्ट्रसभेंतील समाजवादी पक्ष कसा निर्माण झाला, या समाजवादी पक्षाचे महाराष्ट्रांतील सत्याग्रही पक्षाशीं सहकार्याचे संबंध कसे वाढत गेले, फैजपूरच्या अधिवेशनांत महाराष्ट्रीय जनता व सर्व उत्साही राष्ट्रभक्त राष्ट्रसभेच्या झेंड्याखालीं प्रचंड संख्येनें व कार्यक्रम-संघटनेनें कसे एकत्र आले—तात्पर्य, खरा महाराष्ट्र कमाक्रमानें राष्ट्रसभाभिमुख व सत्याग्रही कसा बनला याचें मनोरम आणि स्फूर्तिप्रद विवेचन या पुस्तकांत प्रेमाबाईनीं केलें आहे. तरुण पिढीस तें उद्बोधक व चित्तवेधक होईल अशी मला आशा वाटते.

प्रेमाबाईची लेखन-पद्धति व्यक्तिनिष्ठ आणि तात्त्विक अशी उभयविध आहे. यामुळें कांहीं कांहीं ठिकाणीं त्यांचा इतिहास एखाद्या कादंबरीप्रमाणें चटकदार झाला आहे, पण त्यामुळें यथार्थ-कथनाला सहसा धक्का लागला असेल असें वाटत नाहीं. सत्याग्रही महाराष्ट्राचा गेल्या वीस वर्षांतील इतिहास ज्या व्यक्तींच्या चरित्रांभोंवतीं गुंफला गेला आहे त्यांच्या कार्याचें व गुण-दोषांचें

दिग्दर्शन यांत आलें आहे. असें करितांना लेखिकेच्या स्वतःच्या मतांची, विचारांची व भावनांची छाप त्यावर उठणें अपरिहार्यच आहे. तथापि त्यांनीं जें चित्र रेखाटलें आहे तें सामान्यतः यथातथ्य आहे असेंच बहुतेकांस वाटेल.

सत्याग्रही महाराष्ट्राचा इतिहास लिहितांना प्रथमतः ज्यांनीं महात्मा गांधींच्या सत्याग्रहाचा सर्वांगीण जीवननिष्ठा म्हणून स्वीकार केला त्यांचा विचार करावा लागतो. अशा लोकांचेही पुन्हा दोन भेद पडतात. ज्यांच्या कार्याचा विशेष भर विधायक कार्यक्रमावर आहे ते व ज्यांचें विशेष लक्ष राजकीय पक्ष-संघटनेकडे आहे ते. पहिल्या वर्गांत श्री. अण्णासाहेब दास्ताने, आप्पासाहेब पटवर्धन, अण्णासाहेब सहस्रबुद्धे व राष्ट्रीय शिक्षणांतील अध्यापकवर्ग यांचा समावेश होतो व श्री. देव प्रभृतींचा दुसऱ्या वर्गांत अंतर्भाव होतो. सत्याग्रही तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें विचार करतां राजकीय पक्ष-संघटना अथवा समाजाचें राजकीय नेतृत्व याला विशेष महत्त्व आहे, असें मला वाटतें. सत्याग्रही महाराष्ट्राच्या निर्मितींत श्री. देव यांना याच दृष्टीनें केंद्रस्थान देणें अवश्य आहे व तें तसें या पुस्तकांत देण्यांत आलें आहे तें योग्यच होय. चंपारण्यांतील अगदीं पहिल्या भारतीय सत्याग्रहापासून तों आजपर्यंत महात्मा गांधींच्या मागून अव्यभिचारी वृत्तीनें व एकनिष्ठेनें जाण्याचें व त्यासाठीं आपल्या सर्वस्वाचा होम करण्याचें श्रेय श्री. देव यांनीं संपादन केलें आहे. सत्याग्रही तत्त्वज्ञानाची आजन्म दीक्षा घेऊन त्यांनीं राष्ट्रीय सभेचें सत्याग्रही राजकारण आजपर्यंत चिकाटीनें, धडाडीनें व सर्व पक्षोपपक्षांना तोंड देऊन चालविलें आहे. असें करण्यासाठीं त्यांना आपल्या सर्व जीवनांत क्रांति घडवून आणावी लागली. जीवनांतील कोणतेही इतर पाश त्यांनीं निर्माण केले नाहींत. आपल्या स्वभावांत व अंतरंगांत जे अडथळे होते ते सर्व उल्लंघून महाराष्ट्राला राजकारणाची दीक्षा देण्यासाठीं त्यांनीं आपलें जीवित समर्पण केलें आहे. या त्यांच्या असामान्य गुणांमुळें सत्याग्रही महाराष्ट्राच्या इतिहासांत त्यांना साहजिकच अग्रस्थान प्राप्त झालें आहे.

यानंतर राजकारणांतील संतप्रवृत्ति अथवा त्याचें आध्यात्मिक अधिष्ठान यांचें विशेषसें महत्त्व न वाटतांही राजकीय दृष्ट्या सत्याग्रह-संग्रामाचें महत्त्व पटलेल्या व त्या दृष्टीनें या राष्ट्रीय लढ्यांत असामान्य त्याग केलेल्या लोकांचा विचार येतो. श्री. काकासाहेब गाडगीळ यांची हीच भूमिका आहे. प्रथम-

पासून महात्मा गांधींच्या विभूतिमत्त्वाचें राजकीय महत्त्व त्यांना पटलें असलें तरी त्यांची वृत्ति व्यावहारिक मुत्सद्दीपणाची असल्यानें देशबंधु दास व पंडित मोतीलाल नेहरू यांच्या स्वराज्यपक्षाकडे त्यांचा विशेष ओढा होता. यामुळें प्रथम त्यांचा केसरीपक्षाशीं अधिक निकट संबंध होता. पण श्री. केळकर यांनीं स्वराज्यपक्षांतून फुटून प्रतियोगी सहकारिता पक्ष काढला आणि राष्ट्र-सभेच्या शिस्तीचा भंग करण्यांतच लोकमान्यांचें राजकारण व महाराष्ट्राचा बाणा आहे असें प्रतिपादन करण्यास सुरुवात केली, तेव्हांपासून श्री. गाडगीळ यांचे केसरीपक्षाशीं असलेले संबंध तुटत गेले; आणि राष्ट्रसभापक्ष व श्री. देव यांच्याशीं त्यांचे संबंध वाढूं लागले. कौन्सिलांतील कार्याचें महत्त्व असलें तरी तें राष्ट्रसभेची शिस्त पाळूनच झालें पाहिजे आणि त्या कार्यापेक्षां बाहेरील लढाऊ कार्याला अधिक महत्त्व आहे हें दास-नेहरूंचें तत्त्व त्यांनीं आजपर्यंत सोडलेलें नाहीं. महात्मा गांधींचें विभूतिमत्त्व खणून काढण्याचा केसरीपक्षानें चालविलेला प्रयत्न, राष्ट्रसभेच्या शिस्तीचा भंग करण्याच्या त्याच्या धोरणाइतकाच अराष्ट्रीय आणि टिळकांच्या राजकारणाशीं विसंगत आहे, या भूमिकेवरून ते केसरीपक्षाला विरोध करूं लागले. युवकसंघ, स्वातंत्र्यसंघ, वगैरे चळवळी सुरू झाल्या तेव्हांपासून त्यांनीं तरुण सुशिक्षित महाराष्ट्रीयांना केसरीपक्ष सोडून राष्ट्रसभेस येऊन मिळण्याचा स्पष्ट उपदेश केला. हा मार्ग स्वीकारण्यांत धोका आहे व आपणांस असामान्य त्याग करावा लागणार आहे हें त्यांना माहीत होतें. बुद्धिपुरस्सर स्वीकारलेलें हें आपलें व्रत त्यांनीं आजपर्यंत धैर्यानें व चिकाटीनें चालविलें असून मध्य असेंब्लींतील त्यांच्या निवडणुकीनें महाराष्ट्रांतील राष्ट्रसभापक्षाचें एक अंग सजविलें आहे.

अशाच प्रकारें प्रथम कांहीं दिवस महाराष्ट्रांतील सत्याग्रही पक्षापासून दूर असून पुढें त्याच्या कार्यांत विशेष महत्त्वाची भर घालण्याचा मान श्री. बाळा-साहेब खेर यांना प्राप्त झाला आहे. १९३० सालच्या स्वातंत्र्य-संग्रामांत ते महाराष्ट्रांतील सत्याग्रहीपक्षाशीं समरस झाले आणि आपल्या अंगचे असामान्य गुण त्यांनीं महाराष्ट्राच्या कार्यास समर्पण केले. त्यांच्या लाभामुळें पुढें राष्ट्रसभेला प्रांतिक-मंत्रिमंडळें चालविण्याच्या वेळीं केवढें साहाय्य झालें आणि महाराष्ट्रांतील या झांकलेल्या रत्नाची प्रभा सर्व देशभर कशी फांकली

तें येथें विस्तारानें वर्णन करण्याची गरज नाहीं. मुंबईसारख्या पुढारलेल्या प्रांताचे पंत-प्रधानत्व यशस्वी रीतीनें चालविण्याची शक्ति सत्याग्रही महाराष्ट्रांत आहे अशी त्यांच्यामुळेंच भरतखंडाची खात्री झाली. महाराष्ट्रांत या प्रांतिक स्वराज्याच्या काळांत राष्ट्रसभेच्या द्वेषाला महापूर आलेला होता. पण त्या गढूळ पाण्याचा एक कणही बाळासाहेबांच्या शुद्ध चारित्र्यास व चाणाक्ष मुत्सद्दीपणास स्पर्श करूं शकला नाहीं.

श्री. केशवराव जेधे यांचेंही सत्याग्रही महाराष्ट्राच्या इतिहासांतील स्थान असेंच महत्त्वाचें आहे. श्री. गाडगीळ यांना लढाऊ राजकारण चालविण्या-साठीं जसा केसरीपक्षाशीं असलेला संबंध तोडावा लागला त्याचप्रमाणें श्री. केशवराव जेधे यांना राष्ट्रसभापक्षांत येऊन मिळतांना जुन्या ब्राह्मणेतर पक्षांत क्रांति घडवून आणावी लागली. या बाबतींतील श्री. जेधे यांच्या कार्याचें महत्त्व विशेष असून त्यांचें यथोचित वर्णन या पुस्तकांत आलेलें आहे. १९३०–३२ सालांतील सत्याग्रह-संग्रामांत ब्राह्मणेतर जनता सामील झाल्यानें महाराष्ट्रीय राजकारणांत एक नवें युग निर्माण झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. १९२०–२२ सालीं जुन्या राष्ट्रीय पक्षांतील क्रांतिकारक वृत्तीचे लोक सत्याग्रही बनले आणि केसरीपक्षाला सोडून महात्मा गांधी व राष्ट्रीय सभा यांच्या मागून जाऊं लागले. अशाच प्रकारची क्रांति जुन्या ब्राह्मणेतर पक्षांत १९३० सालीं झाली आणि ब्राह्मणेतर जनता राष्ट्रसभेच्या झेंड्याखालीं स्वातंत्र्यसंग्रामोन्मुख झाली. पुढें प्रांतिक स्वराज्याच्या वेळीं श्री. अण्णासाहेब लठ्ठे हेही सत्याग्रही महाराष्ट्रांत सामील झाले. त्याला ब्राह्मणेतरपक्षाच्या इतिहासाच्या दृष्टीनें विशेष महत्त्व आहे. १९३० सालापासून सत्याग्रह-संग्रामांत धडाडीनें उडी घेऊन महात्मा गांधींचें नेतृत्व स्वीकारण्याचा व प्रांतिक मंत्रिपद सजविण्याचा मान श्री. लक्ष्मणराव पाटील यांनीं मिळविला. आज ते महात्मा गांधींचे एकनिष्ठ व उत्साही अनुयायी बनलेले आहेत.

श्री. देव-गाडगीळप्रभृतींच्या विचारांत व वृत्तींत कितीही भेद असला तरी ते सर्व टिळकांच्या राष्ट्रीय पक्षाचे संस्कार घेऊन सत्याग्रहांत आलेले आहेत. श्री. जेधे, पाटील अथवा लठ्ठे यांचे पूर्व-संस्कार भिन्न आहेत. जो महाराष्ट्र लोकमान्य टिळकांना पूर्णपणें वश झाला नव्हता, किंबहुना जो त्यांना विरोधी होता, त्याचे प्रतिनिधी या दृष्टीनें श्री. जेधेप्रभृतींच्याकडे

पाहातां येतें. लोकमान्यांचें जहाल राष्ट्रीय राजकारण पुढें चालवावयाचें तर गांधीजींचें नेतृत्व आणि सत्याग्रह यांचा स्वीकार केला पाहिजे या वृत्तीनें देव-गाडगीळ महाराष्ट्रांत कार्य करीत होते, तर शेतकरीसमाजाचा व ब्राह्मणेतरसमाजाचा खरा उद्धार व्हावयाचा, तर पूर्वीच्या मवाळ ब्राह्मणेतरपक्षाचा नाद सोडून देऊन महात्मा गांधी व राष्ट्रसभा यांच्या नेतृत्वाखालीं ब्राह्मणेतर जनतेनें सामील झालें पाहिजे या वृत्तीनें श्री. जेधे व इतर ब्राह्मणेतर तरुण सत्याग्रह-संग्रामांत उड्या घेत होते. देव-गाडगीळांना टिळकांच्या नांवानें विरोध करणारा केसरीपक्ष होता, तसाच श्री. जेधेप्रभृतींना विरोध करणारा जुना ब्राह्मणेतरपक्ष होता. तथापि ब्राह्मणेतर जनतेनें त्या जुन्या मवाळ-पक्षाचें नेतृत्व सोडून राष्ट्रसभेंत प्रवेश केला.

महाराष्ट्रांतील हरिजनसमाजाच्या राजकारणांत मात्र अद्यापि अशी क्रांति व्हावयाची आहे. तथापि तिचीं पूर्वचिन्हें कोठें कोठें दिसत असून ती घडून आली म्हणजेच महाराष्ट्रीय समाजांतील सर्व थर सत्याग्रही व राष्ट्रीय बनले असें म्हणतां येईल. सत्याग्रही पक्षाच्या हरिजन-सेवेंतील विधायक कार्यावरच हें सर्वथैव अवलंबून आहे हें उघड आहे. महाराष्ट्रांत राष्ट्रीय बनूं लागलेल्या सुशिक्षित जातींना हिंदुसभेच्या अराष्ट्रीय राजकारणाचें वळण लावण्याचा जो प्रतिगामी प्रयत्न चालू आहे तो लक्षांत घेतला असतां, ब्राह्मण, ब्राह्मणेतर, हरिजन, हिंदु, मुसलमान या सर्वांना जाति-धर्म-निरपेक्ष राष्ट्रधर्म आणि सत्याग्रही वृत्ति यांचें शिक्षण देण्याचा प्रयत्न करणाऱ्या राष्ट्रसभापक्षाचें कार्य राष्ट्र-निर्मितीच्या दृष्टीनें किती महत्त्वाचें आहे याची कल्पना येते. या कार्याच्या मार्गांतील अडचणी दूर करण्यास सत्याग्रही वृत्तीनें केलेली मागासलेल्या जातींची निरपेक्ष सेवाच उपयोगी पडणार आहे. लोकमान्य टिळकांच्या राज-कारणांत या विधायक कार्याची भर टाकून त्याचें जें केवळ राजकीय क्रांति-कारक स्वरूप होतें तें महात्मा गांधींनीं पालटलें, आणि त्याला सर्वांगीण क्रांतीचें रूप दिलें. यामुळेंच महाराष्ट्रांतील राष्ट्रसभापक्षाला राष्ट्रीकरणाच्या कार्यांत अधिक यश आलें आणि ब्राह्मणेतर जनता राष्ट्रसभेंत उत्साहानें सामील झाली. केवळ राजकीय क्रांतिवाद अथवा जहाल राजकारण जनतेच्या अंतःकरणावर पूर्ण प्रभुत्व संपादन करूं शकलें नसतें, या मुद्दयाचें मार्मिक विवेचन या पुस्तकांत करण्यांत आलेलें आहे.

म. गांधींनीं लो. टिळकांच्या राजकारणांत सामाजिक व धार्मिक सुधारणांचा अंतर्भाव करून त्याला सर्वांगीण क्रांतीचें स्वरूप दिलें, त्याचप्रमाणें ही सर्वांगिण क्रांति अहिंसेच्या अधिष्ठानावर झाली पाहिजे हें ओळखून, सत्याग्रहाचें अहिंसात्मक क्रांतिशास्त्र देशापुढें ठेवून, या क्रांतीमुळें नवीन जन्मास येणाऱ्या या राष्ट्राचे शतशः तुकडे होऊं नयेत आणि क्रांतीचें फल अल्पसंख्य लष्करशाहीच्या हातीं पडूं नये अशी दक्षता घेतली आहे. याचमुळें लोकशाही राष्ट्रवाद आणि सर्वांगीण क्रांतिवाद यांचा सुंदर समन्वय झाला आहे आणि लोकमान्यप्रभृति राष्ट्रीय लोकशाहीच्या भारतीय पुढाऱ्यांना अभिप्रेत असणारें राजकारणाचें आध्यात्मिक अधिष्ठानहि निर्माण झालें आहे. पण म. गांधींच्या या राजकीय अहिंसावादामुळें लो. टिळकांचें राजकारण व म. गांधींचें राजकारण हीं परस्परविरोधी आहेत असें लोकांना भासवून महाराष्ट्रांत राष्ट्रसभापक्षाला विरोध करण्यास केसरीपक्षाला संधि मिळाली. ‘शठं प्रति शाठ्यम्’ हें लोकमान्यांचें राजकीय सूत्र आणि ‘शठं प्रति अपि सत्यम्’ हें म. गांधींचें तत्त्व यांतील विरोध लोकांपुढें ठेवून राष्ट्रसभेच्या निःशस्त्र क्रांतिवादी राजकारणापासून महाराष्ट्रीय जनतेला अलिप्त ठेवण्याचा प्रयत्न केसरीपक्षानें केला, पण तो मुळींच यशस्वी झाला नाहीं. उलट महाराष्ट्रीय जनता राष्ट्रसभेच्या राजकारणांत सामील झाली आणि केसरीला मात्र महाराष्ट्राच्या नेतृत्वास मुकावें लागलें. याची थोडी तात्त्विक मीमांसा येथें केल्यास तें अप्रस्तुत होणार नाहीं. म. गांधींनीं जो असहकारयोग व सत्याग्रह राष्ट्रापुढें मांडिला, त्याचा कायदेभंग, करबंदीसुद्धां सर्व कार्यक्रम लो. टिळकांनीं १९०५ ते १९०८ पर्यंतच्या काळांत बहिष्कारयोग या नांवानें राष्ट्रसभेपुढें ठेविला होता हें कोणासहि नाकारणें शक्य नव्हतें. याच आधारावर टिळकपक्षांतील श्री. काकासाहेब खाडिलकर, गंगाधरराव देशपांडे, अण्णासाहेब परांजपे वगैरे पुढाऱ्यांनीं म. गांधींना पाठिंबा दिला होता व लोकमान्यांच्या तेजस्वी राजकारणाची जनतेची स्मृति जोंपर्यंत ताजी होती, तोंपर्यंत केसरीलासुद्धां तसें करावें लागलें होतें. पुढें श्री. देवप्रभृतींनीं याच बहिष्कारयोगाच्या आधारावर राष्ट्रसभाच लोकमान्यांचें राजकारण चालवीत आहे आणि सत्याग्रह हेंच त्यांच्या राजकारणाचें नैसर्गिक परिणत फल आहे असें अनेकवार आग्रहानें प्रतिपादलें आहे. मग ‘शठं प्रति

शाठ्यम्' या लोकमान्यांच्या सूत्राचा 'शठं प्रति अपि सत्यम्' या म. गांधींच्या सूत्राशीं जो विरोध भासतो त्याचा निरास कसा करावयाचा ?

हा निरास व्यावहारिक राजकारण आणि आध्यात्मिक नीतिशास्त्र या दोनही दृष्टींनीं करितां येतो. प्रथमतः व्यावहारिक राजकारणाच्या दृष्टीनें विचार करूं. लोकमान्यांनीं आपल्या हयातींत जें प्रत्यक्ष राजकारण केलें तें कायद्यांची मर्यादा पाळूनच केलें. अशी मर्यादा पाळून 'शठं प्रति शाठ्यम्' या वृत्तीनें ते इंग्रजांशीं वागले. पण कायद्यांची मर्यादा पाळल्यामुळें 'शठं प्रति शाठ्यम्' या त्यांच्या धोरणास निसर्गतःच फार मर्यादा पडतात हें उघड आहे. उदाहरणार्थ, 'शठं प्रति शाठ्यम्' या सूत्राचा अर्थ सरकारनें शिक्षा दिली असतां ती न पाळणें, तुरुंगांतून पळून जाणें, शिक्षा ठोठावणाऱ्यांस देहदंड करणें असाहि होऊं शकतो; पण लोकमान्यांचें कायदेशीर राजकारण असें चालूं शकलें नसतें व तसें त्याला स्वरूप द्यावें असा त्यांचा विचारहि नव्हता हें उघड आहे. पण त्यांच्या मृत्यूनंतर कायदेशीर राजकारण संपल्यानंतर, पुढें कोणता मार्ग स्वीकारावयाचा हा प्रश्न व्यावहारिक राजकारणांत महत्त्वाचा बनला. हा प्रश्न लोकमान्यांच्या हयातींत जेव्हां उपस्थित झाला तेव्हां त्यांनीं सशस्त्र बंड किंवा सशस्त्र क्रांति असें उत्तर न देतां व्यवहारदृष्ट्या आपल्या राष्ट्रास निःशस्त्र क्रांति किंवा बहिष्कारयोग याचेंच आचरण केलें पाहिजे असें देऊन ठेविलें होतें. याचें कारण आपल्या परिस्थितींत सशस्त्र क्रांतीची संघटना करण्याचा प्रयत्न करणें हा एक पोरखेळ आहे असें त्यांच्या परिणत प्रज्ञेस पटलें होतें. बहिष्कारयोगांतील कायदेभंग, करबंदी वगैरे चळवळींच्या साहाय्यानें हिंदुस्थान एक दिवसांतही स्वतंत्र होऊं शकेल अशी त्यांनीं कलकत्त्यास १९०७ च्या जानेवारींत दिलेल्या "Tenets of The New Party" या व्याख्यानांत ग्वाही दिली आहे. अर्थात् कायदेशीर राजकारण संपल्यानंतर सशस्त्र क्रांतीच्या वृथा वल्गना करून जनतेचा बुद्धिभेद न करतां सत्याग्रहाचा, निःशस्त्र क्रांतीचा मार्ग अनुसरणें हेंच टिळकानुयायांचें स्पष्ट कर्तव्य होतें. मात्र हा मार्ग स्वीकारावयाचा तर 'शठं प्रति शाठ्यम्' या नीतीचें अवलंबन सोडून 'शठं प्रति अपि सत्यम्' या श्रेष्ठतर नीतीचा अवलंब करण्यावांचून गत्यंतर नव्हतें व नाहीं. कायद्याचीं बंधनें उल्लंघन केल्यानंतर 'शठं प्रति शाठ्यम्' या नीतीचें अवलंबन करावयाचें म्हणजे सशस्त्र क्रांतीचीच

तयारी केली पाहिजे हें स्पष्ट आहे. अशी तयारी करणें हा आपल्या परिस्थितींत पोरखेळ आहे हें श्री. केळकर यांना स्वभावतःच पटलेलें होतें. टिळकपक्षांतील परांजपे-खाडिलकर यांनीं त्यांना समजावून सांगण्याची आवश्यकता नव्हती. पण परांजपे-खाडिलकर यांनाहि लो. टिळकांच्या आजन्म शिकवणुकीनें तें अनुभवांतीं पटलें होतें. कायद्यांचीं बंधनें तर उल्लंघावयाचीं, पण सशस्त्र क्रांतीच्या क्षेत्रांत तर उतरावयाचें नाहीं असें म्हटलें कीं, 'जशास तसें' 'ठोशास ठोसा', 'शठं प्रति शाठ्यम्' ही प्राचीन राजधर्मांतील नीति सोडून 'अक्रोधेन जयेत् क्रोधम्', 'असाधुं साधुना जयेत्' 'जयेत् सत्येन चानृतम्' या श्रेष्ठतर यतिधर्मांतील नीतीचा अवलंब क्रांतिकारकांनीं करावा लागतो. ते तसें न करतील अथवा तो आदर्श आपल्यापुढें न ठेवतील तर ती क्रांति निःशस्त्र राहूं शकणार नाहीं. लो. टिळकांनीं आपल्या परिस्थितीचा भौतिक दृष्ट्या विचार करून व्यवहारदृष्ट्या बहिष्कारयोगाचा जो अचूक मार्ग शोधून काढिला होता त्याचें अखेरपर्यंत अवलंबन करून स्वराज्याशिखर गांठावयाचें तर 'शठं प्रति अपि सत्यम्' या श्रेष्ठ नीतितत्त्वावर आरूढ होऊन राजकीय क्रांतीचें कार्य चालविणें भौतिकदृष्ट्याच भरतखंडाला अपरिहार्य झालें होतें. सुदैवानें या श्रेष्ठतम नीतितत्त्वाचें आचरण करण्याच्या बिकट मार्गावरून त्याचें नेतृत्व करण्यास अधिकारी असा एक अद्वितीय कर्मयोगी महात्मा प्राचीन भारताच्या पुण्याईनें निर्माण झाला. यामुळें लो. टिळकांचा लुप्त झालेला बहिष्कारयोग सत्याग्रहाचें तेजस्वी स्वरूप धारण करून पुनः अवतीर्ण झाला आणि भारताचें व्यावहारिक राजकारण वेगानें पुढें जाऊं लागलें. ज्यांनीं त्याला विरोध केला त्यांना कोणतेंच राजकारण न करतां स्वस्थ बसावें लागलें.

आतां आध्यात्मिक नीतिशास्त्राच्या दृष्टीनें, 'शठं प्रति शाठ्यम्' आणि 'शठं प्रति अपि सत्यम्' या दोन तत्त्वांचा विचार केला तर दुसरेंच तत्त्व शाश्वत नीतिधर्माशीं सुसंगत असून, पहिला मार्ग हा केवळ अपवाद म्हणून अपरिहार्यत्वानें आचरिल्यास क्षम्य समजला गेला आहे. राजधर्मांतहि सत्य, अहिंसादि नीतिधर्मांना जे अपवाद प्राचीनांनीं मानिलेले आहेत ते गौण म्हणून व मनुष्यस्वभावांतील दुर्बलतेचा विचार करून मान्यता दिलेले आहेत. मानवतेच्या अपूर्णावस्थेचे द्योतक असे हे अपवाद आहेत, ते आचरणाऱ्यांनींहि निर्वैर बुद्धीनें केवळ साधूंच्या संरक्षणासाठींच त्यांचा अवलंब करावा, तसें

करितांना शास्त्रें प्रमाण मानावींत, निरनिराळ्या काळच्या स्थितप्रज्ञ यतींनीं या अपवादांच्या मर्यादा शास्त्रांत घालून द्याव्यात, स्थलकालपरिस्थितीस अनुसरून जुन्या मर्यादा काढून नव्या घालून देण्याचें कार्य पुढील पुढील स्थितप्रज्ञ यतींनीं साम्यबुद्धीचा आश्रय करून करीत राहावें आणि अशा क्रमानें संपूर्ण सत्य व संपूर्ण अहिंसा या दोन ध्रुवताऱ्यांच्या दिशेनें मानवसमाजाची प्रगति चालू ठेवावी हेंच आध्यात्मिक नीतिशास्त्राचें सार आहे व मनुष्यजातीची पूर्णावस्था किंवा कृतयुग-प्राप्ति हेंच सर्व नीतिशास्त्राचें, अध्यात्माचें व धर्माचें ध्येय आहे हें लो. टिळकांनीं आपल्या गीतारहस्यांत उत्कृष्टपणें दाखवून दिलें आहे. सत्य, अहिंसा यांना आमच्या शास्त्रकारांनीं कांहीं अपवाद विशिष्ट परिस्थितींत सांगितले असले तरी हे नीतिधर्म आम्ही नित्य मानतों व भौतिक दृष्टीचे नीतिशास्त्रज्ञ तसें मानीत नाहींत हेंच आमच्या आध्यात्मिक नीति-शास्त्राचें वैशिष्ट्य व श्रेष्ठत्व आहे असें लोकमान्यांनीं आग्रहपूर्वक प्रतिपादिलें आहे.

अर्थात् भारतीय स्वातंत्र्याचा प्रश्न सशस्त्र मार्गानें सुटणें शक्य नाहीं व निःशस्त्र क्रांतीनें सुटणें शक्य आहे, अशी भौतिक दृष्टीनेंच खात्री झाल्यानंतर तुम्ही अहिंसेचा नित्यधर्म सोडून तिच्या अपवादाचा गौण मार्ग कां अवलंबीत नाहीं असा आग्रह धरण्याचें अथवा म. गांधींच्या अहिंसा-वादाला सतत विरोध करून लोकांचा बुद्धिभेद करण्याचें, निदान टिळकांच्या अनुयायांना तरी, कांहीं कारण नव्हतें. त्यांतून हे लोक दुसऱ्या मार्गानें क्रांति-कार्य करीत असते तर गोष्ट निराळी होती. पण त्यांचा विरोध हा कोणत्याहि कार्यासाठीं नव्हताच असें जेव्हां जनतेला दिसून आलें तेव्हां राज्यशास्त्र किंवा नीतिशास्त्र यांतील कूट प्रश्नांचा काथ्याकूट करण्याचा कंटाळा असलेली क्रांति-प्रवण जनता अंतःप्रेरणेनेंच सत्याग्रह-संग्रामांत येऊन दाखल झाली.

मग महाराष्ट्राच्या नांवानें गेलीं २० वर्षे राष्ट्रसभेच्या सत्याग्रह-राजकारणाला सतत विरोध कां व कोणी केला? तो विरोध ज्यांच्या नेतृत्वाखालीं झाला त्यांना लो. टिळकांचा राजकीय बहिष्कारयोगच किंबहुना विशेष त्याग करावा लागणारी कोणतीहि राजकीय चळवळ स्वभावतःच अव्यवहार्य वाटत होती. आणि राजकीय कर्मयोगाला आध्यात्मिक नीतिशास्त्राचें अधिष्ठान असलें पाहिजे, ही टिळकांची तात्त्विक भूमिकाहि त्यांच्या जड भौतिक बुद्धिवादाला

पटण्यासारखी नव्हती. लो. टिळक बुद्धिवादाच्या पुढें जाऊन आत्मवादी कां बनले, त्यांच्या राष्ट्रीय राजकारणाला धर्म आणि अध्यात्म यांचें अधिष्ठान देऊनहि आपलें राष्ट्रीयत्व विशिष्टधर्मातीत त्यांनीं कसें ठेवलें, शिवाजी-उत्सवासारख्या ऐतिहासिक विभूतिपूजेच्या चळवळी करूनहि त्यांनीं त्या-पासून चालू राजकारणास अनुरूप अशींच प्रमेयें लोकांपुढें कशीं ठेवलीं आणि विद्याहीन गणलेल्या दुर्बल बहुजनसमाजांत लढाऊ राजकारण कोणत्या बळावर निर्माण केलें, यांपैकीं एकाहि प्रश्नाचा उलगडा त्यांच्या बुद्धीस झालेला नव्हता. ब्रिटिश सरकारविरुद्ध चढाईचें राजकारण त्यांनीं आज-पर्यंत कधींहि केलेलें नाहीं. उलट हिंदु राष्ट्रीयत्व आणि मुसलमान राष्ट्रीयत्व अशा द्वैती कल्पनांना चालना देऊन परकीय सत्तेचें बल आज हे वाढवीत आहेत. लोकमान्य वेदांताचा आश्रय करून सर्वधर्मसमत्वावर भारतीय राष्ट्रवादाची इमारत उठवीत होते व म्हणूनच इंग्रजांनीं हिंदुस्थानचें स्वराज्य मुसलमानांच्या हवालीं केलें तरीही तें मला चालेल असे उद्गार ते काढूं शकले व लखनौचा हिंदुमुसलमानांचा करार त्यांनीं घडवून आणला; पण त्यांचे शिष्य म्हणवून घेणाऱ्यांना आज लोकमान्यांचें हें धोरण चुकलें असेंच वाटत आहे. कारण परकीय सत्तेशीं झगडण्याचें चढाईचें राजकारण त्यांनीं आज सोडलें आहें. तात्पर्य, राजकीय बहिष्कारयोग, सर्वधर्म-समानत्वाचें राष्ट्रीयत्व आणि राजकारणाचें आध्यात्मिक अधिष्ठान यांपैकीं कोणत्याही लोकमान्यांच्या तत्त्वावर त्यांचे शिष्य म्हणवणाऱ्या या लोकांचा विश्वास नसल्यानेंच त्यांनीं गेलीं २० वर्षें राष्ट्रीय राजकारणापासून महाराष्ट्रीय जनतेला अलिप्त ठेवण्याचा निष्फळ प्रयत्न केला. पण अखेरीस आजन्म तपश्चर्या करून संपादन केलेला नेतृत्वाचा ठेवा लोकमान्यांनीं हातीं दिला असतां तो ते गमावून बसले. याच्या उलट ज्यांना वरील तीन गोष्टींतच लोकमान्यांचें खरें श्रेष्ठत्व होतें असें वाटलें त्यांनीं राष्ट्रसभेचा मार्ग स्वीकारला, राजकीय बहिष्कारयोगाला सत्याग्रहाचें मूर्त स्वरूप दिलें आणि राजकारणाला आध्यात्मिक अधिष्ठान निर्माण करून सर्वधर्मसमत्वाच्या भरभक्कम पायावर राष्ट्रनिर्मितीचें कर्मयोगी धर्मकार्य चालू ठेवलें. लोकमान्य टिळकांनीं महाराष्ट्रांत जो राष्ट्रवाद अथवा राष्ट्रधर्म निर्माण केला त्याचा त्यांच्या मृत्यूनंतरच्या वीस वर्षांचा असा त्रोटक इतिहास आहे.

पण लोकमान्य टिळकांचा राष्ट्रवादी महाराष्ट्र हाच सर्व महाराष्ट्र असें म्हणतां येणार नाहीं. त्यांना आजन्म विरोध करणारे, एक प्रागतिक व एक समाजसुधारक असे दोन पक्ष अथवा विचारप्रवाह त्यांच्या वेळच्या महाराष्ट्रांत होते. यांपैकीं प्रागतिक पक्षाचें नेतृत्व राष्ट्रांतून व महाराष्ट्रांतून लोकमान्यांनीं आपल्या हयातींतच नष्ट केलें होतें. समाज-सुधारणावादाला त्यांच्या मृत्यूच्या वेळीं ब्राह्मणेतर चळवळींचें जातीय स्वरूप प्राप्त झालें होतें. ही ब्राह्मणेतर चळवळ मॉंटफोर्ड सुधारणांच्या पहिल्या अमदानींत प्रागतिक पक्षाशीं सख्य करून राजकारणांत शिरली. पुढें या प्रागतिक अथवा मवाळ राजकीय धोरणानें मागासलेल्या जातींचा अथवा शेतकरीवर्गाचा खरा उद्धार होऊं शकत नाहीं असा अनुभव येतांच, ब्राह्मणेतर चळवळ करणाऱ्यांत राष्ट्रसभा व महात्मा गांधी यांच्या मार्गे जाण्याची स्फूर्ति निर्माण झाली. गांधीजींनीं राष्ट्रसभेला सामाजिक सुधारणेचा कार्यक्रम स्वीकारावयास भाग पाडल्यामुळें ब्राह्मणेतर जनता तिच्याकडे कशी ओढली गेली याचें विवेचन मागें केलेंच आहे. अशा क्रमानें महाराष्ट्रांतील राष्ट्रवाद आणि समाज-सुधारणावाद हे दोन्हीही राष्ट्रसभानिष्ठ व सत्याग्रही बनले.

आतां लोकमान्यांच्या मृत्यूनंतर उगम पावलेल्या महाराष्ट्रांतील आणखी एका विचारप्रवाहासंबंधीं लिहावयाचें उरलें. हा विचार-प्रवाह म्हणजे कम्यूनिझमचा शास्त्रीय समाजवाद अथवा क्रांतिकारक समाजवाद होय. या विचारांनीं भारलेल्या चळवळींनीं गेल्या २० वर्षांत महाराष्ट्रांत बरेंच आंदोलन निर्माण केलें आहे. अखिल भारतीय कम्यूनिस्ट पक्षांत महाराष्ट्रीय पुढाऱ्यांचें फार मोठें स्थान आहे. राष्ट्रसभेंतील श्री. देवप्रभृति महाराष्ट्रीय पुढाऱ्यांच्या सार्वजनिक जीवनाला प्रारंभ झाला त्याच सुमारास भाई डांगेप्रभृतींनीं मुंबईत कम्यूनिस्ट चळवळीचा झेंडा उभारला. १९२८-२९ सालापर्यंत मुंबईतील कामगारवर्गांत या पंथाचा बराच प्रसार झाला आणि कांहीं काल राष्ट्रसभेच्या सत्याग्रही चळवळीला मागें टाकून राष्ट्राचें नेतृत्व कम्यूनिस्ट पक्षच घेतो कीं काय, असेंही १९३० सालच्या प्रारंभीं कांहींना वाटूं लागलें होतें. पण १९३०-३२ सालांतील महात्मा गांधींच्या सत्याग्रह-संग्रामानंतर कम्यूनिस्ट पक्षाचें धोरण कोठें तरी चुकलें आहे आणि हिंदुस्थानांत समाजवादी ध्येयांचा प्रसार व्हावयाचा तर समाजवादानें कम्यूनिस्ट

पक्षाच्या धोरणाहून कांहीं तरी नवें धोरण स्वीकारलें पाहिजे याची जाणीव १९३०–३२ सालीं सार्वजनिक जीवनांत प्रवेश करणाऱ्या तरुण समाजवाद्यांना होऊं लागली. या तरुणांच्या मनावर पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या विचारांची छाप पडलेली होती. आणि त्यांच्या मागोमाग राष्ट्रीय स्वातंत्र्या-च्या लढ्यांत त्यांनीं उड्या घेतल्या. यांतच महाराष्ट्रांतील श्री. पटवर्धन बंधु, जोशी, गोरे, खाडिलकर हे येतात. याच तरुणांनीं १९३४ सालीं तुरुंगांतून बाहेर पडल्यावर राष्ट्रसभानिष्ठ समाजवादीपक्ष (काँग्रेस-सोशॅलिस्ट पार्टी) स्थापन केला, या वेळीं मी मुंबईतील “नवशक्ति” दैनिकाचा संपादक होतों; व या नव्या पक्षाचें अभिनंदन करितांना मीं असें लिहिलें होतें कीं, “कम्यूनिस्ट पक्षाहून स्वतंत्र असा समाजवादीपक्ष ज्यांनीं काढला आहे त्यांनीं समाजवादाचें साध्य सत्याग्रहाच्या साधनानें आपण प्राप्त करून घेऊ असें आपलें धोरण निश्चित करून घ्यावें. आणि त्याच एका निष्ठेनें त्यांनीं आपल्या कार्यास सुरुवात करावी.” अर्थात् माझ्यासारख्या केवळ लेखकाच्या सूचनेला कोणी विशेष महत्त्व देईल अशी माझी अपेक्षा नव्हती. पण कम्यूनिस्ट पक्षाहून स्वतंत्र असा समाजवादी पक्ष जर स्थापन करावयाचा तर त्याला तात्त्विक मतभेदाचा निःसंदिग्ध आधार हवा. तो कोणता असावा हें मीं दिग्दर्शित केलें होतें येवढेंच. यानंतर आजपर्यंतच्या कालांत या पक्षाच्या धोरणांत जे फेरफार घडत आले आहेत त्यांवरून राष्ट्रसभेंतील समाजवादी पक्ष अनत्या-चारी क्रांतीचें सत्याग्रही धोरण निष्ठापूर्वक स्वीकारील ही माझी आशा दृढतर झाली आहे. पंडित नेहरू यांनीं अनत्याचारी क्रांतितंत्राचा उपयोग समाज-वादाच्या प्रस्थापनेस करणें शक्य व अवश्य आहे असें अनेकवार जाहीर केलें आहे. भाई जयप्रकाश नारायण यांनीं रामगडच्या अधिवेशनापुढें ठेवण्यासाठीं म्हणून जो एक समाजवादी ठराव पाठविला होता. त्याला महात्मा गांधींनीं केवळ बड्या संस्थानिकांसंबंधींचें कलम वगळून “हरिजनां”तून पूर्ण पाठिंबा दिला आहे. तसेंच समाजवादी कार्यकर्त्यांनाहि अनत्याचारी क्रांतितत्त्वाचें सत्याग्रहीतत्त्व पुष्कळ प्रमाणांत पटूं लागल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. अशा प्रकारें स्वतंत्र भारतांत सत्याग्रहाला समाजवादी स्वरूप प्राप्त होईल अथवा समाजवाद सत्याग्रहाचा अवलंब करील हें माझें मत खरें ठरत असल्याचें

समाधान मला होत आहे. चालू महायुद्ध सुरू झाल्यापासूत भारतीय क्रांतीचें नेतृत्व करण्यास सत्याग्रहच समर्थ आहे हें पुन्हा एकदां सिद्ध झालें आहे.

१९३२-३३ सालीं नाशिकच्या तुरुंगांत असतांना देव-गाडगीळप्रभृति पुढाऱ्यांशीं माझीं जीं बोलणीं होत त्यांवरून महाराष्ट्रांत सत्याग्रह आणि समाजवाद या दोन विचार-प्रवाहांतील मतभेद व गैरसमज फार झपाट्यानें नाहींसे होतील अशी माझी समजूत झाली. त्यानंतर " नवशक्ति " आणि " लोकशक्ति " या वृत्तपत्रांतून मी या धोरणाचाच प्रचार करीत असें. १९३५ ते ३७ मधील काळांत श्री. देवप्रभृतींचें धोरण समाजवादी पक्षाशीं व कार्यकर्त्यांशीं सहकार्याचें कां व कसें होतें त्याचें वर्णन व विवेचन या पुस्तकाच्या उत्तरार्धात थोडेंसें आलें आहे. सत्याग्रही व समाजवादी या दोन पक्षांतील महाराष्ट्रांत दिसून येणारे हे सलोख्याचे व सहकार्याचे संबंध इतर प्रांतांत दिसत नव्हते. यामुळें राष्ट्रसभेच्या महाराष्ट्रीय कार्याला एक नवी इष्ट दिशा लागत आहे अशी माझी खात्री पटत गेली, व तो आशावाद माझ्या अनेक लेखांत व्यक्त होत गेला. राष्ट्रसभेचें फैजपूर-अधिवेशन व त्यानंतरच्या निवडणुकी या काळांत हा आशावाद कळसास पोंहोचला होता. श्री. देव यांचें श्री. पटवर्धन, गोरे, जोशी, खाडिलकर यांच्याशीं सहकार्य वाढत होतें.

१९३७ सालीं अधिकारस्वीकार झाल्यानंतर मात्र या माझ्या आशावादास धक्का बसला. आणि इतर प्रांतांप्रमाणें महाराष्ट्रांतही सत्याग्रही व समाजवादी या पक्षांत तीव्र मतभेद होऊं लागले. सुदैवानें मी या वेळीं अगदींच एका बाजूस जाऊन राहिलों होतों. पण या कालचा इतिहास या पुस्तकांत आलेला नाहीं; व तो निर्विकार मनानें लिहिण्याचा काळहि अद्यापि प्राप्त झाला नाहीं, असें मला वाटतें. तथापि सत्याग्रही व समाजवादी या दोन्ही पक्षांच्या सहकार्याचा व त्यांच्या समन्वयाचा काळ निकट येत आहे, अशी माझी आशा मात्र पुन्हा वृद्धिंगत होत आहे. भारतीय समाजवादाला सत्याग्रहाचें क्रांतिशास्त्र स्वीकारावें लागेल आणि सत्याग्रहाला समाजवादांत अंतर्भूत होणारीं सामाजिक रचनेचीं तत्त्वें आत्मसात् करावीं लागतील, तरच स्वतंत्र भारताचें राष्ट्रीयत्व आणि लोकशाही सुरक्षित राहतील हें मत दोन्ही पक्षांच्या कार्यकर्त्यांना पटण्याचा काळ फार दूर नाहीं. असें होईल त्या वेळीं सर्व महाराष्ट्र सत्याग्रही बनला असें निश्चयपूर्वक म्हणतां येईल. आणि

शेतकरीवर्गाप्रमाणें महाराष्ट्रीय गिरण्यांतील कामकरीवर्गहि राष्ट्रसभापक्षांत मनोभावानें सामील झाल्याचें दृश्य दिसूं लागेल. मुंबईतील कामकरीवर्गांत श्री. आंबेकरप्रभृति कार्यकर्त्यांनीं जें संघटनेचें कार्य सुरू केलें आहे त्याला असें फळ येणें अगदीं शक्य आहे.

महाराष्ट्रांतील पुरुषवर्गाप्रमाणें महिलावर्गावरहि सत्याग्रही तत्त्वज्ञानाचे संस्कार होणें अवश्य आहे. या दृष्टीनें या पुस्तकाच्या लेखिका श्री. प्रेमाबाई यांचें मला विशेष महत्त्व वाटतें. सत्याग्रही तत्त्वानुसार महिलांची जागृति व संघटना महाराष्ट्रांत अद्यापि निर्माण झालेली नाहीं. पूर्वीच्या सुधारकपक्षांतील स्वातंत्र्य-वृत्ति, राष्ट्रीय पक्षाची सनातनी वृत्ति आणि अलीकडील एकराष्ट्रीयत्वाला मारक हिंदुसभावृत्ति या वृत्तीच महाराष्ट्रीय महिलांत अद्यापि बऱ्याच अंशानें दिसून येतात. सत्याग्रही वृत्तींत सनातनी वृत्तींतील संयम व त्याग आणि सुधारक वृत्तींतील स्वातंत्र्य, स्वावलंबन, निर्भयता आणि पुरोगामित्व या सर्वांचा समन्वय अभिप्रेत आहे. प्रेमाबाईच्या ठिकाणीं निष्पाप निर्भय वृत्ति आणि निःस्वार्थ संयमी स्वातंत्र्यवृत्ति यांचा मिलाफ झालेला आहे. सत्याग्रहाची त्यांनीं दीक्षा घेतलेली आहे. निष्ठापूर्वक व कष्टपूर्वक लोकसेवा करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं आहे. स्वतंत्र विचार व लेखन करण्यास लागणारे गुणहि त्यांच्या अंगीं आहेत हें या पुस्तकावरून दिसून येईल अशी मला आशा आहे. महाराष्ट्रीय महिलावर्गांत सत्याग्रही निष्ठा जागृत करण्यास त्यांच्या हातून पुष्कळ कार्य घडून यावें अशीच कोणीहि इच्छा करील.

सत्याग्रह हें एक वैयक्तिक व सामाजिक जीवनाकडे पाहण्याचें नवें दर्शन आहे. यांतून एक सर्वांगीण सामाजिक तत्त्वज्ञान निर्माण होत आहे व त्याचें स्वरूप जागतिक आहे. ज्याप्रमाणें व्यक्तिवाद, राष्ट्रवाद आणि समाजवाद अशीं तीन सामाजिक तत्त्वज्ञानें आधुनिक युरोपांत निर्माण झालीं त्याचप्रमाणें आधुनिक भारतांत निर्माण झालेलें हें एक स्वतंत्र तत्त्वज्ञान आहे. युरोपांत निर्माण झालेलीं वरील तत्त्वज्ञानें तिकडील इतिहासांतील निरानिराळ्या संघर्षांतून जन्मास आलीं. तसेंच सत्याग्रह हें तत्त्वज्ञानही भरतखंडाच्या राष्ट्रीय लढ्यांतून निर्माण होत आहे. त्याचें स्वरूप अद्यापि वर्धिष्णु आहे. आणि आज केवळ परकीय सत्तेशीं झगडण्याचें एक शस्त्र असेंच स्वरूप त्याला प्राप्त झालें असलें तरी हें त्याचें मर्यादित कार्य संपल्यानंतर अहिंसक

राष्ट्ररचना अथवा समाजरचना करून दाखविणें आणि व्यक्तिस्वातंत्र्य, राष्ट्रीय स्वातंत्र्य सामाजिक व आर्थिक समता आणि समाजसत्ता इत्यादि रूपांनीं समाजापुढें येणाऱ्या समस्या सोडवून दाखविणें हें त्याचें स्वतंत्र भारतांतील स्वाभाविक कार्य आहे. हेंच कार्य करितांना त्याचें राष्ट्रवादी स्वरूप पालटून त्यास समाजवादी स्वरूप धारण करावें लागेल असें माझें मत आहे. अशा व्यापक सामाजिक तत्त्वज्ञानाकडे पाहत असतां केवळ प्रांताभिमानाची अथवा राष्ट्राभिमानाची संकुचित दृष्टि स्वीकारणें अगदीं चुकीचें आहे. भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत संकुचित प्रांताभिमान, जातीय अभिमान व संकुचित धर्माभिमान हे वितळून जात आहेत. भारतांतील सर्व प्रांतांत, सर्व जातींत व सर्व धर्मांत एक संस्कृति निर्माण होत आहे, ही संस्कृति सत्याग्रही बनेल व या सत्याग्रही भारतापासून आपल्यापुढें येणाऱ्या समस्या सोडविण्याचें साधन इतर राष्ट्रांस प्राप्त होईल. अर्थात् असें झालें तरी या सत्याग्रही संस्कृतीचें निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळें स्वरूप प्रकट होणें स्वाभाविक व इष्ट आहे. या दृष्टीनें सत्याग्रही गुजरात, सत्याग्रही महाराष्ट्र अथवा सत्याग्रही बंगाल यांत भेद होऊं शकेल, व त्या भेदांत त्या त्या प्रांताचें वैशिष्ट्य प्रकट होईल. पण त्याचें विवेचन करण्याचा काळ अद्यापि पुढें आहे. आज महाराष्ट्रांत ही सत्याग्रही संस्कृति प्रथम कोणत्या स्वरूपांत निर्माण झाली व तिची आजपर्यंत कशी वाढ झाली येवढेंच दाखवून देणें शक्य आहे. या पुस्तकानें या विषयाचा योग्य प्रकारें उपक्रम होत आहे असें मला वाटतें व त्याच दृष्टीनें त्याला मी महत्त्व देतों. महाराष्ट्रीय जनता या दृष्टीनें त्याचें स्वागत करील व आपणांतील सत्याग्रही वृत्ति अधिकाधिक जागृत करील अशी मला आशा वाटते.

शं. द. जावडेकर

# अनुक्रमणिका





## खंड पहिला–घर्षण

## खंड दुसरा—आंदोलन



## खंड तिसरा—मंथन

“ आशबे ना से भिक्षा निते ना, ना, ना;
लडाई करे नेबे जिते पराणाटि तोमार
ए जे आशबे वीरेर साजे ”

— रवींद्रनाथ ठाकूर

[ “ छे ! छे ! छे ! हा कांहीं भिक्षा मागायला येणार नाहीं. हा तर वीरवेषांत सज्ज होऊन येईल आणि लढून तुझ्या प्राणांना जिंकून घेईल.” ]

" आशबे ना से भिक्षा निते ना, ना, ना;
लडाई करे नेबे जिते पराणाटि तोमार
ए जे आशबे वीरेर साजे "

— रवींद्रनाथ ठाकूर

[ " छे ! छे ! छे ! हा कांहीं भिक्षा मागायला येणार नाहीं. हा तर वीरवेषांत सज्ज होऊन येईल आणि लढून तुझ्या प्राणांना जिंकून घेईल." ]

# पुनरुत्थान



**३१** जुलै १९२० च्या उत्तररात्रीं भारतवर्षाच्या आनंदवन-भुवनाचा आनंद मृत्यूच्या काळरात्रीमागें अदृश्य होत होता!

भगवन्ताच्या लीलासृष्टींत असंख्य माणसें जन्माला येतात व विलयाला जातात. त्यांचें जीवनरहस्य समाजाला महत्त्वाचें वाटत नसतें. कारण आयुष्य कसें तरी पुरें करण्याकडे त्यांची वृत्ति असते. तशा अनाथ वृत्तीच्या मानवी-प्राण्याची कदर समाज कां करील? परंतु वीरपुरुषांची गोष्ट वेगळीच असते. समाजाला पावन करणाऱ्या तेजस्वी पुण्यपुरुषांच्या मृत्यूनंतर देखील त्यांची पुण्यतिथि सालोसाल करण्यांत समाज स्वतःला धन्य मानीत असतो.

लोकमान्यांनीं महाराष्ट्रांत प्राण ओतला होता. त्याचें राजकीय जीवन उन्नत केलें होतें. अखिल हिंदराष्ट्राचें भवितव्य स्वातंत्र्याच्या फलकावर आलेखिलें होतें. आपल्या वीरकर्मांनीं तरुणांत उत्साह निर्माण केला होता. प्रजेला भयभीत दशेंतून मुक्त होण्याचा मार्ग दाखविला होता.

कॉलेज-जीवन संपूर्ण झाल्यापासून देशोद्धारासाठीं त्यानीं केलेल्या विविध प्रवृत्तींची व कर्मयोगाची वर्षानुवर्षें सतत परंपरा लागली होती. त्यांचा अखंड उद्योग विविधरूपांनीं प्रकट झाला होता. त्यांनीं स्थापन केलेल्या अनेक शैक्षणिक व राजकीय संस्था, त्यांचीं प्रखर मुखपत्रें, त्यांचे विद्वन्मान्य ग्रंथ, त्यांचे दौरे, भाषणें, तुरुंगवास, चळवळी, सार्वजनिक, उत्सव, नोकर-शाहीशीं अनेक क्षेत्रांवरून केलेला सामना या सर्व गोष्टी महाराष्ट्राच्या दृष्टीसमोर ताज्या होत्या. महाराष्ट्राची त्या वृद्ध नेत्याबाबतची अपेक्षा दिवसेंदिवस वाढतीच होती. वयानें वृद्ध आणि देहानें क्षीण झालेला तो कर्मयोगी तरुणांनाही लाजवील अशा उत्साहानें राष्ट्रव्यापी चळवळीचा शोध करीत होता. स्वराज्य हें त्यांच्या जीवनाचें अमृत होतें. त्याच्या प्राप्तीसाठीं त्यानें चाळीस वर्षें अनन्य उपासना केली. आणि आपली अवतारसमाप्ति होण्याचा

समय नजीक येतांच भीष्माचार्यांप्रमाणें तो विक्रमवीर शरपंजरीं पडला. " मृत्यूनेंच त्याला पहिली-वहिली शांति दिली ! "

* * *

स्वराज्यमंत्राचा तो महान् ऋषि आपलें जीवनसाफल्य करून परलोकवासी झाला; परंतु आपल्या देशबांधवांना प्रेरणा देऊन गेला. छिन्नभिन्न झालेल्या राष्ट्रास त्यानें राष्ट्राभिमानाच्या नवौषधीनें परिपुष्ट केलें. लोकमान्यांनीं महाराष्ट्राच्या सार्वजनिक आयुष्यांत प्रवेश करतांच महाराष्ट्राच्या इतिहास जिवंत बनला. त्या महाराष्ट्र-केसरीच्या पराक्रमी आत्म्याला शांति देण्यासारखा पुरुषार्थ करून दाखविणें हें महाराष्ट्राच्या शिरावर ऋण होतें. आणि स्वदेश-सेवेची दीक्षा घेऊन, तिच्यासाठीं लागेल तितकें बलिदान देऊन, स्वराज्याचा अधिकारी बनल्यानेंच तें ऋण फिटणार होतें. स्वाभिमानशून्य व हतोत्साह झालेल्या महाराष्ट्रानें लोकमान्यांच्या हयातींत काय केलें तें जाणणें महत्त्वाचें नाहीं. कारण तो वीरपुरुष जिवंत होता, तेव्हां त्याच्या मर्दुमकीनें त्रिखंड गाजत होतें. समाजाचा पुरुषार्थ नेत्याच्या पराक्रमांत लोप पावला होता. परंतु चाळीस वर्षे तपस्या करून महाराष्ट्राच्या कलेवरांत प्राण ओतल्यावर नेत्याच्या पश्चात् त्याच्या उर्वरित तेजानें कोणता पुरुषार्थ करून दाखविला, महापुरुषाचा वारसा त्याच्या अनुयायांनीं कसा टिकविला, त्याचा जीवन-मंत्र कसा सफल करून दाखविला आणि त्याचें कर्ज कसें फेडलें तें जाणून घेणें अधिक अगत्याचें होईल.

* * *

लोकमान्यांनीं आपल्या अनुयायांस कोणता महत्त्वाचा वारसा दिला होता? 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' असें म्हणणारे लोकमान्य, स्वातंत्र्याच्या तहानेनें तळमळणारे लोकमान्य, " जीवन सुधारा, संप करा आणि आजची स्थिति जाणून घ्या " असा मुंबईच्या मजुरांस उपदेश करणारे लोकमान्य, लखनौ कॉंग्रेससमयीं " प्रथम देशाचा विचार केला पाहिजे. मी हिंदु आहे किंवा मुसलमान हा भेद देशहिताचा विचार करतांना मनांत आणतां कामा नये " असें सांगून मुसलमान जेवढें मागत होते तेवढें सारें देण्याचा हिंदूंस आग्रह करणारे लोकमान्य, " खलाशाचें काम करणाऱ्याला एखादे दिवशीं समुद्रांत

बुडण्याचाही प्रसंग येतो. त्याचप्रमाणें देशसेवा करणाऱ्याला जेलयात्रेचाही प्रसंग यावयाचा " असें म्हणणारे निर्भयवृत्ति लोकमान्य, " फुसक्या आपटबारानें कांहीं इंग्रज लोक भिणार नाहींत. त्यांना खऱ्या दारूचे बार वाजविण्यास शिकविण्यासाठीं तुम्हांस मर्द बनलें पाहिजे" असा मर्दुमकीचा उपदेश करणारे लोकमान्य, " राष्ट्राकरितां फकीर बनण्यास तुम्ही तयार आहां काय ! बुद्धिमान् ब्राह्मणाचीं मुलें महाराष्ट्रांत रामदासांच्या शिष्यांप्रमाणें फकीर म्हणून हिंडण्याची वेळ आतां आली आहे" असें सांगून तरुणांस फकीरीची दीक्षा देणारे लोकमान्य, " देशाभिमान हा विश्वबंधुत्वाचा धाकटा भाऊ आहे" असें सांगून स्वतःची विश्वकुटुंबकवृत्ति सिद्ध करणारे लोकमान्य, देशास– विशेषतः महाराष्ट्रास एक महत्त्वाचा आदेश देऊन गेले होते. त्यांच्या वर्तमानपत्रांनीं महाराष्ट्रांत राजकीय जागृति केली. शिक्षणसंस्थांनीं तरुणांत चैतन्य आणलें; राष्ट्रीय उत्सवांनीं वीरधर्माचें आवाहन केलें, व्याख्यानांनीं प्रजाक्षोभ व्यक्त केला, ग्रंथांनीं 'आर्यबुद्धि वंध्या झाली नाहीं' हें साऱ्या जगाला जाहीर केलें, स्वदेशी, बहिष्कार व मद्यपाननिषेध यांच्या चळवळींनीं प्रजेचें जीवन स्वावलंबी व विशुद्ध करण्याचा प्रयत्न केला. परंतु स्वराज्यप्राप्तीसाठीं तळमळणाऱ्या हृदयाचा खरा संदेश, हताश राष्ट्राला आशेचे किरण दाखविणारा आणि ध्येयापर्यंत पोंहोचण्यासाठीं मार्गदर्शन करणारा खरा संदेश त्यांच्या मुखांतून कलकत्त्यांतील त्यांच्या एका व्याख्यानांत उसळून आला. त्या समयीं क्रान्तिवादी लोकमान्यांचें खरें हार्द ज्वालामुखींतील तप्तरसाप्रमाणें तुफान वक्तृत्वांत प्रकट झालें आणि त्यानें त्यांच्या सच्छिष्यांच्या हृदयांत कायमचा ठाव घेतला.

* * *

वंगभंगामुळें बंगाल खवळून उठला होता. " इंग्रजी राज्य आणि इंग्रजी राष्ट्र यांशीं परिपूर्ण अहसकार" अशी गर्जना त्यानें केली. तिकडे नेमस्तांच्या नेतृत्वाखालीं कॉंग्रेसनें आपलें 'क्रीड' ठरवून या 'जहाल' लोकांचा संबंध तोडून टाकिला. प्रजा स्वावलंबनाचा मार्ग चोखाळूं पाहत होती, सरकार दंडनीतीचा निष्ठुर प्रयोग करीत होतें, तरुणांच्या भावना उसळत होत्या, आणि कॉंग्रेसचा अंकुश त्या लोकांवरून दूर झाला होता. अशा वेळीं अचानक बंगाल्यांत 'युरोपचें आसुरी हत्यार– बॉम्ब हें अवतीर्ण' झालें. टिळकांच्या

स्वातंत्र्यप्रिय मनाला काँग्रेसची भीरुनीति असह्य वाटली, तसा सरकारच्या दंडनीतीनेंही त्यांना त्वेष चढला. सांपळ्यांत कोंडलेल्या सिंहाप्रमाणें चडफडत असतां भारतविमोचनाचे विचार त्यांच्या अंतःकरणांत उसळून येऊं लागले. सर्व बाजूंनीं निर्बल झालेल्या राष्ट्राच्या हातीं कोणतें शस्त्र द्यावें म्हणजे तें जगांतील बलिष्ठ साम्राज्यशाहीशीं यशस्वी सामना करण्यास लायक होईल, असा विचार करीत असतां दुखावलेल्या बंगाल्यास सांत्वनपर आणि स्फूर्तिप्रद असें दुहेरी भाषण त्यांच्या वैखरींतून बाहेर पडलें आणि बहिष्काराचा तो जाज्वल्य संदेश लोकमान्यांच्या मरणानंतरही जिवंत राहिला.

नश्वर देह गेला तरी आत्म्याचे स्फुलिंग कायम राहतात आणि योग्य इंधनांच्या साहाय्यानें पेट घेतात. १९०७ च्या जानेवारींत भरताच्या आकाशांत जे स्फुलिंग उडून गेले ते १९०० मध्यें लोकमान्य समाधिस्थ होण्याचीच जणूं वाट पाहत होते. साडेतीन हातांचा देह भस्मीभूत करणाऱ्या ज्वाला समुद्रकिनाऱ्यावर पेट घेत असतां त्या स्फुलिंगांनींही जणू पेट घेतला व आत्मस्वरूपानें राष्ट्रास व्यापून राहिलेल्या त्या परलोकवासी नेत्याप्रमाणेंच त्यांनींही दुसऱ्याच दिवशीं राष्ट्रव्यापी विराट् आंदोलनाचें स्वरूप धारण केलें! महर्षीचा मंत्र प्रभावी झाला!

* * *

लोकमान्यांचा आत्मा अनुभवाचे बोल बोलत होताः—

" नोकरशाहीकडे अर्ज-विनंत्या व्यर्थ आहेत. ब्रिटिश राष्ट्राला विनविण्याच्या मार्गावर जुन्या पक्षाचा विश्वास आहे; आमचा नाहीं.

" आमच्यापाशीं दुसराही एक मार्ग आहे. आम्ही कांहीं स्वस्थ बसणार आहों असें नाहीं. आमचें ध्येय साध्य करण्याकरितां आमचेही कांहीं मार्ग आहेत.

" ( इंग्लंडांतील ) सरकार उदारपक्षाचें असो, नाहीं तर हुजूरपक्षाचें असो, तें सुखासुखी तुम्हांला कांहींही देणार नाहीं.

" जेत्यांनीं जितांना बहाल केलेल्या सवलतींनीं साम्राज्यें नष्ट होत नाहींत.

" मागणी करणें आणि अर्ज करणें यांत फार फरक आहे. आमची मागणी फेटाळली जाणें अशक्य आहे या जाणीवेनें ती झाली पाहिजे.

" आम्ही आमची एक योजना घेऊन पुढें आलों आहों. तुम्हीं ती पसंत केली तर जुन्या पक्षापेक्षां या पद्धतीनें हल्लींची ही परिस्थिति बदलून घेण्याला तुम्ही जास्त समर्थ व्हाल. तुमचे उद्योगधंदे रसातळाला गेले आहेत. परकीय अमलानें ते मारले गेले आहेत. तुमची संपत्ति देशाबाहेर वाहून नेली जात आहे. मनुष्याला जितक्या खालच्या दर्जाला नेतां येईल तितक्या हीन दर्जाला तुम्हांला पोंचविण्यांत आलें आहे. अशा परिस्थितींत तुम्हांला दुसरा कांहीं उपाय आहे काय ? याला अर्ज करणें हा उपाय नसून बहिष्कार हाच उपाय आहे. आम्ही म्हणतों, तुम्ही आपली तयारी करा, शक्ति संघटित करा, आणि मग अशा तऱ्हेनें कामाला लागा, कीं तुमची मागणी नाकारणें शक्य राहणार नाहीं.

" तुमची मागणी नाकारली गेली तर त्याकरितां झगडण्याची तुमची तयारी आहे काय ? असेल तर तुमची मागणी नाकारली जाणार नाहीं ही खात्री बाळगा आणि तयारी नसेल तर ती नक्की फेटाळली जाणार आणि कदाचित् कायमची फेटाळली जाणार हें पक्कें समजा.

"आमच्याजवळ शस्त्रें नाहींत. आणि शस्त्रास्त्रांची जरूरीही नाहीं. आमच्या-जवळ त्याहूनही बलवान् शस्त्र आहे. हें राजकीय शस्त्र आहे. तें म्हणजे बहिष्कार. आम्हीं ही गोष्ट हेरली आहे कीं मूठभर इंग्रजांनीं चालविलेलें सर्व राज्यतंत्र आमच्याच साहाय्यानें चालविलें जात आहे. आपण सर्व सेवेकरी झालों आहों.

" सर्व राज्यकारभार आमच्याच साहाय्यानें चालला आहे व आमच्या आपापसांतील सहकार्याच्या सामर्थ्याची जाणीव आम्हांला होऊं नये इतक्या अज्ञानांत आम्हांला ठेवण्यांत आलें आहे. आमच्या हातांत सर्व सत्ता पाहिजे हाच महत्त्वाचा मुद्दा आहे. स्वराज्य हें आमचें ध्येय आहे. सध्यां आपण नुसते खर्डे घाशीत आहोंत; इतकेंच नव्हे तर परकी सरकारच्या हातांतील आमच्यावरच जुलूम गाजविणारीं हत्यारें आहोंत. सरकार स्वतःच्या सामर्थ्यावर आमच्यावर राज्य करीत नसून वरील वस्तुस्थितीविषयीं आम्हांला अज्ञानांत व अंधारांत ठेवूनच राज्य करीत आहे. हें राजकारण आहे. आजपर्यंत आम्ही

या नीतीला फसत आलें; परंतु तुमचें भवितव्य सर्वस्वीं तुमच्याच हातांत आहे. हें ओळखण्यास शिका असें नव्या पक्षाचें म्हणणें आहे.

" तुम्हांला स्वतंत्र व्हावयाची इच्छा असेल तर तुम्ही स्वतंत्र व्हाल. नसेल तर परतंत्रच राहाल. कायमचे परतंत्र राहाल.

" तुम्हांला सशस्त्र प्रतिकार करावयाची शक्ति नसली तरी या परकी सरकारला आपल्यावर राज्य करण्याला मदत मिळणार नाहीं अशा तऱ्हेनें आत्मत्याग व आत्मसंयम करण्याची शक्ति तुमच्याजवळ नाहीं काय ? हाच बहिष्कार. आणि आम्ही जेव्हां बहिष्कार हें राजकीय शस्त्र आहे असें म्हणतों तेव्हां त्याचा हाच अर्थ असतो.

**" सारा गोळा करण्याकरितां व शांततारक्षणाकरितां आम्ही त्यांना साहाय्य करणार नाहीं; हिंदी रक्तानें व पैशानें हिंदुस्थानच्या सरहद्दी-बाहेरच्या लढाया मारण्याकरितां आम्ही त्यांना मदत करणार नाहीं. आम्ही स्वतःचीं कोर्टें स्थापन करूं व वेळ आल्यावर करही भरणार नाहीं.** तुम्ही आपल्या संघटित सामर्थ्यानें हें करूं शकाल काय? करूं शकत असाल तर उद्यांपासून तुम्ही स्वतंत्र व्हाल.

" निवळ भावनेसरशीं आम्ही हा आरडाओरडा करीत आहों असें समजूं नका. त्याच्यामागें एक विचारसरणी आहे. ही विचारसरणी समजून घेण्याचा प्रयत्न करा. शक्य तितकें स्वतःच्या कर्तबगारीवर विसंबून राहण्याचा हा धडा आहे. त्यांतील खरें मर्म तुम्हांला उमगलें असेल, तुमची खात्री पटली असेल तरच तुम्ही सध्यां जींत खितपत पडलां आहांत त्या परकीय सत्तेपासून आपली सुटका करून घेऊं शकाल ! "

* * *

कॉंग्रेसच्या क्षेत्रांत त्या वेळीं दुर्बलांचें व पराजितांचें राजकारण चालू होतें. तत्कालीन पुढाऱ्यांस हा सामर्थ्यशाली नवविचार रुचला नाहीं. जनता तर अज्ञ होती. पुढारी आणि जनता यांच्यामध्यें समुद्र पसरला होता. जनतेच्या हृदयापर्यंत नेऊन नवसंदेश भिडविण्याचें काम कोणाच्यानें करवलें नाहीं. लवकरच लोकमान्यांना कारावास मिळाला.

वर्षोमागून वर्षे गेलीं आणि स्वातंत्र्याचा प्रभातकाळ जवळ येऊं लागला. वरील ऐतिहासिक उद्गार बीजरूपानें क्षेत्रांत जीवनरस शोधीत होते. ते चिरंतन राहावे अशीच भारताच्या इतिहासविधात्याची योजना होती. यथाकालीं त्यांना अंकुर फुटले. परंतु त्यापूर्वी मन्त्रद्रष्टा निजधामास गेला!

सामान्य वारकरी नुसते टाळ कुटतात, पण भजनांतील भव्य आत्मा तुकारामासारखा एखादा संतच पाहूं शकतो. महात्मा गांधी स्वतःला लोकमान्यांचे शिष्य म्हणवीत नव्हते परंतु त्यांच्या जीवनांतील खरें रहस्य तेच पाहूं शकले आणि आपली अलौकिक श्रद्धा व प्रचंड धर्मतेज यांच्या जोरावर त्यांनीं लोकमान्यांचा "तुम्ही उद्यांपासून स्वतंत्र व्हाल" हा संदेश 'एका वर्षात स्वराज्य' संपादन करण्याच्या कल्पनेंत उतरविला. टिळकांच्या बहिष्कार-योगास त्यांनीं अहिंसेचें अधिष्ठान दिलें व सत्याग्रहाचें अमोघ शस्त्र निर्जीव राष्ट्राच्या हातीं देऊन त्यास सजीव केलें! राष्ट्राचा आत्मा जागृत करण्यासाठीं लोकमान्यांचा आत्मा जणूं महात्माजींत प्रविष्ट झाला! आणि तें उर्वरित तेज असाधारण रीतीनें तळपत राहिलें!

---

# १ भूमिका



इतिहास हा समाजांतील सतत चालणाऱ्या विविध संघर्षांचा दर्पणरूप आहे ही गोष्ट सर्वमान्य आहे. परंतु त्याचें दर्शन पुष्कळदां संकुचित स्वरूपाचें व एकांगी असतें. सर्वसाधारणपणें राजकीय घटनांचाच त्यांत समावेश केला जातो आणि इतर बाबींना फाटा देण्यांत येतो. पण समाजाला अनेक बाजू असतात व प्रत्येक बाजू आपापल्यापरी अव्वल महत्त्वाची असते ही गोष्ट आपण विसरतां कामा नये. प्रत्येक क्षेत्रांतील घटना इतर क्षेत्रांवर कमी-अधिक प्रमाणांत परिणाम घडवून आणितात. जीवन विविध असलें तरी तें मूलतः एक आहे आणि त्यांतील निरानिराळे प्रवाह एका अदृश्य रज्जूनें परस्परांशीं बांधले गेले आहेत. यामुळेंच एखाद्या समाजाचा अभ्युदय झाला किंवा त्याचें पतन झालें तरी तें सर्व बाजूंनीं होत जातें हें आपण पाहतों. समाजांत निरनिराळ्या क्षेत्रांतून वावरणाऱ्या सर्व व्यक्ति या उत्कर्षा-पकर्षाला कारण असतात. सूक्ष्म दृष्टीनें पाहणाऱ्यास व अभ्यास करणाऱ्यास समाजांतील या गुणदोषात्मक सर्व क्रियांचें नीट आकलन झाल्याविना राहणार नाहीं. केवळ राजकीय घडामोडी अथवा केवळ धार्मिक भावना एवढ्याच सामाजिक परिस्थितीच्या मुळाशीं आहेत असें त्याला बिलकूल म्हणतां येणार नाहीं. त्यामुळें देशाच्या एखाद्या विशिष्ट संक्रमणावस्थेचा इतिहास जेव्हां लिहिला जातो तेव्हां तो अशा एकांगी दृष्टीनें लिहिला गेल्यास अपूर्णच राहील हें उघड आहे.

व्यक्तींचा समाज बनला जातो ही गोष्ट खरी असली तरी एखाद्या व्यक्तीच्या विकासाचा इतिहास व संपूर्ण समाजाच्या उन्नतीचा इतिहास यांत पुष्कळच फरक आहे. व्यक्तीचा इतिहास लिहिणें सोपें आहे. समाजाचा लिहिणें कठीण आहे. जीवनाची पूर्णता प्राप्त करून घेणें हें दोघांचेंही एकच ध्येय असलें तरी उभयतांच्या मर्यादा भिन्न आहेत. व्यक्ति स्वतंत्रपणें आपला मार्ग चोखाळूं शकते. स्वतःवर तिचें नियंत्रण अमर्याद राहूं शकतें. आपल्या

भावना, आपली बुद्धि, आपली कार्यक्षमता यांवर तिचा अनिरुद्ध ताबा चालूं शकतो. समाजाचें तसें नाहीं. व्यक्तीला दृष्टि ( vision ) असूं शकते. समाजाला ती नसते म्हणूनच तो द्रष्टयाची अपेक्षा करितो. समाजाला कल्पनाशक्ति नसते. इतरांच्या सुखदुःखाची जाणीव व्यक्तीला असूं शकेल, समाजाला असत नाहीं. अन्यायाबद्दल त्वेष व्यक्तींच्या हृदयांत खळबळ माजवून सोडील. समाजांत खळबळ उत्पन्न करण्यास काळ लागतो; साधनें लागतात. जागृतीलाच जर एवढा अवकाश लागतो तर क्रियेला उद्यत होण्यास समाजाला किती काळ लागत असेल त्याची कल्पनाच करावी !

समाजांत अनेक थर असतात, त्यांचें वजन त्याला नेहमीं खालच्या पातळीकडेच ओढीत असलें तर त्यांत आश्चर्य नाहीं. कुशाग्रबुद्धिव्यक्तींपेक्षां जडबुद्धींचाच भरणा समाजांत अधिक असतो हें एक झालेंच. पण आर्थिक परिस्थितीचा पगडाही समाजावर कमी नसतो. जगण्यासाठीं रात्रंदिवस धडपड करून देखील पुरतें अन्नवस्त्र न मिळणारे लाखों लोक मेंढरांसारखे दुर्बळ व परावलंबी बनल्यास नवल नाहीं. या मेषपात्र समाजाचें घोर अज्ञान व मूठभर धूर्तांचा स्वार्थ यामुळें समाजाला जडता येते. त्यांतच रूढि व संप्रदाय यांचे पाश घट्ट बसले, कीं समाजाच्या सदसद्विवेक बुद्धीचाही नाश झालाच. तो नुसता गतानुगतिक वृत्तीचा व यंत्रवत् बनून जातो. त्याचा अहंकार मात्र कोणत्याही परिस्थितींत त्याला सोडीत नाहीं व व्यक्ति जितक्या प्रमाणांत अधिक बुद्धिमान् किंवा साधनसंपत्तीनें युक्त असतील तितक्या प्रमाणांत त्या समाजाचा हा सुप्त अहंकार वाढविण्यास कारण झाल्याविना राहत नाहींत. म्हणून समाजांत क्रांति घडवून आणणाऱ्या नेत्याला किंवा युगकर्त्या साधूला या गटाला वश करणें अतिशय जड जातें. हाच गट समाजाला शेजारधर्मही पाळूं देत नाहीं आणि त्याच्याकरवीं धर्मसंस्थापकांचा छळ करवितो. व्यक्तीचा अहंकार गळून पडण्याचा किंवा त्याचें हृदयपरिवर्तन लवकर होण्याचा संभव असतो परंतु या गटाचा अहंकार संयुक्त रूपांत असल्यामुळें त्याचा भेद करणें कठीण जातें.

समाजांतील संघर्ष हे बहुधा अन्यायाचा विरोध करण्यासाठींच निर्माण होतात. तरी सार्वभौम संघर्षाला अनेक फांटे फुटल्याविना राहत नाहींत.

आणि त्याचें कारण हेंच असतें कीं समाजांतील कोणताही एक थर सर्वथैव निर्दोष नसतो. मुख्य अन्यायाची जाणीव प्रथमतः एका व्यक्तीला होते, ती एकटी त्याचा प्रतिकार करण्यास असमर्थ झाली, कीं समाजाकडे धाव घेते, कांहीं घटक अनुकूल होतात, कांहीं प्रतिकूल असतात व कांहीं उदासीन राहतात. या सर्वांची परिणति कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत होते. तें स्वरूप त्या जाणत्या व्यक्तीच्या कल्पनेशीं जुळणारें असेल किंवा नसेलही; परंतु या सर्व घडामोडींचा इतिहास लिहिणाऱ्याला कांहीं विशिष्ट गोष्टींचें ज्ञान असणें अपरिहार्य असलें पाहिजे.

वर सांगितलेंच आहे, कीं समाजाला जागृत करणें सोपें काम नाहीं; आणि त्याला क्रियेला उद्यत करणें ही तर त्याहूनही कठीण गोष्ट आहे. समाजांत बुद्धिमान् माणसें पुष्कळ असतात. परंतु त्यांच्या कठोर बुद्धिवादानें समाजांत चेतना उत्पन्न होणार नाहीं. प्लेटो व कन्फ्यूशियस यांचीं सुंदर उदाहरणें साक्ष देत आहेत. त्यांच्या बुद्धिमत्तेची जाणीव समाजाला नव्हती असें म्हणतां यावयाचें नाहीं. परंतु लोकांनीं त्यांचें ऐकिलें नाहीं हेंही खरें आहे. कोणी म्हणेल, कीं स्वतंत्र व सुखी राष्ट्रांना बुद्धिवादानें आपला उद्धार करण्याची आवश्यकता भासली नसेल; तर परतंत्र राष्ट्राचें उदाहरण घेतां येईल. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत हिंदुस्थानांत शहाण्या व बुद्धिमान् लोकांची वाण नव्हती; पण त्यांना देखील समाजांत अनुयायी मिळाले नाहींत

नुसत्या भावना उचंबळविण्याचा प्रयत्न करूनही कार्यभाग होत नाहीं. भावनाप्रधान काव्यें करणाऱ्या राष्ट्रीय कवींचीं काव्यें अरण्यरुदितें बनलीं. आणि कविवर रवींद्रनाथांवर " तुझी हाक ऐकून कोणीही तुजबरोबर आला नाहीं, तरी तूं एकटाच पुढें चाल " असें निराशेनें गाण्याचा प्रसंग आला.

बुद्धिवादाचा प्रखर अभिमानी असा जो एक वर्ग समाजांत असतो त्याला आपल्या योग्यतेविषयीं अतोनात उच्च कल्पना असतात. परंतु केवळ बुद्धि-वादी मनुष्य समाजाचा नेता झालेला ऐकिवांत नाहीं. याचें कारण उघड आहे. समाजांतील सर्व थरांना त्याच्या बुद्धीचें आकलन करतां येत नाहीं. सुज्ञ व अज्ञ जनांना सामान्यतः पटेल व त्यांना कर्माला प्रवृत्त करील अशी गोष्ट तो देऊं शकत नाहीं. समाजाची मिश्र कल्पनाशक्ति फार मर्यादित असते.

त्याच्या बुद्धीवर अनेक प्रकारचीं पटलें असतात; अनेक प्रकारचे बरेवाईट ग्रह जमलेले असतात. त्यांचा भेद तर्क करूं शकत नाहीं. सामान्य जनांना त्यांची आवश्यकताही नसते.

दुसरें असें कीं समाजाला आपल्यावर होत असलेल्या अन्यायांचें भान असलें तरी सामुदायिक क्रियेबाबत त्याला एकदम साहस करवत नाहीं. आपला पक्ष न्याय्य आहे अशी त्याची खात्री झाली तरी सुद्धां लढ्यांत अखेरचें यश आपलें आहे हीही श्रद्धा त्याच्यांत उत्पन्न झाली पाहिजे. आणि तशी श्रद्धा उत्पन्न होण्यास कुशल नेता व प्रभावी साधनें हींही हवींत. तेव्हांच कोठें समाज हालचाल करूं लागेल.

साधनाची गोष्ट येतांच नीति-अनीतीचा प्रश्न उभा राहतो. अर्थात् साध्य-साधनांचा संबंध अविभाज्य असल्यामुळें साध्याची कल्पना स्पष्ट असल्यास साधनांच्या स्वरूपाबद्दल शंका असतां कामा नये. समाजाच्या नैतिक सामर्थ्याची एखादी अद्‌भुतरम्य कल्पना वाचकांसमोर मांडण्याचा हेतु नाहीं. परंतु समाजाची उन्नति घडवून आणण्यासाठीं त्याची नैतिक भूमिका वर आणल्याखेरीज गत्यंतर नाहीं. कोठलेंही उच्च ध्येय संपादन करावयाचें असेल तर तत्प्रीत्यर्थ स्वार्थाचा त्याग ही तर एक आवश्यक बाब आहे. स्वार्थत्याग या एका शब्दांत अनेक गोष्टी येतात. त्यांत स्वतःविषयीं निरहंकारवृत्ति. इतरांविषयीं प्रेम व सहानुभूति आणि निर्भयता हे गुण आलेच. जेव्हां जित समाजाला जेत्यांच्या अन्यायाविरुद्ध प्रतिकार करावयाचा असतो तेव्हां तर या नैतिक सामर्थ्याची फारच आवश्यकता असते. कारण विरोधी पक्षाचें नैतिक बळ कमी करणें यांत त्यांचा तात्त्विक दृष्टया पराभवच समजला जातो. या नैतिक दृष्टया प्रभावी साधनांचा दुसरा एक उपयोगही आहे. संघर्षातील कटूपणा व निष्ठुरपणा यांचें स्वरूप सौम्य होत जातें; आणि प्रतिकार करणाऱ्या समाजाविषयीं शेजारीवर्गांत सहानुभूति उत्पन्न होते.

साधनांची गरज सरल्यावरही कार्यभाग होईलच असें नाहीं. जेत्या समाजाचें हृदयपरिवर्तन ही सोपी गोष्ट नाहीं. वर सांगितलेंच आहे कीं व्यक्तीचें हृदय जिंकणें सोपें जातें पण समाजाचे निरनिराळे घटक संयुक्त होऊन पहाडी भिंतीसारखे अभेद्य राहतात. एखाद्या शेतकऱ्याच्या यातनांनीं निर्दय

सावकाराचें हृदय द्रवेल पण सहकारी पतपेढी कशी द्रवेल? ती तर यंत्रासारखें काम चालूच ठेवते. एका व्यक्तीच्या हातांत सत्ता केन्द्रित असल्यामुळें तिच्यावर उपाययोजना करणें अवघड जात नाहीं. परंतु सत्ता समाजांत वांटली गेल्यास तिला तोंड देणें कठीण जातें. तिच्यावर परिणामकारक उपाय एकच आहे. सत्तेला सत्तेनें तोंड द्यावयाचें असतें. आणि जित समाजाला आपली संघटना करून ही सत्ता निर्माण करावयाची असते. या संघटित सत्तेचा उपयोग परवांपर्यंत तरी हिंसकवृत्तीनें केला जात असे. समाज जें धोरण पसंत करी त्याबरहुकूम तिचा उपयोग करण्यांत येई. परंतु जेत्यांच्या अहंकाराला एरवीं धक्का बसणें शक्यच नाहीं.

मागें सांगितलेंच आहे, कीं बुद्धिवाद सत्य असला तरी समाजाला तो पटत नाहीं. परंतु बुद्धिवाद जें करूं शकत नाहीं तें सत्ता करूं शकते. सत्ता याचा अर्थ 'जबरदस्ती' असाच घेण्याचें कारण नाहीं. 'कायदा', 'बहुमत' असाही घेतां येईल. दारूबंदीचें नैतिक सामर्थ्य समाजांतील श्रीमंत लोकांस माहीत नसतें असें नाहीं. पण क्षुद्र स्वार्थापायीं श्रीमंत समाज त्याला विरोध करितो आणि लढाईच्या भयानें सरकारनें लादलेले कर मात्र निमूटपणें भरतो. यांतील स्वारस्य समंजस लोक तेव्हांच उमगूं शकतील.

अन्यायाविरुद्ध लढणाऱ्या समाजाच्या मानसशास्त्राचें हें अल्प विवरण झालें. लढा यशस्वी झाला तरी तो संघर्षाचें पूर्णपणें उच्चाटण करूं शकेल असें म्हणतां येणार नाहीं. समाज पूर्णावस्थेस जाईल तेव्हांच कलहाचें बीज नष्ट होईल. पण त्यासाठीं समाजांत एखादाच बुद्ध किंवा ख्रिस्त एखादे वेळीं जन्मून उपयोगी नाहीं. जेव्हां साराच समाज स्वार्थाइतकेंच परार्थाचें आकलन करूं शकेल, स्वतःप्रमाणेंच दुसऱ्याच्या हक्काबद्दल जागरूक राहील, तेव्हांच तशी परिस्थिति निर्माण होईल. निदान सध्यां तरी द्रष्टा असा एखादाच मनुष्य जन्मास येतो व कांहीं काल समाजास हालवून जागें करितो. त्याला अनुयायीही पुष्कळ मिळतात. पण ते सारे त्याच्याच उच्च भावनांनीं प्रेरित होऊन त्याला मिळतात असें नव्हे. त्यांना दिसतें, पुष्कळांना दिसतें कीं त्याच्या मागून जाण्यांत आपला मोठा स्वार्थ साधण्याचा संभव आहे. अर्थात् सत्य वस्तु ही भौतिक सुख मिळवून देणारच नाहीं असें मुळींच नाहीं. पण सत्याची

शक्ति त्यागांत प्रामुख्यानें प्रकट होते म्हणून तर सत्यनिष्ठ मनुष्याचा प्रभाव समाजावर पडतो. सत्याचा अर्थ व्यापक घेतला पाहिजे. त्यांत सर्वोदयाची कल्पना अंतर्भूत आहे. या कसोटीस अजून कोणताही समाज उतरला नाहीं म्हणून तर कोठल्याच समाजांत आज पूर्णांशानें सुख व शांति नांदत नाहीं.

म्हणूनच जेव्हां 'सत्यमेव जयते' या वाक्याची संदेहवादी लोक हेटाळणी करितात तेव्हां त्यांची दृष्टि खोल व व्यापक नसते. राजकारणांत सत्य कसलें? असा सवाल करण्यांत येतो. दर्शनी बाजूचे पापुद्रे वर केले तर अंतरंगांत अनेक भानगडी दिसतील. इंग्रजी अमलाखालीं येण्यापूर्वी भारतवर्षांत असत्याचरण कांहीं कमी नव्हतें. समाजांतील सर्व थरांना त्यांचे न्याय्य हक्क मिळाले पाहिजेत, याचेंच नांव सत्य. तें नसेल तर समाज अवनतीच्या गर्तेत जाऊन पडेल.

समाजाच्या उन्नति-अवनतीबाबत जी चर्चा येथवर केली तिच्या आधारावर पुढील विवरण करण्याचा विचार आहे. महाराष्ट्र हा एक स्वतंत्र घटक नसून हिंदुस्थानच्या जीवनांत त्याला एक स्थान आहे. आज हिंदुस्थानचा ब्रिटिश सत्तेशीं जो लढा चालला आहे, त्यांत इतर प्रांतांच्या बरोबरीनें त्यालाही आपली भूमिका घ्यावयाची आहे. परतंत्र हिंदुस्थानांत अनेक प्रांत आहेत. सर्वांची प्रगति सारखी नाहीं. हिंदी समाज हा मूळपासून अविभक्त असा समाज नसल्यामुळें त्याचें समग्र जीवन एकरंगी नाहीं. राजकीय जागृति प्रथमतः ज्या प्रांतांत सुरू झाली त्यांपैकीं एक महाराष्ट्र आहे. महाराष्ट्राची बुद्धि राजकारणप्रधान मानली जाते. गेल्या पाऊणशें वर्षांत या प्रांतांत अनेक बुद्धिशाली लोक होऊन गेले. कांहीं काल साऱ्या देशासही त्यानें आपल्या मागें ओढून आणलें. परंतु नेतृत्व ईश्वरानें कोणा खास समाजाला कायमचें दिलेलें नाहीं. निसर्गाच्या नियमानुसार पुढील योजना वेगळी घडून आली. आणि नंतर महाराष्ट्रांतील सुप्त अहंकाराला धक्का बसला. महाराष्ट्रांतील संघर्ष दुहेरी स्वरूपाचा झाला. राजसत्तेशीं त्याचा झगडा चालूच होता. आणि अंतस्थ रीतीनें त्याला आपल्या अहंकाराशींही झुंजावें लागलें. हा समय 'महाराष्ट्रांतील तमोयुग' या नांवानें प्रसिद्ध आहे. त्याचा सर्वच इतिहास रोचक व उद्बोधक असल्यामुळें त्याचें विवरण पुढील पानांत करण्याचें योजिलें आहे.

---

# २ पुढारी आणि पंथ

अर्वाचीन पाश्चात्य संस्कृति ही भारतवर्षांत तरवारीच्या जोरावर आली. यामुळें तिचा प्रसार या देशांत होत असतांना देशाच्या बाह्य परिस्थितीवर तसे मनोभूमिकेवर महत्त्वाचे परिणाम होत गेले. या संस्कृतीचें मुख्य लक्षण यान्त्रिक सामर्थ्याची वाढ हें असल्यामुळे भारतवर्षांतील मूळ कृषिप्रधान संस्कृतीवर फार मोठा घाला पडला.

कोणत्याही परकीय सत्तेला गुलाम राष्ट्रावरील आपली पकड चिरकाल टिकवावयाची असेल तर त्या राष्ट्रांतील लोकांचीं मनें अगोदर निर्बुद्ध करावीं लागतात. नुसतें त्यांना निःशस्त्र करून चालणार नाहीं. इंग्रजांनीं हिंदुस्थानांत हीच नीति स्वीकारली.

हिंदुस्थानच्या प्रजेपैकीं फक्त एकदशांश लोक लढाऊ वृत्तीचे आहेत. बाकीची सारी प्रजा शांतताप्रधान वृत्तीची आहे. ही एक अनुकूल परिस्थिति राज्यकर्त्यांना आयतीच मिळाली. महाराष्ट्र-पंजाबसारखे कांहीं संघटित राज्यतंत्र असणारे प्रांत सोडले तर देशभर अनवस्था होती; तिचें दर्शनी स्वरूप बदलून देशास शांतता बहाल केल्याचा देखावा दाखविण्यांत ते यशस्वी झाले. जी प्रजा स्वभावतः उच्छृंखल वृत्तीची नाहीं तर शांतिकालांतील व्यवसाय करण्याची जिला संवय आहे, अशा प्रजेला अनवस्थाप्रसंगापेक्षां संघटित राज्य, मग तें एखाद्या जुलमी राज्यकर्त्याचें का होईना, पण पसंत असतें. अफगाणिस्तानसारख्या देशांतील लोकांची ही वृत्ति नाहीं. पण हिंदी लोकांची अवश्य आहे. दुसरें असें कीं मुसलमानी अमलांत पुष्कळ हिंदी प्रांतांचें स्वातंत्र्य नष्ट झालें तरी ग्रामपंचायतीसारख्या खेड्यांतील स्थानिक स्वराज्य संस्था किंवा देशी उद्योगधंदे यांवर कधींच आक्रमण झालें नव्हतें. त्यांचा उत्कर्ष अबाधितपणें होत गेला. इंग्रजांच्या तरवारीमागें भीषण यंत्रयुग येत आहे व आपल्या आर्थिक जीवनांत तें कायमची उलथापालथ घडवून आणणार आहे, याचें स्वप्न हिंदी प्रजेला कधींच पडलें नव्हतें. त्यामुळें

सर्वत्र शांतता पसरली असून कांहीं नवे चमत्कारही दृष्टोत्पत्तीस येऊं लागले या गोष्टींत हिंदी मनें आनंद मानूं लागलीं.

इंग्लंडची परंपरा वाणिज्य ही असल्यामुळें त्याची दृष्टि व्यापारी बनली होती; म्हणून हिंदुस्थानांतील त्याच्या राजकीय दिग्विजयानेंच त्याची तृप्ति झाली नाहीं. अथवा आपला आर्थिक लोभ तृप्त करण्यासाठींच त्यानें तरवारीला हात घातला असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. हा आर्थिक लोभही एका व्यक्तीचा नसून एका प्रबळ राष्ट्राचा होता. अर्थात् तो संघटित होता. त्याचें आक्रमणही संघटितपणें चालत होतें. त्यामुळें जित राष्ट्राला मैदानावर नामोहरम केल्यानंतर त्याच्या पिळणुकीचें कार्य संघटितपणेंच चालू झालें.

स्वतंत्र राष्ट्रांत राज्यतंत्र कितीही जुलमी असलें तरी एकदां स्थिरस्थावर झाल्यानंतर आपणांवर होत असलेली जबरदस्ती ध्यानांत येण्यास प्रजेला फार अवकाश लागत नाहीं. आणि जुलमी राज्ययंत्र उलथून पाडणें परतंत्र राष्ट्राइतकें त्याला कठीण जात नाहीं. आपद्धर्म म्हणून एका व्यक्तीचा अनियंत्रित अंमल सहन करणारे लोक शांतिसमर्थी जबाबदार राज्यतंत्राची अपेक्षा करूं लागतात. पण हिंदुस्थानची परिस्थिति सर्वच रीतींनीं बिकट होती.

हिंदुस्थान अर्वाचीन अर्थानें कधींही एकराष्ट्र नव्हतें. राष्ट्रीयत्वाची कल्पना जगांत देखील एकोणिसाव्या शतकांत आली व तिलाही जन्म लोकशाही राज्यतंत्रांनीं दिला ही गोष्ट घटकाभर गृहीत धरली तरीसुद्धां सतत एकछत्री अंमलाखालील प्रजेला स्वतःच्या राजाविषयीं अथवा राजवंशाविषयीं एक प्रकारचा जो आपलेपणा वाटत असतो ( कीं जो देशाऐवजीं राजासाठीं लढण्यास लोकांस प्रवृत्त करितो ) तोही हिंदी लोकांना वाटण्याचें कारण नव्हतें. तीनचारशें वर्षांच्या मोंगल साम्राज्याच्या गौरवाचा परिणाम म्हणून उत्तरेकडील प्रजेंत दिल्लीच्या तख्ताबद्दल पुष्कळ आस्था उत्पन्न झाली होती उत्तरेच्या नित्यसंबंधामुळें मराठ्यांनाही मोंगल पादशाहीबद्दल आदर वाटत नव्हता असें नाहीं; पण दक्षिण टोकाकडे गेल्यास ही मनःस्थिति बिलकूल दृष्टीस पडली नसती. आणि तख्ताविषयींचा आदर तख्तासाठीं लढण्यांत परिणत झाला असता असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं. लढणार तरी

कोण ? स्वातंत्र्यासाठीं प्रजा संघटितपणें बंड करील ही गोष्ट हिंदुस्थानांत असंभवनीयच होती. मुसलमानी राज्यसत्तेविरुद्ध लढणारे नेते हिंदु राजे किंवा सरदार होते हें विसरून चालणार नाहीं. इंग्रजी राज्यछत्राखालीं भरतखंड येण्यापूर्वी या राजांचा व सरदारांचा वैयक्तिक स्वार्थ एवढा बळावला होता, कीं देशांतील एक एक प्रदेश परकीय घशाखालीं जात असतां ते खुशाल डोळ्यांवर कातडें ओढून स्वस्थ बसले होते. ज्यांच्या हाकेला प्रजेंतून साद मिळण्याचा संभव होता तेच अगोदर नालायक व नंतर म्हणजे इंग्रजांचे मांडलिक बनल्यानंतर पुरतेच परवश बनले व यांत्रिक सामर्थ्याच्या चक्रांतून प्रजेइतकेच पिळून निघाले, तर मग अज्ञान व दुर्बळ प्रजा स्वतः स्वायत्त बनण्याची कल्पना तरी कशी करूं शकेल ?

आंग्लप्रभूंच्या अमलाखालीं देश राजकीय दृष्ट्या तरी एक पूर्ण घटक बनला. परंतु तेवढें कारण हिंदुस्थानांत एकराष्ट्रीयत्वाची भावना आणण्यास पुरेसें नव्हतें. हिंदुस्थानांतील नाना धर्म, नाना पंथ, जाति व भाषा या सर्व गोष्टी एकराष्ट्रीयत्वाच्या कामांत विघ्नरूप होत्या असें मानण्याचें मात्र कारण नाहीं. हिंदुस्थानांत लोकशाहीच्या आवश्यकतेला जोडूनच एकराष्ट्रीयत्वाची कल्पना निर्माण होत गेली. यांपैकीं कोणत्या गोष्टीची अगोदर जाणीव झाली तें सांगणें कठीण आहे. परंतु दोन्ही गोष्टींचा अविभाज्य संबंध जरूर आहे.

राजकीय सत्ता स्वतंत्र राखण्याचें कार्य हिंदी सरंजामशाहीनें सोडून देतांच त्याची जबाबदारी सूक्ष्म रीतीनें सामान्य प्रजेवर येऊन पडली. या जबाबदारीची जाणीव प्रजेला सावकाश पण खात्रीपूर्वक कशी होत गेली त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन या प्रकरणांत केलें म्हणजे १९२० च्या सुमारास सार्वत्रिक राजकीय चळवळ करण्यास देश उल्हासानें कसा पुढें झाला त्याचें कारण ध्यानांत येईल.

इ. स. १८५७ त इंग्रजांविरुद्ध सार्वत्रिक सशस्त्र उठाव घडवून आणण्याचा प्रयत्न ज्यांचीं वतनें खालसा झालीं होतीं त्या दुखावलेल्या सरंजामदारांनीं केला व तो निष्फळ गेला. त्यानंतर लोकांच्या मनांत जी दहशत बसली ती बसलीच. या दहशतीला राजकीय पराभव हें एक कारण नव्हतें. इंग्रजी अमलाखालीं समाजाची घडी मुळापासून बदलली जात होती, तिचा परिणाम प्रजेवर अधिक झाला.

यांत्रिक सामर्थ्यानें प्रजा गांगरून जाईल असेंही मानण्याचें कारण नव्हतें. आकाशांतील गडगडाट किंवा विजांचा चमचमाट पाहून घाबरून जाणारे मानवी समाजाचे मूळ पूर्वज कांहीं त्या वेळीं हिंदुस्थानांत नांदत नव्हते. हिंदुस्थानची स्वतःची अशी एक संस्कृति होतीच. स्वतंत्र जपाननें अर्वाचीन यंत्रसामर्थ्याला स्वतःच्या आटोक्यांत आणलें, त्याचप्रमाणें हिंदुस्थान स्वतंत्र असता तर त्यानेंही केलें असतें. त्याच्या पारतंत्र्यामुळें त्याच्या प्रगतीच्या मार्गात दोन विघ्नें अवश्य आलीं : दारिद्र्य आणि परराष्ट्रांशीं व्यवहार करण्यास मोकळिकीचा अभाव.

हिंदुस्थानच्या दारिद्र्याचा विचार येथें करण्याची आवश्यकता नाहीं. परंतु हिंदुस्थानांतील मूळच्या वर्गभेदांत पुढें फेरफार कसे होत गेले हें जाणून घेणें देशांतील जागृतीचा अभ्यास करतांना उपयोगाचें होईल.

इंग्रजांपूर्वी देशांतील श्रीमंत वर्ग सरंजामदारांचाच होता; अर्थात् हा वर्ग केवळ पैशामुळें महत्त्वास चढला असें नव्हे. क्षात्रधर्माचें पालन करण्यासाठीं म्हणून निर्माण झालेला हा वर्ग खास हक्कांची प्रथा वाढतांच वेगळा वर्ग होऊन बसला. आजचे वर्ग आर्थिक परिस्थितीनें बनले जातात; परंतु त्या काळीं सत्ता आनुवंशिक असून राजा अथवा राजपुरुष यांच्यांत वाटली जात असे. सत्तेच्या बळावर धनसंपादन करणें त्यांना असाध्य नसे. त्या काळचें अर्थशास्त्रही साधें होतें, परंतु सत्ताधाऱ्यांचा गौरव त्यांच्या श्रीमंतीवर अवलंबून नसून पुष्कळसा घराण्याच्या प्रतिष्ठेवर किंवा लष्करी सामर्थ्यावर अवलंबून असे. खालचे वर्ग त्यांना भिऊन असत. कारण सर्व समाजाचें जीवित त्यांच्या हातीं असे.

इंग्रज अमलानंतर त्या वर्गाचा हा दबदबा नाहींसा झाला. त्यांच्या कर्तबगारीला क्षेत्र नाहींसें झालें. मात्र आपल्या मोठेपणाच्या कल्पना त्यांनीं उराशीं बाळगल्यामुळें नव्या मनूंत सुद्धां इतर कार्यक्षेत्रांतून चमकण्याची संधि तो वर्ग गमावून बसला. यानंतर अर्थातच समाजाचें पुढारीपण त्यांच्या हातून कायमचें गेलें.

क्षत्रियवर्ग निर्वीर्य होतांच उच्च वर्णीयांपैकीं ब्राह्मण व वैश्य हे राहिले. एक काळ असा होता, कीं ब्राह्मणवर्गाचा वचक इतर सर्व वर्गांवर असे.

साऱ्या समाजांतील तो बुद्धिमान् वर्ग होता. मुसलमान राजांना 'काफर' लोकांविषयीं कितीही द्वेष वाटला तरी पुष्कळ वेळां ब्राह्मणांना आपलें मंत्रिपद देणें त्यांना भाग पडलें. पेशव्यांच्या काळीं तर ब्राह्मणवर्ग उघडपणें क्षत्रियांचा पेशा करूं लागला होता.

इंग्रजांनीं तरवार आणि वाणिज्य यांच्याबरोबर तिसरीही एक देणगी आणली होती व ती म्हणजे शिक्षण. हें शिक्षण सर्वथैव वेगळ्या धर्तीचें व पाश्चात्य पद्धतीचें होतें. शिक्षणाचीं द्वारें सर्व जातींस मोकळीं झाल्यामुळें बुद्धिमानांचा असा एक वेगळाच वर्ग निर्माण झाला व ब्राह्मणांबरोबर इतर जातीही त्यांत समाविष्ट झाल्या. या साऱ्या वर्गाचें स्वरूपच असें होत गेलें, कीं बहुजनसमाजाला त्याविषयीं आदर तर वाटेना. ते सारे नोकरपेशाचे लोक आहेत अशीच छाप त्याच्या मनावर पडत गेली. स्वतंत्र राष्ट्रांतील बुद्धिमान् वर्ग हिंदुस्थानांतील बुद्धिमान् वर्गापेक्षां अधिक नशीबवान् आहे. त्यांच्या बुद्धीचा गौरव होतो, त्यांना अमुक मर्यादेपर्यंत संपत्तीही मिळवितां येते, विज्ञानशास्त्रांत बुद्धि चालविणारे तर लक्षाधीश बनतात, तरी सुद्धां सत्ता त्यांच्या हातीं असते असें म्हणतां येत नाहीं. पुष्कळदां त्यांना आर्थिक सत्ताधाऱ्यांच्या हातीं आपलें शक्तिसर्वस्व द्यावें लागतें.

अर्वाचीन काळांत राष्ट्रांतील सारी सत्ता एकाच वर्गाच्या हातीं केन्द्रित असते असेंही नाहीं. खरोखर पाहतां सत्ता अनेक वर्गांत वांटली गेलेली असते. ज्या देशांत जसें राज्यतंत्र असेल तशी सत्ता निरनिराळ्या प्रमाणांत वेगवेगळ्या वर्गांत पसरते. वर्ग आर्थिक पायावर उभारलेले असतात तसे ते सामाजिक पायावरही उभारलेले असतात. अमेरिकेंत मोठमोठे अर्थश्रेष्ठी सत्ता बळकावून बसले आहेत. त्यांनीं द्रव्याच्या बलावर सत्ता काबीज केली आहे. जपानमध्यें घराण्याच्या प्रतिष्ठेच्या जोरावर व कांहीं अंशीं राजकीय सामर्थ्याच्या बळावर राष्ट्राच्या शिरोभागीं विराजणारा एक लष्करी वर्ग आहे. ज्यांच्या हातांत सत्ता असते ते स्वतःसाठीं खास हक्क बळकावून आपला असा एक वेगळाच वर्ग करितात.

पण गुलाम हिंदी राष्ट्राची परिस्थिति कशी होती ? येथील वैश्यवर्ग ब्रिटिश अमलांत उत्पादनांचीं साधनें आपल्या ताब्यांत कधींच ठेवूं शकला नाहीं.

त्याचें स्वरूप पुष्कळसें दलालाचें राहिलें आहे. हिंदुस्थानांत कच्चा माल भरपूर आहे; परंतु प्रथमपासून इंग्लंडनेंच तो काबीज करून टाकिला आहे. किती तरी वर्षें हिंदुस्थानला संरक्षक जकाती सुद्धां मिळाल्या नव्हत्या. देशांतील वाहतुकीचीं साधनें परकीय कंपन्यांच्या हातीं अव्वलपासून होतीं. कारखाने काढावयाचे असल्यास यंत्रसामग्री सुद्धां प्रथमपासून विलायतेहून आणावी लागे. यामुळें युरोप-अमेरिकेप्रमाणें कोट्यधीश किंवा उत्पादनाच्या साधनांचे सार्वभौम मालक हिंदुस्थानांत होऊं शकले नाहींत.

हिंदुस्थानांत ज्याप्रमाणें विशिष्ट जाती लढाऊ आहेत. त्याप्रमाणें साहसी वणिक् जाती सुद्धां विशिष्टच आहेत. ज्या कांहीं आहेत त्या विशेषतः कच्छ, गुजरात व मारवाड या ठिकाणीं दिसून येतात. अर्वाचीन युग तर भांडवलशाहीचें म्हटलें जातें. शस्त्रसामग्रीच्या किंवा प्रचंड सैन्याच्या सामर्थ्यावर शत्रूला जेरीस आणण्याचे दिवस निघून गेले. आजच्या कालांत व्यापाराचे रस्ते बंद करून व कच्च्या मालाचा पुरवठा अडवून धरून एखाद्या राष्ट्राचा कोंडमारा करतां येतो. युरोप-अमेरिकेंतील बहुतेक राष्ट्रें कारखान्यांवर जगतात. त्यांच्या कारखान्यांना कच्च्या मालाचा पुरवठा नसेल तर लाखों लोक बेकार व दरिद्री होतील, स्वतःचें अन्न त्यांना विकत घेतां येणार नाहीं, परिणामीं प्रजा बंडास उद्युक्त होईल. म्हणूनच या यांत्रिक भस्मासुराला त्याचा नैवेद्य वेळचे वेळीं मिळावा याची काळजी तीं राष्ट्रें घेत असतात, व त्यासाठीं वसाहतीचें साम्राज्य त्यांना हवें असतें. असो.

इंग्लंड हा औद्योगिक देश असल्यामुळें कच्चा माल हें तर त्याचें जीवन आहे. कच्च्या मालाचा पुरवठा करण्यासाठीं व पक्का माल विकत घेण्यासाठीं गिऱ्हाईक म्हणून असा हिंदुस्थानचा दुहेरी उपयोग इंग्लंडला होत असतो. याशिवाय इंग्रज लोकांना अधिकारी वर्ग म्हणून स्वतंत्रपणें चरण्यासाठीं हिंदुस्थान कुरण बनलें आहे ही गोष्ट वेगळीच.

अशा मगरमिठींत हिंदुस्थान सांपडला असतां त्याची प्रगति कितीशी होणार ! इंग्रजी शिक्षणाबरोबर गुलामी मनोवृत्तीचे संस्कार हिंदी बालकांच्या मनावर ठसविण्यांत येऊं लागले. राज्यतंत्र बदलतांच राजधानीपासून खेड्यापर्यंत एकदम बदल झाला. पूर्वीची स्वायत्त पद्धति नाहींशी होऊन

जीवनपद्धति यांत्रिक बनूं लागली. सामाजिक जीवनांतही प्रचंड उलथापालथ झाली, व तींतून तीन वर्ग निर्माण झाले. मध्यम वर्ग, श्रमजीवी वर्ग आणि अस्पृश्य.

मध्यम वर्ग हा शिक्षण घेतलेल्यांचा म्हणजे बुद्धिजीवी लोकांचा वर्ग बनला. श्रमजीवी वर्गांत अशिक्षित शेतकरी लोकांचा प्रामुख्यानें भरणा होतो. अस्पृश्य हे अगदींच दलित व बहिष्कृत समजले गेले.

आरंभापासून या तीनही वर्गांत परस्परसंबंध मुळींच नव्हता. असण्याचें कारणही नव्हतें. लोकशाहीप्रधान राष्ट्रांतून वयांत आलेल्या प्रत्येक व्यक्तीस मताधिकार असतो. त्यामुळें सत्तेसाठीं धडपडणाऱ्या लोकांना समाजाच्या खालच्या थरापर्यंत सर्वांची खुशामत करावी लागते. हिंदुस्थानांत नोकरशाही राज्य करीत असतांना हिंदी लोकांना आपल्या जबाबदारीचें भान व्हावेंच कसें ? तरी सुद्धां, इंग्रजी विद्येच्या व साहित्याच्या अधिकाधिक परिचयानें हिंदी बुद्धिमान् वर्गांत जाणीव येऊं लागली. तिचें स्वरूप प्रथमतः बंगाल व महाराष्ट्र प्रांतांतून दिसून आलें. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत या दोन्ही प्रांतांतून अनेक बुद्धिमान् लोक होऊन गेले व त्यांनीं समाजास हलविण्याचा प्रयत्न केला. इ. स. १८८५ मध्यें झालेली हिंदी राष्ट्रीय सभेची स्थापना ही ह्या प्रयत्नांचीच द्योतक आहे.

परंतु या प्रयत्नांत कांहीं दोष होते. मध्यम वर्गांतील बुद्धिमान् लोक ही इंग्रजी शिक्षणसंस्काराचीच निर्मिति होती. त्यामुळें ते लोक आपल्या संस्कारदात्रीशीं इमानी राहिले. ज्याला इंग्रजींत व्हिक्टोरियन युग म्हणतात त्या युगाचे सर्व संस्कार या लोकांत ओतप्रोत होते. त्यांनीं स्वतःची अशी एक स्मृति बनविली होती. त्यांचीं ध्येयें, त्यांच्या कल्पना, त्यांचे विचार उदारमतवादी होते. वाचाळपणा आणि नीतीचें अवडंबर यांचें त्यांनीं एक शास्त्रच बनविलें होतें. सद्गुण आणि काटकसर यांना त्यांच्या आचारानियमांत महत्त्वाचें स्थान असे. श्रमजीवी लोकांनींच समाजाचा फार मोठा भाग व्यापून टाकिला आहे हें माहीत असूनही ते त्या वर्गाकडे तुच्छतेच्या नजरेनें पाहत. बुद्धिमान् वर्गांतील बहुतेक लोक वकिली पेशाचे होते. अर्थात् त्यांच्या अशीलांत शेतकऱ्यांचाच फार मोठा भरणा होता. परंतु कामाच्या निमित्तानें

का होईना जवळ येणाऱ्या समाजाच्या या खालच्या थराबद्दल त्यांनीं कधींच विचार केला नाहीं. आतां याला कांहीं अपवाद नव्हते असें म्हणतां येणार नाहीं. परंतु राजकीय चळवळ करण्यास जी शक्ति समाजांत निर्माण करावी लागते. ती या लोकांत प्रवेश केल्याशिवाय होणार नाहीं ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत आली नाहीं.

अर्थात् याला कारणें होतीं. इंग्रज राज्यकर्त्यांच्या अपरंपार सामर्थ्याविषयीं या बुद्धिमान् वर्गाच्या मनांत विलक्षण समजुती होत्या. इंग्रज लोक यावच्चंद्र-दिवाकरौ आपणांवर राज्य करणार आहेत ही पहिली कल्पना. त्यांच्या हाता-खालीं नोकरपेशांत राबून त्यांच्या कृपेची प्राप्ति करून घ्यावी ही मोठ्यांत मोठी आकांक्षा. आणि इंग्रज गेले तर अनवस्था माजेल व परचक्रें येऊन आपला सर्वनाश होईल ही भीति. मध्यम वर्गाचा स्वार्थ प्रारंभींच्या कालांत तरी इंग्रजी अमलाखालीं सुरक्षित होता. तो नष्ट न व्हावा ही त्यांची मनीषा असणें साहजिक होतें. म्हणजे गुलामी मनोवृत्ति, भीति व स्वार्थ यांहीं-करून स्वातंत्र्याचें ध्येय त्यांना सुचलें नाहीं.

परंतु परिस्थिति मानवी तर्काच्या पलीकडे काम करीत होती. हिंदुस्थानांत कर्झनशाही गाजूं लागतांच बुद्धिमान् वर्गाला धक्के बसूं लागले. भावना-प्रधान बंगालची चिरफाड झाल्यामुळें त्यानेंच प्रथम रणगर्जना करण्यास सुरुवात केली. महाराष्ट्रांत राष्ट्रसभेच्या स्थापनेनंतर चिपळूणकर, टिळक, आगरकर या त्रयीनें राजकीय व सामाजिक क्षेत्रांतून जहाल विचार समाजा-समोर मांडण्यास प्रारंभ केलाच होता. आपल्या राजकीय परवशतेची जाणीव या बुद्धिवान् वर्गाला यापुढें होऊं लागली व आपल्या अडचणी दूर करण्याची शक्ति 'स्वराज्य' या गोष्टींत आहे या निर्णयावर तो पोंचला.

अन्यायाची जाणीव होतांच प्रतिकाराची भावना लोकांच्या मनांत उसळून येऊं लागली. मानवी हक्काच्या मागणीपेक्षां राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या मागणीचीच भावना त्यांत विशेष होती. तरुण पिढीचा तोल सुटला. तेव्हां ते परंपरागत सशस्त्र बंडाचा मार्ग चोखाळण्याचा प्रयत्न करूं लागले. आधुनिक शस्त्रांनीं सज्ज असलेल्या इंग्रज सत्तेला तोंड देणें जरूर असेल तर आपणही तसाच सरंजाम जवळ बाळगला पाहिजे ही कल्पना मनांत धरून परदेशांतून गुप्तपणें

शस्त्रें आणविण्यास या लोकांनीं सुरुवात केली. हा पंथ पुढें दहशतवाद्यांचा पंथ म्हणून प्रसिद्ध झाला. त्याचे अनुयायी बंगाल व पंजाब प्रांतांतून अधिक पसरले.

महाराष्ट्रांतील बुद्धिमान् वर्ग अधिक प्रौढ होता. प्रारंभीं या प्रांतांतही दहशतवादी तरुण निर्माण झाले, नाहीं असें नाहीं. परंतु सर्वसाधारणपणें बुद्धिमान् वर्ग बंगालइतका भावनाप्रधान नव्हता आणि येथील आर्थिक परि-स्थितींत बंगालपेक्षां थोडाफार फरकही होता. बंगालपेक्षां महाराष्ट्रांत मध्यम वर्गाचें प्राबल्य अधिक होतें. ह्या वर्गाकडे त्या वेळीं समाजाचें पुढारीपण होतें. त्याचें जीवनांतील एकंदर धोरण वैयक्तिक नसून एक प्रकारचें सामाजिक वळणाचें होतें. एक श्रेष्ठ धार्मिक व नैतिक आदर्श जनतेपुढें मांडण्याचा तो प्रयत्न करीत असे. न्या. रानडे व त्यांचे सहकारी आणि त्यांचे शिष्य ना. गोखले व त्यांचे भारतसेवक यांनीं तत्कालीन समाजाला विशिष्ट संस्कार दिले. अनेक लोकोपयोगी संस्था या लोकांनीं काढल्या व बुद्धिमान् तरुणांच्या उत्साहास कार्यक्षेत्र निर्माण करून दिलें. महाराष्ट्राच्या अर्वाचीन इतिहासांत न्या. रानडे व ना. गोखले यांचें स्थान वरच्या दर्जाचें आहे.

देशाच्या राजकारणाला जहाल स्वरूप येण्यापूर्वीं अखिल भारतीय दृष्टीनें, मर्यादित का होईना, पण विचार करण्याचें श्रेय न्या. रानडे यांस दिलें पाहिजे. तत्कालीन बुद्धिवादी समाजाच्या उदार राष्ट्रवादाचें अत्युच्च शिखर न्या. रानडे यांनीं गाठलें होतें. हिंदी प्रश्नाचा विचार त्यांनीं केवळ राजकीय दृष्टीनें न करितां आर्थिक व सामाजिक दृष्टींनींही केला होता. सरकारी नोकरींत राहूनही त्यांची नजर चौफेर चालत होती. समता व दलितोद्धार या गोष्टी त्यांना मनापासून प्रिय होत्या. म्हणून सर्व क्षेत्रांतील वैषम्य होतां होईल तितकें नाहींसें करण्याच्या हेतूनें त्यांनीं विविध संस्था स्थापन केल्या. पुरोहितवर्गाचा जाच नाहींसा व्हावा म्हणून एकेश्वरीपंथ स्थापन केला. सामाजिक अन्यायांवर उपाय करण्याच्या उद्देशानें सार्वजनिक सभा स्थापन केली. ज्ञानप्रचाराच्या हेतूनें व्याख्यानमाला स्थापन केल्या. त्यांच्या कर्तृत्वाचा विस्तार एवढा अफाट व खोल होता, कीं आजमितीसही त्यांनीं स्थापलेल्या पुष्कळ संस्था विद्यमान आहेत. त्यांनीं ना. गोखले यांस आपल्या तालमींत

तयार केलें आणि त्यांच्या हातून राजकीय क्षेत्रांत अलौकिक कामगिरी घडवून आणिली. अर्थात् त्या वेळचें राजकारण सरकारास न दुखवितां, सनदशीर मार्गानें कायदेमंडळांत जाऊन तेथेंच आपल्या बुद्धिविलासानें व वक्तृत्वानें अधिकारीवर्गाचें मन होतां होईल तितकें वळवून केलें जात असे. परंतु ना. गोखले आपल्या असामान्य बुद्धिसामर्थ्यानें मध्यवर्ती असेंब्लींत चमकले तसे वयास पुरतीं चाळीस वर्षें लोटण्यापूर्वीच राष्ट्रीय सभेचे अध्यक्षही झाले ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. पुढें महाराष्ट्रांत राजकारणाला अधिक तडफदार वळण देण्याचें कार्य लो. टिळकांनीं केलें. तरी वरील दोन पुढाऱ्यांच्या सतत कर्तृत्वाची व तपस्येची छाप महाराष्ट्रावर कायमची ठसली. त्यांनीं आपला स्वतंत्र संप्रदायच निर्माण केला.

न्या. रानड्यांच्या संप्रदायामुळें महाराष्ट्रांतील पुढारलेल्या वर्गास एक वळण लागलें हें खरें; परंतु सर्वसाधारणपणें या वर्गाची आर्थिक परिस्थिति सुखाची असल्यामुळें क्रांतिवादी मनें होण्यास जी असंतोषाची भूमिका लागते ती महाराष्ट्रांत प्रारंभीं नव्हतीच. त्यामुळें महाराष्ट्रांत एक प्रकारची धार्मिक व बौद्धिक आदर्शवादी विचारसरणी निर्माण होऊं लागली. धार्मिक विचारांत एकेश्वरीवाद, सामाजिक कार्यक्षेत्रांत सुधारणावाद आणि राजकीय क्षेत्रांत पार्लमेंटरी वृत्ति यांकडे बुद्धिवाद्यांचीं मनें झुकूं लागलीं. सारेच बहुधा कायदेपंडित अथवा प्रोफेसर असल्यामुळें साहसी वृत्तीला विचारांतून अजीबात फांटा मिळत गेला. बौद्धिक व नैतिक विचारसरणी बळावत चालली खरी; पण व्यवहारांत तिचा परिणाम वर्ग-स्वार्थावर मुळींच झाला नाहीं. स्वतःच्या वर्गापलीकडे त्यांचें ध्यान इतरत्र मुळींच गेलें नाहीं.

या परिस्थितीचा परिणाम महाराष्ट्रांत श्रमजीवी वर्गावर विलक्षण रीतीनें झाला. महाराष्ट्राला राजकीय इतिहास असल्यामुळें ब्राह्मणजातीशिवाय इतर जातींतही स्वत्वाची जाणीव थोडीबहुत आहेच. चारपांचशें वर्षांपासून महाराष्ट्रांत दोन संप्रदाय तर सामान्य जनतेपर्यंत पोंचलेले आहेत. एक वारकरी संप्रदाय व दुसरा रामदासी संप्रदाय. वारकरी संप्रदाय हा अधिक व्यापक आहे. कारण तो समतेचा पुरस्कर्ता आहे. रामदासी संप्रदाय 'राजकारण' व "मराठा तितुका मेळवावा" हें धोरण जोंपर्यंत उत्साहानें अमलांत

आणीत होता तोंपर्यंत समाजांतील सर्व थरांत त्याला मान असे. पुढें तो संप्रदाय संकुचित स्वरूपाचा बनला व स्वतःचें शक्तिशाली अंग त्यानें सोडून दिलें. त्यामुळें त्याचा प्रसार ब्राह्मण जातींतच राहिला. त्यांतूनही कांहीं थोडें कार्य पुढें भविष्यकालीं निर्माण झाल्याविना राहिलें नाहीं. आजन्म ब्रह्मचारी राहून समाजसेवा करण्याची दीक्षा पुष्कळांनीं घेतली. मधल्या नैतिक आदर्श-वादाच्या काळांत रामदासी संप्रदायाची भूमिका पुढील संघर्षासाठीं तयार होत होतीच. रामदासस्वामी हे राजकारणी तसेच क्रांतिवादी मनोवृत्तींचे असल्यामुळें त्यांच्या पंथाचे लोकही क्रांतिवादी मनोवृत्तीस अनुकूल होत गेले. इंग्रजी अमदानींत महाराष्ट्रांतील जहाल राष्ट्रवादाचें जनकत्व कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचेकडे जातें. आपल्या लोकांचें दैन्य आणि परकीय सरकारचा उन्मत्तपणा हीं त्यांस असह्य वाटलीं व म्हणून ऐन तारुण्यांत सरकारी नोकरीवर लाथ मारून जनसेवा करण्यास त्यांनीं स्वतःस मोकळें करून घेतलें. आपल्या निबंधमालेंतून त्यांनीं बुद्धिजीवी समाजाला सपाटून कोरडे हाणले आणि प्रचलित परिस्थितीची जाणीव करून घेण्याची धोक्याची सूचना ते सतत देत राहिले. महाराष्ट्रांतील जहाल बुद्धिवादी राजकारणास येथून सुरुवात झाली. चिपळूणकरांनीं मध्यम वर्गास जागें केलें परंतु त्यांचें कार्य पुढें जोरानें चालविणारे लो. टिळक 'तेल्यांतांबोळ्यांचे' जातिवंत पुढारी असल्यामुळें त्यांनीं मध्यम वर्गाच्याही पलीकडे जाऊन सार्वजनिक राष्ट्रीय उत्सव सुरू करून विभूतिपूजेचाही राजकीय जागृतीस उपयोग करून घेतला. रामदासांप्रमाणें त्यांनींही राजकारणास आध्यात्मिक भूमिकेचें अधिष्ठान देण्याचा प्रयत्न केला. नुसता बुद्धिवाद राष्ट्रीय चळवळीस अपुरा पडतो याची त्यांना चांगलीच जाणीव होती. म्हणून १८९५ ते १९०५ पर्यंत त्यांनीं गणपति-उत्सव, शिवाजी-उत्सव इत्यादि चळवळी सार्वजनिक स्वरूपांत सुरू केल्या. पुण्याची सार्वजनिक सभा आपल्यां ताब्यांत घेतली. तिच्याच मार्फत पुढें पुष्काळ पडला असतां शेतकरी दुःख-विमोचनाच्या चळवळी सुरू केल्या आणि राजकारणांत बहिष्कार हें अमोघ अस्त्र आणिलें.

या बहिष्कारवादी राजकारणाच्या जोडीला आणखी एक विचारसरणी होती व ती म्हणजे सशस्त्र क्रान्तिवाद्यांची होय. १८५७ च्या निष्फळ प्रयत्ना-नंतर सशस्त्र सामुदायिक उठावणीचा पहिला प्रयत्न वासुदेव बळवंत फडके

र्यानें केला; तो अयशस्वी झाला. पुढें महाराष्ट्रांत प्लेगची सांथ सुरू होतांच सोल्जरांच्या अत्याचारांच्या निमित्तानें आधींच धुमसत असलेल्या प्रजाक्षोभानें पेट घेतला व चाफेकरानें रॅण्डसाहेबांचा बळी घेतला. महाराष्ट्रांत अत्याचारी पंथाचें प्रथम प्रकटीकरण या वेळीं झालें. काळ लोटल्यावर सावरकरबंधु, सेनापति बापट वगैरे लोक त्या पंथाचे अनुयायी असल्याचें दिसून आलें. परंतु सरकारच्या सामर्थ्यापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. १९०७–८ च्या दरम्यान नाशिक येथें झालेला जॅक्सनचा खून हा महाराष्ट्रांतील ह्या पंथाचा शेवटचा पराक्रम म्हणतां येतील. त्यानंतर या पंथाचें महाराष्ट्रांतून बहुतेक निर्मूलन झालें. क्वचित् कोठें एखादें तुरळक उदाहरण घडल्यास तें मानसिक विकृतीचेंच म्हणण्यासारखें झालें. असो.

महाराष्ट्रांत क्रान्तिवादी वर्तमानपत्रें त्या वेळीं दोन होतीं:— केसरी व काळ. केसरीची भूमिका म्हणजे टिळकांची भूमिका. काळाचे संपादक श्री. शि. मं. परांजपे हे सुरुवातीस सशस्त्र क्रान्तिवादी मनोवृत्तीचे होते. सशस्त्र क्रान्तिवादी लोकांशीं त्यांचा खूप संबंध होता. त्यांच्या दृष्टीसमोर पूर्वकालीन भारताचें व पाऊण शतकापूर्वीच्या मराठा साम्राज्याचें देदीप्यमान चित्र सदैव झळकत असे. स्वातंत्र्याकरितां उत्कटपणें तळमळणारा तो एक भावनाप्रधान पण रसिक जीव होता. टिळकांना वास्तवतेची कल्पना फारच उत्कृष्टपणें आली होती. पण परांजपे स्वातंत्र्याचे शाहीर होते. “ आज बंड केलें तर लोकांचीं मनें तयार होणार नाहींतच, पण सरकारच्या छळामुळें उलट लोक एक प्रकारची भयंकर माघार मात्र घेतील. पाड लागल्याखेरीज आंबा पिकवीत नाहींत; व तसा तो पिकविला तर नासतो.”— ‘आठवणी खंड ३, पृ. २७८’ ही टिळकांची विचारसरणी होती. तिचा अनुभव पुढें परांजपे व सावरकर या दोघांसही आला.

टिळक अधिक व्यवहारचतुर असल्यामुळें आणि “ स्वातंत्र्याची चळवळ ही पोटापाण्याची चळवळ आहे ” याची पक्की खूणगाठ त्यांनीं मनांत बांधल्यामुळें त्यांचें बहिष्कारवादी राजकारण हळूहळू महाराष्ट्रांत अग्रेसर होऊं लागलें. रानडे-गोखले आणि चाफेकर-सावरकर ह्यांचे पंथ मागें पडूं लागले, परांजप्यांनीं वेळींच सशस्त्र क्रान्तिवादी पंथापासून आपली फारकत करून घेतली व

ते टिळकांच्या चळवळीशीं संबंध ठेवूं लागले. परंतु त्यांच्या अंतःकरणांतील क्रान्तिवादाचीं बीजें मात्र कायम होतीं. टिळकांच्या तालमींत अनेक लोक तयार झाले होते. त्यांपैकीं बऱ्याच लोकांवर रामदासी तत्त्वज्ञानाचा परिणाम झाला होता हें मागें सांगितलेंच आहे. संघटना, वैराग्यवृत्ति, त्यागाची तयारी व आध्यात्मिक आदर्शवाद इतक्या भांडवलानिशीं टिळकांच्या अनुयायी-वर्गाची भूमिका तयार होत होती. सन १९२० च्या चळवळींत या भूमिकेनें काम दिलें. कारण प्रत्यक्ष कार्याची स्फूर्ति या संप्रदायांत अवश्य मिळते; परंतु त्याला दिशा मात्र मधल्या काळांत दिसत नव्हती. ती दिशा व संधि सांपडतांच या वर्गानें कार्यांत उडी घेतली.

श्रमजीवी वर्ग बहुसंख्याक असून तो जड होता ही गोष्ट नाकबूल करितां येणार नाहीं. महाराष्ट्राची पूर्वपरंपराच अशी आहे, कीं ब्राह्मणवर्गातच शिक्षणाचा प्रसार व्हावा. फार मोठा असा जो मराठावर्ग तो ज्या काळीं सत्ताधीश होता त्या काळींही शिक्षणाकडे तुच्छतेनेंच पाहत असे. शेतकरी व उद्यमिवर्गाला तर शिक्षणाचें वावडेंच होतें. इंग्रजांपूर्वी या सामाजिक अज्ञानाबद्दल ब्राह्मणांना किती जबाबदार धरावें लागेल हा प्रश्न अलग आहे. मध्ययुगांत जगभर हाच प्रकार चालू होता. समाजाच्या शैक्षणिक उद्धाराच्या कल्पना अर्वाचीन आहेत. तरीसुद्धां महाराष्ट्रांत ब्राह्मणेतरांपैकीं कायस्थ लोक शिक्षणसंस्कार पावले होते ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे व तिचें कारण अर्थात् त्या जातीच्या व्यवसायास मुळीं शिक्षणाची आवश्यकताच असे. म्हणजे व्यवसायास उपयोग नसला तर शिक्षण घेऊं नये ही सर्व समाजाची त्या वेळची मनोवृत्ति होती.

इंग्रजी अम्मल सुरू झाल्यानंतर इतर सर्व कार्यक्षेत्रें बंद झालीं व नोकर-पेशा तेवढा राहिला. नोकरीसाठीं शिक्षणाची आवश्यकता वाटूं लागली. ब्राह्मणवर्ग पुढें सरसावतांच इतर वर्गांचे डोळे तिकडे लागलेच, शिवाय इंग्रजी अमलाखालीं चालू असलेल्या पद्धतशीर आर्थिक पिळणुकीची आंच ब्राह्मणेतरवर्गाला विशेष लागली. त्यामुळें त्या वर्गांत तीव्र असंतोष निर्माण होऊं लागला. त्याला वाचाशक्ति देण्याचें काम स्व. फुले यांनीं केलें.

लढाऊ मराठा जात मुख्यत्वेंकरून शेती करीत असे. त्यांना शेतींत

प्राप्ति होईना. महाराष्ट्रांत नदीचें कालवे फारसे नाहींतच. कांहीं ठिकाणीं पाट आहेत परंतु शेतकऱ्याचें जीवन मेघराजाच्या लहरींवर अवलंबून असतें. जबाबदार स्वतंत्र राष्ट्रांत सरकारकडून शेतकऱ्यांच्या सोयीकडे लक्ष पुरविण्यांत येतें तसें हिंदुस्थानांत होणें असंभवनीयच. त्यांतून सावकाराच्या कचाट्यांत शेतकरीवर्ग सांपडला. त्याच्या विशिष्ट जीवन पद्धतीनें त्याला दैववादी बनविलें होतेंच. त्याची धर्मबुद्धीही आंधळी होती. एकीकडे सावकारवर्ग व दुसरीकडे पुरोहितवर्ग यांच्या कैचींत त्याचे फार हाल होऊं लागले. इतर धंदे बंद पडल्यामुळें त्याला देशांतर करून शहराचा मार्ग धरणें भाग पडलें. तेथेंही गिरणीच्या चक्रांत त्याचीं हाडें पिचून निघालीं. त्याच्या कौटुंबिक जीवनाची वाताहत तर झालीच होती. शिक्षण नाहीं, उत्साहदाता धर्म नाहीं व खावयास अन्न नाहीं. अशा हालांत समाजाचा हा मोठा भाग अधिकाधिक दलित होत होता.

त्या वेळच्या बुद्धिमान् वर्गाला या गोष्टीकडे पाहण्यास अंतर्मुखी दृष्टि नव्हती. ही दृष्टि जागृत होण्यास दोन गोष्टींची आवश्यकता असते. एक तर आध्यात्मिक जागृति–जशी तीं बुद्धास झाली, किंवा सर्वसाधारण अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठीं सामाजिक संघटनेच्या आवश्यकतेची जाणीव. ती होण्यास कांहीं काळ लागला. पण या दोहोंपैकीं एकही गोष्ट योग्य वेळीं न घडल्यामुळें महाराष्ट्रांत ब्राह्मणेतर चळवळीचा उदय झाला.

मध्यमवर्ग सामाजिक जागृतीचें काम करीत होता, परंतु त्याचें क्षेत्र मर्यादित होतें. स्वतःच्या जमातींतच राहून त्याचा फायदा होत होता तोंवर त्यानें इतर जमातींना जवळ करण्याचें धोरण स्वीकारलें नाहीं. त्याच्या इच्छा सामुदायिक नव्हे– तर वैयक्तिक स्वार्थाच्या होत्या. सरकारी नोकऱ्या हेंच त्याचें प्रथमचें ध्येय होतें. पुढें मध्यमवर्गांत राष्ट्रीय वृत्तीची लाट येतांच सरकारी गुलामीचा वीट पुढील पिढीस येऊं लागला. शिक्षण घेतलेल्या बुद्धिमानवर्गास स्वतंत्रपणें पैसे कमावण्याचे दोनच धंदे नंतर शिल्लक राहिले. ते म्हणजे वकिली व डॉक्टरी; आणि जोंपर्यंत या धंद्यांत चुरस उत्पन्न झाली नव्हती तोंपर्यंत ते धंदे फायदेकारक होत गेले. कांहीं विद्वानांनीं शिक्षकपेशाही स्वीकारला. परंतु त्यांतून पैसे फार निघत नसत. अर्वाचीन आर्थिक युगांत

पैशाला मान आहे. शिवाय साधनेंही धनवानांनाच अनुकूल होत असल्यामुळें महाराष्ट्रांत वकीलवर्ग हाच कांहीं काळ समाजाचा पुढारी होऊन राहिला. चळवळीचें स्वरूप जोंपर्यंत कायद्याच्या कक्षेंत होतें तोंपर्यंत वकीलवर्गच राजकीय क्षेत्रांत चमकत राहिला.

बुद्धिमान् वर्ग व श्रमजीवी वर्ग दोघेही परकीय सत्तेचे गुलाम होते. परंतु जीवनाकडे पाहण्याचे त्यांचे दृष्टिकोण जोंवर भिन्न होते, तोंवर ते जवळ येऊं शकले नाहींत. मध्यमवर्गाच्या 'सुखं च मे शयनं च मे' वृत्तीची श्रमजीवी वर्गाला चीड येऊं लागली. तोंपर्यंत आपल्या डोक्यावर परकीय सत्ता आहे व दोघांनीं एक होऊन झुंजावयाचें आहे ही कल्पना एकालाही सुचत नव्हती. कारण जगास आजपर्यंत माहीत असलेला एकच मार्ग म्हणजे सशस्त्र बंड, तो सध्यां अशक्य आहे ही जाणीव दोघांनाही होती. परदेशांतील देशभक्तांचीं चरित्रें महाराष्ट्रांतील बुद्धिमान् वर्गास तरी अवगत नव्हतीं असें म्हणतां येणार नाहीं. परंतु मनांतून तो मार्ग पटला तरी त्याप्रीत्यर्थ कराव्या लागणाऱ्या बलिदानाची तयारी त्यांच्यांत नव्हती. मार्क्सवाद अज्ञात होता. कांहीं तरी चळवळ केली पाहिजे असें तरुण पिढीस वाटत होतें, पण 'मंत्रद्रष्टा' पुढारी निर्माण झाला नव्हता.

आंतील जोम जेव्हां सरकारविरुद्ध उग्ररूप प्रकट करूं शकेना तेव्हां त्याची परिणति आपसांतील द्वेषांत झाली. ब्राह्मणेतर व दलित जातींचा ब्राह्मणां-विषयींचा अविश्वास फुटून प्रकट झाला. त्याचें मूळ अधिष्ठान सामाजिक अन्यायांवरच उभारलेलें होतें. जेव्हां त्यांच्या आर्थिक अवनतीवर ब्राह्मण उपाय करीनात तेव्हां अनेक पिढ्यांतील जुलूम उग्र रूपांत अवतीर्ण झाला. ब्राह्मणांचें ढोंग, त्यांची बाह्यनीति व सदाचार, त्यांची वर्गनिष्ठा हीं सारीं उपहासास्पद बनलीं. त्या वेळीं ब्राह्मणेतर समाजानें आपला विरोध इतक्या संघटित रूपांत व्यक्त केला, कीं ब्राह्मणवर्गाचे डोळे उघडले व खरी परिस्थिति त्याच्यांतील विचारी लोकांच्या डोळ्यांसमोर उभी राहिली.

याच वेळीं अर्वाचीन संस्कृतीचें आणखी एक मोठें साधन पुढारीवर्गाच्या डोळ्यांसमोर प्रामुख्यानें आलें व तें म्हणजे 'प्रचारकार्य' होय. समाजाचीं दुःखें किंवा त्यावर होत असलेले अन्याय वेशीवर टांगणें अवश्य होऊन

बसलें. सरकारवर टीका करतांना शिक्षेची भीति चळवळ्यांना वाटे. पण ब्राह्मणेतरांना ब्राह्मणांवर टीका करण्यांत ही भीति वाटत नव्हती. त्यामुळें त्यांचें प्रचारकार्य सुलभ झालें. 'तमाशे' हें एक फार सोपें व कमी खर्चाचें साधन होऊन बसलें. वर्तमानपत्रें फक्त सुशिक्षित व तीं विकत घेऊन शकणारेच वाचूं शकतात; परंतु अज्ञानसमाजांत प्रचार करण्यासाठीं बिनखर्चाच्याच पद्धति योजल्या पाहिजेत व त्या सोप्याहि असल्या पाहिजेत. ब्राह्मणेतर चळवळीमुळें महाराष्ट्रांतील मोठा वर्ग जागा झाला. बुद्धिजीवी वर्गापेक्षां साहसांत उडी घेण्याची श्रमजीवी वर्गाची ताकद अधिक असते. त्या वर्गाप्रमाणें श्रमजीवी नीतीचें अवडंबरही माजवीत नाहीं; आणि कष्टाची आंच त्याला लागलेली असल्यामुळें स्वतःच्या समदुःखी वर्गबांधवांविषयीं अधिक सहानुभूतीची भावना त्याच्या मनांत असते. त्याचें इमानही अधिक जाज्वल्य असतें. वर्ग-संघटना केल्यास तो अधिक तत्पर सैनिक बनूं शकतो. लष्करांतील शिपाई याच वर्गांतील असतात हें प्रसिद्ध आहे. असो, ब्राह्मणेतर चळवळीमुळें जरी या मोठ्या वर्गाच्या देशभक्तीच्या भावना जागृत झाल्या नाहींत तरी त्यांना चळवळी निर्माण करून त्यांत काम करण्याची तालीम पुष्कळच मिळाली व अन्यायाच्या जाणीवेला तोंड कसें फोडावें याचाहि धडा त्यानें गिरविला.

मोर्ले-मिंटो व मॉंटफर्ड सुधारणांमुळें मताधिकाराचें क्षेत्र वाढत चाललें होतें. त्याचा परिणाम आणखी दोन वर्गांवरही झाला—ते म्हणजे अस्पृश्य आणि स्त्रिया होत.

महाराष्ट्रांतील उदारमतवादी कार्यकर्त्यांनीं या दोघांच्याही उद्धाराची खटपट केली होती. पैकीं स्त्रीवर्गाला अधिक सोयी व उत्तेजन मिळाल्यामुळें त्याची प्रगति झपाट्यानें होत गेली. अस्पृश्यांत जागृति येण्यास थोडा अवकाश लागला. ब्राह्मणांप्रमाणेंच इतर स्पृश्यवर्णांनींही अस्पृश्यांना दूरच ठेविलें. त्यांचा इतिहास पुढें स्वतंत्र प्रकरणांत करूं. येथें एवढेंच सांगावयाचें कीं महाराष्ट्रांत अन्यायाची जाणीव समाजाचे एकाखालचे एक थर भेदून तळाचा ठाव घेऊं पाहत होती.

राजकीय क्षेत्रांत संघटना होण्यापूर्वी समाजांतील साऱ्या वर्गांकडून सह-योगाची अपेक्षा करावी लागते ही गोष्ट महाराष्ट्र हळूहळू शिकत होता.

ब्रिटिश साम्राज्यासारख्या बलिष्ठ साम्राज्याशीं झुंजण्यास केवळ फुरसतीच्या वेळीं कायद्याचें पांडित्य करणारा वर्ग पुरेसा नव्हता. मुसलमान लोकांच्या आक्रमणा-पुढें हिंदी क्षत्रियवर्ग पुढें पुढें नामोहरम होत गेला त्यांतील बीज हेंच आहे. दुसरी गोष्ट ही कीं, राजकीय संवटनेंत दिवसाचे चोवीस तास व सारें आयुष्य घालणारे व लोखंडाचे चणे खाणारे देशसेवक हवे होते. विसाव्या शतकाच्या आरंभीं एकाच व्यक्तीनें हा धडा घालून दिला व ती व्यक्ति म्हणजे लो. टिळक होत.

टिळक स्वभावतः लढवय्या प्रकृतीचे होते. त्यांचें शौर्य व तत्त्वासाठीं हाल सोसण्याची तयारी यांच्या योगानें त्यांनीं बहुजनसमाजाचीं मनें आपल्याकडे आकर्षून घेतलीं. जनतेला साहसी पुढारी हवा असतो आणि तो जितका चिवट व मेहनती असेल तितकी त्याची लोकप्रियता व जनमनावरील पकड अधिक टिकते. तितक्यापुरते टिळक तत्कालीन कोणत्याही कार्यकर्त्यांपेक्षां अधिक पुढें गेलेले होते. व हिंदी समाज त्यांना इतर कोणाहीपेक्षां अधिक मानीत होता. त्यांचें धोरणसुद्धां अखिल भारतीय स्वरूपाचें होतें. त्यामुळें हिंदूशिवाय इतर धर्मीयांशींही त्यांचे राजकीय संबंध पोंचत असत. परंतु परिस्थितीमुळें त्यांच्या नेतृत्वाच्या ठायीं कांहीं उणीवा निर्माण झाल्या होत्या, त्याला टिळकांचा इलाज नव्हता.

पहिली गोष्ट ते जातीनें ब्राह्मण होते. ब्राह्मणेतरांचा विश्वास त्यांना मिळणें कठीण होऊन बसलें.

त्यांच्या शास्त्री घराण्याचे जे संस्कार त्यांच्या मनावर झाले होते त्या योगानें सामाजिक सुधारणांकडे पाहतांना त्यांची दृष्टि सनातनी असे. बहुजन-समाज एखाद्या नेत्याकडे आदरबुद्धीनें पाहील; परंतु तेवढ्यानें तो त्याच्या-साठीं जीव देण्याला तयार होणार नाहीं. जेव्हां त्याची मनोवृत्ति आपल्या मनोवृत्तीशीं एकजीव झाली आहे अशी जनतेच्या मनावर दृढ छाप बसते तेव्हांच जनता त्याचें पुढारीपण आंधळेपणानें स्वीकारते. टिळक बहुजन-समाजाशीं इतके समरस झाले नव्हते. राष्ट्रीय हिताच्या दृष्टीनें मुसलमान-वर्गाशीं 'समेट' करण्यास ते तयार झाले यांत त्यांचा दूरदर्शीपणा व देशहित-बुद्धि दिसते. परंतु त्यांचें हृदय त्या समाजाशीं एकजीव होतें असें मात्र

कोणी म्हणूं शकणार नाहीं. हें एक उदाहरण झालें. हिंदु समाजांतील ब्राह्मणेतर किंवा अस्पृश्य यांबद्दल त्यांच्या मनांत तिरस्कार असणें शक्य नाहीं. परंतु त्यांचा जातीय दृष्टिकोण त्यांनीं समजावून घेण्याचा प्रयत्न केला असेल असें वाटत नाहीं आणि दलित समाजाची सुप्त अहंभावना हा प्रकार सहन करूं शकली नसल्यास त्यांत आश्चर्य नाहीं.

टिळकांचे अनुयायी बरेचसे महाराष्ट्रापुरते तरी ब्राह्मणसमाजांतील होते. त्यांत सनातनींचाच भरणा फार होता. वकीलवर्गावर त्यांचें वजन होतें. परंतु बुद्धिमानांचा सूक्ष्म अहंकार फार भयानक असतो. जातीय ऐक्याच्या दृष्टीनें टिळकांनीं एखादें सुधारणावादी पाऊल टाकलें असतें तरी वरील समाजाचा अहंकार दुखावला गेला असता हें खचित; तेव्हां ज्यांच्याकडून काम करून घ्यावयाचें त्यांना दुखविणें टिळकांना जड गेल्यास आश्चर्य नाहीं.

लो. टिळकांच्या 'आठवणीं'तून अस्पृश्यांबाबतच्या त्यांच्या सकृद्दर्शनीं धरसोडी धोरणाचीं उदाहरणें आढळतात. श्री. विठ्ठल रामजी शिंदे यांनीं कांहीं आठवणी दिल्या आहेत. व्यक्तिशः टिळक अस्पृश्यतेचें निर्मूलन झालें पाहिजे या मताचे होते. २४ मार्च १९१८ रोजीं मुंबईस भरलेल्या अस्पृश्यता-निवारणाचे परिषदेंत लोकमान्यांस शिंदे "देणेकऱ्याप्रमाणें धरणें" धरून घेऊन गेले. ७००० वर लोकसमुदाय जमला होता. "लोकमान्यांसही आवेश चढून त्यांच्या गर्जना मंडपाबाहेर रस्त्यांतच नव्हे— तर पलीकडील चाळींत राहणाऱ्या लोकांच्या कानांवरही आदळत होत्या. "पेशव्यांच्या वेळींही अस्पृश्यांनीं भरलेल्या पखालींतील पाणी ब्राह्मण प्याले. ...If a God were to tolerate untouchability I would not recognise him as God at all (अस्पृश्यता देवास मान्य असेल तर मी त्यास देवच म्हणणार नाहीं). मी येथें जरी आज शरीरानें प्रथमच आलों आहे, तरी मनानें ह्या चळवळींत नेहमींच आहे. जुन्या काळीं ब्राह्मणांच्या जुलमानें ही चाल पाडली, हें मी नाकारीत नाहीं; पण ह्या रोगाचें आतां निर्मूलन झालेंच पाहिजे."

याप्रमाणें भरघोष भाषण झाल्यावर जाहीरनाम्यावर सही देण्याचा प्रसंग आला. केळकर व खापर्डे यांनीं तात्काळ आपल्या सह्या दिल्या. "पण

लोकमान्य कचरूं लागले! एकवेळ ते पुढेंहि आले; पण दादासाहेब करंदीकर आडवे आले! शेवटीं लोकमान्य अगदीं काकुळतीस येऊन उभे राहून त्यांनीं दोन्ही हात माझ्या खांद्यावर ठेविले व आर्जवूं लागले कीं, 'इंग्लंडाहून परत येईपर्यंत तरी तुम्हीं हा आग्रह सोडावा."

अखेर सही दिली नाहींच. मात्र इंग्लंडहून परत आल्यावर सोलापूरच्या प्रांतिक परिषदेचे वेळीं त्यांनीं सहभोजनाचें निमंत्रण द्यावयास आलेल्या शिंद्यांना वचन दिलें कीं, "सोलापुरासच, काय पण प्रत्यक्ष पुण्यासही असें सहभोजन झाल्यास मी आनंदानें येईन."

नंतर काळानें लवकरच त्यांच्यावर झडप घातली!

एकंदरींत ब्राह्मण (सनातनी) अनुयायांना दुखविणें त्यांना जड जाई.।

पुन्हा या बुद्धिमान् वर्गांत वर्गनिष्ठाही कमीच होती. त्यांचीं नीतितत्त्वें सामाजिक रूपाचीं असलीं तरी प्रत्येक व्यक्ति बहुधा व्यक्तिनिष्ठच वागत असे. टिळक मंडालेला तुरुंगवास भोगीत असतां त्यांच्या अनुयायांत—ज्यांच्या इमानावर व कर्तबगारीवर विश्वास ठेवून ते तुरुंगवास भोगीत होते—टिळकांच्या संस्था आपल्या ताब्यांत आणण्यासाठीं जी स्पर्धा चालू होती ती पाहिली असतां, टिळक परत आल्यावर महाराष्ट्रांतील आपलें सारें तप व्यर्थ गेल्याचा अनुताप त्यांच्या मनास आंतून झाला असल्यास नवल नाहीं. शिवाजीमहाराज औरंगजेबाच्या अटकेंत असतां व ते सुटल्यावरही पुन्हा राज्यांत परत येईपर्यंत त्यांच्या अशिक्षित अनुयायांनीं तरी अधिक शिस्त व सेवातत्परता दाखविली असें म्हटलें पाहिजे.

यानंतर आणखी एक मोठी उणीव टिळकांच्या बाबतींत दाखवायची म्हणजे त्यांच्यामागें धनिकवर्गाचा पाठिंबा नव्हता ही होय. महाराष्ट्र हा दरिद्रीच प्रांत आहे, परंतु आधुनिक युगांत सर्व प्रकारच्या चळवळी चालविण्यास पैसा लागतो. प्रचारकार्य हे सध्यांचें एक जबरदस्त साधन आहे. लोकोपयोगी संस्था याही पैशाशिवाय चालत नाहींत. ब्रिटिश भांडवलशाही हीच साम्राज्य-शाहीच्या मुळाशीं असल्यामुळें तोडीस तोड म्हणून तिच्या सामन्यासाठीं संघटित लोकशक्ति उभी करावयाची असली तरी हें महत्कार्य पैशाशिवाय होणें अशक्य होतें. महाराष्ट्रांत कांहीं वकील सधन होते. परंतु राजकारणांत त्यांच्या वर्गणीनें अखिल भारतीय संघटना झाली नसती. साऱ्या देशाचें नेतृत्व

पत्करणें ही जबाबदारी कांहीं लहानसहान गोष्ट नव्हे. महाराष्ट्राची शक्ति या कामीं अपुरी पडली.

टिळक मंडालेहून परत आल्यानंतर अखिल भारतीय स्वरूपाचे प्रश्न वाढतच गेले. महायुद्धाचे चांगले-वाईट परिणाम हिंदुस्थानांतही दृष्टोत्पत्तीस आले. चांगले असे कीं, पश्चिमेकडील युद्धानें हिंदी तरुणांच्या उमद्या मनांत आशा व उत्साह यांचा प्रादुर्भाव झाला. आपल्या देशासाठीं आपणही कांहीं करून दाखवावें असें त्यांना वाटूं लागलें. वाईट परिणाम हे कीं, देशांतील पुष्कळ संपत्ति व मनुष्यबल लढाईत खर्ची होऊन, शेतकरीवर्गही पिळून निघाला व या सर्वांवर कळस म्हणून स्वराज्याचा कांहीं हप्ता मिळण्याऐवजीं काळे कायदे, पंजाबचे अत्याचार व खिलाफत प्रकरण एवढें बक्षीस हिंदुस्थानच्या पदरांत पडलें. यामुळें देश संतप्त झाला, पण करतो काय? अंगांत रक्त सळसळत होतें, उत्साह वाढत होता. कार्याला उद्यत होण्याची प्रवृत्ति वाढत होती. बलिदानाचीं स्वप्नें पडूं लागलीं होतीं. पण दिशासूचन करणारा व अंतिम यशाची खात्री देणारा नेता त्यांना मिळत नव्हता. राष्ट्राचे डोळे सारी जबाबदारी आपल्या शिरावर घेणाऱ्या आणि पळांत निश्चय करून तो अमलांत आणणाऱ्या प्रभावी नेत्याकडे लागले होते. परिस्थिति अनुकूल होती, उत्कंठित होऊन देश वाट पाहत होता, आणि—

---

# ३ अहिंसेचा प्राचीन वारसा



लोकमान्यांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रांतील जवळ जवळ दहा वर्षांचा काळ संघर्षात गेला. सकृद्दर्शनीं त्याची कारणमीमांसा स्थूल दृष्टीनें करितां येईल. परंतु नुसत्या राजकारणाच्या दृष्टीनें तिकडे पाहून भागणार नाहीं.

कोठल्याही प्रकारचा सामाजिक प्रयोग करावयाचा असेल तरी त्याला दोन गोष्टींची तयारी करावी लागते. साधन आणि साधना. समाजांतील सर्व शक्ति, सद्‌गुण व पुरुषार्थ या दोन गोष्टींवर अवलंबून आहेत. समाजाच्या संस्कृतीचा दर्जा या दोहोंच्या स्वरूपांप्रमाणें बनत जातो.

महाराष्ट्रांतील हा दशवार्षिक संघर्ष या दोन गोष्टींबद्दलच्या मतभेदावरूनच चालला होता. दोन विचारपद्धतींतील तें भांडण होतें. एक नवीन क्रांतिकारक कल्पना समाजाला दिली जात होती. साराच समाज या क्रान्तीच्या भट्टींत पडूं पाहत होता. परंपरागत विचारसरणीला धक्का बसतांच असंतोष माजला.

महाराष्ट्रांत राजकीय विचारवाद्यांची एक सशस्त्र क्रांतिवादी विचारसरणी होती हें मागें सांगितलेंच आहे. तिला अनेक फांटे फुटले तरी ती भारतीय काळापासून चालत आलेल्या आर्य (!) संस्कृतीच्या क्षात्रस्वरूपाहून भिन्न नव्हती. या संस्कृतिस्वरूपाचा पाया 'संहार' हा आहे. द्वेष, विग्रह, सूड या विकारांस त्यांत स्थान आहे. चातुर्वर्ण्याचें रक्षण करणारे क्षत्रिय आपापसांत कलह करून मरून जात, दिग्विजय करून साम्राज्यशाहीचा डौल मिरवीत. रंतिदेवासारखा मान्यवर राजा हजारों गाईंचें बलिदान देई व त्याचा लौकिक होई. कारण यज्ञांत तो हजारों ब्राह्मणांना जेवण घाली. मद्यपानाला आळा नसे, परस्त्रीहरण राजरोस चालत असे. द्यूत तर त्या काळची फॅशन होती.

या भूतकालच्या दौलतीचा वारसा मध्ययुगाचाहि भेद करून थेट पेशवाई व इंग्रजांच्या काळापर्यंत लोकांनीं उपभोगिला. सर्वसाधारण समाज भौतिक-

वादी असतो आणि भौतिकवादी म्हणजे पार्थिव गोष्टींना महत्त्व देणारा असणारच. त्याचें साधन 'हिंसा' व साधना 'असंतोषाचा फैलाव.'

लोकमान्यांपर्यंत जे अनेक राजकारणी पंथ झाले त्यांचे आपसांत कितीही मतभेद असले तरी स्वातंत्र्यप्राप्तीचें साधन हिंसा या बाबतींत कोणालाही मनांतून तरी शंका नव्हती. प्रबळ व समर्थ इंग्रजांच्या दाबाखालीं राहत असतां त्यांच्याविरुद्ध सशस्त्र बंड करण्याची कल्पना मुखानें वा लेखणीनें प्रसृत करणें असंभवनीय होतें. कित्येकांच्या दृष्टीनें काल अनुकूल नव्हता. त्यांतील मर्म हेंच कीं राज्यसत्ता दुबळी झाली नव्हती. जर्मनींत हिटलर, इटलींत मुसोलिनी किंवा रशियांत लेनिन यशस्वी होण्यास तेथील राज्यतंत्र ढिलें झालें होतें हें मुख्य कारण आहे. हिंदुस्थानांतील आंग्लसत्ता अजूनही शक्तिशाली व कार्यकुशल आहे. हिंसेचा प्रतिकार हिंसेनें करूं म्हटलें तरी तिची हिंसाशक्ति अधिक प्रचंड आहे हें सर्व हिंदी नेते आजच्याप्रमाणें तेव्हांही जाणून होते. या पहाडी भिंतीवर ज्या थोड्या वेड्यांनीं डोकें आपटण्याचा प्रयत्न केला ते डोकें गमावून बसले. बाकीच्यांपैकीं कित्येकांनीं निराशावाद स्वीकारला, कित्येकांनीं राज्यकर्त्यांच्या भलेपणाला द्रव फोडण्याची उमेद धरली; तर लोकमान्यांसारखे शक्तीचे उपासक कायदेशीर भांडणें करीत राहिले. या भांडणांची परिणति सशस्त्र बंडांत यशस्वीपणें होऊं शकली असती तर ती त्यांना नको होती असें नाहीं. श्री. ग. वि. केतकर यांच्या आठवणींत टिळक व गांधी यांचा एक संवाद आहे त्यावरून टिळकांच्या मतावर प्रकाश पडतो.

"गांधी म्हणत होते, 'नॉन-कोऑपरेशन' हें सनदशीर आहे." टिळकांनीं सांगितलें, 'मी सशस्त्र बंड देखील सनदशीर समजतों, आज तें शक्य नाहीं इतकेंच. सशस्त्र बंडाला यश येईल अशी कोणी आठ आणे जरी खात्री दिली तर बाकीच्या आठ आण्यांबद्दल परमेश्वरावर विश्वास ठेवून मी बंड पुकारीन. पण आज पाव आण्याइतकीही तयारी व खात्री नाहीं.' "

लाला लजपतराय यांस हद्दपार केल्याचें कळतांच ते त्वेषानें उद्गारले, "लालाजींसारखा देशभक्त हद्दपार होतो आणि लॉर्ड मिंटो अजून कसा जगतो!" नंतर निराशेनें हलक्या स्वरांत ते म्हणाले, "या दुर्बल राष्ट्राकडून भलतीच अपेक्षा करणें मूर्खपणाचें आहे."—'आठवणी' खंड १, पृ.– २२१

महाराष्ट्रांतील दहशतवादी, क्रांतिकारक म्हणविणारे व टिळकपंथी म्हणविणारे जरी उघड बोलले नाहींत तरी त्या सर्वांचे संस्कार हे असेच आहेत. गॅरीबाल्डी, मॅझिनी वगैरे वीरांचीं चरित्रें, यांचा आदर महाराष्ट्रांत पुष्कळ वर्षांपासून चालू होता. भूतकालांतील इतिहास नुसत्या कौतुकानें लिहिला जात नव्हता. बाजीराव पेशवे, बापू गोखले, महादजी शिंदे, राणी लक्ष्मीबाई यांचीं चरित्रें रसाळपणें लिहिणारे मनोमन युद्धमार्गाचे पूजक होते.

परंतु वास्तवसृष्टींत काल्पनिक पूजेनें काय साधणार? प्रजाविकासांत त्यामुळें यत्किंचितही भर पडत नव्हती. सामान्य जनसमुदायाला भारतीय हिंसाशास्त्र उमगत नव्हतें किंवा पाश्चात्य आसुरी शास्त्रें कळत नव्हतीं. त्यांचे अन्न-पाण्याचे प्रश्न जो नेता आत्मीयपणें उकलूं शकला असता, त्याचें म्हणणें त्यांनीं श्रद्धापूर्वक मानलें असतें. लोकमान्यांनीं खूप स्वार्थत्याग केला, निर्भयपणा दाखविला, तुरुंगवास सोसला परंतु प्रजेच्या दुःखाचा अंत अजमावणारी प्रत्यक्ष योजना कांहीं तयार केली नाहीं. लोक त्यांची वीरपूजा करीत. परंतु जीवनक्रांतीचा स्पष्ट मार्ग त्यांचेकडून सुचविला गेला नाहीं. प्रजेचें खरें शिक्षण पुस्तकें वाचून, व्याख्यानें देऊन, किंवा वर्तमानपत्रें चालवून थोडेंच होतें? तें शिक्षण आत्मक्लेशानें, आपल्या पुरुषार्थानें मिळविलें पाहिजे. त्याचाच अर्थ प्रजेच्याच हस्तें एक प्रचंड चळवळ करविली पाहिजे.

तेथवर नेत्यांची दृष्टि सशस्त्र बंडापर्यंत पोंचली होती. सशस्त्र बंड अशक्य असल्यामुळें दुसरें साधन त्यांना उमगत नव्हतें. सामर्थ्यशाली परकीय सत्तेला विरोध करण्यासाठीं शस्त्राशिवाय एक प्रभावी चळवळ करितां येते याची कल्पना कोणास येणें कठीण होतें.

लोकमान्यांतील क्रांतिवादी वृत्तींचा क्षोभ १९०७च्या आसपास फारच कळसास पोंचला होता. एकीकडून सरकारचें जुलमी धोरण, कर्झनशाहीचा देशभर—विशेषतः बंगाल प्रांतांतील धिंगाणा, प्रजेची हताश स्थिति आणि त्याच वेळीं उचंबळून येत असलेली तिची त्वेषवृत्ति यांच्या जोडीस कॉंग्रेसच्या प्रागतिक सूत्रधारांचे तिच्या धोरणाला मागें खेंचण्याचे लज्जास्पद प्रयत्न यामुळें लोकमान्यांचा क्षोभ वाढतच होता. प्रजेची संघटना करून तिच्यामार्फत राष्ट्रव्यापी चळवळ सुरू करावी आणि सरकारवर तिचा

शह आणावा असे विचार जोरानें त्यांच्या अंतःकरणांत येऊं लागले. त्याचाच परिणाम त्यांचें कलकत्त्यांतील Tenets of The New Party हें प्रसिद्ध व्याख्यान होय. त्यांत त्यांनीं सार्वत्रिक बहिष्काराचा अमोघ राजकारणी अस्त्र म्हणून पुरस्कार केला आहे. अरविंद घोष यांनीं तर यापुढेंही जाऊन "निःशस्त्र प्रतिकार" हा मार्गही बोलून दाखविला. "आम्ही लोकांना सांगतों कीं, स्वातंत्र्याचें ध्येय कोणत्याही स्वरूपांत प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर त्याला शांततेचा मार्ग आहे. आम्ही म्हणतों कीं, स्वावलंबनानें, निःशस्त्र प्रतिकारानें आम्हांस तें प्राप्त होईल ...आम्हांला सांगण्यांत येतें कीं, निःशस्त्र प्रतिकाराचा उपदेश करून तुम्ही लोकांना कायदे मोडण्यास, शांततेचा भंग करण्यास, उत्तेजन देतां आणि अत्याचारास व बंडास प्रवृत्त करितां. पण वस्तुस्थिति याच्या अगदीं विरुद्ध आहे. अत्याचाराचा अवलंब न करितां आणि कायद्याच्या राज्यास धक्का न लावितां आपल्या न्याय्य आकांक्षा तृप्त करण्याचा एकच मार्ग निःशस्त्र प्रतिकाराच्या स्वरूपांत आम्ही लोकांस दाखवून देत आहोंत."

याप्रमाणें निःशस्त्र प्रतिकाराचा उच्चार तर हिंदी राजकीय आकाशांत घुमला. परंतु त्याचें स्वरूप निश्चित झालें नव्हतें. कारण कोणाचीही मानसिक किंवा आध्यात्मिक भूमिका त्या शस्त्राला योग्य अशी नव्हती. पुण्यास शांततेचें पिकेटिंग टिळकांनीं सुरू केलें. स्वयंसेवक शांत राहिले तरी विरुद्ध बाजू शांत राहील हें अशक्यच होतें. आणि अरेराव पोलिस व भेदनीतीचा अवलंब करणारी नोकरशाही यांचे डावपेच तर सामान्य जनांच्या आकलनाबाहेरचे असावयाचे. युरोपांतील Agent Provocataur संस्थेची ज्यांस माहिती आहे त्यांस शांततेचें दारूनिरोधन करण्यांत देखील किती अडचणी आहेत हें लक्षांत आल्याविना राहणार नाहीं. पुण्यांतील निरोधन करणाऱ्या स्वयंसेवकांस त्रास पोंचूं लागला आणि साहेबांची व स्वयंसेवकांची मारामारी झाली. खुद्द टिळकांना "साहेबांनीं मांडलेल्या धिंगाण्याची बातमी समजल्यापासून घोड्याच्या गाडींतून त्याचा पाठलाग करीत" हिंडण्याची पाळी आली व असेहि उद्गार काढावे लागले कीं, "साहेब असा बेफामपणें अंगावर आला असतां त्याची कणीक चांगली तिंबली गेली पाहिजे." –आठवणी खंड १, पृ. ३६०.

निःशस्त्र प्रतिकार हें शस्त्र जाज्वल्य करावयाचें असेल तर त्याच्या पाठीशीं एका मोठ्या तत्त्वाची भूमिका असावी लागते हें तत्कालीन जहाल राजकीय पुढाऱ्यांस उमगलें नव्हतें. तें तत्त्व म्हणजे 'अहिंसा' हें होय. या तत्त्वाचें निष्ठापूर्वक पालन करण्यांत आलें नाहीं, तर निःशस्त्र प्रतिकार फार दिवस निःशस्त्र राहणार नाहीं किंवा त्याचें पर्यवसान जुलमाला वश होण्यांत होईल. म्हणजे अधःपात झालाच !

परंतु अहिंसेचें तत्त्वज्ञान लोकांस शिकविण्यास स्वतः पुढाऱ्याचें जीवन त्या तत्त्वावर उभारलेलें हवें होतें. तत्कालीन जहाल पुढाऱ्यांत ही भूमिका कोणाचीच नव्हती. त्यामुळें स्वतःशींच झुरत त्यांना स्वस्थ बसावें लागलें. १९०७ नंतर सरकारनें जी सार्वत्रिक दडपशाही सुरू केली तिला लाल व बाल हे मोहरे तर बळी पडलेच. अरविंदबाबूंनाही तिची आंच लागली. पुढें ते सुटले तरी त्यांची मानसिक स्थिति कठीण झाली. मनांतील आकांक्षा तृप्त होण्याचें चिन्ह दिसेना आणि डोळ्यांवर कातडें ओढून " जें जें होईल तें तें पहावें " या धोरणाचा अवलंबही त्यांच्यानें करवेना. चिनी सेनापति पराभूत झाला म्हणजे भिक्षु बनत असे. त्याप्रमाणें त्यांचें उत्कट भावनावश हृदय परिस्थितीच्या दडपणानें निराश होतांच त्यांनीं योगमार्गाचा अवलंब केला आणि स्वतःच आपणांस निर्वासित करून घेतलें. जातांना त्यांनीं हृदयद्रावक भाषेंत आपल्या देशबांधवांस शेवटचा संदेश दिला. त्यांत हिंदुस्थानला योग्य पुढारी मिळावा म्हणून आर्तनाद केला आहे :—

" राष्ट्रीय पक्षाची स्थिति बिकट झाली आहे. पण या परिस्थितींतही कार्य चालू ठेवणें अशक्य नाहीं.......हा पक्ष जिवंत आहे आणि त्याची शक्ति व व्याप्ति याही पूर्वीपेक्षां कमी झालेल्या नाहींत. **त्याला एका पुढाऱ्याची व धोरणाची आवश्यकता आहे.** धोरण त्याला सांपडूं शकेल; पण पुढारी मात्र केवळ परमेश्वरच पुरवूं शकेल. आपला परमेश्वर-नियोजित पुढारी येई-पर्यंत आणि आपण परमेश्वरी शक्तीच्या आविष्काराचें साधन बनेपर्यंत, सर्वच मोठ्या चळवळी थांबून राहत असतात. नंतर जेव्हां तो येतो तेव्हांच त्या आपल्या कार्यांत विजयशाली होण्यास पुढें सरसावतात. आजपर्यंत ज्या लोकांनीं या चळवळीचें नेतृत्व केलें ते खंदे वीर होते, त्यांच्या अंगीं श्रेष्ठ

गुण होते. त्यांची प्रतिभा प्रभावी होती. इतर कोणत्याही चळवळीचें नेतृत्व करण्यास लागणारें मोठेपण त्यांच्या अंगीं होतें; पण या जगद्व्यापक क्रांतींतील प्रमुख प्रवाहाचें अखेरपर्यंत नेतृत्व करण्यास त्यांची ही शक्ति पुरी पडली नाहीं. म्हणून भावी कालाचा निर्धारक अशा राष्ट्रीय पक्षानें असा पुढारी पुढें येईपर्यंत आतां वाटच पाहिली पाहिजे. आपत्तींतही त्यानें शांत राहावें; पराभवांतही आशा सोडूं नये; परिणामीं आपणांस विजय मिळेल याबद्दल खात्री बाळगावी; आणि हिंदुस्थानच्या भावी पिढ्या आणि जगांतील इतर राष्ट्रें यासंबंधींच्या आपल्या जबाबदारीसंबंधीं नेहमीं जागरूक राहावें."

याप्रमाणें संदेश देऊन अरविंदबाबू पॉंदिचरीस निघून गेले. नंतर हिंदुस्थानांत स्मशानशांतताच होती. मात्र ज्या अलौकिक पुढाऱ्याचें भविष्य अरविंदबाबूंनीं केलें होतें तो भारतवर्षापासून शेंकडों मैलांवर प्रचंड तपस्या करीत होता. महायुद्धाची ठिणगी पडण्यापूर्वीच त्यानें अहिंसेच्या भूमिकेवरून निःशस्त्र प्रतिकाराच्या चळवळीचा प्रयोग दक्षिण आफ्रिकेंत यशस्वी करून दाखविला. त्या अस्त्राला त्यानें 'सत्याग्रह' हें नांव दिलें. आणि महायुद्ध संपल्यावर हिंदुस्थानांत जेव्हां १९०७ च्या कालाची दुप्पट जोरानें पुनरावृत्ति झाली, देशाचें अन्तःकरण त्वेषानें संतप्त झालें, तेव्हां जनतेच्या पुरुषार्थास वाव देणारें आपलें अमोघ अस्त्र घेऊन तो पुढें आला, आणि जनतेच्या नेतृत्वाचें रिकामें सिंहासन त्यानें विभूषित केलें.

महात्माजींनीं पुढें केलेल्या 'सत्याग्रह' या अस्त्राच्या नाविन्यानें ज्याप्रमाणें जनता मुग्ध झाली. त्याचप्रमाणें त्याचें सर्वव्यापी व सर्वोदयकारी* स्वरूपही तिला ग्राह्य वाटलें. त्याचें शिक्षण आबालवृद्ध, स्त्री-पुरुष सर्वांस मिळण्यासारखें होतें. त्यानें सर्वांच्या जीवनांत परिवर्तन घडवून आणलें. आतांपर्यंत बुद्धिनिष्ठ लोकांनीं लेखी शिक्षण व साहित्यद्वारा सामाजिक

* रस्किन या प्रसिद्ध इंग्रज लेखकाच्या Unto This Last या पुस्तकाचें भाषांतर महात्मा गांधींनीं 'सर्वोदय' या मथळ्याखालीं केलें आहे. Greatest Good of the Greatest Number या बेंथॅमच्या सिद्धान्ताच्या विरुद्ध "सर्वांचें कल्याण" अशा अर्थाची त्यांत मांडणी आहे. बहुसंख्याकांचा उद्धार व अल्पसंख्याकांना क्लेशांत खितपत ठेवणें हें महात्मा गांधींना पसंत नाहीं.

जीवनाचा जो विलास चालविला होता त्यापासून बहुजनसमाज तोंड फिरवूं लागला. या मार्गांत त्याला जिवंत शिक्षण मिळूं लागलें. मग तो महात्माजींच्या मागें वेड्यासारखा कां धांवणार नाहीं ?

ही स्थिति खुद्द लोकमान्यांच्या नजरेंत आली नव्हती असें म्हणतां येत नाहीं. दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाविषयीं लिहितांना ते लिहितातः— " आफ्रिकेंत मागें नीग्रो लोकांस ज्याप्रमाणें ते वागवीत होते, त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील काळ्या लोकांस मजूर म्हणून तेथें नेऊन केवळ पशूंप्रमाणें त्यांस वागविण्याची आणि त्यांच्या उद्योगावर आपण समृद्ध होण्याची वसाहतवाल्यांनीं कल्पना काढली. आणि आमच्या हिंदुस्थानांतील नोकरशाही, वसाहतवाल्यांच्या बांधवांचीच असल्यामुळें वसाहतींतील हिंदी मजुरांच्या शोचनीय स्थितीकडे हिंदुस्थान सरकारचें जावें तितकें लक्ष गेलें नाहीं. **ही शोचनीय स्थिति हिंदुस्थानांतील पुढारी लोकांच्या लक्षांत येऊन गेल्यास पुष्कळ वर्षें झालीं, पण गांधींसारखे पुरुष पुढें येईपर्यंत तिचें अल्पदेखील निवारण झालें नाहीं. समजलें होतें पण उमजलें नव्हतें; आणि उमजलें तरी करवत नव्हतें असा प्रकार होता. या कुचंब्यांतून लोकांना बाहेर काढून गांधींनीं आपल्या उदाहरणानें सुधारणेचा मार्ग दाखविला.**" —लो. टिळकांची प्रस्तावना— श्री. अवंतिकाबाई गोखलेकृत महात्मा गांधींचें चरित्र.

वरील उद्गार दक्षिण आफ्रिकेंतील परिस्थितीबाबत लिहिले आहेत तेच हिंदुस्थानच्याही परिस्थितीला तंतोतंत लागू पडतील.

मंडालेहून परत आल्यावर लोकमान्यांनीं कांग्रेसची व हिंदुस्थानच्या एकंदर राजकीय परिस्थितीबाबतची जी दैना पाहिली तिचा परिणाम त्यांच्या मनावर झालाच असला पाहिजे. एरवीं इंग्रज साम्राज्यशाहीचा द्वेष करणारे लोकमान्य महायुद्धांत इंग्रजांना मदत करा असें सांगण्याच्या भरीस केव्हांच पडले नसते. यासंबंधीं श्री. केळकरकृत " लोकमान्य टिळकांचें चरित्र, भाग २, यांत पुढील ओळी सांपडतातः— " मुंबई सरकारनें हस्तें-परहस्तें असा डाव टाकला कीं, टिळकांच्या दारावरचा पहारा उठवून ता. २५ जूनचा हुकूम परत घेण्याला आम्ही तयार आहों. पण उलट टिळकांनींही मन थोडें मोठें

करून सरकारच्या या संकटाच्या वेळीं त्यांना सहानुभूतिपर उद्गार काढावे म्हणजे परस्पर हिशेब मिटला. इकडे टिळकांचीही मनःस्थिति या वेळीं कशी असेल याचा थोडासा विचार करूं. England's difficulty is our opportunity हें ब्रीदवाक्य त्यांनीं आपल्या मनावर नेहमीं कोरून ठेवलें होतें. पण या संधीचा उपयोग करून घेण्याचेही प्रकार असूं शकतात. हिंदुस्थानांत बंडाची खरोखरीच तयारी असती तर या संधीचा फायदा घेण्याचा प्रकार वेगळा ठरला असता. **पण तशी तयारी कोणतीच नव्हती. लोकांच्या मनाची नाहीं व साधनांचीही नाहीं.** अर्थात् हा फायदा घेण्याचा दुसरा प्रकार म्हटला म्हणजे सरकारला सहानुभूति दाखवून त्याच्या मोबदला काय मिळेल तें उचलावयाचें."

मंडालेहून परत आल्यावर गायकवाडवाड्यांत लोकमान्यांना सार्वजनिक पानसुपारी झाली. त्या प्रसंगीं त्यांचें भाषण झालें. त्यांत पुढील उद्गार आहेतः—

"आज सहा वर्षांनीं मी परत आलों व जेव्हां सर्व परिस्थिति पाहूं लागलों तेव्हां मला वॉशिंग्टन आयर्व्हिंगच्या स्केच बुकांतील रिप्व्हॅन विंकलची गोष्ट आठवली.......तशी माझी अवस्था झाली आहे. जग आहे कीं नाहीं, असल्यास तें कोणत्या स्थितींत आहे हें मीं विसरावें असाच मला या रीतीनें वागविण्यांत हेतु असावा असें मला वाटलें. पुढें तुम्ही काय करणार असा पुष्कळांनीं मला प्रश्न केला. आतां यापुढें पाऊल कसें ठेवावें याचाच विचार करावयाचा आहे. ज्या रस्त्यानें आपल्याला जावयाचें तो साफ आहे कीं नाहीं हें प्रथम पहावें लागतें."

रस्त्याचें निरीक्षण करूनच नंतर लोकमान्यांनीं सरकारच्या सूचनेचा स्वीकार करून महायुद्धासंबंधींचा आपला जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्याचें धोरण मंडालेस जाण्यापूर्वीच्या लोकमान्यांस साजेसें नाहीं. पण त्यास टिळकांचा इलाज नव्हता. क्रांतिवादी टिळक त्या वेळींही हयात होते; परंतु परिस्थितीचा जोर त्यांच्यांतील शक्तीला दाबीत होता. यासंबंधीं श्री. स. वि. बापट यांच्या एका आठवणीचाही दुजोरा मिळतो. ते लिहितातः—

"सरकारशीं राजनिष्ठ राहण्याबद्दलच्या ( लेखांतील ) मजकुराबद्दल

टिळकांच्या जुन्या स्नेह्यांनीं त्यांस फार दोष दिला. त्यावर ते म्हणाले, 'मला तें भाषण अगर तो लेख बोलण्यास व लिहिण्यास महाराष्ट्रानें व विशेषतः या लोकांनींच भाग पाडलें. माझे पश्चात् सहा वर्षांत जर सर्व मृतवत् झालें नसतें, कांहीं तयारी केली असती तर हा प्रसंग माझेवर कां येता ? सहा वर्षांत यांनीं कांहीं कामगिरी करून दाखविली असती, तर हल्लीं लढाईचा योग्य फायदा घेऊन कोणाची वाट न पाहतां हातांत बंडाचें निशाण घेऊन मीच पुढें झालों असतों ! मग व्यर्थ नांवें ठेवण्यांत अर्थ काय ?' "

पुढें महात्माजींनीं जो असहकारितेची देशव्यापी चळवळ सुरू केली तिचीं बीजें कल्पनारूपानें लोकमान्यांच्या मेंदूंत स्फुरलीं नव्हतीं असें नाहीं. ना. गोखल्यांनीं मद्रास कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. भूपेन्द्रनाथ बसु यांस पत्र लिहिलें होतें ( १४ डि. १९१४ ) त्यांत ते लिहितात— " श्री. टिळकांनीं श्री. सुब्बाराव यांना स्पष्ट व निःसंदिग्ध शब्दांत सांगितलें आहे कीं, कॉंग्रेसक्रीड म्हणून ज्याला म्हणतात ( म्हणजे हिंदुस्थानला सनदशीर मार्गानें साम्राज्यांतर्गत स्वराज्य प्राप्त व्हावें हें कॉंग्रेसचें ध्येय आहे ) तें मान्य करण्याची जरी आपली तयारी असली तरी **कॉंग्रेसच्या सध्यांच्या मार्गावर आपला विश्वास नाहीं. हा मार्ग म्हणजे सरकारशीं शक्य तेथें सहकार्य व अवश्य तेथें विरोध असा आहे.** या मार्गाऐवजीं सरकारला सनदशीर मर्यादेंत राहून निर्भेळ विरोधाचा मार्ग, दुसऱ्या शब्दांत आयर्लंड-चा अडवणुकीचा मार्ग, अवलंबावा असें त्यांचें मत आहे.... श्री. टिळकांना वाटतें कीं, येथील सरकार व ब्रिटिश लोक यांच्यापुढें एकच मागणी मांडावी. **ही मागणी म्हणजे हिंदुस्थानला स्वराज्य देण्याची मागणी होय व ती मिळेपर्यंत अधिकारांच्या जागा, कायदेमंडळें, म्युनिसिपालिट्या व जिल्हा बोर्डें यांच्या फंदांत मुळींच पडूं नये,** असा ते आपल्या देशबांधवांस उपदेश करणार आणि शक्य त्या दिशांनीं कायद्याच्या मर्यादेंत राहून **सरकारची संघटित अडवणूक करून आपण राज्ययंत्र बंद पाडूं शकूं आणि सत्ताधाऱ्यांस शरण येण्यास भाग पाडूं अशी त्यांना आशा आहे.**"

प्रत्यक्ष चळवळीच्या अस्पष्ट का होईना पण कांहीं कल्पना लोकमान्यांना स्फुरत होत्या. ते विलायतेस असतांना रौलट कायद्याविरुद्ध जी प्रचंड चळवळ हिंदुस्थानांत सुरू झाली तिचा गौरव त्यांनीं मुंबईस उतरतांच केला. त्यांनीं उद्गार काढले, "रौलट बिलाविरुद्ध गांधींनीं सत्याग्रह सुरू केला तेव्हां त्यांत भाग घेण्याला मी हजर नव्हतों एवढेंच मला वाईट वाटतें."

लोकमान्यांच्या दूरदृष्टीला अशा कांहीं तरी विराट् चळवळीचें महत्त्व पटलें होतें. ते योजना मात्र करूं शकले नाहींत; कारण 'अहिंसा' ही गुरुकिल्ली त्यांस सांपडली नव्हती. त्यामुळें त्यांची गति अडली. विधिसंकेताप्रमाणें महात्माजी चळवळीचे योजक ठरले. मात्र मूलभूत सिद्धांतांत मतभेद होण्याचा प्रसंग पुढें आला.

लोकमान्य दिवंगत झाल्यामुळें त्यांचें मत सत्य-अहिंसेच्या सिद्धांतांबाबत काय झालें असतें त्याचा प्रश्नच उरत नाहीं. त्यांच्या पश्चात् टिळकसंप्रदायी म्हणविणाऱ्यांचा महात्माजींशीं जो मतभेद झाला त्याला मुख्य कारण हेंच होतें. त्यांचा अहिंसेवर विश्वास नव्हता. नवीन प्रयोग करण्याची त्यांची हिंमत नव्हती; किंवा तो निष्फळ जाईल असेंही त्यांना वाटत असावें.

या अहिंसातत्त्वाविषयीं थोडें लिहावें लागेल. अर्थात् त्या तत्त्वाच्या नैतिक वा आध्यात्मिक महत्त्वाविषयीं फारसें लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. त्याची ऐतिहासिक वाढ लिहून हें प्रकरण पुरें करूं.

भारतवर्षाच्या इतिहासांत हिंसावृत्तीचें थैमान खूप दृष्टीस पडतें हें जरी खरें आहे तरी त्याविरुद्ध अहिंसावादाचा प्रचारही थोडाथोडका झाला नाहीं. हा सिद्धान्त महात्माजींनीं आपल्या डोक्यांतून काढला नसून त्याचा परिपोष कोणत्या ना कोणत्या तरी प्रसंगाच्या अनुरोधानें आज हजारों वर्षें हिंदुस्थानांत होत गेला आहे.

जुन्या पुराणांतून अर्वाचीन कल्पनेप्रमाणें इतिहास जरी आढळून येत नाहीं तरी त्यांत तत्कालीन समाजापुढें उभे राहिलेले अनेक प्रश्न चर्चिलेले सांपडतात. त्यांपैकीं कित्येकांचा निर्णय लागला; कित्येकांचा लागला नाहीं. त्यांतून पुढें अनेक पंथ झाले तरी मुद्दां हिंसा अथवा पशुवृत्तीचीं अनेक प्रकट स्वरूपें व त्यांना शांत करण्यासाठीं योजलेले अनेक उपाय त्या पौराणिक

कथांतून जागजागीं मिळतात. नरमेध अथवा पशुमेध, दिग्विजय, युद्धें हीं सर्व हिंसेचींच द्योतक होत. परंतु या हिंसावृत्तीला विरोध करणारा अहिंसावाद्यांचा वर्ग भारतवर्षांत वाढताच होता. ऋषभदेवापासून बुद्धदेवापर्यंत असे किती तरी महात्मे झाले, कीं ज्यांनीं अहिंसामार्गाचा उपदेश करून लोकांस संस्कार देण्याचा व त्यांची संघटना करण्याचा प्रयत्न केला. परशुरामानें संहार चालविलेला पाहून क्षत्रियांनीं आपली संघटना करण्यास सुरुवात केली तेव्हां यांतून भीषण नरमेध निर्माण होणार असें पाहून कश्यपांनीं आपल्या तपोबलाच्या प्रभावानें परशुरामास देशत्याग करावयास लाविलें व पुढील आपत्ति टाळली. राजा रन्तिदेवाची कथा, पशुमेधाचा प्रश्न पुढें सोडविण्यांत आला व पशूंची हिंसा बंद पाडण्यांत आली त्या प्रयत्नाला प्रेरक आहे. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञांत मुंगसाच्या तोंडानें त्याच्या दिग्विजयाचा धिक्कार करविला आहे. शिबिराजा व श्येन-कपोतांची कथा— क्षत्रिय राजा सुद्धां अहिंसाव्रताचें कसें पालन करूं शकतो तें स्पष्ट दाखवीत आहे. जनमेजयाचें सर्पसत्र बंद करविणारा आस्तिकमुनि हाही अहिंसासंप्रदायाचा श्रेष्ठ प्रणेता आहे. वसिष्ठांच्या कामधेनूची कथा तर सर्वप्रसिद्धच आहे. फार काय ! नागपंचमी व महाशिवरात्री हे सण देखील अहिंसेचें पुण्यस्मरण करण्यासाठींच निर्माण झाले. गीता जरी युद्ध-प्रवृत्तीचा संदेश देणारी म्हटली जाते तरी तिच्यांत युद्धाच्या प्रेरणेपेक्षां अहिंसेचें महत्त्व व

यस्मान्नो द्विजते लोको लोकान्नो द्विजते च यः ।

असलीं वचनें अधिक सांपडतात. भरतखंडांत अहिंसासिद्धान्त शतकानुशतकें वृद्धि पावतच होता. पुढें त्याला संघटितरूपानें सामाजिक व्यवहारांत बसविण्याचें काम बुद्ध व महावीर यांनीं केलें. दोघांनींही अहिंसेचा 'धर्म' म्हणून जोरानें पुरस्कार केला व तत्कालीन जीवनांत प्रचंड क्रांति घडवून आणिली. या मार्गानें जर समाजाचे प्रश्न उलगडले नसते तर नुसत्या आदर्शाला भाळून लोकांनीं त्या त्या धर्माचा स्वीकार खालीनें केला नसता. या मार्गांत जशी नैतिक श्रेष्ठता होती तशीच आत्मविश्वासाची जाणीव व संघटनेची प्रचंड शक्ति होती. जातिभेद, आर्थिक विषमता, सामाजिक विषमता, बहुजनसमाजांत पसरलेली जडता या सर्वांचें निर्मूलन करणारी शक्ति प्रजेंत उदय

पावूं लागली होती. धर्मग्रंथांतील अनुशासनाप्रमाणें क्षत्रियवर्णाचें कर्तव्य इतर वर्णांचें रक्षण करणें हें होतें. क्षत्रिय लोकच शस्त्रें बाळगीत. त्यांच्या जुलमानें त्रासून परशुरामानें त्याच साधनानें त्यांचा निःपात करण्याचा प्रयत्न केला, तो व्यर्थ गेला. तेव्हां इतर वर्णीयांसमोर जुलमाचा प्रतिकार शस्त्रांशिवाय कसा करावा हा एक प्रश्नच होता. भगवान् बुद्धांनीं या शस्त्रबळावर करण्यांत येणाऱ्या दिग्विजयाचा निषेध केला आहे. कारण एकाचा विजय म्हणजे दुसऱ्याचा पराजय— व पराजय म्हणजे चिरंतन विग्रहाचें मूळ. म्हणूनच बुद्धांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहेः—

जयं वेरं पसवति दुक्खं सेते पराजितो ।
उपसंतो सुखं सेति हित्वा जय पराजयं ॥

बुद्धाचे शिष्य म्हणविणाऱ्या राजांनीं कित्येक प्रसंगीं धर्मप्रसाराच्या नांवाखालीं हातांत शस्त्र धरिलें होतें. पण पुढें अनुतप्त मनानें त्याचा त्यांनीं त्याग करून अहिंसाधर्माचा आपल्या जीवनांत अंगीकार केला. सम्राट् अशोकाचा अपूर्व प्रयोग भारतवर्षाच्या गौरवाचें उदाहरण होऊन बसला आहे.

बुद्ध 'अहिंसा' या शब्दाबद्दल पुष्कळदां 'अवेर' हा शब्द योजतो. अहिंसेचा सारा रोख द्वेषाचें निर्मूलन करण्याकडे आहे. राजकारणांत तर या गोष्टीची अत्यंत आवश्यकता आहे. कारण सामुदायिक द्वेष राष्ट्रांचा निःपात करण्यास कारणीभूत होतो. बुद्धाचा पुढील श्लोक प्रसिद्ध आहेः—

नहि वेरेण वेराणि सम्मन्तीथ कुदाचन।
अवरेणे च सम्मन्ती एस धम्मो सनन्तनो ॥ –धम्मपद

राजकारणांतसुद्धां बुद्धानें वारंवार द्वेष मिटविण्याचा व शान्ति प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. त्याचें लक्ष केवळ सामाजिक व धार्मिक क्षेत्रांतील प्रयोगांकडेच होतें असें दिसत नाहीं. "दुक्खं सेते पराजितो" या वाक्यांत पराभूत शत्रूच्या मानसशास्त्राचें चांगलेंच आकलन दिसून येतें.

बुद्धानें एका प्रसंगीं युद्ध कसें शमविलें त्याचा उल्लेख सांपडतो. वैशालीजवळील महाअरण्यांतील कुतागार विहारांत बुद्धाचा निवास असतां शाक्य व कोलीय या दोन क्षत्रिय जमातींत समरप्रसंग होण्याची वेळ आली.

त्या वेळीं त्या प्रदेशांत मोठें अवर्षण पडलें होतें. रोहिणी नदीच्या दोन्ही तीरांस त्या दोन जमाती वसल्या होत्या. नदीचें पाणी आटत आलें होतें त्यामुळें दोन्ही बाजूंच्या शेतांस पाटाचें पाणी पुरविणें तिच्या शक्तीबाहेरचें होतें. दोन्ही पक्ष नदीवर हक्क सांगूं लागले व भांडण कळसास पोंचलें. शेवटीं लढाई करून निर्णय ठरवावा या कल्पनेवर ते आले. बुद्धाला तें कळतांच तो नदीकिनाऱ्यावर जाऊन बसला; आणि दोन्ही जमाती एकत्र गोळा झाल्या तेव्हां त्यानें त्यांस लढाईचें कारण विचारिलें. राजांना कारण सांगतां येईना तेव्हां सेनापतीला विचारिलें. त्यालाही ठाऊक नव्हतें. तोही चौकशी करूं लागला. जात जात तें प्रकरण शेतकऱ्यांपर्यंत गेलें, तेव्हां त्यांनीं नदीच्या पाण्याचा इतिहास सांगितला. बुद्धानें विचारिलें, "मग पाण्याची किंमत काय?" "फारच थोडी", राजांनीं उत्तर दिलें. "बरें. जमिनीची केवढी?" "तीही अल्पच." "आणि राजांची केवढी?" "ती अमूल्य आहे." त्यांनीं उत्तर दिलें. "मग अल्प किंमतीच्या वस्तूसाठीं तुम्ही अमूल्य किमतीची वस्तु बळी देणार का?" बुद्धानें विचारिलें. नंतर त्यानें रक्तपाताच्या विरोधी अशा जातककथा व सूत्रें सांगून दोन्ही पक्षांचें मन वळाविलें व लढाई होऊं दिली नाहीं. रक्तपाताचा फोलपणा त्यांच्या मनावर ठसला व त्यांच्यापैकीं ५०० लोक बुद्धाचे शिष्य झाले.

बुद्धाच्या वृद्धपणीं वैशालीचे वज्जी आणि राजा अजातशत्रु यांत युद्ध झालें. अजातशत्रूनें बुद्धास विचारिलें, "या लढाईत मला जय मिळेल काय?" बुद्धानें उत्तर दिलें, "वज्जी लोकांना मींच स्वतः खरा कल्याणमार्ग दाखविला होता. जर त्यांनीं त्या मार्गाचें अनुसरण केलें असेल तर त्यांचा पराभव होणार नाहीं."

बुद्धानें सांगितलेला मार्ग संकुचित राजकारणाचा किंवा धूर्त डावपेंचाचा नसून सामाजिक एकोप्याचा, सहकारी प्रवृत्तींना पोषक, नीतीचा व सामाजिक कर्तव्यें आदरबुद्धीनें पार पाडण्याची शिफारस करणारा असा आहे. इतिहास सांगतो कीं अजातशत्रूला या युद्धांत जय मिळाला नाहीं.

परंतु बुद्धाला राजकारणाचें प्रेम नव्हतें. जातक-मालेंत एक वाक्य आहे. "राजकारणाचा मार्ग हा असत्याचा घाणेरडा मार्ग आहे."

प्राचीन आर्यावर्तात युद्धें होत तरी हिंसा कमी करण्याबाबत शहाण्यांचे प्रयत्नही कमी नसत. एक तर क्षत्रियांशिवाय इतर वर्णांचे लोक व सर्रास स्त्रिया शस्त्र धारण करीत नसत. फक्त क्षत्रियच रणझुंझार होते. युद्धाचेही पुष्कळ नियम असत. आणि रणस्तंभाच्या आसपास अमुक मर्यादेच्या बाहेर युद्ध करितां येत नसे. खुद्द महाभारतांत क्षात्रधर्म हा पापधर्म असल्याचा उल्लेख आहे.

पुढील श्लोकांत तर हिंसेचा स्पष्ट निषेध आहेः—

युद्धान्ते तीर्थयात्रा यत् प्रब्रूते बादरायणः ।
तेन जानीमहे हिंसा धर्म्यापि दुरितप्रदा ॥

श्रीकृष्ण हा राजकारणी पुरुष होता. त्याचें धोरण परचक्राच्या बाबतींत प्रभावी होण्यासारखें होतें; परंतु बौद्ध व जैन संस्कृति अहिंसेवर उभारलेली असून ती अंतर्गत सामाजिक क्रांति घडवून आणणारी आहे महात्माजी या दोन्ही संस्कृतींचा मिलाफ करण्याचा प्रयत्न करितात. कृष्ण राजधर्माची महती गातो. परंतु राजकारण म्हणजे राजधर्म नव्हे. राजसत्ता उन्मत्त बनली असतां अन्यायाविरुद्ध प्रतिकार करण्यास प्रजेची उठावणी केली पाहिजे. हें कार्य प्रजाधर्माचें महत्त्वाचें अंग आहे. महात्माजी मुळीं शासनपद्धतिच काढून टाकूं इच्छितात. तसें झालें म्हणजे राजा व प्रजा हा भेदच नाहींसा होईल व अन्यायाला स्थानच राहणार नाहीं. मात्र याला अहिंसेचें अधिष्ठान हवें.

अर्वाचीन हिन्दुधर्माचे प्रणेते आद्य श्रीशंकराचार्य यांनींही श्रीनगर सिद्धपीठ येथील नरमेध बंद करण्यासाठीं आपलें तपोबल खर्ची घातलें. हिंदुउपासना-पद्धतींत ऐक्य साधण्याकरितां त्यांनीं सर्व भांडणें मिटविलीं व समन्वय साधून दिला. त्यांच्यानंतरही अर्वाचीन काळापर्यंत हिंदुसमाजाला संस्कार देणाऱ्या सर्व थोर साधुसंतांनीं अहिंसाधर्माची शिकवण या नाहीं त्या रूपानें चालू ठेविली. त्यामुळें हिंदुसमाजाच्या रक्तांतच सहिष्णुता व सद्भावना मिसळल्या आहेत. त्यांचेंच ऊर्जित स्वरूप महात्माजींच्या अहिंसावादी प्रचंड चळवळींत झालें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. साऱ्या

हिंदुस्थानभर ही संस्कृति पसरलेली होती. महात्माजींत या थोर ऐतिहासिक पुरुषांची धर्मश्रद्धा व अकुतोभयवृत्ति यांचा परिपाक झाला. ते स्वयंभू पुढारी तर होतेच. त्यांनीं आपल्या साधनाचा पाया या प्राचीन सिद्धान्तावर वसविला. त्यांचें वैशिष्ट्य एवढेंच कीं त्यांनीं राजकारणांत अहिंसेचा प्रयोग करण्यांत आपलें जीवन समर्पण केलें.

---

# ४ राजकारणांतील मिरासदार

" टिळकांनंतर महाराष्ट्रांतील राजकारणाचें पुढारीपण ओघानेंच मजकडे आलें. या वेळीं मला तुल्यबल असा प्रतिपक्षी किंवा प्रतिस्पर्धी दुसरा कोणी नव्हता. टिळकांनीं विलायतेला मलाच साहाय्यक म्हणून नेलें. होमरूल लीगचा चिटणीस मीच होतों. केसरीचें संपादकत्व मजकडेच होतें. प्रांतिक परिषदेचा अध्यक्ष मलाच निवडलें. त्यापूर्वी कॉंग्रेसचा एक चिटणीस म्हणून माझीच निवडणूक १९१८ सालीं झाली. कॉंग्रेसच्या शिष्टमंडळाचा व्यवस्थापकहि मलाच नेमण्यांत आलें. आणि १९२५ सालीं कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाकरितां माझें एकच नांव कित्येक प्रांतांकडून सुचविण्यांतही आलें होतें. या सर्व गोष्टींवरून त्या वेळीं महाराष्ट्राचें पुढारीपण मजकडे होतें हें दिसून येतच होतें. इतकेंच नव्हे तर पुढें असहकारितेचें धोरण कॉंग्रेसनें स्वीकारल्यावरही कॉंग्रेस वर्किंग कमिटींत महाराष्ट्रातर्फे मीच एक सभासद निवडला गेलों. आणि राष्ट्रीय सभेची नवीन अशी पहिली घटना तयार करण्याचें काम विठ्ठलभाई पटेल यांच्याबरोबर गांधींनीं मजकडे सोंपविलें. यावरून देखील महाराष्ट्राचें राजकीय पुढारीपण त्या वेळीं मजकडे होतें ही गोष्ट दिसून आल्याशिवाय राहत नाहीं."—श्री. न. चिं. केळकर "गतगोष्टी"

हिंदुस्थानांत असहकारितेचें युग सुरू झालें तेव्हां महाराष्ट्रांतील नेतृत्व अशा प्रकारचें होतें. लोकमान्यांनीं फार मोठा लोकसंग्रह केला होता. त्यांना सदैव देशोद्धाराची तळमळ असल्यामुळें 'थोडाही गुण मिळता घ्यावा' या न्यायानें जितकीं माणसें बुद्धिमान् व होतकरू अशीं त्यांना वाटलीं त्या सर्वांना जवळ ओढण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. त्यांच्या तालमींत तयार झालेल्यांपैकीं जुने असे श्री. केळकर, श्री. खाडिलकर, श्री. गंगाधरराव देशपांडे श्री. अणे, श्री. बाबासाहेब परांजपे, डॉ. मुंजे, ना. खापर्डे, व बॅप्टिस्टा हे होत. यांच्याच जोडीला श्री. बाबूराव गोखले, श्री. अण्णासाहेब भोपटकर, श्री. करंदीकर, श्री. जयकर यांचींही नांवें देतां येतील. श्री. शि. म. परांजपे हे

स्वतंत्र पण टिळकांशीं मिळतें घेणारे पुढारी होते. जेव्हां महाराष्ट्राचा सिंह आपल्या गर्जनेनें दिगंतर कापवीत होता, तेव्हां त्यांच्या अनुयायांना वीरश्रीचे पाठ मिळाले असलेच पाहिजेत. आणि लोकमान्य जेव्हां भारतवर्षाचे नेते झाले तेव्हां साहजिकच त्यांच्या अनुयायांचाही दर्जा वाढला. महाराष्ट्राला बुद्धीची फार कदर आहे, बुद्धिमान् व्यक्तीलाच तो आपला नेता बनवील ही गोष्ट सर्वथैव खरी नाहीं. खुद्द टिळकांना महाराष्ट्राचें नेतृत्व फार उशीरां लाभलें. ज्याप्रमाणें स्वामी विवेकानंदांचा कीर्तिडिंडिम अमेरिके-पर्यंत पसरल्यावर त्यांची हिंदुस्थानांत पूजा होऊं लागली, त्याचप्रमाणें टिळकांचा लोकोत्तर त्याग व क्रांतिकारक प्रकृतीचा प्रभाव हिंदुस्थानची प्रदक्षिणा करून आल्यावरच महाराष्ट्रांतील जनता बहुंशानें त्यांची कदर करूं लागली. बहुजनसमाजाला टिळकांच्या बुद्धिप्रभावाचें महत्त्व वाटत नव्हतें. ज्या वर्गाला वाटत होतें, त्याचा स्वतःचा बुद्धिभेद झाला होता. कारण महाराष्ट्रांत बुद्धिमान् लोकाग्रणींची त्या वेळीं तरी कमतरता नव्हती. रानडे, गोखले, चिपळूणकर, आगरकर सर्वच लोक भव्य बुद्धिमत्तेचे होते. केवळ असामान्य बुद्धि असल्यानें मनुष्य नेतृत्व पावत नाहीं. लोकांच्या प्रवृत्तींना वळण लावून देण्याचें कौशल्य त्याच्यांत असावें लागतें, तत्कालीन राजकीय जागृति पावलेला वर्ग बहुतेक ब्राह्मण जातीचा होता. लोकमान्यांच्या अनु-यायांचीं जीं नांवें वर दिलीं आहेत, तीं वाचतांच वाचकांच्या ध्यानांत येईल, कीं बहुतेक सारे वकील असून क्वचित् कोणी डॉक्टर आहेत. त्यामुळें त्या वर्गाचीं राजकीय मतें आणि सामाजिक प्रश्नांकडे पाहावयाचा कल हीं विशिष्ट प्रकारचींच असणार हें स्वाभाविक आहे. सामाजिक हक्क व आर्थिक सवलती ज्या प्रमाणांत तो वर्ग उपभोगीत असेल त्या प्रमाणांत त्याचे क्रांतिकारी किंवा तादितर विचार असावयाचे. एखाद्या मजुराची किंवा शेतकऱ्याची स्वराज्या-विषयीं जी कल्पना असेल ती व्यापाऱ्याची नसणार; व्यापाऱ्याची असेल ती शिक्षकाची नसणार.

असहकारितेच्या चळवळीचा प्रणेता जो मैदानावर प्रविष्ट झाला तो स्वतः-बरोबर दोन गोष्टी घेऊन आला. एक म्हणजे बहुजनसमाजाच्या दृष्टीशीं समरस असा राजकीय कार्यक्रम व दुसरी म्हणजे उच्च आदर्शवाद. दोन्ही गोष्टींनीं महाराष्ट्राच्या तत्कालपर्यंतच्या विचारसरणीला धक्का दिला.

लोकमान्यांच्या मृत्यूचे वेळीं कायदेकौन्सिलांच्या निवडणुका लढवावयाचा बेत तत्कालीन महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांत निश्चित झाला होता. सरकारशीं शक्य तों सहकार्य व अवश्य तेथें विरोध हें त्यांचें धोरण होतें; टिळकांच्या 'प्रतियोगी सहकारिते'चा अर्थ त्यांनीं असा लाविला.

तिकडे महात्माजींनीं नेमका त्या मर्मावरच घाव घातला. त्यांनीं आपल्या कार्यक्रमांत कायदेमंडळें व मतदान यांवर बहिष्कार, सरकारी शाळा व कोर्टें यांवर बहिष्कार, परदेशी मालावर बहिष्कार, मेसापोटेमियांत पाठविण्यासाठीं भरती करण्यांत येणाऱ्या लष्करी व मुलकी नोकऱ्यांवर बहिष्कार आणि सन्मानदर्शक पदव्या, अधिकार वगैरेचा त्याग करून सरकारी दरबार, उत्सव वगैरे समारंभांशीं असहकार इतक्या गोष्टींचा समावेश केला.

सूक्ष्म दृष्टीनें पाहणाऱ्यास दिसून येईल कीं, हा कार्यक्रम वर्गविशिष्ट नसून बहुजनसमाजाशीं समरस झालेल्या व रात्रंदिन गरीब रयतेच्याच दुःखांचा व प्रश्नांचा विचार करणाऱ्या एका व्यक्तीनें केलेला आहे. पदव्या व अधिकार, तसेच सरकारी दरबार व उत्सव यांच्यामुळें गरीब प्रजा आणि श्रीमंत लोक यांच्यांत पडदा येत होता. तो महात्माजी फाडूं पाहत होते. परदेशी मालामुळें हिंदी कारागिरांचे धंदे बुडून त्यांच्या पोटांवर पाय येत होता. कोर्टांनीं शेतकऱ्यांचें अतोनात नुकसान केलें होतें, सरकारी शाळांतून साऱ्याच हिंदी समाजाचें आरोग्य, बुद्धि व स्वाभिमान हीं नष्ट होत होतीं. गरीबांना शिक्षण घेतां येत नसे. वरच्या वर्गांत शिक्षणाचा फैलाव कांहीं प्रमाणांत होत होता पण त्याची परिणति त्यांच्या मनांत गरीब जनतेविषयीं तिरस्काराची भावना पैदा होण्यांत होत होती. मेसापोटेमियाचा प्रश्न तर हिंदी लोकांच्या स्वाभिमानाशीं निगडित होता. मुसलमानांशीं सहानुभूति दाखविण्याचाही तो एक नैसर्गिक मार्ग होता. कौन्सिलांवर बहिष्कार घालण्याचीं कारणेंही महात्माजींच्या शब्दांत सांगावयाचीं म्हणजे "बहुजनसमाजास पुरतें शिक्षण दिलें गेलें नव्हतें." (A great deal of educative work has to be done among the people.) महात्माजींच्या कार्यक्रमांत बहुजनसमाजाची प्रतिकारशक्ति वाढविण्याकडे लक्ष आहे. कौन्सिलांत प्रवेश करितांच मूठभर लोकच जाऊन सरकार पक्षाशीं भांडण

करितील आणि सरकारपक्षाचें बहुमत झालें (व तें होणारच होतें) म्हणजे मुकाट्यानें बहुमताला मान तुकवितील ही गोष्ट प्रत्यक्षच होती. महात्माजींनीं आयरिश पक्षाचें उदाहरण देऊन पुढें असेंही म्हटलें आहे कीं, "ही परिस्थिति अपमानकारक असल्यामुळें देशाचें लक्ष असल्या निवडणुकींत ओढून मी त्याचें नुकसान करूं इच्छीत नाहीं." आपल्या चतुर्विध कार्यक्रमानें व नंतर महात्माजींनीं जो विधायक कार्यक्रम त्याला जोडला त्याच्या अनुषंगानें ते प्रजेला स्वावलंबी व स्वाभिमानी बनवूं पाहत होते. त्या कार्यक्रमांतील सर्वोदयकारी कल्पना महाराष्ट्रांतील कौन्सिलवादी पक्षाच्या लक्षांत आली नाहीं.

२७ जुलै १९२० रोजीं केसरींत "असहकारितेचा व्यापक अर्थ" या लेखांत बुद्धिवाद्यांचे संशय प्रकट झाले आहेत. "मुसलमान पदव्या व अधिकाराच्या जागा सोडतील कीं नाहीं, राष्ट्रीय सभा या चळवळीला संमति देईल कीं नाहीं, चळवळ करणारे लोक लाखांनीं तर राहोच, पण हजारांनींही मोजतां येतील कीं नाहीं ? सरकारनें आपलें चारित्र्य आज एकदम बदललें आहे किंवा देशाची स्थिति आज एकदम बदलली आहे- अशी परिस्थिति नाहीं." इत्यादि शंका प्रदर्शित केल्या आहेत.

कलकत्त्याला जादा काँग्रेस भरविण्याचें ठरल्यावर देशभर औत्सुक्याचें वातावरण पसरलें. नवीन कार्यक्रमाचा गाजावाजा सर्वत्र झाला होता व त्याचाच खल कलकत्त्यास होणार असल्यामुळें, प्रांताप्रांतांतून मतें अजमावलीं जाऊं लागलीं. महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांना कौन्सिल-बहिष्कार पसंत नव्हताच. "हातीं निर्णायक सत्ता नाहीं तोंपर्यंत विरोध फलद्रूप होऊं शकत नाहीं हें खरें; पण निर्णायक सत्ता मिळवायचीच असली तर ती भांडून व विरोध करकरून मिळेल, कीं नोकरशाहीला कौन्सिलचें रान मोकळें सोडून मिळेल ?" (केसरी १३-७-२०) अशी तक्रार त्यांनीं चालविलीच होती. ऑगस्टच्या ३१ तारखेस जादा काँग्रेसच्या प्रतिनिधींची निवड करण्यासाठीं पुण्यास सभा झाली. अध्यक्ष श्री. केळकर होते. त्यांनीं सांगितलें, "मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटीनें असहकारितेचें तत्त्व मान्य केलें आहे व तपशील जादा काँग्रेसनें

ठरवावा असें ठरविलें आहे. अर्थात् या संस्थेसही तेंच तत्त्व मान्य असून या समजुतीवरच ही प्रतिनिधींची निवड करण्यांत येत आहे."

या निवडीपूर्वी एक आठवडा अगोदर सार्वजनिक सभेच्या विद्यमानें भरलेल्या जाहीर सभेंत श्री. ल. ब. भोपटकर यांचें 'रुसणार कीं घुसणार ?' या विषयावर व्याख्यान झालें होतें. त्यांत प्रांतीयतेचा सूर दिसून येतोः—

" मराठ्यांचा स्वभाव आणि महाराष्ट्राची आजवरची परंपरा हीं लक्षांत घेतां महाराष्ट्र रुसून बसणारा नसून तो पुढें घुसणाराच आहे. अशा धामधुमीच्या वेळीं आपण रुसून कोपऱ्यांत बसून राहूं तर आमच्या नांवावर भलतेच इसम वाटेल तसा राज्यकारभार करतील. याकरितां आपण शक्य तितक्या जुटीनें कौन्सिलांत घुसलें पाहिजे. या बाबतींत मला आयरिश पुढारी पार्नेल याचाच मार्ग पसंत पडतो. त्याच्याप्रमाणें प्रत्येक मुद्द्यावर सूचना-उपसूचना आणून सरकारला भंडावून सोडलें तरच आपले हक्क लवकर मिळतील."

सभेचे अध्यक्ष श्री. केळकर यांस हा सूर जरा कडक वाटल्यामुळें म्हणा किंवा मिळतें घेण्याच्या त्या वेळच्या त्यांच्या कलास वश होऊन म्हणा, जरा वेगळ्या धर्तीचें भाषण त्यांनीं केलें. " व्याख्यात्यांच्या व्याख्यानावरून राष्ट्रीय पक्षाचा व महात्मा गांधींचा मतभेद आहे असा गैरसमज करून घेऊं नका. आमचा मतभेद असला तरी तो तत्त्वाविषयीं नाहीं, तपशिलापुरताच आहे. तत्त्वाचा मतभेद मवाळांशींच आहे. पूर्वी या मवाळांना स्वराज्य हें ध्येयच मान्य नव्हतें. पण राष्ट्रीय पक्षानें तें ध्येय सनदशीर ठरवून घेऊन सरकारकडून तें मान्य करून घेतलें. त्यामुळें ध्येयापुरता मवाळांचा व राष्ट्रीयांचा वाद मिटला. आतां साधनाविषयीं वाद सुरू झाला आहे. मवाळ म्हणतात कीं असहकारिता हें कायदेशीर शस्त्रच नव्हे. महात्मा गांधी व राष्ट्रीय पक्ष उभयतांच्याही मतें हें शस्त्र पूर्णपणें सनदशीर व कायदेशीर आहे. हीच गोष्ट शाबीत करण्याकरितां आम्ही जादा काँग्रेसला जाणार. तेथें मवाळांच्याकडून असहकारितेच्या तत्त्वाला विरोध होईल तर त्या वेळीं राष्ट्रीय पक्षाकडूनच म. गांधींना दुजोरा मिळेल... तपशिलाच्या बाबतींतही " कौन्सिलांत घुसावें कीं नाहीं ? " एवढयापुरताच आमचा व गांधींचा वाद आहे.

माझें मत तर असें आहे कीं, कौन्सिलांत घुसावें आणि मग जरूर तर रुसावें. निवडणुकीला उभेच न राहाल तर प्रतिपक्षी तुमच्या रुसण्याला कांहींच किंमत देणार नाहींत."

या शंकांना महात्माजींनीं यंग इंडियांत पूर्वीच उत्तर दिलें होतें. " मराठ्यांत एक लेख आला आहे. त्यांत कौन्सिलबहिष्काराच्या नापसंतीचीं दोन कारणें दिलीं आहेत. ( १ ) राष्ट्रीय पक्ष प्रविष्ट झाला नाहीं तर नेमस्त प्रविष्ट होतील ( २ ) ज्या अर्थी कायदेमंडळांमार्फत आम्ही थोडी प्रगति केली आहे त्या अर्थी आतां लोकनियुक्त सभासदांना अधिक अधिकार मिळाल्यामुळें आम्ही अधिक प्रगति करूं शकूं.

पहिला मुद्दा एका महान् लोकप्रिय पक्षाला शोभणारा नाहीं. कौन्सिल-प्रवेश जर नुकसानकारक गोष्ट आहे तर नेमस्त लोक कौन्सिलांत शिरले म्हणून राष्ट्रीय पक्षाला हेवा कां वाटावा ? इतर पक्ष गेले म्हणून आपणही जावें असें थोडेंच आहे ? ...... आम्ही एखाद्या संस्थेवर बहिष्कार घालतों याचा अर्थ आम्हांला ती आवडत नाहीं— आम्हांला तिच्या चालकांशीं सहकार कर्तव्य नाहीं. ... अडथळा करण्याच्या हेतूनें जरी आम्ही कौन्सिलांत गेलों तरी माझ्या मतें तो सहकारच झाला. बहुतेक संस्था, विशेषतः ब्रिटिश कायदेमंडळें अडथळ्यावरच प्रभावी बनतात. आयरिश सभासदांनीं मोठ्या शिस्तीनें सतत अडथळा केला पण त्याचा हाउस ऑफ कॉमन्सवर मुळींच परिणाम झाला नाहीं. आयरिश लोकांना पाहिजे होतें तें स्वराज्य अजून मिळालें नाहीं. 'मराठ्या'चें म्हणणें आहे, कीं अडथळ्याचें स्वरूप निकडीच्या व आगाळिकीच्या अहकारितेचें राहील. मला तें पटत नाहीं. माझ्या मतें त्यांत स्वतःविषयीं– आपल्या तत्त्वाविषयीं श्रद्धेची उणीव दिसून येते. संशय बाळगा कीं विनिपात झालाच.

" दुसऱ्या सबबीचें उत्तर हें आहे. जेव्हां आम्ही पूर्वी कौन्सिलांत गेलों तेव्हां ब्रिटिशांचा प्रामाणिकपणा व न्यायबुद्धि यांवर आमचा विश्वास होता. शिवाय त्या वेळीं आम्ही बहिष्कार यशस्वी करूं असा स्वतःविषयींचा विश्वास आमच्यांत नव्हता. आजची कार्यपद्धातिही आम्हांस तेव्हां अवगत नव्हती.

कालानुसार रीतीभाती व पद्धति बदलत जातात. वर्षे जातात तसे आपण वाढत असलें पाहिजे. बालपणींचें अन्न तरुणपणीं योग्य कसें ठरेल ? ”

पुढें सप्टेंबर महिन्यांत कलकत्ता येथें अधिवेशन भरलें तेव्हां असहकारितेचा ठराव पसार झाला. त्या ठरावांत असहकारितेचा हेतु स्पष्ट करणारें एक उद्बोधक वाक्य होतें जें महाराष्ट्रांतील बुद्धिवादी कार्यकर्त्यांच्या फारसें लक्षांत आलें नसावें:—

“ आणि ज्या अर्थी ज्या गुणांखेरीज राष्ट्र उदयाला येऊं शकत नाहीं, अशा गुणांचें म्हणजे शिस्तीचें व स्वार्थत्यागाचें वळण जनतेला लावण्याचा मार्ग म्हणून ही असहकारितेची चळवळ अंगीकारण्यांत आली आहे आणि ज्या अर्थी या चळवळीच्या पूर्वरंगांत देखील प्रत्येक पुरुषाला, स्त्रीला व मुलालाही कांहीं तरी शिस्तीचा व स्वार्थत्यागाचा धडा घेण्याला संधि मिळणें जरूर आहे त्या अर्थी...” यापुढें स्वदेशी, चर्खा व हातमाग यांचा पुरस्कार केला आहे.

एका जबरदस्त प्रजाकीय चळवळीचा पाया या ठरावानें घातला. रचनात्मक कार्यक्रमाचा महाराष्ट्रांतील वकीलवर्गानें अव्यवहार्य कार्यक्रम म्हणून जो उपहास केला त्याचें कारण कार्यक्रमाचें धोरण वर्गविशिष्ट नव्हतें हेंच होय.

## कलकत्त्याच्या जादा काँग्रेसनें पास केलेला असहकारितेचा ठराव

( १ ) ज्या पक्षीं खिलाफत प्रकरणांत हिंदुस्तान सरकार व ब्रिटिश सरकार हे दोघेही हिंदी मुसलमानांसंबंधाच्या आपल्या कर्तव्यापासून सर्वस्वीं च्युत झाले व मुख्य प्रधानानें तर आपलें वचन जाणूनबुजून मोडलें; आणि अशा रीतीनें हिंदी मुसलमानांवर जी आपत्ति कोसळली तिच्यांतून पार पडण्याकरितां मुसलमानांकडून जो प्रयत्न करण्यांत येईल त्यास सर्व प्रकारें कायदेशीर रीतीनें मदत करणें हें हिंदी मुसलमानेतरांचेंही कर्तव्य आहे;

( २ ) आणि ज्या पक्षीं पंजाबांत १९१९ एप्रिलमध्यें उद्भवलेल्या धालमेलींत पंजाबांतील निरपराधी प्रजेचें संरक्षण करण्यांत आणि निरपराधी प्रजाजनाशीं रानटीपणानें व क्षात्रवृत्तीला लांच्छन लागेल अशा रीतीनें वर्तन

करणाऱ्या अधिकाऱ्यांस शिक्षा करण्यांत सदर अधिकाऱ्यांकडून भयंकर हयगय झाली किंवा त्यांस आपलें कर्तव्य बजावितां आलें नाहीं; शिवाय रहिवाशांच्या छळणुकीकडे ज्यानें पाषाणहृदयीपणानें दुर्लक्ष केलें व अधिकाऱ्यांच्या हातून घडलेल्या बहुतेक सर्व अपराधांची जबाबदारी ज्याच्या माथ्यावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें बसते त्या सर मायकेल ओड्वायरला सदर सरकारांनीं दोषमुक्त केलें.

( ३ ) आणि ज्या पक्षीं पार्लमेंटांतील व विशेषतः लॉर्डांच्या सभेंतील वादविवादावरून हिंदी लोकांविषयीं सहानुभूतीचा शोचनीय अभाव दिसून आला व पंजाबांतील अधिकाऱ्यांनीं जी सोटेशाही व रावणशाही राजरोस चालविली तिला या वादविवादानें जणूं काय दुजोराच दिला;

( ४ ) आणि ज्या पक्षीं व्हाइसरॉयांच्या नुकत्याच झालेल्या भाषणांत खिलाफत व पंजाब या दोनही प्रकरणांतील उभय सरकारांच्या वर्तनाविषयीं पश्चात्तापाचा लवलेशही दिसून आला नाहीं.

त्या पक्षीं, या राष्ट्रीय सभेचें असें मत आहे कीं वरील दोन प्रकारांतील अन्यायाची दुरुस्ती झाल्याविना हिंदुस्थानांत समाधान नांदणार नाहीं; आणि या संबंधांत आपल्या राष्ट्राची इभ्रत राखण्याला व असल्या राक्षसी वर्तनाची पुनरावृत्ति न होईल अशी खबरदारी घेण्याला स्वराज्याच्या स्थापनेखेरीज दुसरा रामबाण उपाय नाहीं. आणि ह्या राष्ट्रीय सभेचें आणखी असें मत आहे कीं, वरील दोनही अन्याय दूर होईपर्यंत व स्वराज्याची स्थापना होईपर्यंत क्रमशः वर्धिष्णु व अत्याचारवर्ज्य असहकारिता करण्याचें तत्त्व मान्य करणें व आचरणांत आणणें याखेरीज हिंदी लोकांना गत्यंतर नाहीं.

आणि ज्या अर्थी ज्या वर्गानें आजपर्यंत जनतेचें प्रतिनिधित्व स्वीकारून लोकमताला वळण लावलें त्याच वर्गानें ह्या असहकारितेला सुरुवात केली पाहिजे आणि ज्या अर्थी सरकार आपल्या हुकमतीखालच्या शाळा, कोर्टें, कौन्सिलें आणि बहुमान व पदवीदानसमारंभ यांच्या योगानें आपली सत्ता दृढ करितें आणि ज्या अर्थी या चळवळीच्या सध्यांच्या बाल्यावस्थेंत आपलें ध्येय साध्य करण्याला विसंगत न होईल इतका, पण कमींत कमी धोका व कमींत कमी नुकसान होईल असें करणें प्राप्त आहे.

त्या अर्थी ही राष्ट्रीय सभा सर्वांस कळकळीनें असा सल्ला देते कीं—

( १ ) सरकारनें दिलेल्या पदव्या, बिनपगारी अधिकाराच्या जागा आणि स्थानिक संस्थांतील सरकारनियुक्त सभासदत्व सोडून द्यावें.

( २ ) गव्हर्नरची लेव्ही, सरकारी अधिकाऱ्यांनीं भरविलेले दरबार किंवा त्यांच्या मानाकरितां होणारे समारंभ यांच्यांत भाग घेऊं नये.

( ३ ) पूर्ण सरकारी, निमसरकारी, अगर सरकारच्या मदतीनें चालणाऱ्या शाळांतून व कॉलेजांतून पालकांनीं आपलीं मुलें आस्ते आस्ते काढून घ्यावी आणि अशा शाळा व कॉलेजें यांचेऐवजीं प्रांताप्रांतांतून राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळा व कॉलेजें स्थापन करावीं.

( ४ ) वकील व पक्षकार यांनीं खाजगी भांडण-तंटे तोडण्याकरितां सरकारी कोर्टांकडे धाव घेण्याचें क्रमाक्रमानें सोडून त्या कोर्टांच्या जागीं स्वतःचीं लवाद कोर्टें स्थापन करावीं.

( ५ ) लष्करी, कारकुनी व मजूरदारपेशाच्या लोकांनीं मेसापोटेमियांत नोकरी करण्याकरितां रिक्रूट किंवा उमेदवार होऊं नये.

( ६ ) सुधारलेल्या कौन्सिलच्या निवडणुकीसाठीं उभे राहिलेल्यांनीं आपलीं नांवें उमेदवारांतून परत घ्यावीं आणि राष्ट्रीय सभेचा हा ठराव न जुमानतां जे उमेदवार उभे राहतील त्यांना मतदारांनीं मतें देण्याचें नाकारावें.

( ७ ) परदेशांहून येणाऱ्या मालावर बहिष्कार घालावा.

आणि ज्या अर्थी ज्या गुणांखेरीज राष्ट्र उदयाला येऊं शकत नाहीं अशा गुणांचें म्हणजे शिस्तीचें व स्वार्थत्यागाचें वळण जनतेला लावण्याचा मार्ग म्हणून ही असहकारितेची चळवळ अंगीकारण्यांत आली आहे; आणि ज्या अर्थी या चळवळीच्या पूर्वरंगांतदेखील प्रत्येक पुरुषाला, स्त्रीला व मुलाला ही कांहीं तरी शिस्तीचा व स्वार्थत्यागाचा धडा देण्याला संधि मिळणें जरूर आहे त्या अर्थी ही राष्ट्रीय सभा सर्वांना स्वदेशी मालाचा, मुख्यतः स्वदेशी कापडाचा उपयोग करण्याविषयीं सल्ला देत आहे; आणि ज्या अर्थी हिंदी भांडवलाच्या व हिंदी लोकांच्या देखरेखीखालीं चालणाऱ्या गिरण्यांतून देशांतील सर्व लोकांना पुरवठा होईल इतकें सूत व कापड सध्यां

हिंदुस्थानांत तयार होत नाहीं व पुढेंही बराच काळपर्यंत तयार होईल असें वाटत नाहीं, त्या अर्थी प्रत्येक कुटुंबांत हातरहाटावर सूत काढण्याच्या कामाला उत्तेजन देण्यांत यावें आणि ज्या लक्षावधि कोष्टयांनीं आपल्याला प्रोत्साहन मिळत नाहीं म्हणून आपला सन्मान्य धंदा सोडून दिला आहे त्यांनीं हातमागावर कापड विणण्यास सुरुवात करावी असेंही या राष्ट्रीय सभेचें सांगणें आहे.

( या ठरावाची अंमलबजावणी कसकशी करावयाची त्याचा तपशील ठरविण्याकरितां महात्मा गांधी, पंडित मोतीलाल नेहरू व ना. पटेल यांची कमिटी नेमली असून, ती कमिटी एक महिन्यांत मुंबईस भरणाऱ्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीकडे रिपोर्ट करील व कॉंग्रेस कमिटी आपल्या अभिप्रायासह ती योजना जाहीर करील. )

* * *

लोकमान्यांच्या मृत्यूनंतर दोन तासांनीं टिळकपक्षाच्या मंडळींनीं विचार-विनिमय करून पांच-सहा जणांचें एक सल्लागार मंडळ नेमलें होतें. नागपूर-पासून कर्नाटकापर्यंत कोठें कांहीं करावयाचें तर या सल्लागार मंडळाचा विचार घेऊनच करावें असें ठरलें होतें. पुढें ती योजना जरी फार दिवस टिकली नाहीं, तरी मुंजे, अणे, केळकर, चिंतामणराव वैद्य, खाडिलकर, शिवरामपंत परांजपे, बेळवी, गंगाधरराव देशपांडे व कौजलगी इतकीं माणसें टिळकांच्या मृत्यूच्या वेळीं तरी एकविचाराचीं होतीं. कलकत्त्याच्या कॉंग्रेसचे वेळीं या मंडळींच्या मनाचा गोंधळ उडाला. टिळकांचीं मतें म्हणून उराशीं बाळगलेल्या कल्पनांवर घाला येण्याचा प्रसंग येऊन ठेपला होता. स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, लवाद कोर्टांची स्थापना या गोष्टी सर्वांसच मान्य होत्या; पण शिक्षणसंस्था, न्यायकोर्टें व कौन्सिलें यांवरील बहिष्कार त्यांस कबूल नव्हता. त्यामुळें अधिवेशनांत या टिळकानुयायी म्हणविणाऱ्या बहुतेकांनीं कौन्सिलबहिष्काराविरुद्ध आपलीं मतें दिलीं. कलकत्त्याचें अधिवेशन पूर्वीच्या कोठल्याही अधिवेशनापेक्षां अधिक प्रजाकीय स्वरूपाचें होतें. विभूतिपूजा, राष्ट्राभिमानाचा उन्माद, नवीन कार्यक्रमांची अद्भुतरम्यता आणि मिरासदारीच्या जाणिवेचा पूर्ण अभाव

यांनीं भारून गेलेल्या प्रतिनिधिसमाजानें महात्माजींच्या समग्र ठरावाला बहुमतानें अनुमोदन देऊन त्यांना आपला एकमेव नेता असें जाहीर केलें.

कांहीं अप्रसन्न तर कांहीं व्यग्र अशा मनःस्थितींत महाराष्ट्रांतील कार्यकर्ते आपापल्या स्थानीं परत गेले. यानंतर महाराष्ट्रांतील कॉंग्रेसवाद्यांत दुफळी निश्चितपणें होऊं लागली.

महाराष्ट्रांत अनेक राजकीय पक्ष पूर्वी होतेच. कॉंग्रेस पक्षाशिवाय डॉ. बेझंट यांचा पक्ष व ना. गोखले यांचा पक्ष हे महत्त्वाचे होते. गोखले यांचा पक्ष त्यांच्या मृत्यूनंतर फारसा प्रभावी राहिला नाहीं; अथवा लोकमान्यांच्या यशानें त्याला ग्रासून टाकलें असें म्हटलें तरी चालेल. बेझंटबाईंचा पक्ष जवळ जवळ नामशेषच झाला होता. कॉंग्रेसपक्षच प्रभावी होता. आतां त्यांतही फूट होण्याचा प्रसंग आला.

---

# ५ कलकत्ता ते नागपूर

वर्गनिष्ठ बुद्धिवादी लोकांना राष्ट्रीय भावना नसतात असें नाहीं; परंतु अहंमन्यताही कमी नसते. व्यक्तिगत अहंमन्यता वर्गरूपांत अवतीर्ण होतांच तिचें स्वरूप संघटित व प्रभावी बनतें. बुद्धिवादी वर्ग आपले पिढ्यानपिढ्यांचे संस्कार, मतें किंवा जीवनाकडे पाहावयाची दृष्टि सहज बदलूं शकत नाहीं. त्यांतही एखाद्या पंथाचा तो अनुयायी असल्यास मग तर विशेषच आग्रही बनतो. या अहंकारामुळें तो आपल्याच कल्पनेच्या नैतिक तत्त्वाची एक मायानगरी स्वतःभोंवतीं निर्माण करतो. तिचा भेद बुद्धिवाद किंवा नैतिक समजूत हीं मुळींच करूं शकत नाहींत. महाराष्ट्रांतील बुद्धिवाद्यांचा वर्ग आणि महात्माजींची विशाल पायावरची नैतिक चळवळ यांचा सामना झाला तो अशा रीतीनें. त्याचें स्पष्टीकरण अन्य कोणत्याही पद्धतीनें करतां येणार नाहीं.

कौन्सिलबहिष्काराचा ठराव महाराष्ट्र (यांत वऱ्हाड-मध्यप्रांतही घ्यावयाचेच) व मुंबई येथील टिळकानुयायी म्हणविणाऱ्यांना बिलकुल पसंत नव्हता. १९ सप्टेंबर रोजीं मुंबई येथील सरदारगृहांत कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पार्टीची खास सभा भरली. बॅ बॅप्टिस्टा हजर होते. एकंदर बावीस गृहस्थ हजर असून चोवीस गृहस्थांनीं पत्रें व तारा यांच्यामार्फत आपले अभिप्राय कळविले होते. एक विरुद्ध पंचेचाळीस मतांनीं कौन्सिलबहिष्काराच्या ठरावाचा अंमल करण्याचा निश्चय मंजूर झाला. विरोधी मत श्री. अणे यांनीं दिलें. ठरावाची भाषा अशी होती, "कायदे-कौन्सिलावर बहिष्कार घालणें ही गोष्ट आम्हांस नापसंत आहे; तथापि राष्ट्रीय सभेचा बोज व इभ्रत राहावी, तिच्या हुकमतीस कमीपणा आणण्यासारखें वर्तन घडूं नंय, विशेषतः हिंदुमुसलमान बांधवांची एकी दृढ व्हावी याकरितां आम्ही निवडणुकीच्या उमेदवारींतून आपलीं नांवें काढून घेत आहों..."

त्याप्रमाणें एकंदर शेचाळीस उमेदवारांनीं आपलीं नांवें परत घेतलीं. हे सारे लोक महाराष्ट्र, वऱ्हाड-नागपूर, मुंबई व कर्नाटकपर्यंत पसरले होते. यानंतर आणखीही बऱ्याचजणांनीं आपलीं नांवें परत घेतलीं.

श्री. गंगाधरराव देशपांडे, श्री. मजली व श्री. सीतारामपंत दामले यांनीं आपली वाकिली सोडली.

याप्रमाणें कॉंग्रेसशीं निष्ठा दाखविण्याचा प्रयत्न चालू असतांहि मनांतील असंतोष व्यक्त होतच होता. २१ ता. सप्टेंबरच्या 'केसरीं'त 'एकाच पक्षाचे दोन पंख' या अग्रलेखांत त्याची साक्ष मिळते. "पण शाळा व न्यायकोर्टें यांसंबंधानें गांधींनीं लवचिकपणा दाखविला असतां (क्रमशः बहिष्काराची सुधारणा मान्य केली) कायदेकौन्सिलापुरतीच ताठरपणाची हौस त्यांना अकल्पितपणें आली व ती त्यांच्या अनुयायांनीं पुरविली आणि म्हणूनच वाद माजला आणि राष्ट्रीय सभा सहा दिवस चालली...आपल्या स्वतःच्या मताविरुद्ध इतक्या पुढाऱ्यांचें मत आहे हें पाहून त्यांनीं हार खावयास पाहिजे होती; पण ती त्यांनीं खाल्ली नाहीं; यापुरता त्यांना दोष देणें भाग आहे."

पुन्हा ते पुढें म्हणतात, "गांधींवर आम्हीं कितीही टीका केली तरी त्यांच्याविषयींचा आमचा आदरभाव यत्किंचितूही ढळलेला नाहीं..."

कलकत्त्याच्या कॉंग्रेसनंतर केळकरांनीं नागपूरच्या कॉंग्रेसवर हवाला ठेवून शिस्तपालनाच्या दृष्टीनें ठराव मान्य करण्याचें व जाहीर रीतीनें त्याचा पाठपुरावा करण्याचें ठरविलें होतें व त्याप्रमाणें त्यांनीं आपली उमेदवारी परतही घेतली. ५ ऑक्टोबरच्या 'केसरीं'त ते लिहितात, "असहकारितेच्या चळवळीवर मुख्य आक्षेप असा घेण्यांत येतो कीं, ही चळवळ यशस्वी होणार नाहीं; पण जगांत आजवर अशी कोणती चळवळ झाली आहे कीं, तिच्यावर प्रारंभीं हा भीतिगर्भ किंवा द्वेषगर्भ आक्षेप आणण्यांत आला नव्हता! देशांतलि सर्व जनतेनें अंगिकारिली असतां यशस्वी होणार नाहीं अशी चळवळच नाहीं. शिवाय यशस्वी या शब्दाचा अर्थही नीट लक्षांत घेतला पाहिजे. शेंकडा १०० लोक कोणत्याही चळवळींत सामील झाले तरच ती यशस्वी झाली अशी यशाची व्याख्या केल्यास जगांत आजवर कोणतीच चळवळ यशस्वी झाली नाहीं असें म्हणतां येईल... शिवाय सामान्य कीर्तनकारांत जो गुण दिसून येत नाहीं तो आज गांधींमध्यें दिसून येतो. हा गुण म्हणजे उपदेश व आचरण यांचा मेळ... विसंगतपणा हा जर खरोखर विभूतिविध्वंस करणारा असेल तर गांधींचें पूर्वचरित्र त्यांच्या उत्तरचरित्राचें

खंडन करण्यास समर्थ आहे; पण खरा योजक टीकाकार मात्र त्यांच्या आजच्या महात्मतेचा असा निष्कारण विध्वंस करूं देणार नाहीं. कारण त्या विध्वंसापासून कोणाचें काय हित होणार ?

गांधींमध्यें व्यवहारचातुर्य कमी असलें तरी स्वतःच्या शहाणपणाची घमेंड तरी नाहीं. ते जो कार्यक्रम सांगतात तो आज अव्यवहार्य वाटला तरी त्यांतच भावी आशेचें बीज आहे. निदान मुत्सद्दीपणाचें नसलें तरी भविष्यवादीपणाचें श्रेय त्यांना देण्यास हरकत नाहीं. **कारण स्वराज्याचा प्रश्न सुटावयाचा असला तर तो असहकारितेच्या मार्गानेंच सुटणार आहे.**"

केळकरांनीं असहकारितेचें समर्थन करण्याचा प्रयत्न चालविला होता. जुन्या टिळकानुयायांपैकीं चित्रशाळेचे वासुकाका जोशी, शिवरामपंत परांजपे, खाडिलकर, गंगाधरराव देशपांडे हे सर्व असहकारितेच्या बाबतींत मनाशीं निर्णय घेऊन चुकले होते. केळकर टिळकांचे अनुयायी म्हणवीत असले तरी त्यांचें वळण स्वाभाविकपणें उदारमतवादी व शांतिप्रिय असें आहे. त्यांना क्रांतिवादी जहाल विचार असह्य होतात. महाराष्ट्रांतील कोणत्याही कार्य-कर्त्यांपेक्षां स्थायी संस्थांशीं ट्रस्टी वा अध्यक्ष या नात्यानें संबंध ठेवून त्यांच्या कार्यांत समरस होण्याचें कार्य त्यांनींच अधिक केलें आहे. जवळजवळ ५० वेगवेगळ्या संस्थांशीं त्यांचा संबंध होता. टिळकांचे मदतगार म्हणून ते आले पण त्यांच्या कार्यांपैकीं रचनात्मक कार्यक्रमाची बाजूच त्यांनीं सांभाळली. त्यांच्या धिम्या व थंड प्रकृतीला "व्यवहारचातुर्य" नसलेल्या महात्माजींचा क्रांतिकारी व जगड्व्याळ कार्यक्रम असह्य वाटत होता. याउलट परांजपे, जोशी प्रभृति लोकांची मनोवृत्ति क्रांतिवादी असल्यामुळें त्यांच्या भावना प्रदीप्त होऊन ते महात्माजींकडे साहजिकच आकर्षिले गेले. महात्माजींच्या चळवळीच्या बाह्य-स्वरूपावरच सर्व मोहून गेले होते. आंतरिक सिद्धान्तापर्यंत पोंहोचण्याचा विचार त्या वेळेस तरी कोणीच केला नव्हता व त्यामुळें उत्तरोत्तर गुंता-गुंतीची परिस्थिति निर्माण होत गेली. कार्यकर्त्यांचे स्वभावदोष व चळवळीचे मूलभूत सिद्धान्त यांतील भेद खेदजनक रीतीनें व्यक्त होऊं लागला.

महाराष्ट्रांतील जुन्या पिढीच्या कार्यकर्त्यांपैकीं श्री. शिवरामपंत परांजपे हे एक होते. त्यांना टिळकानुयायी म्हणतां येणार नाहीं. त्यांची स्वतःची अशी एक

स्वतंत्र मनोवृत्ति होती. तारुण्यापासून त्यांनीं स्वतःस स्वातंत्र्यभावनेचीं गीतें गाण्यास वाहून घेतलें होतें. त्यांचें मराठी भाषेवरील प्रभुत्व असामान्य होतें. वक्तृत्व व लेखन दोन्ही अवर्णनीय होतीं. विशेषतः व्याजोक्तीमध्यें त्यांचा हातखंडा असे. साहित्यशास्त्र हा त्यांचा आवडता विषय होता. पण तत्कालीन वाङ्मय-सेवक, क्वचित् अपवाद वगळल्यास उच्च दर्जाचे नव्हतेच. लोकांचें कर्तव्यतेज जागृत करण्याऐवजीं ते लोक नुसते त्यांचें मनोरंजन करण्याचा किंवा त्यांच्या वेळोवेळीं प्रबळ होऊन उठणाऱ्या मनोवृत्तींना पूरक अशी चोपडीं अथवा लेख लिहिण्याचा धंदाच करीत. पण शिवरामपंतांनीं आपल्या वाङ्मयांत राष्ट्रीयत्व आणलें. हृदयशून्य कूजन करणारे ते अलंकारशास्त्री नव्हते. त्यांच्या भाषेंत ओज होतें, उन्माद होता, कारण हृदयांत स्वदेशाभिनाचें यज्ञकुंड पेटलें होतें. सर्व महाराष्ट्रभर त्यांच्या लेखांनीं व व्याख्यानांनीं लोकांस वेड लाविलें. एक वेळ तर त्यांची लोकप्रियता इतकी कळसास पोंचली कीं क्षणभर टिळकांऐवजीं तेच महाराष्ट्राचे राजकीय नेते बनतात कीं काय असें सर्वांस वाटलें. परंतु शिवरामपंतांत एक वैगुण्य होतें. त्यांची साहित्यशक्ति विचारप्रेरक होती पण आचारप्रेरक नव्हती. ते लोकांच्या कल्पनेला धक्के देत पण स्वतः त्यागी व पुरुषार्थी नसल्यामुळें समाजांत परिवर्तन घडवून आणण्याचें कार्य त्यांच्यानें झालें नाहीं. त्यांच्या उत्कट देशभक्तीनें त्यांना राजकीय क्षेत्रांत ढकलून दिलें त्यामुळें त्यांना कारावासादि हाल भोगावे लागले. समाजांत त्यांचा मान वाढला व शेवटपर्यंत त्यांनीं राजकारणाशीं आपला संबंध चालू राखिल्यामुळें जुन्या पिढींत ते प्रतिष्ठा मिळवून बसले. लोकमान्य दिवंगत झाल्यावर ज्या कांहीं कार्यकर्त्यांकडे राष्ट्रीय पक्ष बहुमानाच्या दृष्टीनें पाहत होता त्यांपैकीं तेही एक होते. टिळकांशीं त्यांचा पुष्कळ संबंध होता तरी ते त्यांचे अनुयायी नव्हते. उलट असहकारिकतेची लाट येतांच त्यांच्यांतील उत्कट क्रांतिकारक वृत्ति उचंबळून येऊन त्यांनीं उघडपणें त्या चळवळीचें समर्थन केलें व वडीलकीमुळें महाराष्ट्रांतील असहकार-पक्षाचें नेतृत्व ओघानेंच त्यांच्याकडे आलें. तें त्यांनीं कसें काय चालविलें त्याचें वर्णन पुढें येईलच; परंतु त्यांच्या प्रभावाचा तिखटपणा प्रतिपक्षास कसा भासला त्याचें प्रत्यंतर पाहावयाचें असेल तर केळकरांच्या " गतगोष्टी "त तें भरपूर सांपडेल.

श्री. वासुकाका जोशी हे चित्रशाळा प्रेस चालवीत. आपला खासगी

व्यवसाय सांभाळून ते हौसेनें सार्वजनिक कामांत भाग घेत. त्यांच्या पूर्ववयांतील कांहीं काळ क्रांतिवाद्यांच्या सहवासांत गेला होता. परंतु त्या जीवनांत ते सफल झाले नाहींत. पुण्यांत स्थायी होण्यापूर्वीच त्यांचा टिळकांशीं संबंध होता. असहकारिकतेची चळवळ सुरू होतांच तेहि तिच्यांत सामील झाले.

श्री. गंगाधरराव देशपांडे व श्री. खाडिलकर हे टिळकांच्या अव्वल अनुयायांपैकीं होत. परंतु त्यांची वृत्ति केवळ व्यक्तिनिष्ठ नसून जी थोर विभूति राष्ट्रीय चळवळ पुढें नेईल असें त्यांना वाटे तिला उचलून धरणारी होती. कौन्सिल-प्रवेशाच्या ठरावाविरुद्ध त्यांनीं मत दिलें खरें; परंतु ठराव पसार झाल्यावर मनापासून त्या ठरावाच्या प्रचारार्थ त्या दोघांनीं स्वतःस वाहून घेतलें. पुढें पुढें अहिंसावादाचा जास्त अभ्यास केल्यावर आणि प्रजाकीय चळवळींत पडल्यावर त्यांना महात्माजींची प्रतिभा, संघटनाशक्ति व उच्च चारित्र्य यांची प्रतीति येत गेली आणि विशेषतः गंगाधररावजी असहकारिता व तिचा जनक यांच्याशीं एकजीव होत गेले.

श्री. हरिभाऊ फाटक, भारताचार्य चिंतामणराव वैद्य व श्री. सी. के. दामले यांचाही जुन्या कार्यकर्त्यांत उल्लेख केला पाहिजे. पैकीं हरिभाऊ फाटक आजहि हयात असून सर्व नव्या कार्यकर्त्यांना वडिलांप्रमाणें आदरणीय आहेत.

आजमितीला कॉंग्रेसमध्यें वयोवृद्ध, तपोवृद्ध म्हणून सर्वांस आदरणीय वाटत असलेल्या ज्या तुरळक व्यक्ति आहेत त्यांत श्री. हरिभाऊ फाटक यांची गणना होते. हरिभाऊंनीं कॉंग्रेस कार्यकर्त्यांच्या दोन पिढ्या पाहिल्या आहेत. त्यांचा जन्म स. १८७४ सालीं झाला. त्यांचें दुय्यम शिक्षण न्यू इंग्लिश स्कूलमध्यें झालें. ना. गोखले यांचे विद्यार्थि होण्याचें त्यांचें भाग्य होतें. त्यांना गोखल्यांबद्दल अतोनात आदर वाटत असे. कॉलेजांत असतांना ते लोकमान्य टिळकांबद्दल विरोधी अभिप्राय दर्शवीत. गोखल्यांनीं विलायतेस वेल्बी कमिशनपुढें जी तडफदार साक्ष दिली तिच्यामुळें त्यांच्याबद्दलचा आदर बळावून हरिभाऊंनीं गोखले स्वदेशीं परत आल्यावर त्यांना मानपत्र देण्यांत यावें म्हणून खटपट आरंभिली व वर्गणी जमविण्यास सुरुवात केली. पुढें स्वदेशीं येतांच गोखल्यांनीं सरकारची माफी मागितली तेव्हांपासून त्यांची लोकप्रियता कमी होत गेली. हरिभाऊंचा आदरही कमी झाला आणि टिळक तुरुंगांत गेल्यामुळें त्यांच्याविषयींचा वाढला. हरिभाऊ इन्टरमध्यें

असतांना त्यांचे वडील वारले, त्यामुळें त्यांनीं कॉलेज सोडलें. ते यवतमाळला गेले व तेथें नऊ वर्षें त्यांनीं सरकारी नोकरी केली. पुढें वंगभंगाची चळवळ सुरू झाली व राष्ट्रीय शाळा निघाल्या. हरिभाऊंना त्यांच्या मित्रांनीं राष्ट्रीय शिक्षणकार्यांत ओढलें, तेव्हां नोकरी सोडून ते तपस्वी बाबासाहेब परांजपे यांच्या राष्ट्रीय शाळेंत प्रविष्ट झाले. सेवेचें जीवन स्वीकारतांच त्यांनीं अविवाहित राहण्याचें ठरविलें. तीन वर्षें त्यांनीं शाळेंत अध्यापनाचें कार्य चालविलें. नंतर ते पुण्यास गेले. त्या वेळीं मुंबईस 'राष्ट्रमत' नांवाचें एक दैनिक पत्र चालू झालें होतें. त्याचें धोरण राष्ट्रीय होतें. गंगाधरराव देशपांडे यांनीं हरिभाऊंना त्या कामांत सामील होण्याचा आग्रह केला, तेव्हां हरिभाऊ तिकडे वळले. दत्तोपंत आपटे संपादक होते. हरिभाऊ व्यवस्थापक बनले. वीर वामनराव, आचार्य कालेलकर, स्वामी आनंद, गोपाळराव ओगले वगैरे मंडळी त्या पत्रांत लिहीत असत. जहाल राष्ट्रवाद तेव्हां नुकताच जन्मास आला होता, त्यामुळें या तरुण सेवकांचीं मनें एका नवीन प्रकारच्या उल्हासानें तरारत होतीं. सहा महिने होतांच जॅक्सन खून प्रकरण घडून आलें व राष्ट्रमताच्या संपादकवर्गानें खुनी कान्हेरे यासाठीं फंड मागण्यास सुरुवात केली. त्याबरोबर सरकारनें पत्राकडून ६००० रुपयांचा जामीन मागितला. जामीन भरतां न आल्यामुळें पत्र बंद पडलें. हरिभाऊ रिकामे झाले. त्याच वेळीं दादा वैद्य या गोव्याच्या गृहस्थांनीं वासुकाका जोशी यांस विनंति केली कीं, "गोव्यांत रिपब्लिक जाहीर झालें आहे. तेव्हां राष्ट्रीय शाळा चालविण्यासाठीं कार्यकर्ते हवेत." वासुकाकांनीं हरिभाऊ, दत्तोपंत आपटे, शंकरराव खोत व घारेशास्त्री या चौघांस गोव्यास पाठवून दिलें. ही मंडळी गोव्यांत चार वर्षें (१९११–१४) आल्मेद कॉलेजांत शिकवीत होती. हरिभाऊ १९१५ त पुन्हा पुण्यास आले; कारण लोकमान्य मंडालेहून सुटून आले होते. त्यांच्या नेतृत्वाखालीं हरिभाऊंनीं होमरूल चळवळींत काम केलें.

परंतु १९१८ सालींच हरिभाऊंचा महात्माजींशीं संबंध आला होता. महात्माजींनीं त्या सालीं स्वदेशी चळवळ चालविली तेव्हां हरिभाऊंची महात्माजींशीं ओळख झाली. पुण्यास स्वदेशी सभा निघाली, तिचे महात्माजी अध्यक्ष व हरिभाऊ, लवाटे वगैरे चिटणीस होते. हरिभाऊंनीं महात्माजींचें

पुण्यांत पहिलें व्याख्यान घडवून आणिलें. त्या समयीं परांजपे अध्यक्ष होते. व्याख्यान गायकवाडवाड्यांत झालें व लोकांची अतोनात गर्दी झाली होती.

त्या वेळेपासून पुण्यांतील प्रत्येक चळवळींत हरिभाऊंचा थोडाफार हिस्सा असेच. प्रो. माटे यांनीं अस्पृश्यांकरितां सुरू केलेल्या शाळांत त्यांचें सहकार्य होतें. असहकारितेच्या चळवळीला त्यांनीं पाठिंबा दिला व पुढेंही महात्माजींनीं एकामागून एक विधायक कार्यक्रम राष्ट्रापुढें ठेवतांच हरिभाऊंनीं त्यांना सक्रिय मदत केली. तथापि हरिभाऊंच्या अंगचा मोठा गुण म्हटला म्हणजे स्वतः मागें राहून अज्ञात, उत्साही आणि होतकरू अशा कार्यकर्त्यांना आपल्या हातून होईल तितकी मदत देऊन पुढें आणणें व निराश झालेल्यांना प्रोत्साहन देणें, तरुण मनांना देशसेवेची गोडी लावणें हें होय. १९२० च्या चळवळींत त्यांनीं पुष्कळ तरुणांच्या आयुष्याला याप्रमाणें योग्य वळण लाविलें. मात्र स्वतःच्या प्रसिद्धीची संधि आली कीं, हरिभाऊ लज्जावतीच्या फुलाप्रमाणें संकोचून जातात.

* * *

केळकर नागपूर कॉंग्रेसची वाट पाहत असतांना, त्यांचे सहयोगी मनांतून व प्रसंगीं उघड कौन्सिलबहिष्काराविषयीं असंतोष दाखवीत असतांना महाराष्ट्रांतील असहकारितावाद्यांनीं चळवळीचें समर्थन चालविलें होतें. देशभर उत्साहाची व अकल्पित आशेची लाट पसरत होती. राजकारण म्हणजे वकीलांनीं फावल्या वेळीं क्लबांतून अथवा आरामखुर्चीवरून करावयाचें फुरसतीचें काम ही भावना नष्ट होऊन प्रत्येक स्त्री-पुरुष-बालकाला तें स्वतःचेंही धर्म्य कार्य आहे असें वाटूं लागलें. कारण कॉंग्रेसनें प्रत्येकासाठीं कांहीं ना कांहीं काम ठेविलें होतें. लोकांतील शुभ वृत्ति जागृत होत होत्या. मुलें, स्त्रिया, अस्पृश्य, मुसलमान या सर्वांसाठीं महात्माजींनीं समतेची घोषणा करून देशसेवा करण्याचा त्यांचा समान अधिकार मान्य केला होता व ती करण्याची त्यांना प्रत्यक्ष संधि दिली होती. त्यामुळें सर्वांनाच आपण कांहीं तरी करावें असें वाटूं लागलें होतें.

महात्माजींचें लोकोत्तर चारित्र्य व आध्यात्मिक शक्ति यांची अगोदरच प्रसिद्धि झाली असल्यामुळें आणि सारा समाज त्यांचेकडे संतपुरुष या दृष्टीनें

पाहत असल्यामुळें त्यांनीं लोकव्यवहारांत हा जो एक व्यापक प्रयोग चालविला होता त्याचा सामान्य लोकांनीं तरी उपहास केला नाहीं. त्यांच्या सत्यअहिंसा सिद्धान्ताचें नाविन्य व त्यांच्यामार्फत आपणांवर रामराज्य येणार आहे ही एक भोळीभाबडी पण प्रामाणिक समजूत प्रजेच्या आशास्निग्ध मनाचें प्रतिबिंबरूप होती.

इकडे असहकारितेचा ठराव पसार झाल्यानंतर त्याचा अंमल कसा करावा त्याचा विचार करण्यासाठीं गांधी, मोतीलाल नेहरू व विठ्ठलभाई पटेल यांची कमिटी बसली. या कमिटींत मतभेद झाला. पहिले दोघे एक मताचे व पटेल विरुद्ध बाजूस झाले. तिकडे कलकत्ता कॉंग्रेसचे अध्यक्ष लाला लजपतराय यांनींही जाहीर केलें कीं, ‘ कमिटीच्या रिपोर्टांतील कांहीं बाबी मला मान्य नाहींत.’ मतभेद झाला तो मुख्यतः कौन्सिल-बहिष्काराच्या प्रश्नावरच. या प्रकारानें स्फूर्ति येऊन केळकरांनीं ‘केसरीं’त पुन्हा त्या प्रश्नाबाबत आपलें मत प्रदर्शित करण्यास व महात्माजींच्या हटवादीपणास दोष देण्यास सुरुवात केली. तथापि ठरावाचा अंमल करण्यासाठीं स्वराज्यफंड उभारण्यांत यावा या कमिटीच्या सूचनेस त्यांनीं उचलून धरिलें व यापुढें महाराष्ट्रभर टिळक स्वराज्यफंड, राष्ट्रीय शाळा व चर्खे यांचा प्रचार करण्याबाबत कार्यकर्त्यांनीं आपणांस वाहून घेतलें.

लोकमान्यांना आपल्या वर्तमानपत्रांचें व छापखान्याचें महत्त्व अतोनात वाटे. “ एवढीं लौकिकवान वर्तमानपत्रें व द्रव्यसंपन्न कारखाना ” असें ते वारंवार म्हणत. त्या दोन्ही संस्थांचें चालकत्व केळकरांकडे आल्यामुळें महाराष्ट्रांत साहजिकच त्यांच्या हातीं फार मोठें शक्तिसंपन्न साधन आलें होतें. त्या ‘केसरी’कडे मार्गदर्शनासाठीं लोक साहजिकच उत्कंठेनें पाहत. टिळकांप्रमाणें निश्चित मतें त्यांत आपणांस सांपडतील अशी त्यांची अपेक्षा होती. या समयानंतर ‘केसरीं’तील लिखाणानें वाचकांचा घोटाळा उडूं लागला. १२ ऑक्टोबरच्या अंकांतील अग्रलेखांत खुद्द संपादकांनींच त्याबद्दल तक्रार केली आहे. “ कित्येक पत्रकारांनीं किंवा वर्तमानपत्रांतून आपलीं मतें प्रसिद्ध करणाऱ्या सभ्य गृहस्थांनीं आमच्यावर असा आरोप केला आहे कीं, महात्मा गांधींविषयीं लोकांमध्यें अनादर उत्पन्न करणारीं विधानें आम्हीं

केलीं आहेत. कोणी आम्हांस म्हणतो फिरून असले अनादरकारक लेख लिहिले न जावोत; कोणी विचारतो गप्प बसायला काय घ्याल ? ......पण मौज ही कीं, असले आक्षेप ज्या लेखांमधून निघूं शकतात त्याच लेखांच्या आधारावर अकोलें येथील एका स्नेह्यानें, स्वतःवर मूर्खपणाचा शिक्का पडण्याचा धोका सोसून महात्मा गांधींच्या व्यक्तीची व त्यांच्या मतांची " भाटगिरी " सुरू केल्याचा आरोप आमच्यावर केला आहे."

परस्परविरोधी अनुमानें उत्पन्न करणारे लेख 'केसरीं'त येऊं लागले होते. मनुष्याच्या भावना या त्याचें जीवनसर्वस्व असल्यामुळें त्या फार काळ गुप्त राहूं शकणार नाहींत. आणि लेखणीवर कितीही अंकुश ठेवण्याचा प्रयत्न लेखकानें केला तरी त्याची अस्मिता केव्हां ना केव्हां प्रकट झाल्याविना राहणार नाहीं. केळकरांनीं स्वतःस एक मुदतबंदी घालून घेतली होती व ती मुदत संपेपर्यंत त्यांनीं शिस्त पाळण्याचा बहुविध प्रयत्न केला. परंतु निष्ठाशून्य शिपाई वीरवृत्तीचा उत्कर्ष कोठून दाखवणार ! स्वतःच्या सुसंगतीचें स्पष्टीकरण करीत असतांनाच त्यांनीं " राष्ट्रीय पक्षांतील दोन पोटभेद " स्पष्ट केले !

" आमच्या मतें असहकारितेचें धोरण हिंदुस्थानानें आतां स्वीकारावें अशी वेळ आलेली आहे " असें लिहिल्यानंतर लगेच त्यांनीं वकीलीचा धंदा सोडणें, कोर्टांवर बहिष्कार घालणें, मुलांना सरकारी शाळांतून काढणें, विदेशी मालावर बहिष्कार टाकणें व सरकारास कर न देणें या सर्व गोष्टींचा उत्तरोत्तर अवघडपणा सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. " असहकारिता ही सार्वत्रिक आहे, असहकारिता ही सामुदायिक आहे, व असहकारिता ही अनंत काल चालणारी नसली तरी, एखाददुसऱ्या वर्षांत मात्र ती यशस्वी होण्यासारखी नाहीं, तथापि तिला सुरुवात आजच केली पाहिजे व दिवसें-दिवस तिचा मार्ग अधिकाधिक आक्रमित गेलें पाहिजे. अशा प्रकारचें स्थिर धीराचें पण पक्क्या निश्चयाचें राष्ट्रीय पक्षाचें मत आहे. तथापि वर सांगितल्या-प्रमाणें या प्रत्येक बाबीचा ( अवघड गोष्टींचा ) खुलासाच केला पाहिजे. सूत्ररूपानें कितीही सांगितल्या तरी त्यांत संशयास जागा राहणारच. " अशी भाषाशैली 'केसरीं'त दिवसेंदिवस दृग्गोचर होऊं लागली.

चळवळीच्या प्रभावानें जागृत झालेला लोकसमाज, जो कोठल्याच संप्रदायाचा नव्हता, असल्या लेखांनीं हळूहळू क्षुब्ध होऊं लागला. महाराष्ट्रांतील असहकारपक्षाचे अध्वर्यु लेखणीचे किंवा वाणीचे कमी तिखट नव्हते. राजकीय क्षेत्रांत नित्य दिसून येणाऱ्या स्पर्धेपासून हे दोन्ही पक्षांचे कार्यकर्ते दूर नव्हते. त्यामुळें राजकीय मतभेदांचें निमित्त करून त्यांनीं एकमेकांचीं निंदा करण्यास व लोकांसमोर परस्परांची हेटाळणी करण्यास जाहीर रीतीने सुरुवात केली. आंत धुमसणाऱ्या वैमनस्याला याप्रमाणें वाट मिळाली.

नंतर नोव्हेंबरच्या सुरुवातीस महात्माजींचें पुण्यास शुभागमन झालें. पुण्याच्या सर्व नागरिकांनीं त्यांचें अंतःकरणपूर्वक स्वागत केलें. स्त्रियांचा उत्साह विशेष होता. त्यांनीं किर्लोस्कर थिएटरांत आपली प्रचंड सभा भरविली व महात्माजींना स्वराज्यफंडासाठीं आपले दागिने अर्पण केले. त्याच समयीं पुण्यांत स्त्रियांची सूत कमिटी स्थापन झाली; ती पुढें दहा वर्षें चालली.

महात्माजींच्या विधायक योजनेचा अंमल करण्यासाठीं महाराष्ट्रांत प्रयत्न चालू होता. ब्राह्मणांची दीक्षा अध्ययन व अध्यापन ही असल्यामुळें केवळ शिक्षणसंस्थांवर बहिष्कार घालून स्वस्थ बसणें त्यांना सहन होणें शक्य नव्हतें. म्हणून विधायक कार्यक्रमाच्या इतर कोणत्याही अंगापेक्षां राष्ट्रीय शिक्षणाची चळवळ महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षानें अधिक जोमानें हातीं घेतली व वर्षानुवर्षें तिच्या जोपासनेंत घालविलीं. महाराष्ट्रानें राष्ट्रीय शिक्षणाला पैसाही यथाशक्ति पुरविला. नोव्हेंबरच्या अखेरीस टिळक महाविद्यालयाची योजना तयार झाली. चिंतामणराव वैद्य तिचे योजक बनले. व महाविद्यालय ८ डिसेंबर रोजीं सुरू करावें असें ठरलें.

नोव्हेंबरच्या सोळा तारखेस कौन्सिलांच्या निवडणुका होऊन गेल्या व असहकारितेच्या प्रभावामुळें मतदान नाहीं म्हणण्यासारखें झालें. या बाबतींत मुसलमानांनींही कॉंग्रेसशीं सहकार्य केलें होतें. मतदार आपलें ऐकतील कीं नाहीं, या 'केसरी'च्या शंकेस परस्पर उत्तर मिळालें.

यानंतर नागपूरच्या राष्ट्रीय सभेनें सर्वांचें चित्त आपल्याकडे वेधून घेतलें.

---

# ६ नागपूर व नंतर



“नागपूरच्या लोकोत्तर व यशस्वी राष्ट्रीय सभेचें अगदीं थोडक्यांत वर्णन करावयाचें तर तें ‘ऐक्य व प्रगति यांचा विजय’ अशा शब्दांनीं करितां येईल.”

—‘केसरी’, ता. ४ जानेवारी १९२१.

चार महिने देशाला हादरून टाकणारी चळवळ नागपुरास आपलें उद्दिष्ट व कार्यक्रम निश्चित करणार होती. आपला कार्यक्रम राष्ट्रसभा कबूल करील व प्रजा तो घडवून आणील तर एका वर्षांत देशाला स्वराज्य संपादन करितां येईल असें आश्वासन महात्मा गांधींनीं दिलें होतें. नुकताच जागृत झालेला अफाट समाज या वचनाला उराशीं बाळगून उत्कंठित मनानें नागपूरच्या अधिवेशनाची वाट पाहत होता. आजवर कधीं घडलें नव्हतें तें घडूं पाहत होतें. बलिष्ठ ब्रिटिश साम्राज्याला एका वर्षांत निःशस्त्र चळवळीनें नमवूं पाहणारा जीवनवीर सर्वांच्या कौतुकाचा, आदराचा व प्रेमाचा विषय झाला होता. देश वेडा झाला होता. त्याला मोहक भविष्यकाळाशिवाय अन्य कांहींच दिसत नव्हतें. महात्माजी सांगत त्या साऱ्याच गोष्टी सोप्या वाटत होत्या. नित्याच्या नीरस जीवनांत नूतनाचा संचार झाल्यामुळें तो त्याच्या प्राप्तीच्या आशेनें साहजिकच अधीर बनला !

अधिवेशन भरलें. आजपर्यंतच्या कोणत्याही अधिवेशनांपेक्षां तें अधिक प्रचंड प्रमाणावर भरलें होतें. दोन्ही पक्ष आपली सामग्री जय्यत तयार करून आले होते. त्या समयीं कॉंग्रेसमध्यें आतांप्रमाणें पक्ष असे नव्हतेच. पण प्रांतीय पुढाऱ्यांना वजन फार होतें. जुन्या पिढीचे प्रांतीय पुढारी पक्षाचेंच महत्त्व पावले होते. त्यामुळें त्यांच्या सूचनांचा महात्माजींनाही विचार करावा लागे. कौन्सिलवादी लोकांचा असा एक पक्ष म्हणतां येईल; पण तो महाराष्ट्रांतच विशेष संघटित होता; तरी सुद्धां अधिवेशनप्रसंगीं त्याला विरोध करण्यासारखें कांहीं नव्हतेंच. कौन्सिलच्या निवडणुकी होऊन चुकल्या होत्या. त्यामुळें यापुढें तीन वर्षेंपर्यंत तो प्रश्न काढतांच येण्यासारखा नव्हता.

नागपूरला असहकारितेचा ठराव इतका व्यापक व सर्वस्पर्शी करण्यांत आला, कीं त्यांत बहुतेक सर्वांचें समाधान होऊन प्रतिनिधींनीं तो जवळजवळ एकमतानें मंजूर केला. काँग्रेसचें क्रीडही त्याच वेळीं बदलण्यांत आलें. काँग्रेस पूर्णपणें राष्ट्रीय पक्षाच्या हातीं गेली. श्रीमंतीचा भपका जाऊन बाह्य स्वरूपांत सुद्धां सर्वत्र साधेपणा दिसून येत होता. महात्माजींच्या झोपडीपर्यंत कोणालाही जातां येई.

या अधिवेशनांत बहिष्कार व स्वदेशी यांच्या स्पष्ट व्याख्या होऊन रचनात्मक कार्यक्रम ठरविण्यांत आला. त्यांतील मुद्देः—

सूत कांतणें, विणणें, या कलांस उत्तेजन देणें, लवादकोर्टें स्थापणें, राष्ट्रीय शाळा-कॉलेजें स्थापणें, खेड्यांतून सेवा करणारीं मंडळें स्थापणें, स्वयंसेवक-पथक उभारणें, चळवळीस पैशाचा पाठिंबा देण्याकरितां टिळक-स्वराज्यफंड गोळा करणें.

अनत्याचार उर्फ अहिंसा या महात्माजींच्या सिद्धान्ताला राष्ट्रसभेनें पूर्ण पाठिंबा दिला.* तसेंच हिंदुमुसलमान ऐक्य व अस्पृश्यतानिवारण या दोन बाबीही विधायक कार्यक्रमाचें महत्त्वाचें अंग होऊन बसल्या.

नागपूरच्या अधिवेशनांत राष्ट्रीय सभेची जुनी घटना बदलण्याचें ठरलें. हिंदुस्थानचे भाषावार भाग पाडण्यांत आले व प्रत्येकास प्रांतीय कमिटी देण्यांत आली. त्या नव्या कायद्याप्रमाणें महाराष्ट्राचे मुंबई (शहर), महाराष्ट्र, मध्यप्रांत

---

* असहकारितेच्या ठरावाचा अहिंसा हा अत्यंत महत्त्वाचा भाग आहे म्हणून त्यावर विशेष जोर देण्याची या राष्ट्रीय सभेची इच्छा आहे; आणि शाब्दिक व कृतिविषयक अहिंसा सरकारशीं वागण्यांत जितकी आवश्यक आहे तितकीच लोकांच्या परस्परवर्तनांतही आवश्यक आहे, या गोष्टीकडे ही सभा लोकांचें लक्ष वेधीत आहे. या सभेचें असें मत आहे कीं, लोकशाहीच्या खऱ्या तत्त्वाच्या वृद्धीस हिंसा विघातक आहे, इतकेंच नव्हे तर असहकारितेच्या बाकीच्या कार्यक्रमाच्या अमलबजावणीस ( जरूर पडल्यास ) अडथळा आणणारी आहे. —नागपूर काँग्रेसच्या ठरावांतील एक भाग.

व वऱ्हाड असे चार वेगवेगळे भाग पडले. सुमारें पन्नास हजारांच्या लोकसंख्येला एक याप्रमाणें प्रतिनिधि निवडण्याबाबत नियम करण्यांत आला.

याप्रमाणें जनतेपैकीं प्रत्येक व्यक्तीला कामाचा संदेश मिळाल्यावर त्याची अमलबजावणी करण्याच्या इच्छेनें सर्व लोक आपापल्या ठिकाणीं गेले. महाराष्ट्रांतील प्रतिनिधीहि अर्थात् आपापल्या मुक्कामीं परतल्यावर त्यांना कार्यक्रमाचा प्रसार करणें क्रमप्राप्तच झालें. पहिलें मोठेंच काम म्हणजे विद्यार्थ्यांना शाळांतून बाहेर काढण्याचें होतें. डिसेंबरांतच पुण्यास टिळक-महाविद्यालय सुरू झालें होतें. डिसेंबरच्या सुटीनंतर जानेवारींत तें पुन्हा उघडलें. त्या वेळीं सुरुवातीस ८७ विद्यार्थी होते. त्या वेळीं विद्यालयाचे चिटणीस श्री. घारपुरे होते. विद्यालयांत धंदेशिक्षणाचीही सोय करण्यांत आली होती.

श्री. केळकरांनीं 'केसरी'तून पालकांस उपदेश आरंभिला. " आजकालचे पालक असें मानतात कीं, सरकारी किंवा निमसरकारी शाळांतून ठराविक शिक्षण घेणें हींच आपल्या मुलाच्या कल्याणाची परमावधि, व ही त्यांची घातक कल्पना दैवाला आज काढून टाकावीशी वाटत असल्यामुळें हीं मुलेंच बंडखोर बनून ही शिक्षणपद्धति लाथाडूं लागलीं आहेत. पालकांच्या दृष्टीनें हा सर्वनाश असेल; पण वास्तविक राष्ट्राच्या प्रगतीचें तें एक गूढ बीजच आहे. ...पालकांनाही आम्ही हें स्पष्ट विचारतों कीं, त्यांचीं मुलें रूढ विद्याभ्यासक्रमांतून बाजूला गेलीं तर त्यांना तरी इतकें वाईट कां वाटावें ?... खुद्द पुण्याचेंच उदाहरण घेतलें तर आज सुमारें १५०० मुलें आर्ट्स् शाखेचा अभ्यास करीत आहेत. या सर्वांनीं जर आज सरकारी किंवा निमसरकारी कॉलेजें सोडून दिलीं तर त्यांचें विशेष नुकसान होईल असें आम्हांस तर वाटत नाहीं. याच तोडीचें शिक्षण राष्ट्रीय शाळांतून देतां येईल; पण हें शिक्षण कायमचें सोडून देण्याचाही प्रश्न नसून फार तर एक वर्षभर कॉलेजांवर बहिष्कार घालण्याचा प्रश्न जेव्हां पुढें येतो तेव्हां तर कांहींच अडचण उरत नाहीं. "

" कलकत्त्याच्या ठरावांतील मुख्य दोष अशा रीतीनें काढून टाकण्यांत आल्यावर वाद अर्थातच मिटला व महाराष्ट्रातर्फे केळकर यांनीं ठरावाला

मोकळ्या मनानें संमति दिली " हें वाक्य पुरें झालें नाहीं तोंच " वास्तविक कोणताही ठराव सर्वस्वीं कोणाच्याही मनासारखा केव्हांही होत नसतो. तडजोड म्हणून प्रत्येकाला थोडेंसें उणें पत्करावेंच लागतें. " असे उद्गार काढणाऱ्याच्या हातून 'मुलांना घातक शिक्षण देऊं नका' असें लिहिलें गेल्यावर " हा बहिष्कार एक वर्षापुरताच आहे " असें ताबडतोब लिहिण्याची घिसाडघाई व्हावी याचें वाचकाला आश्चर्य न वाटावें.

तिकडे शिवरामपंत परांजपे यांनीं " स्वराज्य " पत्र चालवून असहकारितेचा पुरस्कार करीत असतांना केळकर व त्यांचा पक्ष यांवर सडकून टीका करण्यास सुरुवात केली, आणि मग युद्ध जुंपलें. केळकरांची वृत्ति धडाडीची नाहीं; थोडी बुजटही आहे. लोकांनीं आपल्याला नांवें ठेवूं नयेत असें त्यांना वाटतें. त्यामुळें हिरीरीसरशीं त्यांनीं आपलीं मुलें शाळेंतून काढून घेतलीं. नंतर परांजप्यांनीं आपलीं मुलें काढून घेतलीं नाहींत म्हणून ते टीका करूं लागले. महाराष्ट्रांतील असहकारपक्षाच्या जुन्या पिढीच्या लोकांनीं त्या वेळीं जाहीर रीतीनें जरी असहकारितेचें समर्थन केलें होतें तरी त्यांच्या खासगी जीवनांत कांहींच परिवर्तन झालेलें जनतेस दिसेना. एकाच काळांत व तालमींत तयार झालेले हे मल्ल आपसांत कुस्त्या खेळूं लागल्यामुळें प्रांताला मार्गदर्शन नीटसें होईना. पुण्यांतच ही अवस्था, मग पुण्याबाहेर काय विचारावें ? याच नमुन्याच्या छोट्या आवृत्त्या सर्वत्र निघूं लागल्या.

वऱ्हाडाकडे अणे स्वतः निवडणुकीला उभे राहिले नव्हते तरी त्यांनीं आपल्या मित्राला उभें करून निवडून आणलें व कॉंग्रेसच्या आज्ञेचा अनादर केला. वकिलांपैकीं कॉंग्रेसनिष्ठ वकिलांनीं वकिल्या सोडल्या. त्यांतही पुन्हा कित्येकांनीं एक वर्षाची मुदत घातली. बॅ. जयकर व अण्णासाहेब भोपटकर हे त्यांपैकींच एक होते. भोपटकरांनीं एका वर्षासाठीं वकिली सोडल्याचें जाहीर केलें खरें, परंतु या मुदतींत ते कोर्टांत गेले नाहींत असा एकही दिवस गेला नसेल ! त्यांचे जुने खटलेच इतके होते !

रत्नागिरीचे नानल, पंढरपूरचे फणसळकर, सोलापूरचे राजवाडे यांनींही एका वर्षासाठीं वकिली सोडली. महात्माजींनीं या मोकळ्या झालेल्या वकिलांना विधायक कार्यक्रमास स्वतःस वाहून घेण्यास उपदेश केला. गंगाधरराव देशपांडे,

दास्ताने वगैरेनीं तो अमलांतही आणला. शेठ जमनालाल बजाज यांनीं टिळक-स्वराज्य फंडाला एक लाख रुपये देऊन त्यांचा उपयोग वकिली सोडणाऱ्या वकिलांना मासिक खर्चासाठीं देण्याकडे करण्यांत यावा असें कळविलें होतें. तरी महाराष्ट्रांतील कित्येक स्वाभिमानी वकिलांना त्या फंडांतून पैसे घेण्यास संकोच वाटला. पुण्याच्या वकिलांपेक्षां नागपूरचे वकील अधिक भरीव निघाले.

नव्या घटनेप्रमाणें महाराष्ट्रांत स्वतःची अशी प्रांतिक कमिटी मिळाल्यामुळें तिची योजना करण्यासाठीं जानेवारींत पुण्यास नानासाहेब वैद्य यांच्या येथें सभा भरली. एक हंगामी प्रांतिक कमिटी स्थापन करण्यांत येऊन श्री. केळकर यांस अध्यक्ष निवडण्यांत आलें. सोलापूरचे राजवाडे चिटणीस झाले. त्याच-प्रमाणें असहकारितेचा कार्यक्रम अमलांत आणण्यासाठीं गायकवाडवाड्यांत असहकारिता कमिटीची स्थापन करण्यांत आली. श्री. ना. स. मराठे तिचे चिटणीस होते. शिवाय महाराष्ट्र प्रांतिक कमिटीनें कार्यक्रमाचा प्रचार करण्यासाठीं प्रांतभर प्रचारक पाठविले.

# ७ जुन्या क्षेत्रांतील नवे कृषिवल

महाराष्ट्र अंगावरील कात काढून टाकण्याच्या प्रयोगांत होता.

परिवर्तनाच्या काळांत जर प्रजा जुनें शरीर टाकून नवें धारण करणार नाहीं तर ती जगणार नाहीं. भूतकालांतील आदर्श वर्तमानाच्या पडद्यामागें अदृश्य होत होते. भविष्यकाल नवीं ध्येयें घेऊन सन्मुख येत होता. नवीन माणसें जोमानें पुढें येत होतीं. जुन्या पिढीचा भूतकाळचाच आदर्श समाजापुढें ठेवण्याचा मिथ्या प्रयत्न नवी पिढी निष्फळ करूं पाहत होती. नवा महाराष्ट्र जन्माला येत होता.

१९२० पर्यंत महाराष्ट्रांत ज्या कार्यकर्त्यांनीं राजकीय क्षेत्रांत प्रामुख्यानें काम केलें ते टिळकांच्या वेळचे लोक होते. महाराष्ट्राचें पुढारीपण स्वतः-कडे ठेवण्याचा त्यांचा अट्टाहास होता. तेही एकाकालचे जहालच; परंतु असहकारितेची लाट आल्यावर त्यांनीं या नव्या अमृतांतून आपलें पुनरुत्थान घडवून आणण्याचें नाकारतांच त्यांचें तेज अल्पजीवी ठरलें. नवी नांगरणी होण्यापूर्वी खोल रुजलेले जुन्या कणसांचें खुंट जसे प्रयासानें उपटून टाकिले जातात तसे उपटले जाण्याची पाळी त्यांचेवर आली. आणि नवजीवनाचा रस आकंठ प्यालेले नवे तरुण क्षेत्राचा ताबा घेण्यास पुढें सरसावले.

या नवीन तरुण कार्यकर्त्यांचा इतिहास लिहिण्यापूर्वी त्यांची पार्श्वभूमि जाणून घेणें अगत्याचें आहे. कारण हेच कार्यकर्ते जरी १९२० समयीं अगदीं तरुण व अज्ञात होते तरी आपल्या सतत परिश्रमांनीं व चिकाटीनें त्यांनीं जुन्या गटास मागें हटविलें व आजच्या महाराष्ट्राचीं सूत्रें त्यांच्याच हातीं आहेत असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. आजचा महाराष्ट्र पुष्कळ अंशीं या १९२० च्या चळवळींत स्फूर्ति प्राप्त करून घेतलेल्या कार्यकर्त्यांनीं निर्माण केला आहे. त्यांची मनोभूमिका देखील उच्च आदर्शवादीच होती. जुन्या गटापासून विभक्त होण्यास व त्याच्याशीं झुंजण्याची प्रेरणा त्यांस देण्यास कोणतीं कारणें झालीं त्यांचाही साकल्यानें विचार करावा लागेल.

पहिली गोष्ट ही सांगावयाची कीं, हा नवा गट बहुतेक सर्व ब्राह्मण-वर्गांतूनच उदयास आला.

श्रीसमर्थांच्या शिकवणीपासून महाराष्ट्रावर जे संस्कार झाले त्यांपैकीं त्याग व तपस्या हे ब्राह्मणवर्गानें उचलले. आद्यश्रीशंकराचार्यांच्या वेळेपासूनच ब्राह्मणांना विरक्ति व विद्या यांची दीक्षा मिळाली होती. समर्थांच्या वेळेस ब्राह्मण्याचा लोप झालेला त्यांना दिसला तेव्हां त्याच्या पुनरुस्थानासाठीं त्यांनीं भगीरथ प्रयत्न केले व आपल्या अद्‌भुत संघटनाशक्तीनें मृताला सचेतन केलें. पुढें पेशवाईत तर ब्राह्मण्य क्षात्रतेजानें युक्त होऊन दिग्विजय करूं लागलें होतें. ब्राह्मणांची अशी एक स्वतंत्र संस्कृति निर्माण झाली होती. रामदास या ब्राह्मणसंस्कृतीचें फार अभिमानी होते, कारण त्यांनींच तिला तेजस्वी व लोकहिततत्पर बनविलें होतें. तरी सुद्धां भागवत संतांची लोकशाही वृत्ति या संस्कृतींत आढळून येत नव्हती. ब्राह्मणसंस्कृतीनें महाराष्ट्रांत एक महाजनवर्ग निर्माण केला. जोंपर्यंत ब्राह्मणांच्या हातीं राजसत्ता होती तोंपर्यंत त्यांच्या पुरुषार्थापुढें दोष लोपले. सत्ता हातांतून जातांच ब्राह्मणवर्ग इंग्रजी राज्यांत मिरासदारी वृत्तीचा बनला.

ब्राह्मणवर्ग हा बुद्धिमानांचा वर्ग असल्यामुळें त्यांच्यांत आत्मानात्म-विवेक लवकर जागृत झाला. त्यामुळें इतर कोणत्याही जातींपेक्षां त्यांच्या स्वाभिमानानें पेट लवकर घेतला. आपल्या पूर्वजांचा व संस्कृतीचा अभिमान त्यांस वाटत असल्यामुळें त्यांच्यांत संस्कृतीचें पुनरुज्जीवनही वेगानें झालें. रानडे, आगरकर यांच्या पंथांविषयीं मागें उल्लेख आलाच आहे. रानड्यांनीं धार्मिक व सामाजिक पुनरुज्जीवन केलें. नंतर चिपळूणकरांनीं राष्ट्रीयत्वाचें पुनरुज्जीवन केलें. तदनंतर टिळकांनीं राजकीय चळवळीचा पाया घातला.

बुद्धिमान् लोकांनीं इंग्रजी विद्येंतही प्रभुत्व मिळविलें; परंतु त्याचा परिणाम सरकारी नोकरींत व प्रायः हीन वृत्तींत होत असलेला पाहून टिळक-चिपळूणकरांनीं खाजगी शाळा काढल्या; स्वतंत्र बौद्धिक व्यवसाय उभारले; जागृतीसाठीं प्रचार सुरू केला. परंतु तो ब्राह्मणवर्गातच झाला. रामदासस्वामींच्या शिकवणुकींतून आलेली ही चळवळ बौद्धिक पायावरच उभी राहत होती. दासबोधाची शिकवण ब्राह्मणांकरितांच बरीचशी आहे.

त्यांची शिकवण प्युरिटन पंथाला शोभेल अशी आहे. महाराष्ट्रांतील इतर वर्णीयांना असें जीवन व असे नियम असह्य झाले असते. रामदासांचा आध्यात्मिक आदर्शवाद त्यांना पचवितां आला नसता. परंतु त्या आदर्शवादाचीं स्वप्नें टिळकांच्या वेळच्या तरुण पिढीला पडत होतीं. तरुणांचा राष्ट्राभिमान जागृत होत होता. रामदासांचें संस्कार कडकडीत, साध्या, तपस्वी जीवनाची प्रेरणा देत होते. त्या संस्कृतीची शेवटची महाथोर निर्मिति म्हणजे टिळक! ते तर १९१४ नंतर विधुर म्हणजे ब्रह्मचारी होते. तत्कालीन तरुण पिढीला ब्रह्मचर्याची स्फूर्ति अशा उदाहरणापासून मिळाली व पुष्कळांनीं आजन्म ब्रह्मचारी राहून देशसेवा करण्याचा निश्चय केला. १९२० च्या चळवळींत पडलेले कांहीं तरुण आजही ब्रह्मचारीच आहेत.

महाराष्ट्रांतलि आदर्शवादी भूमिकाच पुढें निर्भेळ स्वातंत्र्यवादास जन्म देती झाली. या जहाल स्वातंत्र्यवाद्यांचेही दोन पंथ होते. एक क्रांतिवादी पंथ व दुसरा टिळकांचा बहिष्कारवादी सनदशीर चळवळीचा. क्रांतिवादी पंथाच्याही बऱ्याच शाखा होत्या. त्यांपैकीं एकीचे प्रमुख श्री. सावरकर हे होते. सेनापति बापट, सातारचे डॉ. आठल्ये, नाशिकचे श्री. बाबासाहेब खरे वगैरे मंडळी याच पंथापैकीं होत. काळ जातांच परिस्थितीप्रमाणें बहुतेकांचीं मतें बदललीं व ते या नाहीं त्या अन्य राजकीय पंथांत सामील झाले किंवा उदासीन काळ कंठूं लागले. अर्थात् इंग्रजांच्या समर्थ शक्तीपुढें त्या पंथास नमावें लागलें व पुढें नेस्तनाबूद व्हावें लागलें हेंच तें मुख्य कारण होतें. परंतु ती एक मनोवृत्ति आजही महाराष्ट्रांत जिवंत आहे हें पुढें क्रमानें कळून येईलच.

टिळकानुयायांतही दोन पंथ होते. कांहीं लोक कडवे जहाल होते, तर कांहीं नरमवृत्तीचे होते. अर्थात् हा भेद स्थूलरूपानें समजावयाचा. आजचे जहाल उद्यां मवाळ होतात या विधानाचा उलगडा पूर्णांशानें करतां येणें अशक्य आहे. माणसांच्या निश्चितरूपानें जाति करतां येणें अशक्य आहे. पुष्कळदां उशीरां सुद्धां परिवर्तन होऊं शकतें. कित्येकदां परिवर्तित माणसें नंतर पीछेहाट करितात. तरी स्थूल मानानें म्हणतां येईल कीं हिंदुस्थानांत गांधींच्या नेतृत्वाचा उत्कर्ष होऊं लागतांच टिळकानुयायांपैकीं जे समतेचे

भोक्ते व व्यापक अर्थानें राष्ट्रवादी होते असे आध्यात्मिक आदर्शवादी सारे तिकडे वळले. आणि ज्यांचा राष्ट्रवाद संकुचित व व्यावहारिक कोटीचा होता, त्यांनीं आपलीं तोंडें विरुद्ध दिशेकडे फिरविलीं.

गांधींची त्याग व तपस्या यांवर उभारलेली चळवळ वास्तविक पाहतां रामदासी संस्कृतीच्या ब्राह्मणांना अवघड वाटूं नये, पण तसें झालें खरें. कारण कीं, इंग्रजी राज्यांत ब्राह्मणांचा अधःपात झाला होता. नोकरींत शिरलेला ब्राह्मणवर्ग, वकिली करून शेतकऱ्यांच्या पोटांवर पाय देऊन आपली पोतडी भरणारा ब्राह्मणवर्ग, पगार घेऊन शिकविणारा ब्राह्मणवर्ग आपल्या भव्य आदर्शापासून च्युत झाला होता. महात्माजींचा पंचविध बहिष्काराचा कार्यक्रम त्याला असह्य वाटला. " गांधी आमचा वृत्तिच्छेद करीत आहेत." ही ओरड त्यानें चालविली. खरें पाहतां महात्माजी त्याला त्याच्या " मुख्य दीक्षे "चेंच स्मरण देत होते. पण भोगाचीं साधनें ब्राह्मणवर्गाच्या ज्ञानाग्नीवर राखेचीं पडळें रचीत होतीं. त्यामुळें त्याचा विवक गुदमरून गेला.

हें वर्णन भोगलोलुप ब्राह्मणांचें झालें. नंतरची पिढी पुष्कळशी टिळकां-पासून स्फूर्ति पावून आली होती. तिचा इतिहास वेगळ्याच नमुन्याचा घडला.

प्रांतांतील तरुणांचा आत्मा जागृत होत असतां मिळतील ते संस्कार घेण्याकडे त्याची प्रवृत्ति होती. प्राचीन व अर्वाचीन सारेच संस्कार तो अधाशाप्रमाणें घेत होता, दोहोंचा उत्कृष्ट मिलाफ त्याला लोकमान्यांत दिसून आला. त्याला त्यांचेकडूनच प्रेरणा मिळाली.

इंग्रजी अमलांत सुद्धां महाराष्ट्राचें सांस्कृतिक, साहित्यिक व सामाजिक केन्द्र पुणेंच होतें. राजकीय वर्चस्व कांहीं काळ मुंबईनें भोगलें तरी त्यांत अस्सल महाराष्ट्रीयत्व नव्हतें. महाराष्ट्रीयांना ओढा पुण्याचाच प्रथमपासून होता. पुढें लोकमान्यांनीं गायकवाडवाड्यांत आपलीं सूत्रें चालविण्यास सुरुवात केल्यानंतर साऱ्या महाराष्ट्राचे नेत्र तिकडेच लागल्यास नवल नाहीं. ज्या वेळीं गायकवाडवाड्याच्या चौकांत आरामखुर्ची टाकून लोकमान्य बसत असत व गणपत्युत्सवप्रसंगीं अनेक मेळे त्यांना वेष्टून आपलीं वीररसपरिप्लुत

गीतें त्यांना आवडीनें ऐकवीत त्या वेळीं त्या महोत्सवाच्या दर्शनानें आकंठ तृप्त झालेले अनेक चिमुकले नेत्र देशाच्या उज्ज्वल व आकर्षक भवितव्याचीं चित्रें आपल्या मनश्चक्षूंसमोर आणीत होते. याच बालकांतून पुढें खंदे सेवक निर्माण झाले. असहकारितेच्या प्रारंभकाळीं जेव्हां महाराष्ट्रांत कर्तव्या-कर्तव्यतेचा झगडा चालत होता, मिथ्याभिमानी नेते चुकीची मीमांसा करून प्रांताच्या प्रगतीला विरोध करीत होते आणि सर्वत्र पाखंड वाढत होतें, त्या वेळीं या श्रद्धाशील जीवनपरायण सेवकांनीं पुढें येऊन वर्षानुवर्षें नेट धरिला आणि युगोत्कर्षाच्या महोत्सवांत महाराष्ट्राला ओढून आणिलें.

हा जो नवीन सेवकवर्ग हळूहळू समाजापुढें येत होता त्याची माहिती कोणासच नव्हती. त्यांच्यांत कोणी वकील नव्हते, व्यापारी नव्हते, उच्च कुळाची बढाई सांगणारेही नव्हते. तीं साधीं माणसें होतीं. आपल्या संपूर्ण ऐश्वर्यानें बहुजनसमाजाचे डोळे दिपवून टाकणारीं मेहता, दादाभाई, रानडे, वाच्छा, गोखले यांसारखीं तीं माणसें नव्हतीं. असाधारण बुद्धिमत्तेसाठींही कोणाची ख्याति नव्हती. अजून सरकारशीं झगडा यांपैकीं कोणाचाही झाला नव्हता. लोकांचे डोळे दिपण्यासारखी कामगिरी अजून कोणीही करून दाखविली नव्हती.

परंतु त्या सर्वांत एकच जीवनरस वाहत होता. त्यांच्यासमोर एकच उद्दिष्ट कार्य होतें. नवें युग अवतरत होतें. त्याचे ते सारे उपासक होते. महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या भागांतून ते प्रकाशाची उपासना करीत पुढें चालले व शेवटीं एकाच स्थळीं आले.

---

# ८ वकील व संपादक

असहकारितेच्या आरंभकालीं महाराष्ट्रांत ज्यांनीं आपली वकिली सोडली त्यांपैकीं एक भुसावळचे दास्ताने वकील होते. त्यांनीं मुंबई कायदे-कौन्सिलच्या निवडणुकीला उमेदवार म्हणून उभें राहावयाचें ठरविलें होतें. परंतु ती उमेदवारीही त्यांनीं मागें घेतली.

दास्तान्यांना जुन्या पिढीचे म्हणतां येणार नाहीं. लोकमान्य त्यांच्या मागल्या पिढीचे होते. दास्तान्यांना लोकमान्यांपासून पहिली स्फूर्ति मिळाली असें म्हणतां येणार नाहीं. परंतु त्यांना टिळक आवडत असत. १९१९ पर्यंत दास्ताने राजकारणांत फारसे पडलें नव्हते. एका सधन वकिलाच्या पोटीं जन्म घेण्याचें भाग्य त्यांना प्राप्त झालें होतें (१२-११-१८८२). त्यामुळें शिक्षणाबाबत सर्व सवलती मिळत असूनही छांदिष्टपणांत विद्याभ्यासाकडे दुर्लक्ष करण्याची वृत्ति त्यांचे अंगीं बळावली होती. मात्र इंग्रजांना हिंदुस्थानांतून हुसकून लावण्याचे मनसुबे ही अशक्त वामनमूर्ति आपल्या लहानपणीं कैकवार करीत असे. १९०२ सालीं कॉलेजांत सेनापति बापट व दास्ताने यांची ओळख झाली व पुढें ओळखीची परिणाति स्नेहांत झाली. पुढें बापट विलायतेस गेले तरी स्नेह कायम होता.

दास्ताने १९०८ सालीं वकिली करूं लागले त्या सुमारास लोकमान्य तुरुंगांत जाऊन साऱ्या देशाचें राजकारण स्थगित झालें होतें. दास्तान्यांच्या जिवाला कांहीं तरी करावें अशी तळमळ होती. १९१६ पासून ते सार्वजनिक कार्यांत भाग घेऊं लागले. पुण्यांत त्यांचें येणें-जाणें नेहमीं असे, पण तिकडील चळवळींत ते फारसे भाग घेत नसत. टिळकांची ओळख झाल्यावर दास्तान्यांनीं राजकारणांत भाग घेण्यास सुरुवात केली. १९१६ नंतर भुसावळच्या राजकारणाचीं सूत्रें दास्तान्यांच्या हातीं आलीं. त्यांची वकिली चांगली चालत असल्यामुळें आणि स्वभाव लोकांत मिसळणारा असल्यामुळें कॉंग्रेसला जातां-येतांना त्यांच्याच घरीं प्रतिनिधि उतरत.

सन १९१८ त दास्तान्यांनीं जिल्हा परिषद भरवून आणिली. रौलट

ॲक्टाचा निषेध करण्याचा त्यांचा उद्देश होता. अध्यक्ष श्री. पं. का. तेलंग होते. दास्तान्यांनीं होमरूल लीगला खूप सभासद मिळवून दिले. खेड्यांतून लवादकोर्टें स्थापण्याचीही त्यांनीं खटपट केली. पुढें १९१९ मध्यें ते अमृतसर कॉंग्रेसला गेले. तेथें राजकारणाचें संपूर्ण दर्शन झालें. महात्माजींचें दर्शन तेथेंच झालें. तत्पूर्वी त्यांना महात्माजींविषयीं माहिती होती. पण त्यांच्या साऱ्या आश्रमप्रवृत्ति त्यांना पोरकट वाटत. अमृतसरलाही त्यांना महात्माजी मवाळच वाटले. कलकत्त्याचा असहकारितेचा ठराव दास्तान्यांना पसंत नव्हता. पण शिस्तीसाठीं त्यांनीं उमेदवारी मागें घेतली. मग मात्र नागपूर-अधिवेशनप्रसंगीं त्यांना सत्यदर्शन झालें व स्वामी सत्यदेवांचें भाषण ऐकून त्यांनीं वकिली सोडण्याचा निश्चय केला.

दास्तान्यांनीं १ फेब्रुवारी १९२१ रोजीं वकिली सोडली. केळकरांशीं दास्तान्यांचा विरोध तेव्हांपासून सुरू झाला. दास्तान्यांना घरांतूनही विरोध कमी झाला नाहीं; परंतु त्यागाला तयार झालेला मनुष्य कठीण किंवा कोमल कसल्याच अडचणींना जुमानणार नाहीं. त्यांनीं घरच्यांचें कसें तरी समाधान करून, असहकारितेच्या प्रचारासाठीं घराबाहेर पाऊल टाकिलें. लोकांची स्वावलंबनशक्ति वाढवून, त्यांची संघटना करून स्वराज्याची लायकी मिळविणें हें ध्येय त्यांना पटलें होतें.

महाराष्ट्राला स्वतंत्र प्रांतिक कमिटी मिळाल्यावर केळकर अध्यक्ष व दास्ताने उपाध्यक्ष बनले. त्या दोघांतही झगडा सुरू झाला. केळकरांची घरसोडीची भाषा दास्तान्यांना पसंत नसे. दास्तान्यांनीं आपली संपूर्ण निष्ठा महात्माजींना अर्पण केली होती; परंतु दास्तान्यांना महाराष्ट्राच्या दृष्टीनें वैयक्तिक दर्जा कांहीं नव्हता. तो मिळेपर्यंत त्यांना खूप तपस्या करावी लागली.

महाराष्ट्रांत राजकारण रंगूं लागलें होतें. दास्ताने नव्यापैकींच होते, तरी केळकरांना विरोध करणारे जुन्यांपैकीं परांजपे व वासुकाका जोशी होते हें मागें सांगितलेंच आहे. केळकरांच्या 'केसरी'ला तोंड देण्यासारखें वजनदार वर्तमानपत्र विरुद्ध पक्षाजवळ तेव्हां तरी नव्हतें. कांहीं इतर वर्तमानपत्रें असत, पण तीं सर्व स्थानिक म्हणजे वेगवेगळ्या जिल्ह्यांचीं अगर गांवांचीं समाचारपत्रें असत. परांजपे यांनीं लोकमान्य वारल्या दिवसापासून 'स्वराज्य'

( साप्ताहिक ) पत्र सुरू केलें होतें आणि त्यांच्या ओजस्वती भाषाशैलीमुळें व प्रतिष्ठेमुळें तें थोडेंबहुत लोकप्रियही झालें होतें. परंतु त्याला प्रांतीय स्वरूप आलें नव्हतें. वासुकाकांच्या 'चित्रमयजगतां'तून 'केसरी'वर कडक टीका येई; परंतु तें मासिक असल्यामुळें त्याचा फारसा परिणामकारक उपयोग होत नसे. १९२० मध्यें चित्रमयजगताला एक नवीन होतकरू तरुण गृहस्थ संपादक म्हणून लाभले. त्यांचें नांव श्री. देवगिरीकर. टिळकांपासून स्फूर्ति मिळवून लोकसेवेची महत्त्वाकांक्षा बाळगणारे नव्या पिढींतील ते एक चांगले लेखक होते. १८९७ च्या जानेवारींत त्यांचा जन्म झाला. त्यांनीं स्वावलंबनाच्या जोरावर विश्वविद्यालयीन शिक्षण पुरें केलें. पुढें सातआठ महिने पुण्याच्या कॅंप एज्युकेशन सोसायटींत मुख्य अध्यापकाचें काम केल्यावर ते चित्रमयजगत्चे संपादक बनले. शाळा-कॉलेजांत असतांनाही ते सार्वजनिक कामें करण्याची संधि दवडीत नसत. १९१३ सालीं पुण्यास प्लेगची सांथ भयंकर प्रमाणांत होती. त्या वेळीं दक्षिण आफ्रिकेंत महात्मा गांधींची सत्याग्रहाची चळवळ चालू होती. त्यांना पाठविण्याकरितां निधि उभारण्याचें कार्य ना. गोखले यांनीं हातीं घेतलें होतें; त्या कामांत श्री. देवगिरीकर यांनीं साहाय्य केलें व सुमारें २०० रु. जमवून दिले. प्रथमपासून त्यांना वाचनाची फार आवड होती; त्यामुळें चित्रमयजगत्मध्यें त्यांच्या प्रवृत्तीला साजेसें क्षेत्र मिळालें. त्यांनीं सुमारें १४।१५ निरनिराळ्या देशांच्या इतिहासाचें अध्ययन करून चित्रमयजगत्चे खास अंक काढले. त्यांतील कांहीं सरकारी रोषाला बळी पडून जप्त झाले. असहकारितेच्या चळवळींत मद्यपान-निरोधनकामीं त्यांना दंड झाला. आपल्या मासिकांतून लेख व व्यंगचित्रांच्या साहाय्यानें ते केळकरपक्षावर हल्ला करीत. हीं व्यंगचित्रें प्रतिपक्षाला फार झणझणत. पुढें तीं कांहीं कारणानें बंद करण्यांत आलीं. कॉंग्रेस पक्षाचीं जीं अगदींच थोडीं नियतकालिकें तेव्हां होतीं, त्यांपैकीं चित्रमयजगत् हें एक होतें.

महाराष्ट्रांत त्या वेळीं मराठी दैनिक नव्हतेंच. जीं साप्ताहिकें होतीं तीं बहुतेक सर्व असहकारितेच्या विरुद्ध होतीं. टिळकांचें राजकारण चालविण्यासाठीं म्हणून मुंबईस 'लोकमान्य' नांवाचें दैनिक सुरू करण्यांत आलें. श्री. बी. एस्. लिमये व डॉ. भडकमकर त्याच्या डायरेक्टरांपैकीं होते व

श्री. खाडिलकर प्रारंभींचे संपादक होते. खाडिलकरांनीं नवीन चळवळीला उचलून धरलें. व्यवस्थापक-मंडळावर केळकर होते. अर्थातच खाडिलकर फार दिवस संपादक राहूं शकले नाहींत.

श्री. सीतारामपंत दामले यांनीं 'राजकारण' पत्र सुरू केलें होतें. त्याचें धोरण राष्ट्रीय असे. पुण्यास पुष्कळ काळापासून प्रतिष्ठा पावलेलें 'ज्ञानप्रकाश' सर्वस्वीं प्रागतिक पक्षाचें होतें. तें केसरी व महात्माजी दोघांवरही टीका करी. याशिवाय ब्राह्मणेतरांचीं मुखपत्रें असत. त्यांचें वर्णन पुढें येईलच. परंतु सांगण्याची गोष्ट म्हणजे जागृत समाजास राजकीय विचारांचें वळण लावण्यासाठीं आधुनिक कालांतील जबरदस्त साधन जें 'वर्तमानपत्र' तें महाराष्ट्रांतील असहकारपक्षाकडे नव्हतें. त्यामुळें त्याला फार अडचण सोसावी लागली. स्वमतप्रचार करतां येईना व विरोधक मात्र त्यांच्याविषयीं विपरीत किंवा असत्य सांगून लोकांचीं मतें कलुषित करूं शकत. पुण्यांत त्या वेळीं 'लोकसंग्रह' नांवाचें एक छोटेंसें दैनिक निघत असे. प्रथम लवाटे त्याचे संपादक होते. पुढें ल. ब. भोपटकर संपादक झाले व तेव्हांपासून त्या पत्रांत असहकारितेच्या विरुद्ध मजकूर येऊं लागला.

महाराष्ट्रांत वकिली सोडणारे दास्ताने व अलीबागचे गोसावी हेच होते. कित्येक थोड्यांनीं वकिली सोडली ती फिरून चालविली. भोपटकर तर उघडच म्हणत, "आम्हांला साबरमतीची मनीऑर्डर नको." वकिली सोडणाऱ्यांना टिळक स्वराज्यफंडांतून मदत देण्यांत येई तिला उद्देशून हा त्यांचा अभिप्राय होता. महाराष्ट्राबाहेरच्या व्यक्तीनें अखिल भारतीय पुढारी व्हावें ही गोष्ट त्यांना नापसंत होती.

पण कांहीं बुद्धिवाद्यांना ती नापसंत असून काय उपयोग? महात्मा गांधी अखिल भारतील पुढारी होण्यासाठींच जन्मास आले होते. त्यांच्यासमवेत एक अमोघ शक्तीचा पूर वेगानें येत होता. त्यांत अनेकांचे महत्त्वाकांक्षी मनोरथ वाहून गेले. वकीलवर्गाच्या इभ्रतीला समाजांत जोरानें धक्का बसला. साधारण मनुष्याच्या दृष्टीनें ते स्वार्थी व भित्रे ठरले. कलागती लावण्याचा धंदा समाजांतच नव्हे तर राजकारणांतही त्यांनीं सुरू केला व लोकांचा बुद्धिभेद करण्याचा प्रयत्न केला असा आरोप त्यांचेवर होऊं लागला. इतर

लोकांनीं राष्ट्रीय परिवेषाची द्योतक खादीची टोपी मस्तकावर चढविली असतां वकिलांच्या सोनेरी झिरमिळया लावलेल्या पगड्या मात्र तशाच शिरोभागीं राहिल्या याचें लोकांस वैषम्य वाटूं लागलें. आणि त्यांतच जेव्हां सभा व वर्तमानपत्रांतून वकीलवर्गांनीं नवीन नेतृत्वाचा अमर्याद निषेध करण्यास सुरुवात केली, तेव्हां तर जनसमुदाय खवळून उठला व महाराष्ट्रांत कित्येक ठिकाणीं लोकक्षोभ इतक्या उग्र स्वरूपांत प्रकट झाला कीं वकिलांना बराच काळ सार्वजनिक जीवन अशक्य झालें.

अर्थात् एक गोष्ट निर्विवाद आहे. महाराष्ट्रांतलि क्रांतिकारक व त्यागास तयार असलेल्या अनेक तरुणांना मार्गदर्शन करणारा बुद्धिमंत जर या वेळीं 'केसरी'चा संपादक असता तर महाराष्ट्राचा १९२० नंतरचा इतिहास निराळा झाला असता व त्याची पुढील दहा वर्षांत राजकारणांत जी पीछेहाट झाली ती झाली नसती.

---

# ९ शिक्षक आणि विद्यार्थी

समाजाच्या चालू घडींत दोष दिसूं लागले म्हणजे ते दूर करण्यासाठीं चळवळी सुरू होतात. चालू परिस्थिति नको असें लोकांस वाटूं लागतांच ती उलथून पाडण्यासाठीं धडपड सुरू होते. जेथें शस्त्राची मदत घेण्यांत येते तेथें युद्धें सुरू होतात. जेथें वैचारिक क्रांति होऊं लागते तेथें समाजाचे थर वर-खालीं होऊं लागतात. असहकारितेच्या प्रचंड चळवळींत समाजाचा अध्वर्यु जो वकीलवर्ग तो खालीं बसतांच त्याच्या जागीं दुसरा वर्ग येऊन अधिष्ठित झाला. त्याचा इतिहास म्हणजे सतत प्रयत्न, चिकाटी व सहनशीलता यांचा इतिहास आहे.

असहकारितेच्या चळवळीनें ज्या वर्गावर विशेष अनुकूल परिणाम केला तो म्हणजे विद्यार्थिवर्ग होय. सोळा वर्षांपेक्षां अधिक वयाच्या सर्व विद्यार्थ्यांना असहकारितेनें शाळा व कॉलेजें सोडण्याबद्दल आह्वान दिलें होतें. विद्यार्थी व कांहीं ठिकाणीं शिक्षक दोघांनींही हांकेला ओ दिली व देशसेवेला आपलें जीवन वाहिलें.

शिक्षकवर्गापैकीं असहकारितेच्या प्रभावाखालीं येऊन आपल्या जीवनास विशिष्ट वळण लावणारे तीन शिक्षक पुढें लौकिकास चढले. रत्नागिरीचे आप्पासाहेब पटवर्धन, धुळ्याचे शंकरराव ठकार व येवल्याचे आपटेगुरुजी.

पैकीं आप्पासाहेबांचें चरित्र विलक्षणच आहे. रत्नागिरी जिल्ह्यानें महाराष्ट्राला बुद्धिमान् माणसांचा पुरवठा केला आहे. आप्पासाहेबांचा जन्म आगरगुळें येथें ४ नोव्हेंबर १८९४ सालीं झाला. इतक्या खेडवळ वातावरणांत ते वाढले कीं वयाच्या नवव्या वर्षापर्यंत त्यांनीं खटारगाडी पाहिली नव्हती. दहाव्या वर्षी रत्नागिरीस इंग्रजी शिक्षणासाठीं जाते वेळीं वाटेंत प्रथमच होडींत बसण्याचा प्रसंग आला. सात भाऊ व चार बहिणी एवढया भावंडांत ते पांचवे होते. त्यांच्या कुटुंबांत विद्याव्यासंग जबर होता. बहुतेक सारे बंधु पदवीधर झाले. आप्पा १९०५ मध्यें शाळेंत असतांना स्वदेशी चळवळींत

लक्ष घालीत; १९११ त ते मॅट्रिक झाले. शिवजयंत्युत्सवांत ते भाग घेत. सावरकर हे त्यांचें लहानपणचें दैवत होतें. गोविंदाच्या कविता, आपट्यांच्या कादंबऱ्या त्यांना आवडत. 'उषःकाल'मधील सावळ्या त्यांचा नायक होता. पुढें टिळकांच्या चारित्र्याचा परिणाम त्यांच्या मनावर झाला. खेड्यांत चालबोध घराण्यांत वाढलेले आप्पा मनानें क्रांतिकारक होते. खुदीरामबद्दल त्यांच्या मनांत कौतुक वसत असे. आज गुजरातमध्यें सेवाकार्य करीत असलेले मामा फडके आप्पांचे चुलतमामा होत. ज्या वेळीं गंगनाथ* विद्यालयांत ते शिक्षक म्हणून गेले तेव्हां आप्पाबद्दल भाकीत करून गेले, " सीताराम स्वतःला देशसेवेला वाहून घेईल." आप्पांना प्रोत्साहन मिळालें. क्रांतिकारकांच्या गुप्त संस्था पुढें निघाल्या त्यांत आप्पा सामील होते; परंतु टिळक तुरुंगांत गेल्यावर दडपशाहीचें सत्र सुरू होतांच सर्वत्र शांति पसरली, तसे आप्पाही निष्क्रिय बनले. पुढें त्यांनीं कॉलेजांत विद्याभ्यास चालू ठेविला व नेहमीं पहिल्या वर्गांत पास होत गेले.

इंटरमीजिएट परीक्षेसाठीं रस्किनचें Unto This Last हें पुस्तक युनिव्हर्सिटीनें नेमलें होतें. त्या पुस्तकाच्या अभ्यासानें आप्पांच्या मनानें पुन्हा उचल खाल्ली. पुढील वर्षी टिळक मंडालेहून सुटून परत आले व आणखी कांहीं महिन्यांनीं गांधीजीही आफ्रिकेहून हिंदुस्थानांत आले. त्यांच्या हालचालींकडे आप्पांचें सतत लक्ष असेच. १९१६ त ते बी. ए. होऊन एम्. ए. चा अभ्यास करूं लागले. तितक्यांत १९१७ मध्यें Indian Defence Force चें University Corps निघालें, त्यांत ते प्रविष्ट झाले. टिळकांनीं होमरूल लीग काढतांच तिकडेही त्यांचें लक्ष वेधलें.

१९१८ सालीं मामा फडके व कॉलेजमित्र वालजी देसाई यांस भेटण्यास ते साबरमती आश्रमांत गेले होते. स्वामी आनंद यांच्याशींही त्यांचा स्नेह

---

*गंगनाथ विद्यालय नांवाची संस्था बडोद्यास कै. केशवराव देशपांडे यांच्या प्रयत्नानें निघाली होती. राष्ट्रसेवेची व फकीरीची दीक्षा घेतलेले अनेक पदवीधर तरुण तींत शिक्षक होते. ते विद्यार्थ्यांस देशाभिमानाचे पाठ देत असत. आ. कालेलकर हे त्यांपैकीं एक होते. दडपशाहीच्या काळांत सरकारी हुकुमानें ती संस्था बंद झाली.

जमला होता. एम्. ए. होण्यापूर्वीच ते सर परशरामभाऊ कॉलेजांत तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर म्हणून आले. महात्माजींच्या प्रभावाचा पगडा त्यांच्या मनावर बसत चालला होता. त्यामुळें एम्. ए. ची परीक्षा देऊन ते कोंकणांत गेले, तसेच रौलट ॲक्ट सत्याग्रहाच्या चळवळींत पडले. अर्थात् त्यांनीं नोकरीचा राजीनामा दिला.

आप्पांचा त्यानंतर महात्मा गांधींशीं प्रत्यक्षच संबंध आला व ते सत्याग्रहाश्रमांत निघून गेले. कांहीं काल महाराष्ट्र त्यांच्या सेवेस मुकला; परंतु साबरमतीस तरी त्यांनीं पुढच्या कार्यासाठीं तालीम घेण्याचेंच कार्य केलें. १९२०-२१ सालीं ते गुजरात विद्यापीठांत शिकविण्यास जात असत. १९२१ अखेरीस आश्रमांतून महाराष्ट्रांत येऊन त्यांनीं रत्नागिरीस राष्ट्रीय शाळा चालविली. तेव्हांपासून रत्नागिरी जिल्हा आप्पांची तपोभूमि बनला.

आपटे वयानें अप्पांपेक्षां वडील आहेत. त्यांचा जन्म ४ एप्रिल १८८७ रोजीं भावनगर येथें झाला. वडील सरकारी नोकरींत असून फिरतीवर असत. साहजिकच आपटे यांना खूप प्रवास घडला. त्यांच्या वडिलांचा व टिळकांचा स्नेह असे. थोरांचे संस्कार आपट्यांना बालपणींच घडले होते. लहानपणीं त्यांचें वाचन दांडगें होतें. वडील वृत्तीनें उदार व निरभिमानी होते. सर्व धर्मांचे व जातींचे लोक त्यांच्या घरीं येत. त्यामुळें आपट्यांना एकांगी किंवा हेकडपणाचे संस्कार मिळाले नाहींत. लहानपणापासून देशसेवा करावयाची व ती शिक्षक होऊन असें त्यांनीं आपल्या मनाशीं ठरविलें होतें.

बी. ए. झाल्यावर कायद्याच्या टर्म्स भरीत असतांच त्यांचा विवाह झाला. सासुरवाडीची मंडळी राष्ट्रीय वृत्तीची नव्हती. एकदां आपटे अक्कलकोटला सहज आपल्या बहिणीस भेटावयास गेले असतां, त्यांना तेथें हेडमास्तरची जागा रिकामी असल्याचें कळलें. देशी संस्थानांत शिक्षणक्षेत्रांत क्रांति घडवून आणावी या विचारानें त्यांनीं ती नोकरी पत्करिली. दोन वर्षेंपर्यंत तेथें राहून त्यांनीं शाळेंत खूप सुधारणा घडवून आणल्या. ते जातीचे शिक्षक असल्यामुळें आपल्या निगर्वी व प्रेमळ स्वभावाच्या योगानें त्यांनीं तेथें एक चांगलें वातावरण उभें केलें व शाळेचें हायस्कूल बनविलें. परंतु पुढें भविष्यकाळ स्वच्छ दिसेना तेव्हां कायद्यांचा अभ्यास ही सबब सांगून ते तेथून निघाले व अमळनेरची राष्ट्रीय

शाळा उदयास येत होती तिला जाऊन मिळाले. अमळनेरचे प्रसिद्ध दानशूर व्यापारी श्री. प्रतापशेठ यांच्या मदतीनें त्या वेळीं जांभेकर, मोहनी, गुणे (कुवलयानंद), कोटिभास्कर वगैरे मंडळींनीं एका पवित्र हेतूनें टिळकांचें उद्देश्य डोळ्यांसमोर ठेवून तेथें शिक्षणकार्य चालविलें होतें. कांहीं काळ आपटे तेथें होते. नंतर तत्त्व कीं शाळा असा एक सवाल चालकांपुढें उभा राहिला. चालकांनीं तत्त्व सोडण्याचें वळण दाखवतांच आपट्यांनीं तीही शाळा सोडली. त्यांना वाटूं लागलें कीं प्रयोग करावयाचे असतील तर स्वतःची शाळा असली पाहिजे. त्यांचा कायद्याचा अभ्यास चालू होताच. त्यांतच त्यांच्यावर प्रापंचिक अडचणी आल्या. त्यांची पहिली मुलगी वारली. पत्नीलाही भयंकर आजार झाला होता; पण त्यांतून सुटका झाली. नंतर आपट्यांनीं धरणगांव येथें वर्षभर शाळा चालविली. तेथें त्यांनीं कित्येक प्रयोग सफळ केले. इतक्यांत १९२० साल आलें. सरकारी शाळांवर बहिष्कार घालून राष्ट्रीय शाळा काढण्याचें ठरतांच नाशिक जिल्ह्यांत दोन पक्ष झाले. नाशिक येथें सावरकर पक्षानें टिळक विद्यालय काढावयाचें ठरविलें. येवल्याची शाळा आपल्या ताब्यांत घेण्याची त्या लोकांची इच्छा होती. कारण त्या शाळेस एका जैन गृहस्थानें २०,००० रु. देण्याचें कबूल केलें होतें. पण येवलेकर मंडळींनीं आपट्यांना पत्र लिहून शाळा आपल्या चालकत्वाखालीं घेण्यास सांगितलें. आपट्यांना 'स्वर्ग-द्वारमपावृतम्' झालें. ७० रु. पगारावर ते हेडमास्तर म्हणून येवल्यास दाखल झाले. यानंतर आपट्यांच्या जीवनाचा दुसरा भाग येथून सुरू झाला.

आपटे प्रथम टिळकांचे भक्त होते. महात्माजी त्यांना प्रथम प्रथम कोडेंच वाटत. पुढें Young India चे अंक नेमानें वाचूं लागल्यापासून त्यांना कोडें उलगडत चाललें. ते स्वतः महात्माजींचे भक्त बनले व पुढील राष्ट्रीय शिक्षणाची चळवळ त्यांनीं महात्माजींच्या तत्त्वज्ञानाचा आधार घेऊन चालविली.

महात्माजींच्या प्रभावाखालीं येणारे तिसरे शिक्षक गृहस्थ म्हणजे शंकरराव ठकार होत. यांचा जन्म २५ सप्टेंबर १८९३ मध्यें धारवाड येथें झाला. इंग्रजी दुसरी यत्तेपर्यंत त्यांचें शिक्षणही तेथेंच झालें. त्यांनाही आपल्या वडिलांपासून टिळकभक्तीची दीक्षा मिळाली. कॉलेजमध्यें असतांना १९१६–१७ त जेव्हां

टिळक कोलंबोहून परत आले तेव्हां ठकारांनीं सरदारगृहांत त्यांची भेट घेतली होती. त्यांचा कल पूर्वीपासून ग्रामसेवेकडे होता. १९१८ त ते बी. ए. झाले तेव्हां ग्रामसेवेची एक स्पष्ट योजना त्यांच्या डोळ्यांपुढें होती. सेवेच्या इच्छेनें ते नगरच्या अनाथविद्यार्थीगृहांत शिक्षक म्हणून दाखल झाले होते. एकदां ते साबरमतीस जाऊन आले. तेथें खेड्यांतल्या स्त्रिया पेळू नेऊन सूत आणून देत असतांना त्यांनीं पाहिल्या. गांवठी धंद्याची त्यांची कल्पना विशेष दृढ झाली. नगरला ते दोन वर्षें होते, पण त्यांना समाधान नव्हतें. कारण खेड्यांत जाण्यास संधि मिळेना. तेव्हां त्यांनीं नगर सोडलें व ते पुण्यास येऊन नूतन मराठी विद्यालयांत शिक्षक म्हणून दाखल झाले. तेथेंही दोन वर्षें गेलीं. उत्तम शिक्षक म्हणून ठकारांची ख्याति झाली. पण मनाप्रमाणें त्यांना सेवेला वाव मिळेना. १९२० सालीं पुण्यांत त्यांचा विवाह झाला; आणि त्याच सुमारास असहकारितेची चळवळ सुरू झाली, तेव्हां ठकारांच्या राष्ट्राभिमानानें उचल खाल्ली. बोले तैसा चाले या वृत्तीचा अंगीकार करून विद्यार्थ्यांमध्यें राष्ट्रीय बाणा निर्माण करावयाचा असेल, तर आपलें उदाहरण पहिलें असावें अशा हेतूनें त्यांनीं नोकरी सोडली. नंतर ते अमळनेरच्या राष्ट्रीय शाळेंत दोन वर्षें राहिले.

ही मूळची शिक्षक मंडळी पुढें राष्ट्रीय शाळांतूनही शिक्षकाचें काम कांहीं काल करीत होती. परंतु महाराष्ट्राचें राजकारण रंगूं लागलें आणि नव्याजुन्या शक्तींचा सामना निकराचा होऊं लागला तसें या शिक्षकवर्गाला राजकारणापासून फार दूर राहतां आलें नाहीं. महाराष्ट्रांतील अकरा जिल्ह्यांतून प्रचार व सामना या दोन्ही गोष्टी करण्याची जबाबदारी या शिक्षकवर्गावर पडली. नांगरणी व पेरणी हीं दोन्ही कामें शिक्षकवर्गाला एकदमच करावीं लागलीं. अहंमन्य पंडितांच्या प्रहारांना तोंड देणें, संस्कारहीन विद्वानांचीं विधानें खोडून काढणें, विद्यार्थ्यांची मनोभूमिका तयार करणें हीं कामें करीत असतांनाच नवी चळवळ महाराष्ट्रांत स्थिर व्हावी म्हणून लोकजागृति व विधायक कार्यक्रम करण्याचें कार्यही त्यांच्याच माथीं येऊन पडलें होतें. तत्कालीन शिक्षकवर्गापैकीं फार थोडे या चळवळींत पडले. कारण कंगाल महाराष्ट्रांत पोटाचे व्यवसाय हे पांढरपेशावर्गास वकिली, डॉक्टरी, कारकुनी किंवा मास्तरकी

यांव्यतिरिक्त दुसरे नसणारच. पैकीं वकीलवर्ग तर बहुतेक विरुद्धच होता. सातारचे डॉ. आठल्ये हेच काय ते असहकारितेच्या चळवळींत उतरले. यांशिवाय नंतर पुढें आलेले इतर कार्यकर्ते हे त्या काळीं विद्यार्थ्यांत मोडत होते. ज्या विद्यार्थ्यांनीं चळवळीच्या ओघांत शाळा-कॉलेजें सोडलीं त्यांपैकींच पुष्कळसे नंतर अध्यापक बनून महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या जिल्ह्यांतून कार्य करूं लागले.

राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य करणाऱ्या महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांपैकीं सध्यांचे मुंबई प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे चिटणीस श्री. सदाशिवराव पाटील हेही एक होते. त्यांचा जन्म १९०० सालीं सावंतवाडी संस्थानांत झाला. तेथेंच त्यांचें प्राथमिक व दुय्यम शिक्षण होऊन ते पुढें मुंबईच्या सेंट झेवियर कॉलेजमध्यें उच्च शिक्षणासाठीं प्रविष्ट झाले. ते ज्यूनियर बी. ए. त असतांना १९२० मध्यें महात्माजींचें शांतारामाच्या चाळींत असहकारितेवर व्याख्यान झालें त्यास ते हजर होते. त्याचा परिणाम मनावर होऊन त्यांनीं कॉलेज सोडलें. मुंबईतील कॉलेज सोडणारे ते पहिले विद्यार्थी. पुढें पुष्कळ विद्यार्थ्यांनीं कॉलेज सोडलें. तेव्हां या विद्यार्थ्यांची संघटना करण्यासाठीं एक कमिटी नेमली गेली. पाटील तिचे चिटणीस होते. नंतर राष्ट्रीय शिक्षण-योजना तयार करून ते तीसचाळीस विद्यार्थ्यांना घेऊन रत्नागिरीस गेले. या विद्यार्थ्यांत पुढें रत्नागिरी जिल्ह्यांत कार्यकर्ते म्हणून प्रसिद्धीस आलेले महाजन व वालावलकर हे होते. त्याच सुमारास आप्पासाहेब पटवर्धन साबरमतीहून परत येऊन त्यांनीं रत्नागिरीस राष्ट्रीय शाळा चालू केली. पाटील मालवणला गेले व तेथें त्यांनीं राष्ट्रीय शाळा चालविली. तें काम त्यांनीं चार वर्षें केलें. राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य करीत असतां ते राजकारणाकडेही लक्ष देत व सालोसाल प्रांतिकवर निवडून येत. पुढें १९२२-२३ सालीं श्री. केळकर यांनीं रत्नागिरी जिल्ह्यांत कौन्सिलप्रवेश चळवळीचा प्रचार करण्यासाठीं दौरा काढला तेव्हां पाटलांनीं प्रत्येक सभेंत त्यांच्या मागून स्वतः भाषण करून त्यांचा प्रचार फोल केला. विशेषतः रत्नागिरीचा दक्षिण भाग कॉंग्रेसभक्त राहिला.

पाटील १९२४ मध्यें वृत्तपत्रव्यवसाय शिकण्यास विलायतेस गेले. १९२७ च्या सुरुवातीस ते परत येऊन मुंबईत वसले. त्यानंतर त्यांनीं तिकडील प्रांतिक

कमिटींत काम करून आपला खूप प्रभाव बसविला व आजतागायत ते सालोसाल मुंबई प्रांतिकचे चिटणीस म्हणून निवडून येत आहेत. महाराष्ट्रानें एक कर्तबगार कॉंग्रेस कार्यकर्ता मुंबईस दिला ही कौतुकास्पद गोष्ट आहे.

ज्या विद्यार्थ्यांनीं असहकारितेच्या चळवळींत कॉलेजें सोडलीं व नंतर राष्ट्रीय शिक्षणाच्या कार्यांत मन घातलें आणि शेवटपर्यंत देशसेवेच्या व्रतास चिकटून राहिले, अशांत आचार्य जावडेकर ( इस्लामपूर ), आचार्य भागवत ( महाड ), आचार्य लिमये ( सांगली ), डॉ. लागू ( सांगली ), आ. रबडे, तात्या देशपांडे, अण्णा सहस्रबुद्धे, काका कारखानीस वगैरे मंडळी मोडतात. साताऱ्यास नाथ घाणेकर हे चळवळीचे समयीं शिक्षक होते. त्यांनींही नोकरी सोडून असिधाराव्रताचा अंगीकार केला. नगरकडे दादा चौधरी, सठा, हिरे, चिंचोरकर वगैरे मंडळींचा संघ राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य चालवूं लागला. चिंचवडला बाळूकाका कानिटकर यांनींही राष्ट्रीय शिक्षणाचें काम सुरू केलें.

ही सर्व मंडळी नव्या पिढीला तयार करीत होती; स्वोदाहरणानें व आपल्या त्यागतपस्येच्या योगानें विद्यार्थ्यांचें चारित्र्य वाढविण्याचा प्रयत्न करीत होती. यांपैकीं कित्येकजण अतिशय तीव्र व खोल बुद्धीचे असून त्यांनीं पूर्वीचाच क्रम पुढें चालविला असता, तर त्यांचा आयुष्यक्रम वैभवशाली व सुखाचा झाला असता. परंतु त्याग केवळ संभृतार्थाचाच असतो असें नाहीं. वित्तैषणेचा त्यागही कमी म्हणतां येणार नाहीं. वर्तमानकाळाशीं जो अव्यभिचारी निष्ठा दाखवील तो भविष्यांतील आदर्शसिद्धि मिळवीलच. या सर्व तरुणांनीं सुखाच्या मार्गे जाऊन समाजद्रोह करण्यापेक्षां पुरुषार्थाचा खडतर मार्ग स्वीकारणें धर्म्य मानलें.

---

# १० मुळशी आणि वसई



दरम्यान पुण्याचें वातावरण दिवसेंदिवस बिघडत चाललें होतें.

नवीन चळवळीचा पुरस्कर्ता विलक्षण चारित्र्याचा व सचोटीचा मनुष्य असावा लागतो. महात्माजींचें असामान्य व्यक्तित्व समस्त भारतवर्षासाठीं होतें. परंतु प्रत्येक प्रांतांत लोकांत मिळूनमिसळून काम करणारे त्यांचे प्रचारक अथवा उपनेते हेही प्रभावी असण्याची आवश्यकता होती. लोक-समुदायाला शिक्षण द्यावयाचें तें सार्वजनिक चारित्र्याचें द्यावयाचें असतें. साधारण समाज अज्ञ असतो, मूढ असतो, त्याच्यांत वेळोवेळीं उचल खाणारे बरेवाईट मनोविकार यथेच्छ असतात, त्याच्यांत भोळसटपणा असतो तसे दूषित ग्रहही असतात. अहिंसेची तालीम देतांना तर या मनोवृत्तींवर फार लक्ष ठेवावें लागतें.

पुण्याच्या नागरिकांची प्रसिद्धि त्यांच्या वैशिष्टयामुळें हिंदुस्थानभर अगोदरच झाली होती. प्रसिद्ध सुधारकांशीं व लोकाग्रणींशीं त्यांची वागणूक कशी असते याचे उत्कृष्ट नमुने पुष्कळ वर्षांपासून लोकांस पाहावयास मिळत होते. सभा उधळणें, अंडीं, फाटके जोडे किंवा गंडेऱ्या फेंकणें, शिमगा करणें, गाढवाच्या मिरवणुकी काढणें व कुत्सित गाणीं मेळ्यांतून म्हणणें हा पुण्यपत्तनांतील नागरिकांचा स्वाभाविक मनोविनोद असतो. तरीसुद्धां पुणें महाराष्ट्रांत अग्रेसर समजलें जातें. साऱ्या सामाजिक वा राजकीय चळवळी तेथूनच झाल्या पाहिजेत असा चळवळीच्या सूत्रधारांचा आग्रह असतो. महाराष्ट्राचा तोल पुण्याच्या पारड्यावर अवलंबून असल्यामुळें अखिल महाराष्ट्राची राजकीय संघटना करणाऱ्याला साहजिकच पुणें केन्द्र करण्याची बुद्धि व्हावयाचीच.

पुण्याची त्या काळची मनोवृत्ति महात्माजींना अनुकूल नव्हती. महाराष्ट्रांत महात्माजींना जे अनुयायी मिळाले ते अज्ञात असे लोक होते; उगवते तरुण होते. सारे वेगवेगळ्या जिल्ह्यांतून पांगले होते. ते परस्परांस ओळखत

नव्हते, त्यांना राजकारणाचा किंवा समाजकारणाचा अनुभव नव्हता, संघटना करण्याची कल्पनाही अजून त्यांच्या मनांत प्रादुर्भूत झाली नव्हती. क्रांति घडवून आणणाऱ्याला हातीं 'सत्ता' नांवाची कांहीं गोष्ट प्राप्त करून घेतली पाहिजे व तीसाठीं संघटना व संघटनेसाठीं लोकजागृति केली पाहिजे या तंत्राचें कार्यकर्त्यांना स्पष्ट दर्शन झालें असेल असें म्हणवत नाहीं. झाल्यास फारच थोड्यांना झालें असलें पाहिजे. कारण तसा प्रत्यक्ष प्रयत्न त्या वेळीं तरी कोणीही केला नाहीं. एका ध्येयामागें धांवतां धांवतां सारे कालांतरानें जवळ येत चालले व पुढें परिस्थितिवश होऊन त्यांनीं आपली एकजूट केली. तरीसुद्धां महाराष्ट्रसंघटनेची व्यापक कल्पना ज्यांच्या डोक्यांत जरा लवकरच उद्भवली अशा दोन-तीन व्यक्ति निघाल्याच, परंतु त्यांना लोकांसमोर येण्यास थोडा अवकाश लागला.

महात्माजींच्या विधायक कार्यक्रमाचा प्रचार चालू असतांना प्रांतिक कमिटीवर वर्चस्व स्थापणें हें अगत्याचें होतें. महाराष्ट्राची परिस्थिति अशी कीं तेथें धनिकवर्ग जवळ जवळ नाहींच. वडिलार्जित सरंजामदारीवर पैशाची ऐट मिरवणारे सरदार कांहीं थोडे असले तरी ते राजकीय प्रवृत्तींना मदत करणारे नव्हतेच. स्वतंत्र व्यापारीच मनांत आणल्यास धनाची मदत हवी तशी करूं शकतो. गुजरातमध्यें महात्माजींना मोठमोठ्या व्यापाऱ्यांनीं सढळपणें मदत केली, तसें महाराष्ट्रांत कांहीं एक नव्हतें. त्यामुळें विधायक कार्यक्रमालासुद्धां प्रांतिक कमिटीच्या इभ्रतीची व द्रव्याची आवश्यकता महाराष्ट्रांत भासूं लागली. संघटित प्रचार करण्याचें व साऱ्या प्रांतावर दडपण आणण्याचें तेंच एक प्रभावी साधन होतें. महत्त्वाकांक्षी लोकांच्या दृष्टीनें त्यांत व्यक्तीलाही गौरव प्राप्त करून घेतां येत होता. त्यामुळें प्रांतिकच्या अधिकारासाठीं पक्षापक्षांत भांडणें सुरू झालीं.

सुरुवातीस एक हंगामी प्रांतिक कमिटी स्थापन झाली; तिचे अध्यक्ष श्री. केळकर हे झाले. हें १९२१ च्या जानेवारींत घडलें. पुढें रीतसर निवडणुका होऊन पहिली प्रांतिक स्थापन होईपर्यंत चार महिने गेले.

या वर्षी महाराष्ट्राच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा दोन गोष्टी घडल्या:— एक

म्हणजे मुळशी पेटा सत्याग्रह सुरू झाला व दुसरी घटना म्हणजे पहिली महाराष्ट्र प्रांतिक परिषद मे महिन्यांत वसई येथें भरली.

मुळशी पेटा सत्याग्रह हा शेतकऱ्यांचा संघटित भांडवलशाहीविरुद्ध झगडा होता. भांडवलशाहीला सरकारी नोकरशाहीची मदत होती. ती जिंकणार तर होतीच, पण मावळ्यांना पूर्णपणें नागवून गब्बर होण्याच्या तिच्या इच्छेला महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांनीं विरोध केला व मावळ्यांना जमिनीची चांगली किंमत तरी मिळवून दिली.

मुळशी पेटा पुणें शहरच्या पश्चिमेला २८ मैल दूर सह्याद्रीच्या पायथ्याशीं आहे. त्यांत एकंदर ५४ गांवें असून लोकसंख्या जवळ जवळ १५,००० होती. दरवर्षी लागवड होत असलेल्या जमिनीचें क्षेत्रफळ ४० हजार होतें. तेथील शेतकरी मेहनती व सुखी होते. कांहीं भागांत २०० ते २५० इंच पाऊस पडतो. या मुबलक पर्जन्यवृष्टीचा व त्या प्रदेशांतून वाहणाऱ्या मुळा व निळा नद्यांचा फायदा घेऊन, त्यांच्या साहाय्यानें वीज उत्पन्न करण्याची योजना टाटा कंपनीनें तयार केली व तिला सरकारची संमति मिळविली. निळा व मुळा या दोन नद्यांचा संगम जेथें होतो तेथें अर्धा मैल लांब, १५० फूट रुंद व २५० फूट उंच असें धरण बांधून, त्यामुळें सांठणारें पाणी पाट व नळाच्या साहाय्यानें कुलाबा जिल्ह्यांत भिरवडी येथील पॉवर हाउसमध्यें उतरून घेऊन तेथें वीज उत्पन्न करावयाची व ती मुंबईला नेऊन तिच्यावर कापडाच्या गिरण्या, इतर कारखाने व आगगाड्या चालवायच्या अशी ती योजना होती. या योजनेकरितां मुळशी पेटा, हवेली, माणगांव, रोहे, पेण, पनवेल व साष्टी तालुक्यांतील जमिनी त्या त्या खासगी मालकांच्या संमतीनें मिळविण्याच्या दगदगींत न पडतां कंपनीनें सरकारपाशीं लँड ॲक्विझिशन कायद्याची मदत मागितली. त्या कायद्यान्वयें लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशीं जमिनींवर ताबा मिळवितां येत होता. सरकारनें मदत दिली. साऱ्या मुळशी पेट्यांतील लोक देशोधडीस लागणाचा प्रसंग येऊन ठेपला.

१९१९ जूनच्या सुमारास मुळशी पेट्यांतील लोकांवर लॅण्ड ॲक्विझिशनच्या ४ थ्या कलमान्वयें नोटिसा बजावण्यांत आल्या. तत्पूर्वी लोकांना थोडी कुणकुण लागली होतीच. मावळ्यांनीं कलेक्टर व कमिशनर यांकडे अर्जही केले

होते; परंतु त्या वेळीं दोन्ही अधिकाऱ्यांनीं आपणांस कांहीं माहीत नसल्याचें सांगितलें. असें असतां नोटिसा लागतांच लोकांनीं जमिनी देण्याचें नाकारिलें. कलेक्टरांनीं त्यांना गोडगोड बोलून शांत केलें. परिणामीं टाटा कंपनी स्थापन झाल्याचें प्रत्यक्ष जाहीर होईपर्यंत मुळशी पेट्यांतील लोक स्वस्थ राहिले. पुढें कंपनीनें आपले खावयाचे दांत दाखवितांच लोकांनीं चळवळ सुरू केली. डिसेंबरच्या १६ व १७ तारखेस आवळस व मुळशी येथें सभा भरल्या, कंपनीला विरोध करण्यासाठीं योजना तयार झाली. एक कमिटी नेमण्यांत येऊन गुप्ते व गद्रे यांस चिटणीस नेमण्यांत आलें. त्यांनीं सनदशीर मार्गांनीं करतां आल्या तेवढ्या खटपटी केल्या, पण त्या निष्फळ गेल्या. तेवढ्यांत हें मुळशी-प्रकरण पुण्यास पोंहोचून महाराष्ट्रभर त्याचें दुःख वेशीवर टांगलें गेलें होतें. पुण्याहून भुस्कुटे मुळशी पेट्यांत गेले व पाहणी करून आले. त्यांना प्रथम तेथें सत्याग्रह करण्याची कल्पना स्फुरली. तरीसुद्धां मुळशी पट्यांतील लोकांनीं आपण होऊन बोलावण्यापूर्वी पुण्याचे कार्यकर्ते त्या प्रकरणांत पडले नाहींत. १९२० च्या नोव्हेंबरमध्यें महात्माजी पुण्यास गेले असतां मुळशीच्या लोकांनीं त्यांना भेटून त्यांचा सल्ला मागितला. महात्माजींनीं सांगितलें, " सरकारच्या नादाला लागूं नका. एक तर खणलेल्या चरांत बसून मातृभूमीकरितां मरून जा; नाहीं तर देशोधडीला लागून परकीयांचे गुलाम व्हा." यानंतर डिसेंबरपासून पुण्याचे कार्यकर्ते मुळशी पेटा प्रकरणांत मन घालूं लागले व त्यांनीं मावळ्यांना खूप मदत केली.

नागपूर कॉंग्रेससाठीं पार्लमेंटचे सभासद मि. बेनस्पूर आले होते ते पुण्याला भेट देऊन गेले. त्यांनीं मुळशीच्या शेतकऱ्यांच्या गांठीही घेतल्या. त्यानंतर मार्चमध्यें गव्हर्नरचे चीफ सेक्रेटरी मि. मीड यांनीं मुळशी पेट्यांतील लोकांच्या प्रतिनिधींची मुलाखत घेतली. ते जमिनीला जमीन द्यायला तयार होईनात. पैसे सढळ हातांनीं द्यायचें कबूल करूं लागले. 'वचने किं दरिद्रता' या म्हणी-प्रमाणें त्यांनीं आश्वासनें दिलीं, पण तीं पाळण्याचा पुढें प्रयत्नच केला नाहीं.

गोष्टी निकरास पोंचल्या तशी कलेक्टरला मुळशीवाल्यांनीं नोटीस दिली कीं, " १५ एप्रिलपर्यंत कंपनी धरणाचें काम बंद करणार नाहीं तर १६ एप्रिलला आम्ही सत्याग्रह सुरू करूं. अनत्याचारी राहून आम्ही मजुरांच्या

कामास अडथळा आणूं"...वगैरे. प्रथम कलेक्टरला किंवा कंपनीला या नोटिशीचें गांभीर्य कळलें नाहीं. त्यांनीं आपलें काम तसेंच पुढें चालविलें. परिणामीं १६ एप्रिलला मावळ्यांनीं सत्याग्रह सुरू केला. एक मोठी सत्याग्रह-छावणी उघडण्यांत आली व १,००० मावळ्यांनीं विलक्षण शिस्त व संयम पाळून मजुरांच्या घणांखालीं आपलीं शरीरें सादर केलीं. त्यामुळें कंपनीचे अधिकाऱ्यांनीं कच खाल्ली व मावळ्यांशीं तात्पुरता समेट घडवून आणिला. त्यान्वयें कंपनीनें ७ नोव्हेंबरपर्यंत आपलें काम बंद ठेवण्याचें कबूल केलें.

* * *

मे महिन्यांत वसई येथें पहिली महाराष्ट्र प्रांतिक परिषद भरली. या परिषदेस दीड हजारांवर प्रतिनिधि होते. महाराष्ट्रांतील बहुतेक सारे कार्यकर्ते परिषदेंत हजर होते. स्वागताध्यक्ष श्री. जमनादास मेहता हे असून, डॉ. मुंजे अध्यक्ष होते. महात्माजींनीं परिषदेस भेट देऊन लोकांचा उत्साह वृद्धिंगत केला.

परिषदेंत तीन महत्त्वाचे ठराव झाले. मुळशी पेटयांतील सत्याग्रहाला पाठिंबा, मालेगांवच्या अत्याचाराचा निषेध व असहकारितेचें समर्थन, असे ते ठराव होते. असहकारितेच्या तपशीलाबाबत सुधारणा सुचविण्यासाठीं कित्येकांनीं उपसूचना आणिल्या; व महाराष्ट्रांतील असंतोष प्रकट करण्याचा प्रयत्न केला. वाद अजून मिटला नव्हता त्याचें हें प्रत्यंतर होतें. पण परिषदेनें बहुमतानें परांजपे यांचा मूळ ठराव पास केला व भोपटकर यांची "विद्यार्थी व वकील याबद्दलचीं कलमें गाळून 'परदेशी वस्तूस बहिष्कार' या ऐवजीं 'ब्रिटिश मालास बहिष्कार' हे शब्द घालावे." अशा अर्थाची उपसूचना नापास झाली.

याच सुमारास पहिली महाराष्ट्र प्रांतिक कमिटी स्थापन झाली. केळकर अध्यक्ष झाले. चिटणीस कोणी व्हावें याबद्दल मतभेद झाला. शाळाकॉलेजांवर बहिष्कार पुकारला गेला त्या वेळीं न्यू पूना कॉलेजमधील दोन प्रोफेसर– प्रो. घारपुरे व प्रो. फडके यांनींही आपल्या नोकरीचा राजीनामा दिला होता. फडके फारच बुद्धिमान् व होतकरू म्हणून प्रसिद्ध होते. त्यांच्या व्याख्यानांनीं विद्यार्थ्यांना उत्साह येत असे. त्या वेळीं ते टिळकमहाविद्यालयांत अध्यापक झाले होते.

केळकरांची इच्छा फडके यांस प्रांतिकचे चिटणीस करण्याची होती; पण विधिसंकेत निराळाच होता.

भुस्कुटे हे त्या वेळीं नवीनच प्रसिद्धीस येणाऱ्या असहकारितावाद्यांपैकीं एक होते. त्यांनीं श्री. शंकर दत्तात्रय देव यांचें नांव प्रांतिकच्या चिटणीसपदासाठीं सुचविलें. केळकरांनीं मुकाट्यानें फडक्यांचें नांव परत घेतलें.

नेणतेपणीं देवांमुळें केळकरांस प्रांतिकच्या राजकारणांत ही पहिली माघार घ्यावी लागली. त्या वेळीं त्यांना यत्किंचितही कल्पना नव्हती कीं हीच व्यक्ति पुढें आपणांस महाराष्ट्राच्या रंगणांतून कायमची पीछेहाट करावयास लावणार आहे !

# ११ वीर आणि वक्ता

महाराष्ट्र प्रांतिक कमिटीचे पहिले चिटणीस देव हे त्या कालीं तरी महाराष्ट्रास अगदींच अपरिचित नव्हते. महाराष्ट्रांतील पहिले असहकारितावादी व प्रचारक तेच होते. पुण्याचे पहिले खादीधारी, पहिले असहकारितावादी व पट्टीचे वक्ते म्हणून त्यांची प्रांतांत माहिती झाली होती. बिहारला चंपारण्यांत जाऊन महात्माजींच्या मार्गदर्शनाखालीं काम करण्याचें सद्भाग्य त्यांस प्राप्त झालें होतें. इतर कोणत्याही कार्यकर्त्यांच्या वांट्यास न आलेल्या दोन गोष्टी त्यांच्या वांट्यास आल्या होत्या. एक संस्कार-विहीन कुटुंब व दुसरी क्लेशक्लिष्ट जीवन.

देवांचा पितृवंश सातारा जिल्ह्यांत बावधन या गांवचा. त्यांचे आजोबा गांवांतील एक चांगलेच खटपटी गृहस्थ होते. त्यांच्या आठ मुलांपैकीं वडील मुलाचे एकुलते एक चिरंजीव ते शंकरराव देव.

देवांचा जन्म भोर येथें त्यांच्या आजोळीं ४ जानेवारी १८९५ रोजीं झाला. त्यांचे वडील व बहुतेक सारे चुलते संस्कारहीन व त्या वेळीं व्यसनी होते. शिक्षणाकडे कोणाचेंही लक्ष नसे. देवांच्या मातोश्रीहि त्यांच्या वयास अडीच वर्षे होतांच वारल्या. त्यामुळें मातेचें अभिजात स्नेहवर्धन वा लालनपालन त्यांस मिळूं शकलें नाहीं. भोरलाच त्यांना त्यांच्या एका दूरच्या नातलग बाईनें वाढवलें. वयाच्या दहाव्या वर्षी ते बावधनला गेले. बालपणापासून चापल्य आणि साहस हे त्यांचे गुण प्रामुख्यानें दिसून येत. बागेच्या भिंतीवरून उडी टाकून भोर सरकारच्या शेजारच्या बागेंतील कोबीचे कांदे व कैऱ्या चोरून आणणें हा त्यांचा आवडता धंदा असे. कृष्णा-बाईच्या उत्सवासाठीं वाईस जात तेव्हां दारूच्या बाणांची लढाई पाहण्यास ते उत्सुकतेनें जात. रौद्र व वीररसाच्या साऱ्या घटना त्यांच्या कौतुकाचे विषय असत.

बावधनला मराठी शिक्षण संपवून ते पुण्यास गेले. देवांच्या कुटुंबांत त्या वेळीं शिक्षण तर कोणालाच नव्हतें, कोणास त्याची फारशी आवडहि नव्हती.

परंतु या मुलानें जेव्हां मराठी चवथीची परीक्षा पास करून घराण्यांत पहिलें बक्षीस मिळविलें तेव्हां घरांत आनंद झाला. घरांतले कर्ते पुरुष, त्यांचे आजोबा वारल्यावर घराची वाताहात झाली व देवांस कठीण दिवस आले. शिक्षण नसल्यामुळें वडील स्वयंपाक्याचें काम करीत. एक चुलते दक्षिण आफ्रिकेस निघून गेले. बाकीचे असेच कांहींतरी धंदे करून पोट भरीत. एका चुलत्यानें देवांना सहज पुण्यास नेलें. ते पुढें तेथेंच राहिले. यानंतर म्हणजे १९०६ नंतर देव इंग्रजी शिकूं लागले. त्यांना फार हालांत दिवस काढावे लागले. दोनदां माधुकरी मागण्याचाही प्रसंग आला; परंतु अभिमानी स्वभावास जागून त्यांनीं वार मात्र कधीं लावले नाहींत.

त्या समयीं लोकमान्यांची लोकप्रियता वाढत होती. देव गायकवाडवाड्यांत पुष्कळदां जात व सन्मित्रसमाज मेळ्याचीं पदें रसिकपणें ऐकत. त्या वेळींच त्यांच्या मनांत दोन कल्पना बजिरूपानें ठसल्या. मातेची सेवा व मोठेपणाची महत्त्वाकांक्षा.

पुढें टिळकांवर खटला झाला. देव त्या वेळीं जोशी नांवाच्या कुटुंबांत आत्मीयपणें मिसळून गेले होते. घरच्या मालकांनीं त्यांस आपल्या मुलाप्रमाणें घरांत बाळगलें होतें. शाळेंत असतांनाच देशभक्तीनें अन्तःकरण उचंबळून येऊन देशाची सेवा पुढील आयुष्यांत करण्याचे अनेक मनोरथ त्यांनीं केले. इंग्रजी पांचवींत असतांनाच दत्तासमोर बेलभंडारा उचलून त्यांनीं आपल्या दोन मित्रांसमवेत देशसेवेची शपथ घेतली.

मॅट्रिकमध्यें असतांना ते पहिल्या वर्षी नापास झाले. त्यांना आजारही झाला. तसेच ते मित्रांबरोबर बडोद्यास पळून गेले. पोरकटपणांत केलेला रोमान्स त्यांना बराच भोवला व कांहीं दिवस डाळचुरमुरे फांकावे लागले. पुढें कशीबशी त्यांनीं तिकडे आपल्या शिक्षणाची स्वावलंबनपद्धतीनें सोय करून घेतली व कॉलेजांत प्रविष्ट झाले. त्या समयीं त्यांना नाट्याचें वेड लागलें होतें; व विद्यार्थी नाटकें बसवीत त्यांत देव भाग घेऊन आपली भूमिका फार चांगली वठवीत. त्यांचा त्यामुळें बोलबालाही झाला. बडोदा कॉलेजांत विनोबा भावे, घोले, छगनलाल जोशी, न. वि. गाडगीळ ही सर्व

मंडळी त्याच समयीं शिकत होती. देवांनीं फ्रेंच भाषा घेतली होती त्यामुळें त्यांना मुंबईस सेंट झेवियरमध्यें यावें लागलें.

शाळा व कॉलेजांत असतांना स्वामी रामकृष्ण परमहंस, स्वामी रामतीर्थ, स्वामी विवेकानंद व अरविंदबाबू हे देवांचे आवडते आदर्श पुरुष होते. त्यांचे लेख व व्याख्यानें देवांच्या वाचनांत नेहमीं येत. त्यांच्या वाचनानें देवांचा कल ब्रह्मचर्याकडे वळूं लागला होता. प्राचीन आर्यसंस्कृतींतील तपोवनाची कल्पना त्यांस रमणीय वाटे.

बी. ए. पास झाल्यावर देव कायद्यांचा अभ्यास करूं लागले. परंतु त्यांचें मन पूर्वसंकल्पाप्रमाणें आतां राजकारणांत प्रवेश करण्यास उतावीळ झालें होतें.

तत्कालीन दडपशाहीच्या सत्रांत अनेक कोंवळीं व उत्साही मनें देशसेवेच्या अद्‌भुतरसापासून हळूहळू निवृत्त होण्याच्या व जीवनांतील कठोर वस्तुस्थितीसमोर मुकाट्यानें डोकें नमविण्याच्या पंथास लागलीं असतां देवांचा सुप्त अहंकार व प्रखर आत्मविश्वास त्यांना राजकारणांत धडाडीनें उडी टाकण्यास प्रवृत्त करीत होता. महायुद्धांत जर्मन इंग्रजांना परास्त करतील असें कोणीं म्हटल्यास त्यांना दुःख वाटे. इंग्रजांच्या प्रेमानें नव्हे तर आपल्या पुरुषार्थाची त्यांत हानि त्यांना वाटत होती म्हणून !!

रौलट ॲक्टसमयीं जो सत्याग्रह झाला त्याच्या अनुषंगानें सरोजिनीदेवींनीं मुंबईस चौपाटीवर आक्षिप्त पुस्तकें विकलेलीं देवांनीं पाहिलीं. त्यांना त्यापासून प्रेरणा मिळाली. मुंबईत छत्रे मास्तर म्हणून एक विद्यार्थीवर्गाचे आवडते मास्तर होते. त्यांचा व देवांचा परिचय झाला होता. छत्र्यांकडे सर्व जहाल व नेमस्त गोळा होत. अशाच प्रसंगीं गंगाधरराव देशपांडे यांच्याशीं देवांची ओळख झाली. गंगाधरराव त्यांना बेळगांवीं घेऊन गेले व होमरूल लीगच्या थकलेल्या वर्गण्या गोळा करण्याचें काम त्यांनीं त्यांना दिलें. इतक्यांत महात्माजींचें गंगाधररावांना एक पत्र आलें. बिहारमध्यें चंपारण जिल्ह्यांत बेतिआरवा येथें पुंडलीकजी काम करीत होते. त्यांना सरकारकडून नोटीस मिळाली होती. अर्थात् स्थानत्याग करणें भाग होतें. महात्माजींनीं एखाद्या महाराष्ट्रीय तरुण कार्यकर्त्यास तिकडे पाठवण्यास गंगाधररावांस लिहिलें. त्यांनीं देवांस पृच्छा केली. देवांनीं लगेच रुकार दिला.

त्याप्रमाणें देव गोध्रा येथें जाऊन महात्माजींस भेटले. तेथून पटण्यास रवाना झाले. राजेन्द्रबाबूंची तिकडेच प्रथम ओळख झाली. तेथून ते चंपारण्यांत गेले. सहा-सात महिने त्यांनीं बिहारमधील ग्रामीण जीवन अनुभवलें. पुढें अमृतसर कॉंग्रेसला हजर राहून बिहारचें काम पूर्ण करून ते १९२० च्या फेब्रुवारी-मार्चच्या सुमारास महाराष्ट्रांत परत आले.

यानंतरचें देवांचें आयुष्य महाराष्ट्राचें राजकारण करण्यांत गेलें. महात्माजींचा निस्सीम प्रभाव त्यांच्या मनावर झाला होता. नवीन चळवळीचीं सर्व अंगें त्यांस पूर्णपणें मान्य होतीं. महाराष्ट्राचा त्यांस अत्यंत अभिमान होता व त्याची संघटना करण्याचें एकमेव उद्दिष्ट त्यांनीं आपल्या नजरेसमोर सतत ठेविलें होतें. त्यामुळें त्या वेळचे सारे तरुण असहकारितावादी प्रांतभर पांगले असतां, आप्पासाहेब पटवर्धन व बाळूभाई मेहतासारखे बुद्धिमान् लोक साबरमतीकडे गेले असतां, नवीन चळवळीची, नव्या नेत्याची व नव्या विचारप्रणालीची टिंगल उडविणाऱ्या पुण्यांतच देवांनीं ठाम बैठक घातली व 'यो यच्छ्रद्धः स एव सः ।' हा मुद्रालेख अनन्यनिष्ठेनें डोळ्यांसमोर ठेवून सर्व प्रतिस्पर्धी शक्तींना विरोध करण्यास सुरुवात केली.

त्या वेळीं 'लोकसंग्रह' वर्तमानपत्राचे संपादक लवाटे होते. पुण्यांतील आपल्या सार्वजनिक कार्याची सुरुवात देवांनीं 'लोकसंग्रहां'तील संपादकवर्गांत प्रविष्ट होऊन केली.

देव कलकत्त्याच्या अधिवेशनास हजर नव्हते पण तत्पूर्वीच ते असहकारितावादी झाले होते. व्याख्यानें देण्याची त्यांना फार हौस होती. त्या वेळीं बापूराव गोखले होमरूल लीगचे चिटणीस होते. त्यांचीं पत्रें घेऊन ते नाशिक, धुळें, जळगांव वगैरे ठिकाणीं गेले व तेथें त्यांनीं अनेक जाहीर व्याख्यानें दिलीं. त्यांच्या वक्तृत्वांत आवेश, प्रतिपादन-शैली व कळकळ हीं असल्यामुळें तीं परिणामकारकही होत. पुण्याबाहेर त्यांची कीर्ति होतांच पुण्यांतही त्यांचें सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत व्याख्यान करविण्यांत आलें. भाऊसाहेब लवाटे अध्यक्ष होते. तात्यासाहेब करंदीकर वगैरे 'केसरी'-ची मंडळीहि हजर होती. देवांचें व्याख्यान इतकें सरस वठलें कीं कोणीही त्यावर आक्षेप घेतला नाहीं. देव असहकारितेचे कट्टे पुरस्कर्ते म्हणून प्रसिद्धीस आले.

मुळशी-प्रकरण सुरू होतांच भुस्कुट्यांनीं बाहेरील मदतीची याचना केली, तेव्हां देवांनीं पहिले मदतगार म्हणून नांव दिलें. ते नागपूर-अधिवेशनाला हजर होते व विषयनियामक कमिटींत काय घडलें तें बाहेरच्या लोकसमुदायास येऊन व्याख्यानरूपानें सांगत. त्यामुळें त्यांचें भाषण ऐकण्यास लोकांची अतोनात गर्दी होई. शेवटीं कांहींनीं महात्माजींकडे त्यांच्याविरुद्ध तक्रार नेली. त्या वेळीं धुळ्याचे शंकर श्रीकृष्ण देव हेही तेथें आले होते. प्रथम प्रथम तर या दोघांही शंकरराव देवांचा नामसादृश्यामुळें लोकांचा बराच घोटाळा उडे.

पुण्यास राष्ट्रीय शाळा काढण्याचें ठरल्यावर वि. ग. लिमये यांनीं शाळा काढली. देवांनीं लोकसंग्रहाच्या दृष्टीनें माणसें गोळा करण्यास सुरुवात केली. ठकार त्या वेळीं नूतन मराठी शाळेंत शिकवीत होते. देवांनीं त्यांस राष्ट्रीय शाळेंत बोलाविलें. ते कांहीं आले नाहींत. प्रथम साने हेडमास्तर झाले. नंतर इरोलीकर आले; देव व तात्या देशपांडे यांनींही त्या शाळेंत कांहीं महिने शिकविलें.

परंतु देवांचा स्वधर्म राष्ट्रीय शिक्षण हा नव्हता. ते प्रकृत्या लढवय्ये होते आणि त्यांची वीर प्रकृति असल्यामुळें त्यांचें वळण राजकारणाकडे होतें. गायकवाडवाड्यांत जेव्हां पहिली असहकार कमिटी स्थापन झाली तेव्हां ते व नाना मराठे तिचे चिटणीस बनले; आणि पहिली महाराष्ट्र प्रांतिक कमिटी स्थापन होतांच देव तिचेही पहिले चिटणीस झाले.

वसईला देव व दास्ताने यांची प्रथम ओळख झाली व तिची परिणति कायमच्या स्नेहांत झाली. नंतर महाराष्ट्रांतील राजकारणांत जो संघर्ष सुरू झाला त्याचे असहकारितावादी पुढारी हे दोघे होते व दोघांनीं एकविचारानें प्रतिपक्षांशीं सामना केला.

---

# १२ महाराष्ट्राची श्रद्धा !



प्रांतिकची चिटणिशी स्वीकारल्यावर देवांनीं विधायक कार्यक्रमास जोरानें चालना द्यावयाचें ठरविलें. टिळक स्वराज्य फंड महाराष्ट्रांत उत्साहानें गोळा करण्यांत येत होताच. राजकीय कामासाठीं एवढ्या थोड्या अवकाशांत ( २ महिन्यांत ); एवढा प्रचंड फंड साऱ्या राष्ट्राकडून प्रथमच मागण्यांत आला होता. लोकांच्या कल्पनाशक्तीला सूक्ष्म धक्का कसा द्यावा तें महात्माजी उत्तम प्रकारें जाणत होते. त्या वेळीं राष्ट्राला हा पहिलाच अनुभव असल्यामुळें, सरकारी जुलमांचा प्रथमच सक्रिय निषेध व्यक्त करण्याची प्रत्येक संधि महात्माजी देत गेले तसे लोक तिचा स्वीकार करीत गेले.

यानंतर विद्यार्थ्यांना शाळांतून बाहेर काढण्याचा कार्यक्रम हातीं घेण्याचें ठरवून देवांनीं पुण्यांतील मुलांच्या पालकांची सभा भरविण्याची सूचना आणली. केळकरांना ती पसंत पडली नाहीं. त्यांनीं विरोध केला. वास्तविक पाहतां विद्यार्थी व वकील हीं त्यांचीं मर्मस्थानें होतीं. त्यांच्या शाळांवरील किंवा कोर्टांवरील बहिष्कारानें स्वराज्यप्राप्तीच्या मार्गांत कांहीं मदत होईल असें त्यांना मनापासून वाटत नव्हतें. त्यांत त्यांना व्यावहारिक अडचणी वाटत होत्या व "इतक्या पुढाऱ्यांचें मत स्वतःच्या मताविरुद्ध आहे हें पाहून गांधींनीं हार खावयास पाहिजे होती ती त्यांनीं खाल्ली नाहीं," ही गोष्टही त्यांच्या मनास शेवटपर्यंत जाचत होती. त्यामुळें अखेरपर्यंत त्यांनीं महात्माजींच्या चळवळीला मनापासून पाठिंबा दिलाच नाहीं. "आम्हीही प्रथम प्रथम गांधीजींवर उघड टीका न करतां त्यांना चुचकारून घेत होतों; त्यांना मोठेपणा देत होतों." —'गतगोष्टी'–पृष्ठ ४९९.

महात्माजी १९२२ मध्यें तुरुंगांत गेले; तत्पूर्वी त्यांस पाठविलेल्या एका पत्रांत केळकर लिहितात, "शाळा-कोर्टें यांजवरील बहिष्कार घालण्यांत फारसें शहाणपण आहे असें मला वाटत नाहीं." —'गतगोष्टी'–पृष्ठ ५०५.

असें त्यांचें मत असल्यामुळें पालकांची सभा भरविण्याबद्दल त्यांना उत्साह नव्हता. पण केळकर-भोपटकर एका बाजूनें नको म्हणत असतां दुसऱ्या

बाजूस देवांचा उत्साह उताला येत होता. त्यांनीं व प्रो. फडके यांनीं खटपट करून मंडईत प्रचंड सभा भरवून आणिली. पालक हजारोंनीं उपस्थित होते. व्याख्यानेंही परिणामकारक झालीं. महाराष्ट्रांत राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीस जोम येऊं लागला.

पुण्यांत दोन पक्ष झाले. केसरीपक्ष एका बाजूस व परांजपे, दामले, घारपुरे वगैरे दुसऱ्या बाजूस जमले. 'केसरीं'त दुटप्पी लेख येऊं लागले. खाजगी रीतीनें सल्ला मागूं जाणाऱ्या विद्यार्थ्यांस प्रतिगामी सल्ला मिळूं लागला. भोपटकर 'लोकसंग्रहा'चे संपादक बनले. त्यांचें गांधीविरोधी धोरण पाहून देवांनीं 'लोकसंग्रहां'तील काम सोडलें.

जून अखेरपर्यंत टिळक स्वराज्य फंड पूर्ण झाला. महाराष्ट्रानें आपला हिस्सा म्हणून ३॥। लाख रुपये दिले. नंतर परदेशी मालाच्या बहिष्काराची चळवळ सुरू झाली.

याच सुमारास लोकमान्यांची पुण्यातिथि जवळ येत होती. त्या निमित्तानें महात्मा गांधी, सरोजिनीदेवी नायडू व मौ. महंमदअल्ली यांचें आगमन पुण्यांत झालें. २० जुलै हा सर्व दिवस पुण्यास विलक्षण गडबडींत गेला. टिळक महाविद्यालयाच्या इमारतीचा प्रवेश-समारंभ महात्माजींच्या शुभहस्तें झाला. महात्माजी म्हणाले, "मीं कलकत्ता, पाटणा व अहमदाबाद या शहरीं राष्ट्रीय कॉलेजें पाहिलीं आहेत; परंतु अभ्यासक्रम व संघटना ह्या दृष्टीनें पुण्याचें टिळक महाविद्यालय श्रेष्ठ ठरतें."

संध्याकाळीं शनवारवाड्यासमोर जी प्रचंड सभा झाली तींत महात्माजींनीं आपल्या भाषणांत एक वाक्य उच्चारलें, त्यानें कांहीं प्रांतीय वृत्तीच्या महाराष्ट्रीयांच्या अन्तःकरणांत खोल ठाव घेतला व कित्येक वर्षेंपर्यंत ते त्याबद्दल आपला त्वेष प्रकट करीत राहिले. महात्माजी म्हणाले, "महाराष्ट्रांत ज्ञान आहे, स्वार्थत्याग आहे व विद्वत्ताही आहे; पण त्यांत श्रद्धा नाहीं. ही श्रद्धा बाळगाल व स्वदेशीचें व्रत पाळाल तर एका वर्षाचे आंत खात्रीनें स्वराज्य मिळालें पाहिजे. अशा रीतीनें महाराष्ट्र वागेल तर टिळकमहाराजांसारखा पुरुष उत्पन्न होण्यास हा देश लायक होता असें मी समजेन."

लगेच केळकरांनीं आपल्या आभारप्रदर्शनाच्या भाषणांत सांगितलें,

"महाराष्ट्रीय लोकांत श्रद्धा कमी हें म्हणणें खरें नाहीं. महाराष्ट्रांत राजकारणी श्रद्धा आहे म्हणूनच रानडे, टिळक, गोखले वगैरे पुढाऱ्यांना महाराष्ट्राला आजचा दर्जा प्राप्त करून देतां आला. पूर्वी महाराष्ट्रांतील साधुसंतांनीं दाखविलेलें श्रद्धाबळही प्रसिद्धच आहे. आजही असहकारितेचें तत्त्व महाराष्ट्रास मान्य आहे, परंतु चलबिचलीचा खरा दोष कोणाकडे असला तर ज्यांनीं असहकारितेचा ठराव विनाकारण व्यापक करून त्यांत व्यवहार्य गोष्टींबरोबर अव्यवहारी अशाहि गोष्टी घालून दिल्या त्यांच्याकडेच आहे......"

महात्माजी वायुवेगानें आपली दौड चालवीत होते! १ ऑगस्ट १९२० रोजीं त्यांच्या हातीं राष्ट्राचें पुढारीपण आल्यापासून त्यांनीं राष्ट्रभर ज्या प्रचंड चळवळी भराभर चालविल्या होत्या त्यामुळें जुने कार्यकर्ते धांपा टाकूं लागले होते. महात्माजींची घोडदौड त्यांना असह्य होऊं लागली होती. पंचविध बहिष्काराचे कार्यक्रम एकामागून एक रेटले जात होते. कौन्सिल-बहिष्कार पूर्ण झाला नाहीं तों शाळा व कॉलेज बहिष्कार, तो चालू असतांच राष्ट्रीय शाळा स्थापन करणें, परदेशी कापडावर बहिष्कार चालू असतांच होळ्या पेटवणें, चर्खे सुरू करणें, तें संपलें नाहीं तोंच टिळक स्वराज्य फंड; फंड गोळा झाल्याबरोबर दारू व परदेशी कापडांच्या दुकानांवर पिकेटिंग, याप्रमाणें महात्माजी सर्वांना घाण्याला जुंपत होते. कार्यकर्त्यांनीं आजपर्यंत असे अनेकविध विधायक कार्यक्रम कधीं केले होते, तर आतां ते त्यांनीं सहज लीलेनें पार पाडावे! महात्माजी राष्ट्राला शिक्षण देत होते परंतु राष्ट्रापेक्षां त्यांचीच आतुरता विशेष दिसत होती. त्यांचा आंधळा आदर्शवाद त्यांना अडचणीपलीकडील स्वराज्याचें शिखर दाखवीत होता. सामान्य लोक उल्लू बनले होते. महात्माजींच्या 'दर्शना'नेंच स्वराज्य प्राप्त होईल अशा अंधविश्वासानें त्यांच्याभोंवतीं ठिकठिकाणीं गर्दी करीत होते. पण मवलोबांची मात्र त्रेधातिरपीट उडत होती. महात्माजींचा अदम्य आशावाद आणि देशांतील दरिद्रनारायणाशीं समरस होण्यासाठीं महात्माजी उत्तरोत्तर दाखवीत असलेली विरक्ति व स्वतःच्या देहाबद्दलची उदासीनता त्यांना असह्य होत होती. दरिद्री जनता महात्माजींना 'साधु', 'अवतार' म्हणून पूजूं लागली. तर बुद्धिप्रधान, संथपणें जीवनप्रवाह व्यतीत करणाऱ्या

कार्यकर्त्यांना हें नेतृत्व भारभूत वाटूं लागलें. कारण जनतेच्या समोर भव्य आदर्श उभा राहतांच साहजिकच ती प्रत्येक उपनेत्याला त्याच कांट्यानें मापूं लागली. अर्थात् सारेच कमी पडूं लागले. खादी टोपीशिवाय व्यासपीठावर चढणें कठीण वाटूं लागलें. जळीं स्थळीं आदर्शवादाचें प्रमाण पुढें येऊं लागलें. देशभक्ति व देशसेवा यांच्या लायकीचें द्योतक म्हणून उपनेत्यांपासून समाज कमींत कमी अमुक गोष्टींची अपेक्षा बाळगूं लागला. याबद्दल त्याला दोष देणेंही रास्त नव्हतें. आतां कित्येक दांभिक लोकांस त्याचा फायदा घेतां आला हें खरें, पण त्यांचा दंभही फार दिवस टिकूं शकला नाहीं. महात्माजींनीं राजकारणांत धर्माचें जें एक नवीन वातावरण आणलें होतें त्यांत सर्वांची कसोटी होऊं लागली, आणि बाह्यदर्शनी खादीचें सोंग आणणाऱ्या लोकांनाही फार दिवस फावलें नाहीं.

परिणामीं महाराष्ट्रांत उपनेतृत्व पुष्कळ काळपर्यंत प्रभावी राहूं शकलें नाहीं. असहकारितेला विरोध करणारे नेते टिकूं शकले नाहींत, आणि असहकारितावादी म्हणविणारे असहकारितेच्या तत्त्वाचरणाला यथार्थ उतरले नाहींत म्हणून त्यांचा बहुजनसमाजावर प्रभाव पडला नाहीं. महाराष्ट्रांतलि जहाल मध्यमवर्ग क्रांतिवादी होता, पण त्याला महात्माजींचीं आध्यात्मिक मतें व विधायक कार्यक्रम हीं मनापासून पटत नव्हतीं. उलट त्यांच्यापाशीं खरा त्याग व संघटनाशक्तिही नव्हती त्यामुळें त्याचें बस्तान बिघडत चाललें. त्या वेळीं राजकारणांत बंगाल व महाराष्ट्र हेच पुढारलेले प्रांत होते. टिळकांच्या महाराष्ट्रापासून देशाच्या अपेक्षा पुष्कळ होत्या; पण त्या पूर्ण झाल्या नाहींत. कॉंग्रेसमधील महाराष्ट्रीय डावेउजवे दोन्ही पक्ष मनानें अजून महाजनसत्तावादीच होते. श्रमजीवी समाजाच्या शक्तीची त्यांस जाणीव फारशी नव्हती. महात्माजींचें अस्पृश्यतानिवारणाचें तत्त्वही त्यांस नीट उमगलें नव्हतें किंवा त्यांतील क्रांतिवादी कल्पनाही त्यांनीं समजून घेतली नव्हती. चरख्याचें क्रांतिवादी ज्ञान उमगावयासही अजून अवकाश होता. परंतु बुद्धिमंतांना आकलन न झालें म्हणून मुक्तबंध झालेले समाजशक्तीचे सुप्त प्रवाह थोडेच मागें राहणार आहेत ? महाराष्ट्रांत एक अपूर्व चळवळ अकस्मात् सुरू झाली आणि तिनें या बुद्धिवाद्यांना त्यांच्या तन्द्रेंतून चांगलेंच हालविलें.

# १३ ब्राह्मणांचे पालक



जेव्हां शिवाजीमहाराजांनीं छत्रपतिपदाचा स्वीकार केला तेव्हां स्वतःच्या विरुदावलींत “ गोब्राह्मणप्रतिपालक ” ही पदवी प्रविष्ट केली. मुसलमानांच्या अमदानींत गोवध होत असे तो बंद करवून हिंदवी स्वराज्यांत त्यांनीं गाईचें रक्षण केलें. एतदर्थ ‘गोप्रतिपालक’ ही पदवी पुरेशी होती. परंतु ‘ब्राह्मणांचा पालक’ ही पदवी घेण्यांत या क्षत्रियकुलावतंस राजानें ब्राह्मणांचा बहुमान केला कीं अपमान केला हें तत्कालीन ब्राह्मण किंवा मराठे सांगू शकले असते. शिवाजीच्या प्रधानमंडळांत दोन्ही जातींचे लोक होते. त्याचे गुरु स्वतः ब्राह्मण आणि ब्राह्मण संस्कृतीचे फार अभिमानी असे संन्यासी होते असें असतां त्या दोघांचेंही त्या वेळीं ठीक जुळलें. कारण समाजहित साधण्यासाठीं दोघेही कंबर कसून तयार झाले होते. ते जें कांहीं करीत होते तें एकमेकांवर उपकार करायला मुळींच करीत नव्हते. ते दोघेही आपली सामाजिक जबाबदारी समजले होते, तशी तत्कालीन समाजही ही समष्टीची जबाबदारी जाणून चुकला होता. पुढें मात्र ही स्थिति राहिली नाहीं.

अर्थात् बेजबाबदारीचें वर्तन करण्यास सुरुवात कोणी केली हें सांगणें कठीण आहे. जो समाज मुसलमानी सत्तेविरुद्ध साराच्या सारा उठला तो राष्ट्रीय गुणावगुणाविषयीं समाष्टिरूपानेंच जबाबदार असणार हें निश्चित. मराठा साम्राज्य हें ब्राह्मण व मराठे दोन्ही जातींच्या सत्ताधाऱ्यांचें मिश्र होतें. जेव्हां इंग्रजांसमोर मराठी साम्राज्य धुळीला मिळालें तेव्हां दोन्ही जातींचे राज्यकर्ते राष्ट्रीय चारित्र्याला वंचित झाले होते. आणि गुलामीचा काल सुरू होतांच सारेच त्यांत सारखेच खितपत पडले.

परंतु मनुष्याच्या अंतःकरणांत एक जबरदस्त जिजीविषा कायमची असते. कसल्याही परिस्थितींत मानव जगण्यासाठीं धडपडत असतो. थोड्या जागेंत वाढणारीं झाडें परस्परांसच खाऊं लागतात. त्याचप्रमाणें परकीय सत्तेच्या

दडपणाखालीं सारखेच दबले जाणारे लोक एकमेकांसच खाऊं कीं गिळूं करूं लागले.

लोकसंख्येच्या दृष्टीनें महाराष्ट्रांत मराठ्यांची संख्या जास्त असून त्यांच्या खालोखाल महार व माळी येतात. ब्राह्मणांचा अंक चौथा लागतो. इंग्रजाच्या राज्यांत झालें तरी ब्राह्मणलोकच बुद्धिजीवी बनले. आणि मराठ्यांच्या भरभराटीच्या काळांतसुद्धां उच्च वर्णाच्या मराठ्यांनीं बुद्धिविकासास साधनभूत अशा पुस्तकी विद्येचा अंगीकार कधींच न केल्यामुळें बाहुबलास मुळींच वाव नसणाऱ्या इंग्रजी अमलाखालीं तो वर्ग उद्यमी न बनतां ऐदी बनला. ब्राह्मणांनीं शिक्षण घेऊन सरकारी नोकऱ्या अडविल्या. नोकरपेशा स्वीकारतांच त्यांची बुद्धिभ्रष्ट झाली. मग मात्र "न धनेन न प्रजया त्यागेनैकेन अमृतत्वमानशुः" असें म्हणत समाजाला धर्मबोध करणारे परिव्राजक त्या वर्गातून निर्माण होणें बंद झालें. पाश्चात्य अर्थप्रधान संस्कृतीचे मालक नव्हे तर गुलाम बनून, 'धर्मार्थकामाः सममेव सेव्याः' या व्यासोक्तीकडे दुर्लक्ष करून, संकुचित वृत्तीनें उदरंभरणाला ते प्रधानपद देऊं लागले अर्थातच पुरुषार्थविहीन व सेवाभावविहीन वर्गाबद्दल समाजानें कां आदर बाळगावा ? मनुष्यांत ज्ञानबळ तरी हवें किंवा कर्मबळ किंवा चारित्र्यबळ तरी हवें. एकही नसल्यावर समाज अमुक वर्गाला प्राधान्य मुळींच देणार नाहीं.

तिकडे परकीय सत्ताही मनांत कारस्थानें करीत होती. फोडा आणि झोडा हें तिचें ब्रीदवाक्य होतें. हिंदुस्थानांत जातीजातींत वैमनस्यें लावण्याचा तिचा धंदाच होता. तशांत ब्राह्मणवर्गांत कांहीं लोक चळवळ्ये निघाले तेव्हां सरकारची त्या वर्गावर क्रोधदृष्टि झाली. अगोदर सत्ताधाऱ्यांना बुद्धिमान् लोक आवडतच नसतात. कारण ते प्रजेचा बुद्धिभेद करितात व विग्रहाला बोलावून आणितात. तेव्हां त्यानें बुद्धिमंतांना दूर करून ऐद्यांना जवळ करण्यास सुरुवात केली. ऐद्यांना म्हणण्याचें कारण कीं जसे बुद्धिमान चळवळ्ये ब्राह्मण त्यांना नको होते, तसे उदार बाहुबली क्षत्रियही त्यांना नको होते. त्यांची वैश्यसंस्कृति त्यांना अज्ञानपंकांत रुतलेले लोकच जवळ करण्यास सुचवीत होती.

मुंबई इलाख्याचे गव्हर्नर सर सिडनहॅम क्लार्क यांनीं ब्राह्मण-ब्राह्मणेतरांत

फूट पाडण्यासाठीं ब्राह्मणेतरांस जवळ करण्याचें धोरण स्वीकारिलें. एकदां तर त्यांची कन्या वि. रा. शिंदे यांच्या अस्पृश्योद्धार कार्यांत मदत करण्यास स्वतः होऊन आली. कोल्हापूरच्या छत्रपतींनाही ब्राम्हणविरोधी प्रखर चळवळ करूं देण्यांत गव्हर्नरची सहानुभूति होतीच. याच वेळीं ख्रिस्ती मिशनऱ्यांनींही द्रव्यदुर्बळ श्रमजीवी लोकांना फितविण्यास सुरुवात केली. परिणामीं बहुसंख्याक ब्राह्मणेतरांचा समज होत चालला कीं आपल्या सामाजिक अधःपाताचें कारण ब्राह्मणच आहेत.

अर्थात् ब्राह्मणवर्गाची जबाबदारी कमी होती असें नाहीं. जर हिंदु संस्कृति निर्माण करण्याचें व टिकविण्याचें श्रेय ब्राह्मणवर्ग स्वतःकडे घेत असेल तर तिला अधोगतीला नेण्याची जबाबदारीही त्याच्यावरच येते. या बाबतींत हिंदुस्थानांतील इतर प्रांत व महाराष्ट्र यांत कांहीं बाबतींत भेद दर्शवितां येईल. महाराष्ट्रांत ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद माजला तसा तो मद्रासेकडेही माजला. परंतु इतर प्रांत या वादापासून बहुंशानें अलिप्त आहेत याचें कारण हेंच कीं, महाराष्ट्रांत ब्राह्मण व ब्राह्मणेतर या दोन्ही वर्गांतील भेद फारच विस्तृत आहे तसा तो इतर प्रांतांत नाहीं.

नुसतें गुजरातचें उदाहरण घेतलें तरी दिसून येईल, कीं आज गुजरातेंतील अर्थसाधनें, राजकीय सत्ताबळ व संघटनाशक्ति हीं पाटीदार व बनिया जातींच्या हातीं आहेत. पाटीदार हे क्षत्रिय व बनिया वैश्य वर्णांत मोडतात. बरें, बुद्धिशक्तीबाबत म्हणावें तर ब्राह्मणांच्या बरोबरीनें याही वर्गांतील पुष्कळ लोक वकील, डॉक्टर, प्रोफेसर वगैरे आहेत. उत्तरेकडे बंगाल, बिहार, संयुक्तप्रांत यांकडे लक्ष दिल्यास तेथेंही कायस्थ, रजपूत वगैरे लोक ब्राह्मणांच्याच बरोबरीनें बुद्धिशाली व पुरुषार्थी दिसून येतील. त्यामुळें त्या प्रांतांतून उच्चवर्ण व नीचवर्ण अशीं भांडणें चालतात. ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद फारसा माजत नाहीं आणि वर्णकलहाचे वेळीं ब्राह्मण, कायस्थ, रजपूत वगैरे सारे उच्चवर्णीय एक होऊन श्रमजीवी शेतकरी कुणब्यांशीं तंटा करितात.

महाराष्ट्रांत सर्व बुद्धिजीवी धंदे ब्राह्मणांनींच अडविले होते. ब्राह्मणेतर प्रारंभीं शेतजमिनींचे मालक होते; परंतु ब्राह्मणांच्या अक्कलहुशारीनें त्या भोळ्या लोकांना आपल्या जमिनी ब्राह्मण वकील व सावकार यांच्या पंजांत द्याव्या

लागल्या. येथून पुढें जीवनकलहानें पेट घेतला. ब्राह्मणांना पारतंत्र्याच्या कठोर शाळेंत " सर्वभूतहितेरताः "चा पाठ शिकावा लागला.

ब्राह्मण चळवळ्यांनीं देशाच्या दुःखदारिद्र्याचें मूळ शोधून काढलें. पारतंत्र्यामुळें समाजाच्या भद्र भावना जळून गेल्या आहेत, देश विकल झाला आहे, प्रगति होत नाहीं, हें सर्व त्यांनीं शोधून काढलें, व सरकारशीं सामना करण्यासाठीं देशाला हाक दिली. पण लवकरच त्यांना आढळून आलें कीं, आपल्या हाकेला ओ देणारे मूठभर आपलेच जातभाई आहेत. समाजाचा फार मोठा भाग नुसताच तटस्थ राहिला नाहीं; त्या भागाच्या पुढाऱ्यांनीं 'ब्राह्मणां'च्या चळवळीला उघड विरोध करण्यास आरंभ केला आणि प्रतिपादन केलें कीं, " इंग्रजांच्याच राज्यांत आम्हांला सुख आहे. स्वराज्यांत ब्राह्मणांचेंच वर्चस्व राहील. "

हा ब्राह्मणांना फारच मोठा धक्का बसला. आज मुसलमानांच्या बाबतींत हिंदूंना जो अनुभव मिळत आहे तोच त्या वेळीं ब्राह्मणेतरांच्या बाबतींत ब्राह्मणांना आला.

ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांच्यांत फार मोठी तड पडली होती. विचार, आचार, आवडीनिवडी यांत अतिशय भेद होते. ब्राह्मणांचा अहंकार त्यांना इतर वर्णांत मिसळूं देत नव्हता. मग ब्राह्मणेतरांना विश्वास कां वाटावा ? आपणांकडे ते तिरस्कारानें पाहत आहेत हें ब्राह्मणेतरांना कळून येत होतें. बेटीव्यवहार दूर राहो, रोटीव्यवहारही परस्परांत कधीं होत नव्हता. हृदयें एकत्र येण्यास एकत्र राहणें व खाणेंपिणें यांचें महत्त्व केवढें आहे हें ब्राह्मणांस अजून कळून यावयाचें आहे.

ब्राह्मणेतरांचेही तीन प्रकार होतेः— ( १ ) सत्यशोधक, ( २ ) पुराणमतवादी व ( ३ ) अत्याचारी.

ब्राह्मणेतर चळवळीचें पहिलें स्वरूप सामाजिकच होतें. ब्राह्मणांचा धर्म फसवणुकीचा आहे येथपासून प्रचारास सुरुवात झाली. ब्राह्मणेतरांची सामाजिक व आर्थिक उन्नति करण्यासाठीं त्यांच्यांत जागृति व प्रचार करणारी सत्यशोधक समाजाची चळवळ होती. तिचे अध्वर्यु कै. ज्योतिबा फुले होते. ज्योतिबांवर ख्रिस्ती मिशनऱ्यांचा प्रभाव असल्यामुळें त्यांना न मानणारा

ब्राह्मणेतरांचा पुराणमताभिमानीही एक पक्ष होता. तो अर्थात् निर्जीव होता. पुढें काळ लोटला तशीं लढाऊ वृत्तीचीं कांहीं माणसें ब्राह्मणेतरांत निघालीं. त्यांनीं अत्याचारी मार्गाचा अवलंब करून ब्राह्मणद्वेषास उग्र रूप दिलें.

सातारा जिल्ह्यांत कुळकर्ण्यांनीं संप केला असतां जाधवांनीं मराठे तलाठी पुरवून तो संप मोडला. तेव्हांपासून दोन्ही जातींत वैमनस्य सुरू झालें. तें पुढें वाढतच गेलें.

ब्राम्हणेतर चळवळीनें शेवटपर्यंत राजकारणाशीं म्हणजे स्वातंत्र्यप्राप्तीच्या आंदोलनाशीं कधींच संबंध ठेवला नाहीं. परंतु जहाल राष्ट्रीय पक्षाशीं भांडण करण्याचा प्रयत्न अनेक वेळां केला. महात्माजींच्या नेतृत्वाखालीं कॉंग्रेस चळवळीचें केवळ राजकीय स्वरूप नाहींसें होऊन सामाजिक, धार्मिक, शैक्षणिक वगैरे अनेकरंगी रूपांनीं स्वातंत्र्याची चळवळ नटली. परंतु लोकमान्यांनीं चळवळीचें स्वरूप फक्त राजकारणी ठेवावयाचा आग्रह शेवटपर्यंत राखल्यामुळें ब्राम्हणेतर समाजाला ते स्वतःकडे खेचूं शकले नाहींत. उलट स्वातंत्र्याची चळवळ प्रजाकीय स्वरूपांत विस्तार पावूं लागली व टिळकांची समाजांत वीरपूजा होऊं लागली, तसा ब्राह्मणेतर समाज संशयानें पछाडला. त्याला वाटलें, 'हा ब्राह्मण मातणार'. तेव्हां ब्राह्मणेतरांनीं टिळकांना त्रास देण्यास आरंभ केला. १९२० च्या उन्हाळ्यांत सोलापूर येथें परिषद भरली होती व श्री. केळकर तिचे अध्यक्ष होते. खुद्द लोकमान्य त्या प्रसंगीं उपस्थित होते. ब्राह्मणेतरांचा पहिला संघटित हल्ला याच प्रसंगीं झाला. या कामीं प्रागतिक व बेझंटबाईचा पक्ष हेही जहालपक्षाच्या विरुद्ध असल्यामुळें राजकारणी मतलबानें त्यांनीं ब्राह्मणेतरांशीं संगनमत केलें होतें. परिषद उधळण्यासाठीं त्या लोकांनीं दगडफेकीपर्यंत मजल नेली होती. अर्थात् इतर दोन पक्षांप्रमाणें ब्राह्मणेतरांचा हेतु राजकीय स्वरूपाचा नव्हता. त्यांना ब्राह्मणनेतृत्वाचें वावडें होतें व तेवढेंच सिद्ध करण्यासाठीं ते या दंगलींत पडले.

यानंतर जुन्नर येथें गंगाधरराव देशपांडे यांच्या अध्यक्षतेखालीं पुणें जिल्हा परिषद भरली असतां, लोकमान्य त्या सभेस हजर होते. त्या समयीं मुसलमानांनींही त्यांचें स्वागत करून गोवधबंदीला पाठिंबा दिला. परंतु ती परिषद उधळण्याकरितां पुण्याहून दोनतीन तुकड्या गेल्या होत्या. ब्राह्मणेतरांची तुकडी

बाबूराव जेधे यांच्या नेतृत्वाखालीं गेली होती. रँग्लर परांजपे, प्रो. काळे, के. आर. कानिटकर, ना. कामत वगैरे प्रागतिक पुढारीही आपली तुकडी घेऊन गेले होते. सोलापूर परिषदेंत गाजलेले वा. रा. कोठारी हेही बरोबर होते. अर्थात् तेथेंही परिषद उधळणें त्यांना शक्य झालें नाहीं. परंतु ब्राह्मणेतरांच्या चळवळीला दिवसेंदिवस उग्र रूप येत होतें. शिवाय मॉंटफर्ड सुधारणा सुरू होणार होत्या. त्यामुळे मतदारसंघाला ब्राह्मणांविरुद्ध कलुषित करण्यासाठीं त्यांचा प्रचार चालला होता. १९१९ ते १९२१ पर्यंत ही ब्राह्मणेतर चळवळ महाराष्ट्रभर उग्र रूपांत चालू होती. निवडणुकी होऊन त्यांचे पुढारी दिवाण झाल्यावर ती थंडावली.

सन १९१७ पर्यंत सत्यशोधक चळवळीचें स्वरूप सामाजिक पुनरुज्जीवनाचेंच होतें. ब्राह्मण पुरोहितवर्गाच्या तडाख्यांतून अज्ञ जनतेला सोडविणें व शिक्षणाचा प्रसार करणें हेंच त्या चळवळीचें मूळ स्वरूप होतें. १९१७ मध्यें मॉंटेग्यूसाहेबांचें विधान प्रसिद्ध होतांच जातवार राजकीय हक्क मिळविण्याची आकांक्षा ब्राह्मणेतर पुढाऱ्यांच्या मनांत उद्भवली. त्या वेळीं खुद्द महाराष्ट्रांत या चळवळीचें केन्द्र नव्हतें. पुढें दिवाण झालेले भास्करराव जाधव, लठ्ठे वगैरे लोकांनीं बेळगांवकडे व राजाराम कॉलेज, कोल्हापूर, येथील प्रो. डोंगरे, 'जागरूक' चे संपादक कोठारी इत्यादि गृहस्थांनीं ती चळवळ चालवली होती. हे सारेच कांहीं मराठे नव्हते. पण नंतर ॲडव्होकेट नाईक व बाबूराव जेधे या चळवळींत सामील झाल्यावर व पुण्यांत तिचें केन्द्र झाल्यावर योग्य वातावरणाची मदत मिळून चळवळ जोरांत आली. नवीन राज्यव्यवस्थेंत ब्राह्मणेतरांना स्वतंत्र हिस्सा मिळावा म्हणून चळवळ सुरू झाली. त्यांनीं Deccan Ryot हें वर्तमानपत्र चालू केलें. नवीन निवडणुकीवर कॉंग्रेसवाल्यांनीं बहिष्कार घातला होता, परंतु ब्राह्मणेतर चळवळीच्या पुढाऱ्यांनीं त्या संधीचा आयता फायदा घेण्याचा प्रयत्न केला. तरी देखील राज्यतंत्रच दोषी असल्यामुळें जाधवांनीं खूप खटपट करूनही त्यांना आठच जागा मिळवितां आल्या;[1] मग मात्र ब्राह्मणेतरांतच फूट सुरू झाली. कांहींना निवळ मराठ्यांसाठीं वेगळा मतदारसंघ असावा असें वाटूं लागलें. त्यांच्या मानानें जाधव थोडे अधिक उदारमतवादी होते. नव्या राजवटींत सरकारनें त्यांना दिवाण बनविलें. वास्तविक

त्यामुळें ब्राह्मणेतरांचे पांग फिटावयास पाहिजे होते; परंतु तसें कांहीं न होतां प्रकार उलटा होऊं लागला. ब्राह्मणेतरांत मराठा व मराठेतर असे पक्ष झाले व आपसांत मारामाऱ्या सुरू झाल्या.। ती हकीकत पुढें येईल.

असहकारितेची चळवळ सुरू असतांना ब्राह्मणेतरांतील अत्याचारी पक्ष महाराष्ट्रांत जागोजाग हैदोस घालीत होता. सातारा जिल्ह्यांत ब्राह्मणद्वेष कळसास पोंचला होता. तेथील अत्याचारांच्या बातम्या ऐकून पंढरपूर येथील ब्राह्मण्यसंरक्षक परिषदेनें सातारा जिल्ह्यांतील अत्याचारांची चौकशी करण्यास एक कमिशन नेमिलें. त्या कमिशननें चौकशी करून अहवाल प्रसिद्ध केला. अत्याचारांचें वर्णन साधारणपणें " ब्राह्मणांना शिव्या देणें, बीभत्स तमाशे करणें, हिंदु दैवतें व धर्मगुरु यांची निंदा करणें, धाक घालणें, मजूर कामावरून पळविणें, लागणीस आलेल्या जमिनी स्वतः न करणें व दुसऱ्यांस करूं न देणें, ग्रामजोशांच्या हक्कास हरकत करणें, स्वतः त्यांचेपासून किंवा त्यांना धर्मकृत्यांस बोलावील त्यांचेपासून दंड घेणें, पाणवठे, देवस्थानें यांचा उच्छेद करणें किंवा तीं दूषित करणें, गुरें व इतर मालमत्ता चोरणें, जाळणें " असें करितां येईल.

ब्राह्मणेतर चळवळीला ही दिशा लागतांच विचारी ब्राह्मणेतरांनीं तिच्याशीं संबंध ठेवणें बंद केलें. अत्याचार कांहीं नवीन उल्लू तरुण लोकांनीं सुरू केले होते, ते जुन्या संभावित लोकांस मान्य नव्हते. पुण्यांतील डेक्कन सभेचे अध्यक्ष बाबासाहेब कामत यांनीं १९२१ च्या जूनमध्यें जाहीर भाषण करून अत्याचारी ब्राह्मणेतर पक्षाशीं आपली फारकत करून घेतली.

दरम्यान महात्माजी आपल्या असहकारितेच्या प्रचारार्थ दौरा करीत असतां ब्राह्मणेतरांनाही वळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. एकदां त्यांची व लठ्ठे यांची मुलाखत झाली असतां महात्माजींनीं त्यांच्याशीं शाळा व कोर्टें यांवर बहिष्कार घालण्याबाबत बोलणें केलें. लठ्ठयांनीं उत्तर दिलें, " अगोदरच ब्राह्मणेतरांत शिक्षण कमी आहे. तेव्हां जें थोडयांना मिळतें तेंही बंद करून आम्हांला पूर्वापार नांगरच हातांत घ्यायला सांगत असाल तर तें आम्हांला मुळींच पसंत पडणार नाहीं. वकिली बंद करण्याविषयीं म्हणाल तर आमच्या कोर्टांत वीस ब्राह्मण वकील व तीन ब्राह्मणेतर वकील आहेत.

विसांनीं वकिली सोडावी म्हणजे आम्हीहीं सोडतों." महात्माजींना या मुद्द्याचा जोर पटला व त्यांनीं ब्राह्मण वकिलांना वळविण्याचे प्रयत्न केले. पण ते व्यर्थ गेले, त्यामुळें ब्राह्मणेतरांचा प्रश्न तसाच राहिला. परंतु ब्राह्मणांनीं अधिकारन्यास केला तर ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळ आपोआप थांबेल असें आपलें मत महात्माजींनीं जाहीर केलें.

ब्राह्मणेतर चळवळीचा सर्वांत मोठा साहाय्यकर्ता म्हणजे कोल्हापूरचे माजी महाराज शाहू छत्रपति हे होत. त्यांच्या नेतृत्वाचा व मदतीचा परिणाम होऊन ब्राह्मणेतर पक्ष महाराष्ट्रांत फार संघटित व प्रभावशाली बनला. पण पुढें हातीं थोडी सत्ता येतांच त्याचा अधःपात होत गेला. बाह्य परिस्थितिही बदलत होती. दोन्ही शक्तींचा जोर होऊन ब्राह्मणेतर चळवळीला नंतर निराळेंच स्वरूप मिळालें. तो इतिहास पुढें यथावकाश येईल.

खुद्द शिंद्यांना राष्ट्रीय मनोवृत्ति प्रिय होती. त्यांचा मराठ्यांस असा सल्ला असे, कीं मराठ्यांनीं सरकार किंवा ब्राह्मण चळवळ्ये यांच्या पंखांखालीं न जातां आपला स्वतंत्र संघ काढावा व राष्ट्रसेवा करावी. त्याप्रमाणें १९१७ सालीं त्यांनीं 'मराठा राष्ट्रीय संघ' स्थापन केला. त्याचे अध्यक्ष श्री. ना. ग्या. एखंडे व चिटणीस वि. रा. शिंदे आणि का. ठ. जाधव हे होते. या संघातर्फे दोन-चार अखिल भारतीय परिषदाही झाल्या. परंतु पुढें कार्यकर्त्यांनीं शिंद्यांचें धोरण चालू ठेविलें नाहीं आणि राजाराम महाराजांच्या प्रोत्साहनानें मराठा लीग पुढें आली त्यामुळें हा संघ मागें पडला.

# १४ धूर्तांचें राजकारण

टिळक स्वराज्य फंड गोळा झाल्यावर पुण्यांत शांततेचें पिकेटिंग सुरू झालें. स्वदेशीचा पुरस्कार व परदेशीवर बहिष्कार हें तत्त्व प्रत्यक्ष व्यवहारांत उतरण्याची संधि येतांच आणखी एका आघाडीवर रण माजलें. व्यापाऱ्यांनीं दुटप्पीपणा सुरू केला!

दीर्घकालच्या सतत गुलामीमुळें राष्ट्रांतील नेकी, सत्यनिष्ठा व त्यागवृत्ति यांचा लोप झालेला देखावा इतरत्र क्वचितच पाहावयास मिळाला असता. गोऱ्या कुंभाराच्या थापटण्याप्रमाणें असहकारिता समाजाच्या प्रत्येक अंगाच्या डोक्याशीं जाऊन भिडत होती व प्रत्येक अंग आपलें डोकें मागें घेत होतें. जेथें समोरून विरोध करणें अशक्य वाटे तेथें आंतून कारस्थानें केलीं जात. लोखंडी चणे खायला दांतही मजबूत हवेत. राष्ट्राचे दांत केव्हांच गळाले होते असा पदोपदीं अनुभव येऊं लागला.

व्यापारी अडचणी सांगूं लागले. अगोदर खरेदी केलेल्या मालाचें काय करावें? वित्ताचा प्रश्न मनुष्याचें काळीज उलटें फिरवितो. देहदंड सोसणारा मनुष्य द्रव्यदंडाच्या कल्पनेनें कांपूं लागतो. होळ्या करण्यासाठीं घरांतील परदेशी कपड्यांची मागणी होऊं लागली, तसे व्यवहारचतुर विचारूं लागले, "उगाच जाळून टाकण्यापेक्षां अनाथ, भणंग, भिकारी वगैरेंना कां वाटूं नये?"

महात्माजींना एका वर्षांत स्वराज्य मिळविण्याची अनावर उत्कंठा वाटत होती. स्वदेशी हें अमोघ साधन असल्याचें तें जाणत होते. राष्ट्राच्या वाढत्या उत्साहाचा पारा पाहून गिरणीमालकांनीं आपल्या कापडाच्या किमती भरमसाट वाढविण्यास सुरुवात केली. स्वदेशीची विटंबना होऊं लागली. महात्माजींना परकीयांप्रमाणें स्वकीयांच्याही स्वजनद्रोहाला तोंड देणें भाग पडलें. त्यांनीं राष्ट्राला विनंति केली, "सर्वांनीं चर्खा चालवावा. विद्यार्थ्यांनाही शाळेंत अधिक तास सूत कांतण्यास लावावें. आजच्या

आपत्कालांत सर्वांचा तोच एक श्रेयस्कर धर्म मला दिसतो." समाजांत, विशेषतः बुद्धिवादी लोकांत, या उपदेशाची टवाळी होऊं लागली. युद्धकालीं पश्चिमेकडील राष्ट्रांतून बायका-पोरें सुद्धां सर्व धंदे सोडून बंदुकीच्या गोळ्या बनविण्याचें काम रात्रंदिवस करितात, त्याचें मोठमोठ्या बुद्धिमंतांस कांहींच वाटत नाहीं, उलट त्यांचें कौतुक होतें, फोटो येतात; आणि हिंदुस्थानांतील चळवळीचें साधन सार्वत्रिक करण्याचा प्रयत्न महात्माजी जीव तोडून करीत असतां लोकांनीं त्यांना हंसावें हें कोणासही विलक्षण वाटेल ! परंतु तसें झालें खरें.

"असहकारितेच्या पाठीमागें लागून विद्यार्थ्यांना शाळा आणि कॉलेजें सोडावयाला लावल्यास क्वचित् एखाद्या विद्यार्थ्याचें विशेष नुकसान होण्याचा संभव आहे. एखादा अतिशय तरतरीत बुद्धीचा होतकरू विद्यार्थी कॉलेज न सोडतां तसाच पुढें जाता तर विद्वत्ता, कीर्ति व द्रव्यलाभ हीं लोकोत्तर रीतीनें त्याच्या वांटयास आलीं असतीं. पण शिक्षणास खंड पडल्यामुळें त्याला आयुष्यांत पुढें स्वार्थत्यागाच्या जाणीवेपेक्षां दुसरें कांहीं सुखसमाधान उरलें नाहीं असा संभव मानितां येईल. वकिली धंद्याचा झरा झुळझुळ वाहत असतां असहकारितेच्या शिशाचें बूच त्याच्या तोंडावर एक वर्ष मारल्यानें पाण्याचा ओघ दुसरीकडे वळला व झरा आटून गेला आणि फिरून वकिलीला सुरुवात केली तों कांहींच बस्तान बसेना, अशीही गोष्ट क्वचित् घडूं शकेल. परदेशी व्यापाऱ्यांशीं निकट स्नेहसंबंध ठेवून लाखों रुपये मिळविणाऱ्या व्यापाऱ्यानें असहकारितेच्या नादीं लागून एखादें वर्ष पेढीला कुलूप लावल्यास त्याचें सर्व व्यापारी वळण हटेल असेंहि संभवतें. तीच गोष्ट विशेषतः असहकारितेमुळें सरकारी नोकरीचा राजीनामा देणारा व लष्करी हुद्दा सोडणारा यांचीही घडेल." —केसरी.

अशा प्रकारचे युक्तिवाद महाराष्ट्रीय बुद्धिवाद्यांचे राजरोस चालले होते, त्यागाशिवाय स्वराज्यप्राप्ति करून घेण्याची शिकवणूक समाजाला दुसरीकडून दिली जात होती.

परंतु समाजाची नाडी या बुद्धिवाद्यांपेक्षां सरकारला विशेष रीतीनें अवगत झाली. कारण त्यानें लवकरच दडपशाहीचें हत्यार उपसलें. सप्टेंबरांत

अलीबंधु पकडले गेले, डॉ. किचलू व गंगाधरराव देशपांडे यांचीही पाळी नंतर लवकरच आली. ऑक्टोबरमध्यें मुंबईस ४७ पुढाऱ्यांच्या सहीनें लष्करी लोकांना नोकरीवर बहिष्कार घालण्याचा उपदेश करणारा जाहीरनामा प्रसिद्ध झाला. नोव्हेंबरमध्यें हिंदुस्थानांत प्रिन्स ऑफ वेल्सचें आगमन होणार होतें व त्यासाठीं हिंदुस्थानभर आबादी आबाद परिस्थिति असल्याचा देखावा करणें सरकारास इष्ट होतें. त्यासाठीं दडपशाही करून परिस्थिति सुधारण्याचा प्रयत्न व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग करीत होते. परिणाम नेमका उलटा येऊं लागला. त्याच सुमारास पुण्यांत दारूच्या गुत्त्यांवर पिकेटिंग चालू झालें होतें. त्यांत लोकांस यशही येऊं लागलें होतें.

दडपशाहीमुळें सत्याग्रहाची भूमि आपोआप तयार होत असतां आणि विधायक कार्यक्रम जोरांत चालू असतां महाराष्ट्रांतील उपनेत्यांचा असंतोष आंतून धुमसतच होता. अहमदाबाद येथें डिसेंबरच्या अखेरीस काँग्रेसचें अधिवेशन भरणार होतें, तत्पूर्वींच आपलें दुःख वेशीवर टांगण्याची तीव्र लालसा होऊन अकोला येथें अखिल महाराष्ट्र परिषद १ डिसेंबर रोजीं भरली. तींत त्रिदळ महाराष्ट्र व कर्नाटक यांच्या प्रांतिक कमिट्यांची जोडबैठक झाली. या परिषदेंत प्रांतवार मतें घ्यावयाचीं असें अगोदरच ठरलें होतें. मध्यमहाराष्ट्रातर्फे ३७, मुंबईतर्फे ३, कर्नाटकातर्फे ३, वऱ्हाडतर्फे ७५ व नागपूरतर्फे ३८ असे १५६ प्रतिनिधि या बैठकीस हजर होते. केळकर यांस अध्यक्ष निवडण्यांत आलें.

सुरुवातीस श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांनीं अस्पृश्यतेचा प्रश्न धर्मपीठाकडे सोपविण्याची परिषदेला शिफारस केली व परिषदेस आशीर्वाद दिला.

इतकी मंगलसूचक सुरुवात झाल्यावर परिषदेपुढें असहकारितेच्या ठरावांत बदल होऊं नये म्हणून रत्नागिरीचे आपटे यांनीं आणलेला ठराव नामंजूर झाल्यास नवल नाहीं. नागपूरचे बॅ. अभ्यंकर यांनीं उपसूचनात्मक ठराव पुढें आणला व तोच बहुमतानें पास झाला. त्या सुदीर्घ संदिग्ध ठरावाचा मथितार्थ हाच होता कीं, "असहकारितेच्या ठरावाचा फिरून विचार करण्याची वेळ आतां आलेली आहे. ... प्रांतिक कायदेकौन्सिलांत आणि

अशाच तऱ्हेच्या इतर संस्थांत शिरून जागा पटकावल्या पाहिजेत, कारण याच उपायानें राष्ट्रीय चळवळ व्यापक होणारी आहे."

अणे यांनीं तेव्हांची वर्किंग कमिटी रद्द करण्याबद्दलचा ठराव आणला व जमनादास मेहता यांनीं त्यांना अनुमोदन दिलें; परंतु त्यावर वादविवाद होऊन तो मागें घेण्यांत आला. डॉ. हर्डीकर यांनीं परदेशीं हिंदुस्थान-विषयक चळवळ जोरानें करावी असा ठराव आणला व तो पास झाला.

याप्रमाणें अकोला परिषद गाजली. यानंतर तिच्यावर सर्वत्र रण माजलें. पुष्कळजणांनीं " ती प्रातिनिधिक स्वरूपाची नव्हती. तो गांधींविरुद्ध कट होता " अशी टीका केली. अर्थात् परिषदवाल्या पक्षानें तिला तोंड देण्यांत आपल्याही लेखणीचीं टोंकें झिजविलीं. महाराष्ट्रांत नवा व जुना असे पक्ष अधिकच स्पष्टपणें व्यक्त होऊं लागले. वऱ्हाड-नागपूरकडे कौन्सिलांत आपलें पूर्ण मताधिक्य होईल असा विश्वास तिकडील कार्यकर्ते अणे, मुंजे वगैरे लोकांचा असल्यामुळें व आपली कर्तबगारी दाखविण्यांत ते लोक उत्सुक असल्यामुळें कौन्सिल-प्रवेशाबाबतचा त्यांचा उत्साह ओसंडून येत होता. पुन्हा महात्माजींचा अहिंसावाद व उदार राष्ट्रवाद पुष्कळांस मान्य नव्हता. जुन्या पिढींतले जहाल कॉंग्रेसवाले मनानें हिंदी नसून हिंदु होते. मुसलमानांबद्दल त्यांना विश्वास नव्हता किंवा त्यांच्याशीं वागण्याचें महात्माजींचें धोरणही त्यांना बिलकुल पसंत नव्हतें. डॉ. मुंजे यांनीं ३ जून १९२१ रोजीं केळकरांस लिहिलेल्या पत्रांत त्याचा पुरावा मिळतो—

" गेल्या केसरींत मुसलमान लोक व अलीबंधु हे केमालपाशा व अफगाणिस्थान यांची बडेजावी करीत असतात याबद्दल फार मार्मिक व नामी रीतीनें तुम्हीं आपलें मत व्यक्त केलें आहे. अलीबंधूंचें खरें सोंग बाहेर पडलेंच आहे... तुम्हीं बाण अगदीं अचूक मारला आहे. महात्मा गांधींच्या लक्षांत हें केव्हां येईल तेव्हां येईल... न बोलावतां हे ( गांधी ) व्हाइसरॉयच्या मुलाखतीला गेले ही पहिली चूक. आणि तेथें गेल्यावर अलीबंधूंची पाठ त्यांनीं राखली नाहीं ही दुसरी चूक... असहकारितेची लढाई हें शांतिमय युद्ध आहे असें महात्मा गांधी समजोत. पण राजकारणांत इंग्रज लोकांशीं दोन हात यशस्वी रीतीनें करणें फार कठीण आहे. ज्यांनीं जर्मन लोकांच्या डोळ्यांत धूळ

टाकली त्यांना गांधींसारख्या महात्म्याला फसविणें म्हणजे कांहींच अवघड नाहीं. तें पोरखेळांइतकें सोपें आहे. अशीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे गेल्या शतकांत नाना फडणविसानंतर राजकारणांत धुरंधर असा मुत्सद्दी एक लोकमान्यांच्या खेरीज झालाच नाहीं हें मनाला पटूं लागतें. त्यांनीं या इंग्रजलोकांशीं फार धूर्तपणानें डाव चालविले...."

डॉ. मुंजेच काय पण महाराष्ट्रांतील जुन्या पिढीच्या बहुतेक कार्यकर्त्यांना प्रामाणिकपणेंच महात्माजी भोळसट व बालबुद्धीचे वाटत असत. लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे कीं, गांधींचा हिशोब करितांना ते टिळकांचा मानदण्ड लावीत. वास्तविक गोष्ट अशी आहे कीं, महात्माजींचें तत्त्वज्ञानच मुळीं वेगळें आहे. टिळकांना इंग्रजांबद्दल प्रेम नव्हतें. गांधी अजातशत्रु आहेत. पुष्कळांना पूर्वीं वाटे कीं, इंग्रजद्वेषावर पांघरूण घालण्यासाठीं महात्माजी सत्यअहिंसेचा उपयोग वारंवार करितात. पण त्यांचा गैरसमज दूर होण्याचे प्रसंग नंतर अनेकवार आले. महात्माजींनीं सर्वांना बजावलें कीं, "मी हिंदुस्थानचें स्वातंत्र्य मिळविण्यास कितीही उत्कंठित असलों तरी मी इंग्रजांचा द्वेष्टा नाहीं."

परंतु "इंग्रजांशीं धूर्तपणें डाव चालविणारे" लोकमान्य त्यांच्यावर कोणकोणत्या प्रसंगीं मात करूं शकले तें माहीत झालें असतें तर बरें झालें असतें. कारावास तर त्यांच्याही कपाळींचा चुकला नाहीं. चिरोल केसमध्यें 'फटाटोपो भयंकरः' करूनसुद्धां त्यांना हारच खावी लागली. ताई महाराजांच्या खटल्यांत देखील सरकारनें त्यांचें रक्तशोषण कमी केलें नाहीं. नाना फडणिसानें मराठे सरदारांवर किंवा इंग्रजांवर केलेली मात तुलनेस घेतल्यास टिळकांच्या कर्तबगारींची तिच्याशीं तुलना होऊं शकत नाहीं. टिळकांत मुत्सद्देगिरी असेल, पण ती दाखविण्यास तो अनुकूल काळच नव्हता. त्यांचें काम चळवळी करण्याचें (Agitation) होतें व परतंत्र देशांतील कोणीही देशभक्त जें निस्सीम त्यागाचें व आपत्ति सहन करण्याचें असिधाराव्रत अंगिकारितो तेंच त्यांनीं शेवटपर्यंत केलें. म्हणूनच त्यांच्या प्रतिस्पर्ध्यानें त्यांना हिंदी असंतोषाचा जनक (Father of Indian Unrest) हें जें अभिधान दिलें तें तंतोतंत सार्थ होतें. त्यांच्या अंगचा विशेष गुण तोच ठरला.

नागपूरकडे मुंजे मनांतून असंतुष्ट होते तर मुंबईस बॅ. जयकर आपल्या असंतोषास वाट करून देत होते—

"मीं वकिलीची प्रॅक्टिस सोडल्यापासून आपली दोघांची गांठ पडली नाहीं, तथापि जमनादास मेहता मला सांगतात कीं, मीं तुम्हांस भेटून एकदां चर्चा केल्यास बराच फायदा होईल. माझ्या मनाला सध्यां अशी अडचण आली आहे कीं, गांधी व त्यांचें देशकार्य यांच्याविषयीं माझ्या मनांत फार निष्ठा आहे, पण अनेक मुद्द्यांवर त्यांच्याहून माझे विचार वेगळे आहेत. आणि म्हणून मतभेद उपस्थित करण्यापेक्षां तूर्त गप्प बसावें असें वाटतें. अर्थात् याही गोष्टीचा अतिरेक करून उपयोगी नाहीं...... मला वाटतें कीं, आपण दोघे एकत्र बसल्यास कार्यक्रमांतील दोष टाळून तो जास्त व्यावहारिक कसा करतां येईल याबद्दल आपण कांहीं उपाय सुचवूं शकूं." 'गतगोष्टी' (जयकरांचें केळकरांस, पत्र ता. २०।९।२१ )

याप्रमाणें महात्माजींच्या कार्यक्रमास व्यावहारिक रूप देण्याचा या मुत्सद्दी लोकांनीं चंग बांधला होता आणि चळवळीच्या प्रचंड स्वरूपामुळें उघड असंतोष दाखविणें त्यांच्यानें होत नव्हतें; तरी खासगी रीतीनें ते विचार-विनिमय करीत होते. त्याचाच स्फोट अकोल्यास महाराष्ट्र परिषदेंत झाला.

"धूर्तपणाचे डावपेच करितां येत नसलेले" महात्माजी सरकारशीं, त्याच-प्रमाणें महाराष्ट्र पक्षाशींही, सरळपणानेंच वागत होते. त्या पक्षांतील असंतोष त्यांना कळून चुकतांच त्यांनीं केळकरांना पत्र पाठविलें—

"तुमच्याशीं व राजकारणांत थोर असलेल्या महाराष्ट्र पक्षाशीं मीही संभाषण व विचारविनिमय करण्यास फार चाहतों. पण या पक्षाकडून मला अर्धवट पाठिंबा मिळतो ही गोष्ट मला मुळींच पसंत नाहीं. अर्धवट पाठिंबा ( Lukewarm ) असें म्हणण्यांत कोणाचेंही मन दुखवावें असा माझा हेतु नाहीं. ...बौद्धिक खात्री पटून महाराष्ट्र मला मनःपूर्वक पाठिंबा देऊन माझे बाजूस येईल, तर तो मला हवा आहे. कॉंग्रेसची आज्ञा ती मॅन्डेट मानली गेल्यामुळें तुम्ही औपचारिक रीतीनें तिचे ठराव अमलांत आणण्यास तयार होतां, पण मला हें नको आहे. महाराष्ट्र पक्षाची जर मला बौद्धिक

खात्री पटवून देतां येत नसेल तर तुमचे व माझे प्रतिपक्षी या नात्यानें उघड उघड दोन हात झालेले चांगले ! ...”–‘गतगोष्टी’

केळकरांनीं आपले विचार महात्माजींस कळविले:—

“महाराष्ट्र पक्षाला खरोखर मनांतून काय वाटतें असें तुम्ही मला विचारतां; पण कायदेभंगाबद्दल तुमच्या-आमच्यांत यत्किंचितहि मतभेद नाहीं, हें मी तुम्हांला प्रथमच सांगून टाकतों. फक्त कार्यक्रमाच्या इतर बाबतींत आम्हांला कांहीं फेरफार हवे आहेत. ... आज देशाची स्थितिच अशी झाली आहे कीं, कौन्सिलांतल्या किंवा कौन्सिलाबाहेरच्या माणसासही कायदेभंग केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. पण शाळा-कोर्टें यांजवरील बहिष्कार घालण्यांत फारसें शहाणपण आहे असें मला वाटत नाहीं. आणि जोंपर्यंत प्रतिस्पर्धी राज्यसंस्था ( Parallel Government ) स्थापन करून यशस्वी रीतीनें चालविण्याची वेळ आली नाहीं तोंपर्यंत कायदा मोडून तुरुंगांत जाणें हें इतरांप्रमाणें स्वार्थत्यागाचें एक लक्षण होय इतकेंच मानलें पाहिजे......”

“तुमच्या-माझ्या मतांत यत्किंचित्‌ही भेद नाहीं” असें जाहीर करून पुन्हा तपशिलाचा कीस काढीत, “हें योग्य नाहीं, तें योग्य नाहीं” असे अभिप्राय देत जाणें यांत कोणती मनोवृत्ति दिसून येते ?

केळकर पुढें आणखी लिहितात:—

“माझ्यावर व अकोला परिषदेवर जो निष्कारण कडक आरोप करण्यांत आला आहे त्याचा मी मनःपूर्वक निषेध करतों. स्वतः मी तेथें फार तर सभानियामक अगर प्रेक्षक यापेक्षां जास्त कांहींच केलें नाहीं. तेथें पास अगर नापास झालेल्या कोणत्याहि ठरावांना मीं आपलें मत अगर पसंती दिलेली नाहीं... शिवाय या कॉन्फरन्ससंबंधानें तुमचें माझें कांहींही मत असलें तरी गेल्या जुलै ऑगस्टपासूनच कॉन्फरन्स भरविण्याचें ठरत होतें व त्याप्रमाणें सहज योगानेंच ही परिषद आतां भरली इतकेंच आपण समजावें. पण यापेक्षां पुढें जाऊन, दडपशाहीमुळें लोकपक्षाची बाजू सरकारनें कमी करीत आणली असतां आम्ही बंड करण्याची ही संधि साधली, अगर दडपशाहींतून सुटण्यासाठीं कातडी बचावण्याचा प्रयत्न केला, असा कोणी आरोप करणें हा केवळ दुष्टपणा होय.”

३ जून १९२१ रोजीं डॉ. मुंजे यांनीं केळकरांस लिहिलेल्या पत्राचें पहिलेंच वाक्य हें आहेः—

" सर्व महाराष्ट्राची म्हणून एक परिषद भरविण्याची तुमची कल्पना मला फार पसंत आहे. यासंबंधानें दादासाहेब खापर्डे यांस मी लिहितों."—**'गतगोष्टी'**

यांत परिषदेच्या उपक्रमाची जबाबदारी स्वच्छपणें केळकरांचीच दिसून येते. १३ डिसेंबर १९२१ रोजीं केसरींत अकोला परिषदेवर एक लांबलचक लेख लिहून, तिची तरफदारी करण्याची पराकाष्ठा केली आहे. त्यांत केवळ प्रेक्षकाची भूमिका दिसून येत नाहीं.

महात्माजींस लिहिलेलें पत्र केळकरांनीं फार गडबडींत लिहिलें आहे. त्या वेळीं पुण्यांत दारूच्या गुत्त्यांवर पिकेटिंग कायद्यानें बंद करविण्यांत आलें होतें; आणि केळकर, त्यांचे चिरंजीव, भोपटकर, परांजपे, गोखले वगैरे मंडळी कायदेभंगास उद्युक्त झाली होती. या कायदेभंगास दंडवसुलीच्या रूपानें जास्तींत जास्ती शिक्षा होती, तरी पुण्यांतील लोकांत उत्साह माजला होता. केळकरांनीं या चळवळीचा पुढाकार स्वतः घेतला होता व त्या उत्साहभरांतच त्यांनीं महात्माजींस कळविलें कीं, " कायदेभंग करून माझ्या अल्पशक्तीप्रमाणें या राष्ट्रयज्ञांत माझ्याही स्वार्थत्यागाची मी लहानशी आहुति टाकण्यास प्रवृत्त झालों आहे. आणि जर ही अपेक्षा पूर्ण झाली तर येत्या राष्ट्रीय सभेस मला हजर राहतां येणार नाहीं." इतकें गर्दींत लिहून झाल्यावर त्यांनीं ताजाकलमही लिहून टाकलाः—

" इतर कोणत्याही प्रांतापेक्षां वऱ्हाड व मध्यप्रांत यांमध्यें कौन्सिल-प्रवेशाचा वाद अगदीं बिनतोड आहे. या प्रांतामध्यें अतिशय चिकाटीचे खंबीर व शूरांतले शूर असे राष्ट्रीय लोक आहेत. निदान त्यांच्याकडे पाहून तरी कौन्सिलवादी पक्षाच्या हेतूंचा विपर्यास होऊं नये."—**'गतगोष्टी'**

केळकरांची चिकाटी व स्वमतसमर्थनाचा आग्रह हीं किती असामान्य आहेत, याचें हें एक उत्तम उदाहरण आहे.

# १५ " उलटी उडी "



अन्याय दूर करण्यासाठीं देशोदेशीं व युगोयुगीं ज्या अनेक राजकीय, सामाजिक वा धार्मिक चळवळी होतात, त्यांपकींच हिंदुस्थानांतील असहकारितेची चळवळ होती. हा सृष्टीचा नियमच आहे कीं, दमन होईल तेथें प्रतिकार उसळून यावयाचाच. मात्र वेळोवेळीं त्या प्रतिकाराचें स्वरूप कसें असावयाचें तें दमनाच्या स्वरूपावर अवलंबून राहतें. सर्वसाधारणपणें राजकीय परवशतेचा अंत आणण्यासाठीं चळवळी होतात त्या सशस्त्र स्वरूपाच्या असतात. महात्माजींची चळवळ सशस्त्र नव्हती. तो एक अपूर्व प्रयोग होता. तो अजूनही पूर्ण झाला नाहीं. परंतु १९२०-२१ च्या चळवळींत त्याला पूर्ण रूपानें प्रकट होण्यास वावही मिळाला नाहीं, हें खरें आहे.

महात्माजींची प्रथमपासूनची भूमिका आध्यात्मिक होती. ते नुसते राजकारणी पुरुष म्हणून राष्ट्राचे नेते बनले नव्हते. हिंदुस्थानांत त्या समयीं राजकारणी, मुत्सद्दी, बुद्धिमान्, विद्वान्, अशा पुरुषांची वाण नव्हती. राजकारणी लोक सत्तेसाठीं धडपड करितात, लोकांची खुशामत करितात, प्रतिस्पर्ध्यांचा कांटा काढून टाकवयाचा प्रयत्न करितात, अनेक उलाढाल्या करितात. महात्माजींनीं आपल्या सार्वजनिक आयुष्यांत यांपैकीं एक देखील गोष्ट केली नाहीं. कांहीं दिवसांपूर्वी त्यांना कोणीसा प्रश्न केला, "तुम्ही पुढारी कसे बनलां?" तर त्यांना उत्तरही नीट देतां आलें नाहीं. महात्माजींची तुलना आजकालचे थोर वैज्ञानिक व तत्त्वज्ञानी कोणाही राजकारणी देशभक्ताशीं वा मुत्सद्द्याशीं करीत नाहींत, तर महान् धर्मसंस्थापकांशीं वा ईश्वरभक्तांशीं करितात. महात्माजींनीं राजकारणांत प्रवेश करून राजकारणाचें सारें स्वरूप पालटून टाकलें. आजवरच्या कोणत्याही क्रांतिकारकांपेक्षां फार मोठी क्रांति त्यांनीं घडवून आणिली. त्यामुळें त्यांचें चरित्र विशिष्ट प्रकारें अलौकिक आहे.

सवाल हा आहे कीं, व्यवहारचतुर नसणाऱ्या, धूर्तपणा नसणाऱ्या बालकाप्रमाणें सरळ मनाच्या या फकीराला राष्ट्रानें आपला नेता म्हणून कां

पसंत केलें ? त्याच्या अव्यवहार्य वाटणाऱ्या आदर्शवादाचा राष्ट्रानें उदो उदो कां केला ? चित्तशुद्धीचा त्याचा आग्रह राष्ट्रांतील सर्व मनोवृत्तींच्या माणसांनीं उचलून कां धरिला ?

बलिष्ठ इंग्रज साम्राज्याशीं सामना करण्यासाठीं राष्ट्रानें अशाच प्रकारची व्यक्ति कां निर्माण केली ? जगभर हिंसेचा धुसगूस चालू असतां आणि " क्षमस्यैव हि निस्तारः " (Survival of the fittest) या सिद्धान्ताचें पूजन सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत चालू असतां, भारतवर्षासारख्या कंगाल, दुर्बळ देशांत अहिंसेचा संदेश देऊन, सर्वोदयाची महती गाणारा महात्मा जन्मास यावा हें अद्भुत तर खरेंच. नुसत्या कल्पना सांगणारें भविष्यवादी जगांत खूप जन्माला येतात. परंतु साऱ्या राष्ट्रांत एक प्रचंड शक्ति निर्माण करून संघटित रीतीनें भविष्यवाद्यांच्या कल्पना सत्यसृष्टींत उतरविण्याचें कार्य महात्माजींनींच हातीं घेतलें. जीवनशास्त्राचें ज्यास उत्कृष्ट ज्ञान असेल तोच या इतिहासामागील कार्यकारणभाव नीट उलगडून सांगूं शकेल.

प्रत्येक राष्ट्राची आत्मविकासासाठीं धडपड चालू आहे, तशी ती हिंदुस्थानाचीही चालू आहे. प्रत्येक राष्ट्राचें स्वतःचें असें 'कार्य' (Mission) आहे. तसें हिंदुस्थानचेंही आहे. सकृद्दर्शनीं विरोधी दिसणाऱ्या अनेक प्रकारच्या परिस्थितींतून राष्ट्राचा आत्मा डोकें वर काढण्याचा प्रयत्न करीतच असतो. हिंदुस्थानची स्वतःची संस्कृति आज हजारों वर्षें निर्माण होत आहे. हिंदुस्थानच्या ज्ञात इतिहासांतून सुद्धां योद्धे, वैश्य, कारागीर आणि तत्त्वज्ञानी यांच्या अलग मालिका लाविल्या तर मला वाटतें, शेवटच्यांची संख्या जास्त भरेल. हिंदी रक्तांत व संस्कृतींत जें मुरलें आहे तेंच वेळोवेळीं ऊर्जित होऊन व्यक्त स्वरूपांत येतें. गांधी हें असेंच एक ऊर्जित व व्यक्त स्वरूप आहे व त्याचा उगम प्राचीन हिंदी संस्कृतींतून झाला आहे.

महात्माजी पाश्चात्यांचे द्वेष्टे नाहींत. पण अर्वाचीन संस्कृतीचे द्वेष्टे आहेत, व म्हणून त्यांचा विरोध अधिक परिणामकारक स्वरूपाचा आहे. हिंदुस्थाननें त्यांना आपल्या शिरोभागीं धरिलें तें त्यांच्या अंगीं भिनलेल्या प्राचीन आर्यसंस्कृतीला मोहूनच धरिलें. हिंदी जनतेला वश करण्याचें सामर्थ्य प्राचीन संस्कृतीनें युक्त अशाच नेत्याच्या अंगीं असणें शक्य आहे

जनतेनें आपला पुढारी ओळखला ! पुरातनकालापासून हिंदी जनतेनें मंत्र-द्रष्टया ऋषींनाच आपले मार्गदर्शक व नेते म्हणून निवडलें होतें. तीच परंपरा तिनें आजही चालविली आहे. हिंदुस्थानच्या कोट्यवधि लोकांनीं आपलें भागधेय या दुर्बल दिसणाऱ्या तपस्व्याच्या हातीं दिलें आहे.

महात्माजींची दृष्टि आध्यात्मिक असल्यामुळें जीवनांतील सामयिक मूल्यांपेक्षां सनातन मूल्यांकडे त्यांचें लक्ष विशेष आहे. स्वार्थानें आंधळीं होऊन पाश्चिमेकडील राष्ट्रें आपल्या पौर्वात्य बांधवांना ज्या दुष्ट पद्धतीनें लुटीत आहेत, त्याच पद्धतीचा अंगिकार करून हिंदी जीवन राजकीय दृष्टथा सफळ बनविण्याची कल्पना महात्माजींना कधींच स्फुरली नाहीं. जीवना-विषयींचा त्यांचा आदर्श संयमावर उभारलेला आहे. मानवी कर्तव्यें पार पाडण्याकडे त्यांचा मुख्य कटाक्ष असल्यामुळें मानवी हक्कांसाठीं विनाशक झगडा करण्याच्या ते विरुद्ध आहेत. त्यांचा राष्ट्रवाद सर्व राष्ट्रांना युद्धपूर्व शांति नव्हे तर विश्वबंधुत्वाची शांति प्राप्त करून देणारा आहे. म्हणूनच त्यांच्या चळवळीचीं सर्व अंगें विधायक स्वरूपाचीं बनलीं.

राष्ट्राचें त्या समयींचें मानस ध्यानांत घेतलें तर लोक महात्माजींच्या मागें वेडे कां झाले तें कळून येईल. दीडशें वर्षांच्या गुलामीखालीं दबलेले लोक, दारिद्र्यानें पीडलेले, रोगांनीं ग्रासलेले असे लोक, आशातुर होऊन बसले होते; " आमचा उद्धारकर्ता कोणी येतो का ! " विसाव्या शतकाच्या सुरुवातीपासून हिंदुस्थानांत जाग्रति होऊं लागली तशी दडपशाहीही उग्र रूप धारण करूं लागली. महायुद्ध तेवढ्यांत सुरू झालें. जित राष्ट्रानें बुडत्यास काडीचा आधार म्हणून त्यावर आपली आशा ठेवली, तरी अंतीं निराशाच ! पंजाबप्रकरणानें राष्ट्राच्या हृदयांतील आशा जळून खाक झाल्या, पण त्यांतून निराशेचा उन्माद उसळला. अगदीं याच वेळीं महात्माजी पुढें आले आणि सर्वत्र शांति व प्रेमाच्या साम्राज्याची घोषणा त्यांनीं केली. " माझा कार्यक्रम घ्या. एका वर्षांत स्वराज्य ठेवलेलेंच." हा अमृतसंदेश त्यांनीं राष्ट्राला दिला. या व्यक्तीच्या ध्वजावर दक्षिण आफ्रिकेचा, चंपारण्याचा, खेडाचा असे महत्तर विजय फडकत होते. जनतेनें आपला विश्वास त्यांना अर्पण केला. स्वर्गाचें राज्य पृथ्वीवर आणणारा येशू किंवा इस्लामी साम्राज्याचें आश्वासन देणारा

महंमद यांनींही जनतेच्या कल्पनाशक्तीला अशाच एका मानसशास्त्रदृष्ट्या महत्त्वाच्या प्रसंगीं आकर्षून घेतलें होतें. त्याच इतिहासाची पुनरावृत्ति झाली.

या राष्ट्रीय उत्थानाचे संबंध विस्तृत व खोलवर गेले यांत शंका नाहीं. अनेक हेतूंनीं प्रेरित होऊन भिन्न भिन्न लोकांनीं त्यांत उडी घेतली. कांहीं चढले, तर कांहीं पडलेही. जे केवळ आदर्शावर मुग्ध होऊन मनोराज्यें सेवीत होते त्यांच्यापैकीं कांहींचा नाश झाला तर कांहींची पीछेहाट झाली. कांहींनीं स्वार्थ साधण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं; परंतु कांहीं मात्र त्या चळवळींतून आपला आध्यात्मिक विकास करून घेऊन विशुद्ध सेवापद्धतीचा पायंडा घालूं शकले, ही गोष्ट कांहीं कमी नव्हती.

ज्या सत्याग्रहयुद्धासाठीं म्हणजे कायदेभंगासाठीं महात्माजी क्षेत्र तयार करीत होते तो पहिल्या चळवळींत शक्य झाला नाहीं. दारूच्या गुत्त्यांवरील पिकेटिंगसुद्धां सर्वत्र शांततामय होऊं शकलें नाहीं. धारवाडला गोळीबार झाला, मालेगांवला हिंदुमुसलमानांचे दंगे झाले, दक्षिणेंत मोपल्यांनीं बंड केलें, पुण्यांतील पिकेटिंगही दंडभरती सर्रास सुरू होतांच बंद करावें लागलें, प्रिन्स ऑफ वेल्सच्या आगमनप्रसंगीं मुंबईत दंगे झाले. एकंदरींत महात्माजी अहिंसेचें वातावरण सर्वत्र प्रसृत व्हावें एतदर्थ प्रयत्न करीत असतां, प्रजेंतील हिंसा क्षोभरूपानें मधून मधून प्रकट होतच होती. राष्ट्राचें चारित्र्य वाढवायचें म्हटलें तरी तें थोड्या मुदतींत एकजिनसी कसें वाढणें शक्य आहे? व्यक्तिगत भित्रेपणा समुदायाच्या रक्षणाखालीं मत्त होऊन मर्यादा सोडण्यास चुळबूळ करी. पुष्कळदां लोकांनीं अहिंसा हें आपल्या भित्रेपणावर पांघरूण म्हणूनही घेतलें. दैवी संपत्ति कारखान्यांतून थोडीच निर्माण करितां येते? महात्माजींनीं आपल्या तालमींत मूठभर माणसेंसुद्धां अजून पूर्ण तयार केलीं नव्हतीं. अनुयायांजवळ निष्ठा भरपूर होती पण कल्पना नव्हती.

अशा परिस्थितींत डिसेंबरअखेरीस अहमदाबाद येथें राष्ट्रीय सभा भरली व तींत महात्माजींस सर्वाधिकारी नेमण्यांत आलें. नियोजित अध्यक्ष देशबंधु दास सरकारचे पाहुणे बनले होते म्हणून हकीम अजमलखान यांस अध्यक्ष करण्यांत आलें. राष्ट्रभर एक प्रकारची उत्सुकता माजून राहिली होती. सारे डोळे महात्माजींकडे लागले होते. स्वयंसेवकसेनेंत सर्व वृद्धतरुण आपापलीं

नांवें भरती करीत होते. संशयवाद्यांचें संशय तरीही डोकावत होतेच. " कायदेभंगाच्या चळवळीनें झालें तरी सरकार हटकून नमेलच असें कोणी सांगावें ! —केसरी " परंतु लोक तिकडे दुर्लक्ष करून कायदेभंगास तयार होऊन बसले होते. दरम्यान पं. मालवीय यांच्या खटपटीनें वर्तुल मेज परिषद मुंबईस भरविण्याचें एक उपाख्यान झालें. परंतु कांहींच वळेना. महात्माजींनीं बार्डोली तालुका पसंत करून सरकारला नोटीससुद्धां दिली. इतक्यांत चौरीचुरा येथें कांहीं लोकांनीं भयंकर दंगा करून पोलिसांस जिवें जाळल्याची बातमी महात्माजींच्या कानांवर येऊन थडकली व अहिंसात्मक लढयास अनुकूल वातावरण देशांत नसल्याची खात्री पटून महात्माजींनीं बारडोलीचा कायदेभंग बिनमुदत तहकूब केला.

राष्ट्राच्या वाढत्या उत्साहाला व आशेला एक फार जोराचा धक्का बसला; आणि त्याबरोबरच महात्माजींच्या मार्गांत त्यांना साथ देऊं इच्छिणाऱ्यांची कसोटी होण्याचा प्रसंग येऊन ठेपला.

केसरींत लगेच अग्रलेख प्रसिद्ध झाला—" बार्डोलीचा बार फुकट गेला." तुंबून ठेवलेल्या सर्व विचारांचा एकदम स्फोट झाला. महाराष्ट्र पक्षाच्या मनोभावनांचें तें आविष्करण होतें.

वरील घटनेस आज जवळ जवळ १८।१९ वर्षें झाल्यावर, व दरम्यानचा सर्व इतिहास लक्षांत घेतल्यावर, सर्व विचारवंतांनीं ही गोष्ट मान्य केली आहे कीं, महात्माजींचें तेव्हांचें कृत्य लोकांस कितीही उतावळें अगर गैर-मुत्सद्देगिरीचें भासलें तरी अगदीं यथार्थ होतें. जें खऱ्या लोकशाहीचें स्वराज्य महात्माजी हिंदुस्थानांत आणूं पाहत आहेत तें स्वराज्य त्या वेळीं कायदेभंग केला असतां तर जवळ खात्रीनें आलें नसतें. राष्ट्राची विधायक शक्ति मुळींच वाढली नव्हती. राष्ट्राला या पंथाची तालीम मिळाली नव्हती; आणि विभूतिपूजेच्या व स्वातंत्र्यलालसेमुळें तीव्र झालेल्या उत्साहाच्या भरांत लोक डोळे मिटून महात्माजींची प्रत्येक गोष्ट ऐकत गेले तरी त्यांचीं तत्त्वें जनतेच्या हृदयांत त्या वेळीं तरी खोल रुजलीं नव्हतीं. अहिंसेनें मिळविलेल्या स्वराज्याचा पूर्ण फायदा जर समाजाच्या पदरांत पाडून घ्यावयाचा असेल तर समाजांतील हिंसकवृत्तींवर संपूर्ण ताबा मिळविला असला पाहिजे.

म्हणून महात्माजींना जी भीति वाटत होती ती केवळ सत्याग्रह चालू असतांना होणाऱ्या हिंसेची नव्हे– तर पुढचाही प्रश्न त्यांच्या दृष्टीसमोर होता. ते म्हणतातः—

" समजा, ईश्वरानें बार्डोलींतील 'अहिंसामय' कायदेभंग यशस्वी होऊं दिला असता, ब्रिटिश सरकारनें राजीनामा देऊन सत्ता बार्डोलीच्या विजयी वीरांच्या हातीं दिली असती, आणि चिडण्यायोग्य कारणें घडल्यामुळें अनावर झालेल्या लोकसमुदायानें संतापून अमानुष कृत्यें केलीं असतीं, तर त्याचें नियंत्रण कोणी केलें असतें ? अहिंसात्मक पद्धतीच्या स्वराज्यप्राप्तींत समाजांतील हिंसक प्रवृत्तींचें नियंत्रण करण्याची शक्ति गृहीत आहे."

महात्माजींची उच्च आध्यात्मिक शक्ति राजकारणापेक्षांही वरच्या पातळीवरून परिस्थिति ताडते. फ्रेंच अथवा रशियन राज्यक्रांतीसारखें कांहीं तरी हिंदुस्थानांत व्हावें असें त्यांस वाटत नव्हतें. ज्या लोकशाहीच्या स्थापनेसाठीं ते अथांग मेहनत करीत होते ती लोकशाही अहिंसक मार्गानेंच सफळ होईल ही त्यांची बालंबाल खात्री होती. विनाशक काम करणें फारसें अवघड नाहीं. परंतु जनतेचे नेते जर तिचे सच्चे सेवक नसतील तर अधिकार हातीं येतांच ते जनतेचे भक्षक बनण्यास विलंब लागणार नाहीं, ही गोष्ट जगांतील सर्व सशस्त्र क्रांत्यांचा इतिहास सिद्ध करीत आहेच. जनतेचे सेवक बनण्यास नेत्यांचें चारित्र्य उच्च दर्जाचें असलें पाहिजे. त्यांच्यांत निरहंकारवृत्ति असली पाहिजे. महत्त्वाकांक्षा असतां कामा नये. आणि ह्या गोष्टी तेव्हांच शक्य होतील, जेव्हां नेते रात्रंदिवस जनतेची प्रत्यक्ष सेवा अथवा विधायक कार्यक्रम करीत राहतील. अशी एकंदर विचारसरणी असल्यामुळें महात्माजींनीं बार्डोलीचा सत्याग्रह तहकूब ठेविला हें योग्यच झालें. यानंतर सोळा वर्षांनीं त्यांच्या विचारसरणीचा भरींवपणा सिद्ध होण्याचा प्रसंग आला.

आपल्या १६ फेब्रुवारी १९२२ च्या 'यंग इंडिया'च्या अंकांत महात्माजींनीं लिहिल्याप्रमाणें "सबंधच्या सबंध चढाईचा कार्यक्रम इतक्या निष्ठुरपणें रद्द करणें हें राजकीय दृष्ट्या समर्पक वा शहाणपणाचें वाटलें नाहीं तरी धार्मिक दृष्ट्या तें निःसंशय समर्पक होतें" आणि देशांतील संशयात्म्यांना तें कालेंकरून पटल्याखेरीज राहिलें नाहीं. ज्या चळवळीचा पायाच आध्यात्मिक होता,

"सविनय कायदेभंगांत कोठल्याही प्रकारचा क्षोभ ( excitement ) असतां कामा नये" असा दंडक ज्या चळवळीला घालण्यांत आला होता ती चळवळ चौरीचुराच्या अत्याचारानंतर मागें घेतल्यानें ती राजकीय दृष्टया महत्त्वाची चूक झाली असें म्हणणें अप्रयोजक ठरतें.

परंतु राष्ट्रांतील सर्व राजकारणी पुरुषांची भूमिका आध्यामिक नसल्यामुळें सर्वांनीं आपापले अभिप्राय वेगवेगळ्या तऱ्हेनें व्यक्त केले. जहालांची तर निराशाच झाली. महाराष्ट्र पक्षानें आपल्या मनांतील असंतोषास यानंतर पूर्णपणें वाव दिला. महात्माजींनीं चुकीचें धोरण स्वीकारल्याबद्दल त्यांस ठपका देण्यांत आला. परंतु लवकरच दिल्ली येथें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक भरली तेथें हिंसेच्या सर्व प्रवाहांचें प्रदर्शन झालें व महात्माजींना पुढील लेखांत आपलें दुःख ओकावें लागलें:-

"दिल्ली येथें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या बैठकीस आलेल्या सभासदांच्या मनांत कळत वा न कळत अत्याचारीपणाचा प्रवाह इतक्या जोरानें वाहत होता कीं, मी खरोखरीच शब्दशः माझा प्रचंड पराभव व्हावा अशीच प्रार्थना करीत होतों. मी नेहमीं अल्पसंख्याक राहिलों आहे...... अल्पसंख्याक असतांनाच मीं उत्कृष्ट व सर्वांत भरींव काम केलें आहे......मीं कमिटींतील आपल्या मित्रांना धोक्याची सूचना दिली आहे कीं मला ते सुधारूं शकणार नाहींत. लोक ज्या ज्या वेळीं चुका करतील त्या त्या वेळीं मी त्या कबूल करीत राहीन ( जाहीर रीतीनें).........मी एकटा एका बाजूस राहिलों तरी चालेल.........मी पाहत आहे कीं, आमची अहिंसा केवळ वरवरची आहे; आम्ही त्वेषानें सळसळत आहोंत; सरकार आपल्या निर्बुद्ध कृत्यांनीं आम्हांस अधिक भडकावीत आहे......आमची अहिंसा म्हणजे आमच्या हताशपणावरील पांघरूण आहे. आम्हांला पहिली संधि मिळाली कीं लगेच वचपा काढूं अशी इच्छा आम्ही मनांत बाळगीत आहोंत असें भासतें. दुर्बळांच्या अशा जबरीच्या अहिंसेंतून खरी ऐच्छिक अहिंसा कशी येऊं शकेल?.........( दिल्ली येथें ) मला स्पष्ट दिसलें कीं, कार्यकर्ते योग्य विधायक कार्यक्रम करण्याच्या मनःस्थितींत नव्हते. त्या कार्यक्रमांत कांहींच जादू नव्हती ...असल्या मिळमिळीत सुधारक वृत्तीनें सरकारच्या हातून सत्ता छिनवून घेणें शक्य नाहीं

असें त्यांना वाटत होतें. त्यांना अहिंसक "टोले" हाणण्याची इच्छा होती. हा सारा प्रकार इतका कृत्रिम वाटत होता !..."

अहिंसेचा सिद्धान्त काँग्रेसमधील कित्येक जबाबदार कार्यकर्त्यांस देखील संमत नव्हता ही गोष्ट दिल्ली येथें सिद्ध झाली. अर्थात् राजकारणाची पुनर्घटना करून त्याचें रूप पालटूं पाहणाऱ्या महात्म्यास यक्षिणीच्या कांडीप्रमाणें हा चमत्कार थोड्या समयांत घडवून आणण्याची आशा नव्हती हेंही खरें आहे. परंतु १९२२ मध्यें सविनय कायदेभंग करणें धोक्याचें होतें त्याची प्रतीति आली.

दुसऱ्या एका लेखांत महात्माजींनीं केळकरांच्या टीकेस उत्तर दिलें आहे:—

" 'मराठ्या'मध्यें केळकरांनीं लिहिलेला लेख मीं काळजीपूर्वक वाचला. त्यांची टीका सौम्य व विवेकशीलपणाची आहे हें मी कबूल करतों. पण ज्या गोष्टीला ते उलटी उडी ( बार्डोलीचा ठराव ) म्हणतात ती अपरिहार्य होती अशी जर मला त्यांची व त्यांच्याप्रमाणेंच मत असणाऱ्या इतरांची खात्री करून देतां येईल तर मला बरें वाटेल. सुसंगतपणा हा चांगला आहे पण त्याच्यासाठीं सत्य वस्तूकडे आपण काणाडोळा करूं लागलों तर तो पिशाचाप्रमाणेंच आपल्या मानेवर बसेल. मला माहीत आहे कीं, रणमैदानांत सैन्याची रचना तासातासानें बदलावी लागते......जितक्या म्हणून "उलट्या उड्या" मारण्यांत आल्या त्या आवश्यक होत्या......केळकर सुचवितात त्याप्रमाणें मुंबईतील ( वर्तुल ) परिषदेंत मीं माघार घेतली नाहीं त्याचें कारण तसें केल्यानें मी असत्यवादी आणि मूर्ख नसलों तरी बेपर्वा ठरलों असतों. कारण हिंदी राजकीय आकाश त्या वेळीं तरी मला निरभ्र वाटत होतें, राहीलसें वाटत होतें; अशा वेळीं प्रागतिक मित्रांच्या आग्रहाला वश होऊन अधिकाराबाहेर मी वागलों असतों तर तें असत्याचरण झालें असतें......त्या वेळीं सार्वत्रिक कायदेभंग तहकूब करणें दुर्बळपणा ठरला असता. पण चौरिचुरामुळें क्षितिजावर अंधार पसरला व मीं नवीन कारणमीमांसा शोधून काढली....."

पुढें हा वाद अधिक काळ चालण्याचा प्रसंग आला नाहीं. सरकारला महात्माजींचें "मुक्तबंध" राहणें इष्ट वाटलें नाहीं. १८ मार्च रोजीं कारागृहानें महात्माजींना जनतेच्या दृष्टीआड नेलें !!

यानंतर महाराष्ट्रांतील महात्माजींच्या अनुयायांच्या कसोटीची वेळ आली.

---

# १६ अहिंसाधर्म आणि शिकारधर्म

महात्माजी तुरुंगांत गेले ते हिंदी राजकारणाला एक विशिष्ट वळण लावून गेले. त्यांनीं हिंदी राजकारणाचीं सूत्रें आपल्या हातीं घेण्यापूर्वी राजकारणाचें स्वरूप केवळ वैचारिक होतें असें म्हटलें तरी चालेल. यापुढें राजकारणाला संघटनेचें स्वरूप आलें; आणि चोवीस तास काम करणाऱ्या कार्यकर्त्यांची वाण भासूं लागली.

जेव्हां कार्यकर्त्यांकडून चोवीस तास काम करण्याची अपेक्षा केली जाते तेव्हां त्यांच्या उदरनिर्वाहाचाही विचार अवश्य करावा लागतो. एरवीं धनवान् लोकांशिवाय सारा दिवस सार्वजनिक कामाकडे द्यायला फुरसत कोणास असणार ? प्रत्येकाला स्वतःचें, तसेंच आपल्या कुटुंबाचें पोट भरणें अपरिहार्य असतें. आणि वडिलार्जित इस्टेट नसेल किंवा सधन पालक नसेल, तर कार्यकर्त्याला उदरनिर्वाहासाठीं कांहीं काम वा धंदा करणें भाग पडतें. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय कार्यकर्ते कांहीं सधन लोक नव्हते. चळवळींमध्यें उडी टाकतांना त्यांनीं फारच खडतर जीवनाची जबाबदारी स्वतःवर ओढून घेतली होती. तरी सुद्धां चोवीस तास देशसेवा करायची म्हटली तरी, कांहीं तरी आधार हवाच होता. महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांना द्रव्यसाहाय्य मिळण्यासाठीं फंड वगैरे खास साधन नव्हतेंच. टिळकांच्या हयातींत ते 'केसरी' संस्थेंतून पुष्कळांस मदत करीत पण त्यांना सुद्धां सार्वजनिक फंड उभारून त्यांतून अहोरात्र देशसेवा करणाऱ्या सेवकांचा एक संघ पोसण्याची कल्पना पसंत नव्हती. यासंबंधीं 'आठवणी', खंड २ पृ. ४१ मध्यें पुढील उल्लेख सांपडतो : "ना. गोखले यांच्या सर्व्हंट्स ऑफ इण्डिया सोसायटीप्रमाणें आपल्या पक्षाची एक सोसायटी आपण कां स्थापन करीत नाहीं ?" असा प्रश्न करतांच लोकमान्य म्हणाले कीं, 'संस्था काढली कीं, संस्थेंतील लोक पुढें मागें तिच्या कार्याच्या वा उद्दिष्टाच्या अभिमानापेक्षां संस्थेचेच अधिक अभिमानी बनतात. पारतंत्र्यांतून राष्ट्र वर आणूं पाहणाऱ्या

संस्थांवर कार्य करतांना संकटें हीं यावयाचींच; अशा प्रसंगीं संस्थांचा अभिमान हा सहजगत्या कार्यनाश करणारा होतो. ...देशाच्या सद्यःस्थितींत राजकारणाचा काळ हा भरतीचा व ओहोटीचा असणार, याकरितां राजकारणाला वाहून घेणाऱ्या लोकांनीं राजकारणाखेरीज आपली गति चालेल अशा एखाद्या विषयाचा व्यासंग अवश्य केला पाहिजे. तसें झालें म्हणजे ओहोटीचा काळ निराशेंत जात नाहीं... तेव्हां अशा लोकांकरितां नित्याची संस्था काढून काय उपयोग ?"

गोखल्यांची सर्व्हंट्स ऑफ् इण्डिया सोसायटी कांहीं अंशीं अशा प्रकारें सेवकसंघटना करणारी संस्था होती. परंतु महाराष्ट्रांत कॉंग्रेसचा आपला असा फंड नव्हता. पुण्यास 'केसरी' संस्था भरभराटींत होती. केळकरांना स्वतःला अशा सेवकांना आर्थिक मदत देणाऱ्या संस्थेचें महत्त्व कळून चुकलें होतें असें वाटतें. कारण त्यांनीं वेळोवेळीं 'केसरी'च्या निधींतून सार्वजनिक कार्यकर्त्यांना मदत केली आहे. त्यांच्यांत तशी सर्वांशीं सवलतीनें वागावयाची वृत्ति असल्यामुळें कार्यकर्त्यांना अडचणींत पाहिल्यास स्वाभाविकपणेंच त्यांना मदत करण्याकडे त्यांचा कल असतो. म्हणूनच प्रांतिकचे पहिले चिटणीस देव हे विनामूल्य चोवीस तास कार्य करीत असत त्याचें महत्त्व त्यांना वाटून, केळकरांनीं देवांना पगार घेण्याचा आग्रह केला. महाराष्ट्रीय लोकांचा स्वभावविशेष म्हणजे अभिमानी व तुसडा स्वभाव ! त्यास अनुसरून कार्यकर्त्यांना स्वतःला किंवा आपल्या कुटुंबालाही कोणाचें मिंधें बनविणें आवडलें नाहीं. बहुतेक सारे कार्यकर्ते स्वकष्टार्जित द्रव्यावर उदरनिर्वाह करीत. अल्प का होईना परंतु स्वतः कमावलेल्या वेतनावर संतुष्ट राहून बाकीचा सर्व वेळ कॉंग्रेसकार्यास देत. तरी देखील कॉंग्रेस कार्याशिवाय इतर कामें करून पोट भरण्याच्या उद्योगांत दिवसांतील बरेच तास जात. पुढें चर्खासंघ स्थापन होतांच त्या संघानें याप्रमाणें चोवीस तास आपल्या कामास वाहिलेल्या सेवकांस वेतन देण्याचा परिपाठ पाडला. तोच क्रम कालेंकरून हरिजन सेवक संघानें चालविला. परंतु कॉंग्रेसच्या कमिट्यांनीं मात्र हा प्रघात सुरू केला नव्हता. नाहीं म्हणावयास राष्ट्रीय शाळांतील शिक्षकांना वेतन मिळे व त्यांचें कार्यही अहर्निश सेवाकार्यच असे. परंतु त्यांच्यांतही

पोट बांधून काम करणारे अनेक होते. कांहींना तर वेतन इतकें अपुरें व अनियमित मिळे कीं त्यांस वेतन म्हणणें सुद्धां शोभणार नाहीं.

चळवळींत उडी घेणाऱ्या बहुतेक लोकांची परीक्षा होण्याचा समय महात्माजींच्या कारावासानंतर येऊन ठेपल्याचें मागें लिहिलेंच आहे. जनता कायदेभंगाची वाट आतुरतेनें पाहत होती याचा अर्थ " आतां इंग्रजांचें राज्य नष्ट होणार, आपल्या हातीं राज्यसूत्रें येणार व सध्यांचा भीषण जीवनकलह कायमचा मिटून सर्व लोक सुखी होणार " हीच ती एक वेडी आशा त्यांना होती. कायदेभंग झाला नाहीं, नेता तुरुंगांत गेला, दडपशाहीचा वरवंटा आकसानें सुरू झाला, उपनेत्यांतही निराशा पसरली; याचा परिणाम जनतेवर व्हावयाचा तो झालाच. आवेग ओसरल्यावर जनता आपले व्यवहार पूर्ववत् चालवूं लागली. ज्या व्यापाऱ्यांनीं स्वदेशीच्या उत्साहगंगेंत आपले हात धुऊन घेतले होते ते गबर होऊन मोटारी उडवूं लागले. ज्या वकिलांनीं लोकलाजेस्तव वकिली सोडली होती ते फिरून वकिली करूं लागले. आणि कौन्सिल-प्रवेशाची तळमळ लागलेले जीव पुन्हा येत्या निवडणुकी लढविण्याच्या व कौन्सिलांत जाऊन असहकारिता करण्याच्या गोष्टी बोलूं लागले. दिल्लीच्या अखिल भारतीय काँग्रेस समितीच्या बैठकींत महात्माजींना जें दृश्य दिसलें होतें तें वास्तवसृष्टींत येऊं लागलें. विधायक कार्यक्रमावर ज्यांचा विश्वास खरोखरी नव्हता ते मूळपदावर फार लवकर येऊन ठेपले. काँग्रेसमध्यें दोन पक्ष पडले. फेरवाले व नाफेरवाले. नाफेरवाले हे निर्भेळ असहकारितावादी व फेरवाले ते कौन्सिल-प्रवेशवादी.

महात्माजी कायदेभंग न करितां तुरुंगांत गेले तरी महाराष्ट्रांत कायदेभंग होण्याचा प्रसंग आलाच. मुळशी प्रकरण हातघाईवर येत होतें. मुळशी-पेट्यांतील शेतकऱ्यांशीं समरस झालेले पुण्यांतील व पुण्याबाहेरील महाराष्ट्रांतील राजकारणी कार्यकर्ते इरेस पेटले होते. ल. ब. भोपटकरांनीं " जान किंवा जमीन " अशी घोषणा केली व ती साऱ्यांनीं उचलून धरिली. केळकरांचें धोरण नमतें घेण्याचें होतें. त्यांनीं स्वतःच स्वतःविषयीं म्हटल्याप्रमाणें " माझ्यामध्यें इतर कांहीं गुण असोत वा नसोत, पण मी होईल तितकें नमतें

घेणारा मनुष्य आहे," त्यांना तंटा विकोपास जाणें नको होतें. त्यांनीं कंपनी व शेतकरी यांच्यांत मध्यस्थी करण्याचा प्रयत्न केला, पण दोन्ही पक्ष आपली भूमिका सोडण्यास कबूल होईनात. कंपनीनें भेदनीतीचा मार्ग स्वीकारला. कांहीं खातेदारांनीं पैसे कंपनीकडून घेतल्याची ओरड झाली. पुढें चौकशी करून ता. २८।३।२२ रोजीं भरलेल्या सभेंत शंकरराव देवांनीं जाहीर केलें कीं, "एकंदर २००० खातेदारांपैकीं फार तर ३००।३५० लोकांनीं कॉम्पेन्सेशन घेतलें असेल. एकंदर ६०।७० लाख रकमेपैकीं अवघी ७ लाख रक्कम आजपर्यंत दिली गेली आहे." तरी सुद्धां स्थानिक शेतकऱ्यांपेक्षां बाहेरील चळवळ्यांचा उत्साहच विशेष होता.

मुळशी सत्याग्रहाची चळवळ महाराष्ट्रीय स्वरूप घेऊं पाहत होती. तींत भाग घेण्यास जिल्ह्यांजिल्ह्यांतील राष्ट्रीय शाळांतील शिक्षक व विद्यार्थी पुढें सरसावले. तें वर्णन यथाक्रम पुढें येईल. या प्रकरणांत राजकारणांतील वैमनस्य विरार येथें कसें विकोपास गेलें त्याचा इतिहास सांगण्याचा विचार आहे.

एप्रिल महिन्यांत पेण येथें दुसरी महाराष्ट्र प्रांतिक परिषद भरली. त्या परिषदेंत महाराष्ट्र पक्षाच्या आवडत्या विषयाचा भरपूर खल झाला. नागपूर व अहमदाबाद येथील लोकसभांतून "शबल संमति" देणारे कार्यकर्ते "बार्डोलीच्या फुकट गेलेल्या बारा"नंतर उघडपणें असहकारितेवर टीका करूं लागले व 'जागत्या बुद्धी'चें कार्य जनतेचा बुद्धिभेद करणें हेंच एक ठरलें. या शुभकार्यांत साथ देण्यास इतर प्रांतांतूनही कित्येक कार्यकर्त्यांनीं हातभार लावला. परंतु महात्माजी तुरुंगाआड जातात न जातात तोंच कौन्सिलप्रवेशाचा ठराव मंजूर करून टाकण्याइतकें कोडगें साहस प्रतिनिधींच्यानें करविलें नाहीं. म्हणून तशा अर्थाचा भोपटकर यांचा ठराव परिषदेनें पसार न करितां असहकारितेच्या कार्यक्रमांत फेरफार करण्याचा मोघम ठराव तिनें मंजूर केला. खाडिलकर अध्यक्ष होते. त्यांचे विचार अर्थात् असहकारितावादी होते. परंतु परिषदेंत पोल घेऊन मतें मोजण्यांत आलीं व तींत नाफेरवाले हरले. त्या गोष्टीबद्दल समाधान व्यक्त करितांना डॉ. मुंजे लिहितातः—

"महाराष्ट्र पक्षाच्या तत्त्वाकरितां पेण कॉन्फरन्समध्यें चांगलीच खडाजंगी उडाली असें वर्तमानपत्रांवरून दिसतें. खाडिलकर अध्यक्ष असतांना आपल्या

मित्रमंडळींनीं मोठाच जय मिळवून लढाई मारली त्याबद्दल फार समाधान वाटतें. आपल्या टिळक-पक्षांत असलेलें सख्य मोडून लोकमान्यांच्या मृत्यूनंतर अवघ्या दीड वर्षांत त्याची वाताहात झाली व हाच तो पूर्वीचा टिळकांचा महत्तम व बलिष्ठ पक्ष काय अशी भ्रांत पडून शंका येऊं लागली. पण याहीपेक्षां काळजाला घरें पाडणारी गोष्ट म्हणजे सद्‌बुद्धीनें व मित्रभावानें महात्माजींच्या चुका वेळोवेळीं महात्माजींना दाखवून व पटवून दिल्या तरी आपलेच कांहीं मित्र व खांद्यास खांदा लावून काम करणारे कार्यकर्ते यांनीं उठून आपणांविरुद्ध गैरसमज पसरविण्याचें व्रत अनुसरावें ही होय...टीकेचा हा मोह खाडिलकरांनाही आवरला नाहीं.... अशा रीतीनें आपल्याला यादवी व युद्ध करण्यास भाग पाडावयाचें असेल तर आम्हीही मोठ्या निकरानें लढूं हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. मग त्यांत वाटेल तो जगो किंवा मरो !...'गतगोष्टी', पृष्ठ ५१५.'

महाराष्ट्र पक्षानें स्वतःस टिळकांचे खास अनुयायी मानून महाराष्ट्रांतील राजकारणाचा वारसा स्वतःकडे घेतला होता. तो हक्क स्वतःकडून छिनवून घेऊन गांधी-पक्षानें महाराष्ट्रांत दुफळी माजविली ती टिळकनिष्ठेशीं द्रोह करणारी झाली असें मानून गांधींनीं टिळकांचें तत्त्वज्ञान नष्ट करण्याचा प्रयत्न केला असा समज त्यांनीं करून घेतला. काल लोटतांच हा आरोप प्रच्छन्न न राहतां जाहीर रीतीनें होऊं लागला. साबरमतीचा आश्रम टिळकांचें तत्त्वज्ञान हाणून पाडण्यासाठींच आहे, अशीही ओरड चालू झाली. त्यांतच फ्रेंच मुशाफर पॉल रिचर्ड यांच्या मुलाखतीची भर पडली. महात्माजी तुरुंगांत जाण्यापूर्वी या गृहस्थानें त्यांची एक खासगी मुलाखत घेतली होती. तींतील कांहीं भाग त्यांनीं परवानगीशिवाय व तुटक रीतीनें प्रसिद्ध केला. त्या मजकुरानें लोकांचा गैरसमज वाढला आणि महात्माजींस " माझीं दुःखें संपतच नाहींत " या मथळ्याखालीं खास लेख लिहावा लागला. महात्माजींना राजकीय स्वातंत्र्यापेक्षां सत्य व अहिंसा यांचें महत्त्व अधिक वाटतें. मुंबईच्या " लोकमान्य " पत्रानें पॉल रिचर्डची जी मुलाखत प्रसिद्ध केली तींत लोकमान्यांनीं " देशाच्या स्वातंत्र्याकरितां मी सत्यावर पाणी सोडीन " असें महात्माजींजवळ म्हटल्याचें विधान महात्माजींच्या तोंडीं घातलें होतें.

महात्माजींना या सर्वांचा खुलासा करून जीवनाविषयींच्या स्वतःच्या व लोकमान्यांच्या विचारसरणींतील भेद स्पष्ट करावा लागला. परंतु महाराष्ट्र पक्षाला दुखवूं नये म्हणून ते किती आटोकाट प्रयत्न करीत होते व विरोधकांना अहिंसेनें जिंकण्याचा प्रयत्न ते किती नेटानें व सावधगिरीनें करीत होते त्याची साक्ष त्यांच्या या २३-२-२२ च्या यंग इंडियांतील लेखांत सांपडते. केसरीनें त्यांचें हें स्पष्टीकरण आपल्या अग्रलेखांत मान्य करून "महात्माजींचा स्वभाव किती निष्कपटी आहे हें महाराष्ट्रास पूर्ण माहीत असल्यामुळें, विशेषतः लोकमान्य टिळकांविषयीं त्यांची आदरबुद्धि मशहूर असल्यामुळें, परक्यानें कळविलेल्या एखाद्या गोष्टीवरून महात्माजींच्या हेतूविषयीं कोणीही महाराष्ट्रीय आपला गैरसमज करून घेणार नाहीं.... महाराष्ट्राचें मन दुखवूं नये याविषयीं गांधीजी किती खबरदारी घेतात याची जाणीव आम्हांला असल्यानें आम्हीही महाराष्ट्रातर्फे त्यांना प्रेमपूर्वक असें आश्वासन देतों कीं, पॉल रिचर्ड यांनीं प्रगट केलेल्या गोष्टींमुळें महाराष्ट्राच्या मनांत महात्माजींविषयीं बिलकुल किंतु उत्पन्न झालेला नाहीं. उलट त्यांच्या प्रांजलपणाच्या खुलाशानें त्यांनीं महाराष्ट्राला अधिकच आपलेंसें केलें आहे" असा अभिप्राय दिला.

गुजराती 'नवजीवन' पत्राचें मराठी भाषांतर महाराष्ट्रांत गांधी-तत्त्वज्ञानाच्या प्रचारार्थ सुरू करावें अशी विनंति करण्यास महात्माजींकडे गेलेल्या महाराष्ट्रीय शिष्टमंडळास महात्माजींनीं "त्यामुळें केसरीस प्रतिस्पर्धी निर्माण केल्याचा गैरसमज होईल" असें सांगून नकार दिल्याची गोष्ट प्रसिद्धच आहे.

महात्माजींची भीति अस्थानीं नव्हती, ह्यास पुढील उतारा पुरेसा आहे. अणे केळकरांस लिहितातः—

"ज्या लोकमान्यांच्या हाताखालीं २५ वर्षें राजकारणांत आपण वाढलों, त्याच तत्त्वावर पुनः काम करावें एवढीच इच्छा आहे. साबरमतीच्या तीरावरील आश्रमांतून एक एक नवीन हुकूम सुटावेत व आम्हीं भ्रमिष्टपणानें त्यांचा जप करीत बसावें हें बस्स झालें..." —'गतगोष्टी,' पृष्ठ ५१७.

महात्माजी तुरुंगांत जाण्याच्या सुमारास श्री. बम्मनजी नांवाचे पारशी गृहस्थ ( हे बहुधा इंग्लंडांत राहत असत ) दासबाबूंना तुरुंगांत भेटून आले.

तत्कालीन समज असा होता कीं, त्या वेळच्या मजूर मंत्रिमंडळातर्फे खासगी रीतीनें ते दासबाबूंशीं समेट संभवनीय असल्यास तत्प्रीत्यर्थ प्रयत्न करण्यास गेले होते. त्यांनीं "दासबाबूंकडून आणलेली" म्हणून एक चिठ्ठी डॉ. मुंजे यांस दाखविली. तींत कॉंग्रेसनें निवडणुकी लढवाव्या असें मत प्रदर्शित केलें होतें. मुंजे व अणे यांच्या आशांना अंकुर फुटले व महाराष्ट्राच्या मदतीस बंगालचें वजन पडल्यास कौन्सिलप्रवेशाची चळवळ नेटानें सुरू करतां येईल, असें त्यांनीं योजिलें. त्यांनीं केळकरांशीं पत्रद्वारा विचारविनिमय सुरू केला.

दरम्यान गंगाधरराव देशपांडे तुरुंगांतून सुटले. त्यांची मुलाखत घेण्यांत आली असतां त्यांनीं " थोर पुढारी तुरुंगांत असतां कौन्सिलप्रवेशाचा प्रश्न काढणें अप्रस्तुत आहे. ते बाहेर आल्यावर परिस्थितीचा पुन्हा एकवार नीट विचार होऊं द्या. नव्या निवडणुकीस १॥ वर्ष अवकाश आहे. तोंपर्यंत विधायक कार्यक्रम पुरा करा," असा संदेश दिला.

हा संदेश महाराष्ट्र पक्षास नापसंत पडला. अकोल्यास केळकर, जोगळेकर वगैरे गृहस्थांच्या सहीनें 'प्रजापक्षां'त एक पत्र प्रसिद्ध झालें. "महाराष्ट्र पक्षास केवळ एकांगी विधायक कार्यक्रम नको" असें सांगून त्यांनीं कौन्सिलप्रवेशाच्या चळवळीस जाहीर रीतीनें सुरुवात केली.

यानंतर लोकमत साहजिकच क्षुब्ध होऊं लागलें व महाराष्ट्रांतील नाफेरवाल्या पक्षानें प्रतिहल्ला चढविला. केळकरांना कौन्सिलप्रवेशाचा प्रचार करावयाचा होता, म्हणून त्यांनीं महाराष्ट्र प्रांतिक कमिटीच्या आपल्या अध्यक्षपदाचा राजीनामा मे महिन्यांत दिला; त्या वेळीं तो मंजूर झाला नाहीं. परंतु कमिटींतील नाफेरवाल्यांचा पक्ष अधिक उग्र बनून कमिटींत बहुमत मिळविण्याची खटपट करूं लागला. यानंतर पुण्याच्या राजकारणापुरतें म्हणावयाचें म्हणजे विधायक कार्यक्रम बाजूला राहून कमिटी हस्तगत करण्याकडे दोन्ही पक्षांचें लक्ष वेधलें व त्यासाठीं खटपट सुरू झाली. त्या वेळीं प्रांतिक कमिटींत फेरवाल्या पक्षाचें वर्चस्व होतें. अन्सारी व राजगोपाळाचार्य यांनीं पत्रें लिहून गया कॉंग्रेससाठीं महाराष्ट्र प्रांतिक आपल्या ताब्यांत घेण्यास नाफेरवाल्या पक्षास सूचना केली. तेव्हां नाफेरवाल्या पक्षानें पुणें शहर व जिल्हा कॉंग्रेस कमिट्या आपल्या ताब्यांत घेऊन मोहिमेस

प्रारंभ केला. पुणें शहरांत सामान्य जनतेंत आपल्या पक्षाचे अधिक सभासद करून घेऊन आपलें मताधिक्य करणें त्यांस सोपें गेलें. या निवडणुकी होतांना दांडगाई व सभा उधळणें हे प्रकार घडून आले. त्यामुळें दोन्ही पक्षांतील कडू भावना दिवसेंदिवस वाढूं लागल्या. नाफेरवाल्या पक्षाचे पुण्यांतील पुढारी परांजपे होते. त्यांचें व केळकरांचें जमत नव्हतेंच. त्याचा राजकीय जीवनावर वाईट परिणाम घडून येऊं लागला; जनतेची सेवा बाजूस राहिली आणि त्याग व पुरुषार्थ यांच्या जोरावर शक्ति मिळविण्याचा प्रयत्न न करितां केवळ

पुण्यस्य फलमिच्छन्ति पुण्यं नेच्छन्ति भारताः ।

या कव्युक्तीप्रमाणें सत्ता काबीज करण्याच्या महत्त्वाकांक्षेस बळी पडून दोन्ही पक्षांनीं द्वेषाचीं बीजें दीर्घकालासाठीं पेरून ठेविलीं.

जूनमध्यें लखनौ येथें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक भरली. महात्माजी तुरुंगांत गेले तरी सामुदायिक कायदेभंगाची कल्पना कायम होतीच. बैठकींत ठरलें कीं, कायदेभंग १५ ऑगस्टपर्यंत पुढें ढकलण्यांत यावा व तोंवर देशाची कायदेभंग करण्याची तयारी कोठवर आहे त्याचें निरीक्षण करण्यासाठीं एक कमिटी नेमण्यांत यावी. त्याप्रमाणें कायदेभंगाची चौकशी कमिटी नेमण्यांत आली व तिचा दौरा लगेच देशभर सुरू झाला. जुलैमध्यें कमिटी पुण्यास आली होती. केळकरांनीं तिच्यासमोर लेखी साक्ष दिली व तोंडी जबानींत कायदे-कौन्सिलांत प्रवेश करण्याबाबत अनुकूल मत दिलें. "आणखी एक वर्षभर असहकारिता अशीच चालविल्यास पूर्ण स्वातंत्र्य मिळणार नाहीं काय ?" या प्रश्नास त्यांनीं आपल्या स्वभावाचें द्योतक असें उत्तर दिलें. "जीभ उचलून टाळ्याला लावली म्हणजे वाटेल तें म्हणतां येतें, त्यांतलेंच हें आहे. प्रतिस्पर्धी राज्यघटना निर्माण करणें सोपें नाहीं. त्याला सशस्त्र युद्ध करावें लागेल आणि तुमची तर ही निःशस्त्र असहकारिता. शस्त्र नाहीं तर तडजोडच प्राप्त; व तडजोड म्हटली म्हणजे कांहीं दिलें पाहिजे व कांहीं घेतलें पाहिजे."

त्या क्रांतीच्या संधिकाळांत— जेव्हां अविरत पुरुषार्थ करण्याची आवश्यकता होती, आणि नेत्याच्या बंदिवासामुळें समाज आशानिराशेच्या आंदोलनांत

सांपडला होता त्या वेळीं तडजोडीची भाषा बोलून समाजाच्या गतीला मागें खेंचण्याचें हें धोरण केळकरांनीं स्वीकारतांच ते नवीन पिढींत अप्रिय झाले.

ज्याप्रमाणें केळकरांनीं महाराष्ट्र प्रांतिकच्या अध्यक्षपदाचा राजीनामा कौन्सिलप्रवेशाच्या प्रचारस्वातंत्र्यासाठीं दिला, त्याचप्रमाणें मुंबईस बॅ. जयकर यांनीं वकिली सुरू करण्याचें ठरविल्यामुळें गिरगांव जिल्हा काँग्रेस कमिटीच्या अध्यक्षपदाचा जूनमध्यें राजीनामा दिला. दोघांही अध्यक्षांनीं आपलीं मतें प्रांजलपणें बोलून दाखविलीं. आणि अर्थातच वर्तमानपत्रांतून त्यांवर उघड चर्चा झालीच. परंतु मुंबईच्या क्रॉनिकल पत्रांत आलेली टीका वर्मी लागून केळकरांनीं आपली लेखणी त्यावर उचलली:—

" क्रॉनिकल म्हणतो कीं, जयकरांनीं बंडाचें निशाण उभारल्याचें जाहीर केलें ! बरें, हें बंडही स्वतःच्या बुद्धीनें नव्हे; तर लोकांच्या सांगण्यावरून ! व हें सांगणार कोण तर महाराष्ट्रांतील पुढारी !......क्रॉनिकलला जयकरांचें निमित्त घेऊन कांहीं महाराष्ट्रीय पुढाऱ्यांची निंदा करावयाची होती म्हणून ! हे पुढारी कोण हें क्रॉनिकलनें नांवें घेऊन सांगितलें असतें तर फार बरें झालें असतें. आम्ही तर या गोष्टीचा तीव्र निषेधपूर्वक इन्कार करितों."— " बाटग्या पत्राची टारगी टीका " —केसरी.

यापूर्वीच थोडे दिवस अणे यांनीं केळकरांस लिहिलेल्या पत्रांत पुढील मजकूर होता:—" महात्मा गांधींनीं उत्पन्न केलेल्या भ्रमिष्टपणाच्या कल्पना टाकून पुनः राजकारणाच्या वळणावर यावें अशा हेतूनें कंबर बांधून मोहिमेस सुरुवात करण्याकरितां म्हणून जर तुम्हीं आपला राजीनामा दिला असेल, तर महाराष्ट्रानें आपलें कार्य बरोबर ओळखलें असेंच मी म्हणेन... तात्यासाहेब, तुम्हांला खरें सांगतों कीं, हाताशीं चरखा घेऊन काँग्रेसच्या सध्यां मानमान्यतेच्या वरिष्ठ अधिकारी मंडळाच्या जागेमध्यें नाचण्यापेक्षां मला त्यापासून चार हात फटकून राहण्यांतच आनंद वाटतो....आपण सर्वच काँग्रेसच्या अधिकारांच्या जागांचे राजीनामे देऊन टाकूं व धीटपणानें आपलीं मतें पुढें मांडूं. ही गोष्ट आपण केली तर महात्माजी खडबडून जागे होतील; व कार्यक्रमांत एक तर आपणांस इष्ट असलेला बदल घडवून आणितां येईल,

किंवा कॉंग्रेस-घटनेच्या बंधनांतून कायमचे मुक्त होऊन आपणांस पाहिजे तें करण्यास अवसर सांपडेल. "—'गतगोष्टी, पृ. ५१७.'

महाराष्ट्र प्रांतिक कमिटीमध्यें दोन पक्ष झाले होते हें सांगितलेंच आहे. पैकीं केळकरांचा पक्ष अधिक संघटित होता. नाफेरवाल्यांत जुन्यापेक्षां नव्या पिढींतील लोकांचाच भरणा विशेष होता; परंतु त्यांना संघटित रूप अजून आलें नव्हतें. नव्या पिढीचे लोक विचारसरणीच्या दृष्टीनें केळकरांस विरोध करीत होते. परंतु त्या समयीं या लोकांत एकसूत्रता अशी नव्हती. केळकर-पक्षाचा पाडाव व्हावा अशा एका इच्छेनें नवे-जुने नाफेरवाले एक होऊन झगडत होते. या पक्षाचें नेतृत्व आपणांस मिळावें ही महत्त्वाकांक्षा परांजपे यांची होती. परंतु नव्या पिढीच्या लोकांना त्यांच्याविषयीं आदर वाटत नव्हता. कारण परांजप्यांच्या खासगी व सार्वजनिक जीवनांत एकसूत्रता नव्हती. महात्मा गांधींची उदात्त मनोभूमिका त्यांनीं आपल्या विचारसरणींत किंवा वर्तमानपत्रीय प्रचारांत केव्हांच आणिली नव्हती. केळकरपक्षास ते त्याच्याच साधनांनीं हतबल करूं पाहत होते. त्यामुळें परांजपे यांचा प्रभाव नव्या पिढीच्या कार्यकर्त्यांवर फारसा पडला नाहीं. उलट, नव्या पिढींतील कार्यकर्ते वयानें व अनुभवानें जवळ जवळ सारखेच असल्यामुळें, त्यांच्यांतही त्या समयीं पुढारीपणा घेणारी व्यक्ति सिद्ध झाली नव्हती. खानदेशाकडील कार्यकर्ते हे या लोकांपैकीं विशेष मेहनती होते. जूट अशी त्यांच्यांतच थोडीबहुत होती असें म्हणतां येईल. दास्ताने हे या गटाचे पुढारी होते. प्रांतिक कमिटीच्या दर बैठकीस बहुधा हा गट प्रवासखर्च सोसूनसुद्धां नियमितपणें हजर राही व आपलें बहुमत करून केळकरपक्षाचा पाडाव करण्याचा प्रयत्न करी. दास्तान्यांची देवांशीं मैत्री जुळली होती व महाराष्ट्रांत गांधींचें नेतृत्व प्रस्थापित करण्याचा त्यांचा संयुक्त निश्चय होता. आपल्याजवळ स्वमतप्रचाराचें साधन जें वर्तमानपत्र तें नाहीं असें पाहून दास्ताने यांनीं प्रो. घारपुरे व डॉ. भडकमकर यांच्या मदतीनें "सत्याग्रही" वर्तमानपत्र सुरू केलें. पुण्यास त्याचें संपादकत्व देव हे करीत. डॉ. आठवले, दास्तान्यांचे विद्यार्थिदशेंतील मित्र, हे व्यवस्थापक होते. दास्ताने त्यासाठीं पैसे गोळा करीत. कारण वर्तमानपत्रें चालवायचीं व तींही जाहिराती न घेतां आदर्श-भूमिकेवरून चालवायचीं म्हणजे स्वावलंबी राहणें कठीणच !

फेरवाल्यांचें केन्द्र जें पुणें तेथेंच राहून देव राजकारणाचीं सूत्रें आपल्या पक्षाच्या हातीं आणण्याचे मनोरथ करीत होते. त्या वेळीं ते नवतरुणांपैकीं असल्यामुळें लोकांत त्यांना दर्जा नव्हता. परंतु आपल्या पक्षाची संघटना करून एक शक्ति निर्माण करण्याची कल्पना त्यांस सुचली होती. संघटनेला दोन गोष्टींची आवश्यकता असते. द्रव्यबल व मनुष्यबळ. नव्या पिढीचीं नवविचारांशीं समरस झालेलीं माणसें पुष्कळ होतीं पण तीं सर्व प्रांतभर पांगलेलीं होतीं; वेगवेगळ्या क्षेत्रांतून कामें करीत होतीं. राजकीय जीवन-क्रमांत परिवर्तन घडवून आणण्यासाठीं त्यांचें एकत्रीकरण त्या वेळीं तरी होऊं शकलें नाहीं. दुसरें, द्रव्यबळाचा अभावही भरपूर होता. नव्या पिढीचे कार्यकर्ते बहुतेक खालच्या मध्यमवर्गांतून आले होते; व द्रव्यार्जन करण्याच्या ऐन वयांतच त्यांनीं गरीबीच्या सेवामय जीवनाचा स्वीकार केल्यामुळें सारे सारखेच विपन्न होते. त्यांच्या उलट लोकमान्यांचा लौकिक, संस्था व वित्त यांनीं संपन्न असा केळकरपक्ष अधिक समर्थ होता.

गया कॉंग्रेस १९२२ च्या डिसेंबरअखेर भरणार होती. मोतीलाल नेहरू, दासप्रभृति पुढारी तुरुंगांतून सुटले होते व कौन्सिलप्रवेशास अनुकूल वृत्ति दाखवीत होते. सामान्य कॉंग्रेसभक्तांचीं मनें आपल्या थोर पुढाऱ्यांविषयींच्या निष्ठेनें भरून गेलीं होतीं. तो तुरुंगांत असतांना, विधायक कार्यक्रमाची अमल-बजावणी पुरती न करितांना, हे उपनेते स्वतःच पंडितमन्य बनून राजकारणां-त शिथिलता आणूं पाहत होते ही गोष्ट त्यांना असह्य वाटली. त्या मोठमोठ्या वकील पुढाऱ्यांनीं आपल्या वित्ताचा सामयिक त्याग केला होता, तर या सामान्य कार्यकर्त्यांनीं आपलें आयुष्य पणाला लावलें होतें. जीवन सुरू होत असतांनाच त्यांतील गुंतागुंती, पराजय, क्लेश, निराशा यांशीं सामना केला होता. दास-नेहरू पुढारी होऊन बसले. सामान्य कार्य-कर्त्यांना त्यांच्या त्यागाचें व वीरश्रीचें काय बक्षीस मिळालें ? पण तेवढ्यानें या बहाद्दरांनीं पड खाल्ली नाहीं. साध्याच्या विचारांत ते मस्त होते. नवीन युग प्रवर्तमान करण्याचा त्यांचा उत्साह ओसरला नव्हता. कार्यसिद्धि प्राप्त करून घेण्याची तळमळ त्यांस होती. अर्थात् गया कॉंग्रेस जिंकण्याचा निश्चय करून त्यांनीं प्रांतिक सभा काबीज करण्याचा निश्चय केला.

केळकरांनीं कायदेभंग-चौकशी कमिटीपुढें जी साक्ष दिली तिचें धोरण राष्ट्रीय सभेच्या धोरणाशीं न जुळणारें असल्यामुळें त्याचा फार गवगवा झाला. ऑगस्टमध्यें केळकरांनीं पुन्हा एकदां आपल्या अध्यक्षपदाचा राजीनामा सादर केला. १० सप्टेंबरच्या बैठकींत तो मंजूर झाला. नंतर जमनादास मेहता हे हंगामी अध्यक्ष झाले.

यानंतर केसरींत ' वकीलाचें ग्रहण सुटणार काय ? ' या प्रश्नावर लेख आले व असहकारितेच्या कार्यक्रमावर कुठाराघात होऊं लागला. " असहकारितेचा कार्यक्रम राष्ट्रीय 'संपाच्या' स्वरूपाचा असून तो कांहीं विशिष्ट कालमर्यादेपर्यंतच अमलांत यावयाचा अशी समजूत असल्यामुळें विरोधकांनींही पुढें त्यास हरकत घेतली नाहीं. देशांतील एका भागांत संप झाल्यास दुसरीकडेही सहानुभूतिदर्शक संप होतात तसाच हा प्रकार झाला. पण पुढें मूळ संपाची मुदत संपत नाहीं असें दिसतांच दुसऱ्या संपवाल्यांकडून चुळबूळ सुरू व्हावी हें साहजिक आहे " असें त्यांनीं आपलें समर्थन केलें.

पुढें त्यांनीं असेंही लिहिण्यास सुरुवात केली कीं, " राष्ट्रांतील राजकीय चळवळीचा यज्ञकुंडांतला अग्नि विझत चालला आहे. त्याला कांहीं तरी व्यवहार्य अशा कार्यक्रमाचें खाद्य घालून तो अग्नि चेतविला पाहिजे."

याप्रमाणें अग्नि चेतविण्याचा सल्ला चालू असतांना विरारला लंकाकाण्डाची पुनरावृत्ति झाली व भलताच अग्नि पेटला. महाराष्ट्र प्रांतिक कमिटीच्या वार्षिक निवडणुकीची बैठक त्या समयीं विरारला भरण्याचें ठरलें होतें. दोन्ही पक्षांचे सभासद प्रांतिक जिंकण्याच्या ईर्ष्येनें जमा झाले होते. केळकरपक्षाची इच्छा जमनादास मेहता यांस अध्यक्ष करण्याची होती. परांजपे स्वतःची उमेदवारी करीत होते. खानदेशचा सारा गट जमा झाला होता. पुण्याहून परांजपे, बासुकाका जोशी, घारपुरे, गुलाम दस्तगीर वगैरे मंडळीही आली होती.

शंकरराव देवही विरारला हजर होते. अलीकडे त्यांच्यावरसुद्धां केळकरांचा राग झाला होता. देवांचें राजकारण चढाईचें असल्यामुळें ते व्याख्यानांतून आवेशानें मतप्रतिपादन करीत. कोणी तरी केळकरांच्या डोक्यांत भरविलें कीं, देवांनीं कऱ्हाडच्या भाषणांत त्यांच्यावर प्रखर टीका केली व अनुचितही केली. केळकरांचा त्यावर विश्वास बसला व भर बैठकींत त्यांनीं देवांना

जाब विचारला. गोष्ट खोटी होती, पण केळकरांचा देवांवर विश्वास बसेना. ते रागावले, चिडले व परिणामीं त्यांच्या पक्षानें प्रांतिकचा चिटणीस बिनपगारी असावा असा ठराव आणिला. हा ठराव आणण्यांत देव बिनपगारी काम करूं शकणार नाहींत हीच कल्पना होती, पण ती फोल ठरली. देवांनीं काम चालूच ठेवलें व अधिक जोरानें चालू ठेविलें.

विरारला २९-११-२२ रोजीं सायंकाळीं चार वाजतां बैठक भरणार होती. अध्यक्ष जमनादास मेहता मंडपांत शेवटपर्यंत आलेच नाहींत. साडेतीन वाजतां त्यांचेकडे तडजोड करण्यासाठीं म्हणून परांजपे गेले व ते दोघे बोलत असतांच चार वाजले. लगेच सभेंत वासुकाका जोशी यांनीं उठून उपाध्यक्ष दास्ताने यांनीं सभेचें अध्यक्ष व्हावें अशी सूचना आणली. तिला अनुमोदन मिळून दास्ताने स्थानापन्न झाले. सभेंत केळकरपक्षाचे लोक होतेच. त्यांनीं विरोध केला. तो केवळ शब्दांच्या मर्यादेंत न राहतां दंगलींत प्रगट झाला. दोहों बाजूंच्या लोकांनीं अतिप्रसंग केला. पोटांत दीर्घकाळ डांचत असलेले तिरस्कार, द्वेष, दंभ व अहंकार उसळून बाहेर आले. नाफेरवाला संघ आत्मरक्षणाच्या भूमिकेवरून झगडत होता, परंतु सर्वांशीं शुद्ध राहिला नव्हता. फेरवाला पक्ष राजकारणप्रसंगीं अहिंसावाद्यांची उच्च भूमिका मानीत नव्हता. त्यामुळें त्याचें वर्तन तर अमर्याद झालेंच. परंतु अहिंसावादी म्हणविणाऱ्या नाफेरवाल्यांचीही मानसिक स्थिति मोकळी नव्हती. आत्मरक्षा करीत असतांना आणि आपल्या गटाच्या वर्चस्वासाठीं फेरवाल्यांशीं स्पर्धा करीत असतांना त्यांनीं आपल्यामधील बहुमोल शक्तीचा ऱ्हास घडवून आणिला आणि राजकीय आरोग्याची किंमत देऊन प्रांतिकमधील सत्ता विकत घेतली !

त्या गोंधळ माजलेल्या सभेंत कितीक ठराव पुढें आणले गेले व पसारही झाले. परांजपे अध्यक्ष झाल्याचें जाहीर करण्यांत आलें. खजिन्याच्या पेटीवर वस्ताद गुलाम दस्तगीर बसले होते ते शेवटपर्यंत उठले नाहींत. फेरवाल्यांना नामोहरम होऊन स्थानत्याग करावा लागला. प्रांतिक नाफेरवाल्यांच्या हातीं आली, पण ती त्यांना दीर्घकालपर्यंत पचवितां आली नाहीं.

ठोशास ठोसा या जंगली कायद्याचें अनुकरण करून मिळविलेला जय क्षणिक ठरला. अहिंसेच्या मार्गानें स्वतःच्या बलिदानानें सिद्धि मिळवाव-

याची असते. राजकारणाचे सहचारी भाव नाफेरवाल्यांवर आपलें वर्चस्व गाजवीत होते. अविश्रांत श्रम अर्पण करून जनताजनार्दनाचें हृदय जिंकण्या-ऐवजीं तत्त्वविच्युत होऊन शिकारधर्माचा आश्रय करून प्रतिपक्षाचा पाडाव करण्यांत त्यांनीं श्रेय मानिलें.

महाराष्ट्रपक्षास न दुखवितां त्यांना आपल्या श्रेष्ठ अहिंसाधर्मानें वश करण्याचें महात्माजींचें धोरण त्यांच्या महाराष्ट्रांतील अनुयायांना प्रथमतः तरी साधलें नाहीं.

नाफेरवाल्यांचे पुढारी अर्थात् जुन्या पिढीचेच लोक त्या समयीं होते. सामान्य कोटीच्या राजकारणांतील रागद्वेषांपासून ते अलिप्त नव्हते. महात्माजींच्या राजकारणांतील भव्य भूमिकेपासून ते दूर होते. त्यांच्या या कृत्यानें फेरवाल्यांच्या मनांतील द्वेष तर वाढलाच, पण तटस्थ किंवा आस्था बाळगणाऱ्या बहुजनसमाजावरही विपरीत छाप पडली.

महाराष्ट्रांत विरारनंतर दोन प्रांतिक कमिट्या अस्तित्वांत आल्या. त्यांचें भांडण अखिल भारतीय काँग्रेस कमिटीपर्यंत जाऊन गंगाधरराव देशपांडे व सेनगुप्त यांची चौकशी कमिटी नेमण्यांत आली. त्यांनीं तडजोड काढली कीं प्रत्येक पक्षाचे ८।८ सभासद अखिल भारतीय काँग्रेस कमिटीवर पाठवावे. गया काँग्रेसमध्यें कौन्सिल-बहिष्काराचा ठराव पसार झाला तर प्रांतिक नाफेरवाल्यांच्या हवालीं केली जावी.

ही तडजोड उभयपक्षांस मान्य झाली.

# १७ जान किंवा जमीन !

मुळशीची पहिली मोहीम यशस्वी झाली खरी; पण तींत मावळ्यांची कसोटी पूर्णपणें झाली नव्हती. आपल्या प्रतिष्ठेसाठीं सरकार किती हेकड बनतें त्याची त्यांना कल्पना नव्हती. आणि सत्याग्रह म्हणजे तरवारीच्या धारेवर चालणें आहे हेंही त्यांना कळावयाचें होतें.

कंपनीनें ७ नोव्हेंबरपर्यंत आपलें काम तहकूब करण्याचें कबूल केलें होतें तरी धरण बांधण्याचें सोडून देण्याचा तिचा विचार मुळींच नव्हता. भोपटकरांनीं लोकसंग्रहांतील आपल्या एका लेखांत "जान किंवा जमीन" अशी गर्जना केली; आणि ती इतर कार्यकर्त्यांनीं उचलून धरिली. मावळे आंधळेपणानें अनुसरले; पण त्यांना या घोषणेचा खोल अर्थ कोठें माहीत होता?

"सब भूमि गोपाल की" या उक्तीप्रमाणें 'सारी जमीन सरकारची' हा कायदाच आहे. परंतु खाजगी मालकांच्या जमिनी आपल्या ताब्यांत घेतांना त्यांना योग्य किंमत देणें हें कंपनीचें कर्तव्य होतें; व तें ती पार पाडीत आहे हें पाहण्याचें सरकारचें कर्तव्य होतें. सरकार कर्तव्यच्युत झाल्यास लोकांना जागृत होऊन सरकारला वळणावर आणावें लागतें. मावळे तर जडच होते. लोकनायकांनीं मावळ्यांत उमेद आणिली व त्यांना स्वतःच्या हक्कासाठीं झगडा करण्यास तयार केलें. परंतु लढयाचें नेतृत्व ज्यांनीं स्वीकारिलें त्यांना दुर्दैवानें सत्याग्रहाच्या तंत्राचें ज्ञान अद्याप झालें नव्हतें.

चळवळ्ये लोक कांहीं आदर्शवादी तर कांहीं हटवादी होते. मावळ्यांच्या निमित्तानें सरकारची 'जिरवण्याची' तळमळ कित्येकांना होती; तर कित्येक अंतर्यामीं भेकड निघाले.

पुण्याच्या कार्यकर्त्यांपैकीं परांजपे, जोशी, डॉ. पळसुले, ज. स. करंदीकर, डॉ. फाटक, हरिभाऊ फाटक, देव वगैरे मंडळी या सत्याग्रहांत सामील झाली होती. सत्याग्रहाच्या कल्पनेचे आद्यजनक भुस्कुटे हेही अव्वलपासून काम करीत होते. या चळवळींत पुण्याबाहेरील राष्ट्रीय शाळांतील शिक्षक आणि

विद्यार्थीही पुष्कळ सामील झाले होते. यांपैकीं चिंचवड येथील स्वावलंबन राष्ट्रीय पाठशाला, जळगांव येथील राष्ट्रीय शाळा व येवलें येथील राष्ट्रीय शाळा यांचीं नांवें घेतां येतील. या शाळांचें चालक अनुक्रमें बाळूकाका कानिटकर, दास्ताने व आपटेगुरुजी हेही या सत्याग्रहांत सामील झाले. पुण्यांतील टिळक महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांनींही भाग घेतला. आणि विशेष म्हणजे चिंचवड पाठशालेंतील कांहीं भगिनीही सत्याग्रहांत सामील झाल्या. घारेशास्त्री व परचुरेशास्त्री यांच्या धर्मपत्नी या त्यांपैकींच होत. मावळ्यांच्या स्त्रिया तर होत्याच. जयाबाई भोईण व आणखी एक स्त्री यांस कारावास मिळाला.

मुळशी सत्याग्रहाचें स्थानिक स्वरूप जाऊन त्याला महाराष्ट्रीय स्वरूप येत चाललें व तसें करण्याचा आग्रह पुढें या सत्याग्रहास येऊन मिळालेले पां. म. बापट यांनीं धरिला. या सत्याग्रहासाठीं बापट, देव वगैरेंनीं महाराष्ट्रभर दौरा काढला. महाराष्ट्रानें पाऊणलाख रुपये मुळशी सत्याग्रहासाठीं दिले; व नागपूर ते साताऱ्यापर्यंत माणसें दिलीं. जितक्या स्वयंस्फूर्तीनें व तत्परतेनें महाराष्ट्रानें ही मदत दिली तितकी पुढें इतर प्रसंगीं क्वचितच दिली असेल.

केळकर यांनीं कंपनी व मावळे यांच्यांत मध्यस्थी करण्याचा प्रयत्न कित्येक वेळां केला. मावळ्यांबद्दल केळकरांना सहानुभूति होती व त्यांना त्यांनीं मदतही वेळोवेळीं केली. परंतु त्यांची नेहमींची साशंक व सावधवृत्ति त्यांना सत्याग्रह कडेलोटास नेण्याचा सल्ला देईना. त्यांचें म्हणणें होतें कीं, भरपूर मोबदला घेऊन जमिनी कंपनीला द्याव्यात. "जान किंवा जमीन" हें तत्त्व केळकरांना मान्य नव्हतें. त्यांची व्यवहारी दृष्टि हेंच दाखवीत होती कीं मावळे शेवटपर्यंत सत्याग्रहांत टिकणार नाहींत. इतर मंडळींनीं उत्साहभरांत सत्याग्रह नेटानें पुढें चालविला. अर्थात् कंपनीनें सत्याग्रह करणाऱ्या मावळ्यांचा छळ करण्यास सुरुवात करितांच साऱ्यांचीच कसोटी होऊं लागली. कंपनीचे मजूर शेतकऱ्यांवर जुलूम करूं लागले, सत्याग्रह करणाऱ्या मावळ्यांच्या स्त्रियांचा अपमान करूं लागले व सर्व प्रकारें सतावूं लागले. क्लेशांचें तादृश फळ लवकर पदरांत पडण्याचें लक्षण दिसेना तेव्हां मावळ्यांचा धीर सुटूं लागला. हळूहळू त्यांच्यांतील कांहीं लोक फुटून कंपनीनें दिलेले पैसे मुकाट्यानें घेऊं लागले; तर कांहींनीं सत्याग्रहाच्या खडतर मार्गाचा त्याग केला.

दरम्यान बाहेरील चळवळ्ये स्वतःही सत्याग्रहांत सामील होऊं लागले, तसे सरकारनें कंपनीची पाठराखणी करून त्यांना तुरुंगांत पाठवण्यास धडाक्यानें सुरुवात केली. त्याप्रमाणें परांजपे, जोशी, दोघे फाटक, देव वगैरे मंडळी तुरुंगांत जाऊन आली.

कार्यकर्त्यांकडून त्याग करण्याची वा कष्ट सोसण्याची तयारी कमी नव्हती. परंतु त्यांच्याकडून प्रमादही घडत गेले. एक तर विचारांची एकी सर्वांत नव्हती. त्यांनीं आपल्या नजरेसमोर मनोराज्यही भलतेंच ठेवलें. मावळ्यांच्या तितिक्षेची त्यांना नीट कल्पना आली नाहीं; व त्यांचा नेट सुटलेला दिसत असतांना, अधिक न ताणतां थोडक्या श्रमांत प्रचंड यश केवळ तडजोडीनें प्राप्त करून घेतां आलें असतें तें करून घेण्याचें कोणास सुचलें नाहीं.

देवांना प्रथम एक महिन्याची सजा झाली. दुसऱ्या खेपेस ते व दास्ताने तीन महिन्यांची शिक्षा घेऊन गेले ( ३० मे १९२३ ). त्या समयीं बाळूकाका व इतरही कार्यकर्ते तुरुंगांत गेले होते. येरवड्याच्या तुरुंगांत एका बाजूस हिंदी राष्ट्राचा नेता तपस्या करीत होता; त्या वेळीं दुसऱ्या भागांत मुळशीचे कैदी सक्तमजूरी भोगीत होते. साऱ्यांना सामान्य बराकींत गुन्हेगार कैद्यांबरोबर ठेविलें होतें. इतक्यांत आषाढी एकादशी आली. मुळशीच्या कैद्यांनीं उपवास केला. उपवासामुळें दुसऱ्या दिवशीं वर्दीचें काम पुरें झालें नाहीं. अधिकाऱ्यांनीं शिक्षा दिली. देवांनीं हा अन्याय मानून त्याचा प्रतिकार करण्यास सुरुवात केली. प्रकरण वाढत गेलें. देवांनीं वर्दी करण्याचें बंद केलें. जेलच्या कायद्याप्रमाणें हें कृत्य 'बंड' मानून देवांना बेडी घालण्यांत आली. त्यांनीं अन्नसत्याग्रह सुरू केला. देवांना वाटलें काम न करितां अन्न खाणें बरोबर नाहीं. परंतु ही बातमी तुरुंगांत पसरून त्यांच्या बरोबर अन्य पांचसहा माणसांनीं उपोषण सुरू केलें. तिसऱ्या दिवशीं सर्वांवर खटला भरण्यांत आला व ३० फटक्यांची शिक्षा सातजणांना ठोठावण्यांत आली. प्रत्यक्ष देतांना वीस-वीसच मारण्यांत आले. परंतु कोणीही हूं का चूं न करितां शिक्षा मुकाट्यानें भोगली. तो एक नवाच अनुभव होता, पण शिक्षा भोगल्यावर जेव्हां देवांना एकान्तकोठडींत डांबण्यांत आलें तेव्हां खोडकर मुलाप्रमाणें ते खूप हसले. मंडळींनीं फटके खाल्ले पण आपला आग्रह सोडला

नाहीं. दुसऱ्या दिवशीं मुळशी सत्याग्रहींतील दास्तानेप्रभृति आठदहा मंडळींनीं काम बंद करून अन्नसत्याग्रह सुरू केला. देवांनीं सतरा दिवस अन्नत्याग केला. त्या वेळीं कोमागातामारू प्रकरणांतील कांहीं मंडळी तेथेंच शिक्षा भोगीत होती. त्यांनींही सहानुभूतिपूर्वक अन्नत्याग केला; परंतु तो त्यांना फार दिवस टिकवितां आला नाहीं. त्यामुळें देवांच्या दीर्घ उपवासाचा परिणाम होऊन तुरुंग खात्याच्या वरिष्ठ इन्स्पेक्टरनें मध्यस्थी केली. त्यानें महात्माजींची व देव-दास्ताने यांची भेट करविली आणि महात्माजींकडूनच परस्पर निर्णय देववून अन्नत्याग बंद करविला. या सर्व प्रकरणाचा पुण्यांत बराच गवगवा झाला.

देव व इतर मंडळी तुरुंगांतून बाहेर येतांच परिस्थिति बदललेली दिसून आली. देव, भुस्कुटे वगैरे लोक तुरुंगांत जाण्यापूर्वी सेनापति बापट हे मार्चेंचे सुरुवातीस तुरुंगांतून सुटले होते. सेनापति बापट हे पूर्वी क्रांतिवाद्यांपैकीं होते. सावरकरांप्रमाणें त्यांनींही विलायतेस जाऊन सशस्त्र बंडाची योजना करण्यास हातभार लाविला होता. परंतु त्यांचा क्रांतिवाद वास्तवसृष्टींत लवकर उतरण्याचें लक्षण दिसेना तसें त्यांचें भावनाप्रधान मन उत्कटतेच्या भरांत निमित्त शोधूं लागलें. असहकारितेच्या चळवळींत त्यांना क्रांतीची आशा वाटली म्हणून तात्पुरता उत्साह त्यांनीं दाखविला. अन्यायाची चीड स्वभावतःच असल्यामुळें गरीब मावळ्यांच्या कहाणीनें त्यांच्या हृदयास पाझर फुटला व त्यांना कांहीं तरी चळवळ करण्याची उत्कंठा असल्यामुळें त्यांनीं स्वतःस या प्रश्नाला वाहून टाकिलें. परंतु त्यांची प्रकृति इतर कार्यकर्त्यांपेक्षां अगदीं वेगळी होती. त्यामुळें ते येतांच चळवळीचें स्वरूप पालटूं लागलें. तरी सुद्धां भुस्कुटे बाहेर होते तोंवर बापटांना विशेष कांहीं करतां आलें नाहीं. भुस्कुटे तुरुंगांत गेले व इतर कार्यकर्तेही मैदानावरून दृष्टीआड झाल्यावर बापटांनींच सारीं सूत्रें हातीं घेतलीं. सत्याग्रह मंडळाचे ते अध्यक्ष बनले व 'सामसत्याग्रह' नांवाची त्यांनीं नवीन कल्पना काढली. यानंतर मुळशी प्रकरणाला निराळेंच वळण लागलें. मुळशीचा प्रश्न स्थानिक राहिला नाहीं. कारण मावळे हवालदिल बनूं लागले होते. कंपनीशीं सन्मान्य तडजोड झाली असती; परंतु चळवळीच्या नेत्यांनीं आंधळेपणानें तिकडे दुर्लक्ष केलें.

बापट तर इरेस पेटले होते. जेव्हां ऑगस्ट-अखेरीस देव-दास्ताने सुटले तेव्हां सारीच परिस्थिति विपरीत पाहून त्यांनीं मुळशीचा संबंध दूर केला. खेरीज प्रांताचें राजकारणही भडकत होतें. त्यामुळें त्यांना तिकडे लक्ष देणें अगत्याचें होतें.

दरम्यान सेनापति बापटांनीं पत्रक काढून ११ जूनपासून "मावळी महाराष्ट्रीय" सत्याग्रह सुरू करण्याचा पुकारा केला होता; त्यासाठीं दौरे व फंड जमविण्यास सुरुवात केली होती. साधेपणा व कष्ट सोसण्याची तयारी यांच्या भरीला शुद्ध चारित्र्य व जुन्या महाराष्ट्रीय संप्रदायाची क्रांतिवादी वृत्ति यांमुळें बापट महाराष्ट्रांतील ब्राह्मणवर्गांत फार प्रिय झाले. तथापि प्रत्यक्ष त्यांच्या पावलावर पाऊल टाकून त्यांच्यामागें जाणारे फारसे कोणी निघाले नाहींत. मात्र भविष्यकालीं जर बापटांना दीर्घ मुदतीच्या शिक्षा झाल्या नसल्या तर महाराष्ट्राच्या तत्कालीन राजकारणांत त्यांनींही बरीच धांदल उडविली असती, हें संभवनीय आहे.

---

# १८ काँग्रेसपुढील यक्षप्रश्न

सन १९२२ अखेर दासबाबूंच्या अध्यक्षतेखालीं गयेला काँग्रेस भरली तेव्हां एक अद्‌भुत दृश्य दिसलें! महाराष्ट्रातर्फे १६ प्रतिनिधि अखिल भारतीय काँग्रेस समितीचे सभासद म्हणून गेले होते. पैकीं आठ फेरवाले असून, आठ नाफेरवाले होते. त्यांचीं मतें जमेस धरल्यास एकूण हिशोब शून्य ! !

गयेला श्री. राजगोपालाचार्य यांनीं आपल्या असामान्य बुद्धिमत्तेनें व वाक्‌चातुर्यानें सर्व विद्वान् वकीलांचीं तोंडें बंद करून कौन्सिलप्रवेशाविरुद्ध बहुमत मिळविलें. महाराष्ट्रांतील मंडळी पुण्यास येतांच नाफेरवाल्यांनीं आपला हक्क प्रस्थापित करण्यास आरंभ केला.

महाराष्ट्रांतील काँग्रेसी बहुमत निःसंशयपणें महात्माजींच्या धोरणाचें अनुगामी होतें; परंतु अल्पसंख्याक लोक अजून निष्प्रभ झाले नव्हते. देशाच्या विशाल पटावरील दास, नेहरू, पटेल यांसारखीं मोहरीं पटापट कौन्सिलप्रवेशाच्या आहारीं पडत होतीं. महाराष्ट्रांतील जुन्या पक्षाला, त्यामुळें अवसान येत होतें. विरारच्या मारामारीनंतर जुन्या व नव्या प्रांतिकचा वाद तडजोडीवर थांबला होता. परंतु गयेला नाफेरवाल्यांचें धोरण यशस्वी झालें तरी महाराष्ट्रांतील फेरवाला पक्ष आपल्या वचनास जागण्यास तयार झाला नाहीं.

गया-काँग्रेसनंतर लवकरच खाडिलकर यांनीं मुंबईस 'नवाकाळ' नांवाचें दैनिक सुरू केलें. प्रथम ते 'लोकमान्य' वर्तमानपत्राचे संपादक होते पण त्यांचें धोरण चालकांच्या धोरणाशीं न जुळल्यामुळें त्यांनीं स्वतंत्र वर्तमानपत्र काढलें व आपल्या कर्तबगारीवर तें लौकरच भरभराटीला आणिलें. त्यांचें धोरण संपूर्णपणें म. गांधींना पाठिंबा देणारें असल्यामुळें असहकारवाद्यांना त्यांचें फार साहाय्य मिळालें. कारण असहकारवाद्यांचें असें वजनदार मुखपत्र त्या वेळीं दुसरें नव्हतेंच. मात्र 'नवाकाळ' पत्राचें धोरण केवळ महाराष्ट्रीय प्रश्नांची चर्चा करणारें न राहतां सर्वसामान्य असें राहिलें. तरीसुद्धां महाराष्ट्रांतील नाफेरवाल्यांच्या चळवळींचा प्रचार त्या पत्रातर्फे खूप होऊं लागला.

महाराष्ट्र प्रांतिकचें कार्यालय गायकवाडवाड्यांतच असे. जुन्या अधिकारी-

मंडळानें नव्या मंडळास त्याचा ताबा घेऊं दिला नाहीं. तेव्हां १८० बुधवार या ठिकाणीं नव्या मंडळानें आपलें कार्यालय नेलें. नंतर दोन्ही पक्षांतर्फे जनतेस विनंति करण्यांत आली कीं, " जनतेनें आम्हांलाच पाठिंबा द्यावा. "

या समयीं देव अतिशय मेहनत करीत असत. प्रांतिकच्या सर्व कार्यकर्त्यांत त्यांचेच दौरे अधिक होत. पुण्यांत जरी त्यांचा मुक्काम असे तरी त्यांची नजर साऱ्या महाराष्ट्रावर असल्यामुळें ते नेहमीं साऱ्या जिल्ह्यांतून दौरे काढीत, व्याख्यानें देत, कार्यकर्त्यांशीं संबंध ठेवीत. मार्च १८ ला महात्माजींना कारावास होऊन एक वर्ष पुरें होत होतें. गया-कॉंग्रेसमधील ठरावाबरहुकूम देवांनीं घोषणा केली कीं १० ते १८ पर्यंत गांधीसप्ताह पाळला जावा व एक लाख रुपये फंड आणि कायदेभंगासाठीं एक हजार स्वयंसेवक गोळा करावे.

घाटकूपरलाच १५००० रुपये जमले ! देवांनीं खादीप्रचारार्थही दौरे काढले. कारण ते स्वतः दक्षिण महाराष्ट्राचे खादीएजंट होते. या कामीं त्यांना कमलाकर सुमंत या कार्यकर्त्याची फार मदत झाली.

मार्चच्या १८ तारखेस परांजपे व केळकर यांच्या संयुक्त सहीनें रे-मार्केटांत प्रचंड सभा भरली. प्रांतिकमधील दुही मिटावी एतदर्थ हा पहिला प्रयत्न होता. केळकरांनीं जाहीर केलें, " आजच्या पुण्यप्रसंगीं शिवरामपंतांनीं जी विनंति केली तीच मी या दोन विभूतींसमोर ( टिळक-गांधींचे फोटो ) उभा राहून करीत आहें. मी त्याच विनंतीला दुजोरा देण्यास उभा राहिलों आहे. मी ऐक्यासाठीं झटेन. ऐक्य जगण्या करितां आहे. भेद मरण्याकरितां आहे. पंथ मोडून टाकून ऐक्य करणें हेंच खरें राष्ट्रकार्य होय. ...टिळक म्हटले कीं मराठा असें दिसतें. पण महात्माजींना जात नाहीं. ...महात्माजी बुद्धापेक्षां आणि खिस्तापेक्षां ज्येष्ठ आहेत यांत शंका नाहीं. खिस्तानें सांगितलें, " राजाचें देणें राजाला द्या. " पण महात्माजी सांगतात कीं, " राजाचें देणें राजाला देऊं नका." महात्माजींना जरी आपणांस सोडतां आलें नाहीं तरी त्यांच्यामुळें तरी आपण बंधमुक्त होऊं या. पक्षभेद शक्य तितके बाजूला सारून राष्ट्रकार्य करा."

याप्रमाणें दुही मिटविण्याबाबत भाषणें चालू असतां कौन्सिलप्रवेशाच्या

वादाला रंग चढला होता. गयेस बहुमतानें कौन्सिल-प्रवेशाचा ठराव नामंजूर झाला होता, तरी मोठमोठ्या प्रांतीय नेत्यांचीं मनें दुखावलीं गेलीं होतीं. या बुद्धिमंतांना विधायक कार्यक्रमाबद्दल श्रद्धा वाटत नव्हती, असें म्हणण्यापेक्षां "आमची बुद्धि चरखा फिरविण्याचें कंटाळवाणें काम करण्यापेक्षां कायदे-मंडळांत अधिक प्रकाशन होऊं शकेल" असें त्यांना मनापासून वाटत होतें. विधायक कार्यक्रम हा सत्याग्रहाचा आत्मा आहे. तो पसंत नसल्यास मग दोनच मार्ग राष्ट्रापुढें शिल्लक राहतात. एक सशस्त्र बंडाचा किंवा दुसरा कायदे-मंडळांतील सनदशीर अडवणुकीचा. पहिला अशक्य होता. तेव्हां दुसराच स्वीकारण्यांत आला.

तिकडे गंगाधरराव देशपांडे यांनीं फेरवाले व नाफेरवाले यांच्यांत एकी साधण्याचा प्रयत्न केला. केळकरांनीं उमाळ्याच्या भरांत त्यांना समेट करण्याविषयीं कोऱ्या कागदावर सही करून पूर्ण अधिकार दिला. पण "काँग्रेसच्या कार्यक्रमांत कानामात्रेचाही फेरफार होणार नाहीं" असें उत्तर त्यांचेकडून मिळतांच केळकरांनींही "आमचाही मार्ग मोकळा आहे" असें बजावलें.

अमृतसरच्या काँग्रेसमध्यें गांधी–टिळक समेट करण्याकारितां पालबाबूंनीं जी उपसूचना आणली होती तिचाच आधार महाराष्ट्रांतील कौन्सिलपक्षानें घेतला:—

"स्वयंनिर्णयानुसार हिंदुस्थानांत संपूर्ण जबाबदार पद्धतीचें स्वराज्य स्थापण्याची तजवीज पार्लमेंटकडून होईपर्यंत दरम्यान राष्ट्रीय सभेची अशी शिफारस आहे कीं, जबाबदार राज्यपद्धति होईल तितक्या लवकर स्थापतां यावी म्हणून शक्य त्या रीतीनें लोकांनीं नवीन कायद्याचा उपयोग करावा."

काँग्रेसमध्यें नाफेरवाल्यांचें निःसंशय बहुमत झालें आणि महाराष्ट्र प्रांतिक-मध्येंही नाफेरवाल्यांनीं मात केली, हें पाहतांच फेरवाल्यांचा त्वेष दिवसेंदिवस वाढूं लागला. यानंतर वर्तमानपत्रांतील लेखांची व सभांतील भाषणांची भाषा अधिकाधिक उग्र बनत चालली. नाफेरवाल्यांवर निष्क्रियतेचा आरोप करण्यांत येऊं लागला. "नाफेरवाल्यांना बहुमताचा जोर व उबारा असल्यामुळें त्यांना एखाद्या श्रीमंत भांडवलवाल्याप्रमाणें ऐदी व मिजासी होऊन राहतां येईल. एक महात्मा गांधींचें नांव घेतलें म्हणजे ज्यांचें सर्व कांहीं खपतें किंवा

'कौन्सिलबहिष्कार' हीं अक्षरें कोरलेला मंत्रसिद्ध ताईत दंडावर बांधून निघाल्यास ज्यांना सर्व प्रकारचे राष्ट्रीय गुन्हे माफ होऊं शकतात, त्यांच्या कर्तव्याचा विचार कोणीं कशाला करावा ? निष्क्रियता हाच ज्यांच्या कर्तबगारीचा आत्मा होऊन बसला, त्यांना आपलें कर्तव्य बजावण्याला कोणती अडचण पडणार ? "

बापूराव गोखले यांनीं गयेच्या राष्ट्रीय सभेवर टीका केली. " प्रतिसहकारवादी दास-नेहरूपक्ष व प्रतिकारशून्यवादी राजगोपाळाचार्य यांचा पक्ष यांच्या परंपरेंत, विचारसरणींत व तत्त्वज्ञानांत मूलतःच फरक आहे. शून्यवादी पक्षाला झगडा नको, प्रतिकार नको, लढा नको. दुसऱ्यास दुःख देणें यांच्या जिवावर येतें. यांचें मोठें शस्त्र म्हणजे प्रतिकाररहित निरतिशय दुःखसंवेदना हेंच होय. बालकांचें रडणें हें जसें त्यांचें अमोघ शस्त्र आहे तसेंच मोठ्या प्रमाणावर यांचें आहे. "

राष्ट्रीय सभेंत आपलें बहुमत होत नसलें तरी स्वतंत्रपणें पक्ष स्थापण्याची कल्पना फेरवाल्यांच्या मनांत जोर करूं लागली; जानेवारीमध्यें मुंबईस एक तात्पुरता टिळकस्वराज्य पक्ष निघालाही.

विरारनंतर महाराष्ट्रांत दोन प्रांतिक कमिट्या निघाल्या होत्या; त्यांचा लज्जास्पद तंटा महाराष्ट्रांत कांहीं दिवस गाजला. महाराष्ट्राचें राजकीय वातावरण अधिकाधिक दूषित होऊं लागलें. दोन्ही कमिट्यांतर्फे वेगवेगळ्या नोटिसा वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होत आणि दोन्ही पक्ष एकमेकांवर दोषारोप करीत. जनतेची कुचंबणा होऊं लागली. शेवटीं या प्रकाराविरुद्ध वर्किंग कमिटीकडे विनंति गुदरण्यांत आली. वर्किंग कमिटीनें गंगाधरराव देशपांडे व सेनगुप्त यांची चौकशी-कमिटी नेमली. तिनें चौकशी करून विरारच्या निवडणुकी रास्त ठरविल्या व परांजपे-कमिटी कायदेशीर ठरविली. चौकशी-कमिटीनें दोन्ही पक्षांच्या सह्या घेऊन असा निर्णय दिला कीं गयेच्या कॉंग्रेसमध्यें कौन्सिलवाल्यांचे ठराव बहुमतानें पास झाले नाहींत तर पुण्यांतील कौन्सिलवाल्या पक्षानें प्रांतिकमधील अधिकाराच्या जागा जानेवारीअखेर मोकळ्या केल्या पाहिजेत. तरीसुद्धां गयेनंतर जमनादास मेहता जवळ जवळ पांच महिने स्वतःस अध्यक्ष म्हणवीत होते. नंतर त्यांनीं राजीनामा दिला;

तेव्हां भोपटकर स्वतःस अध्यक्ष म्हणवूं लागले. वर्किंग कमिटीनें या दुहीचा निकाल दिला तरी तिचा निर्णय फेरवाल्यांनीं मानिला नाहीं आणि अखिल भारत काँग्रेस समितीकडे भांडण नेलें. तिची बैठक मुंबईस भरली होती तेव्हां तिनें मुरारीलाल, शफी, जोसेफ व कृपालानी यांस पंच नेमून पुन्हा चौकशी करविली. तिनेंही वर्किंग कमिटीचाच निर्णय कायम केला.

नंतर फेरवाल्यांना कमिटीचें दफ्तर नाफेरवाल्यांच्या हवालीं करणें भाग पडलें. परंतु तें सुखासुखी झालें नाहीं. दफ्तराचा हवाला देण्यापूर्वी शिल्लक रक्कम खास ठरावानें त्यांनीं खर्च करून टाकिली, आणि कागद-पत्र नाफेर-वाल्यांच्या स्वाधीन केले !

एप्रिलमध्यें नागपूरला झेंडासत्याग्रह सुरू झाला तेव्हां महाराष्ट्र प्रांतिकतर्फे प्रथम सहा स्वयंसेवकांची तुकडी त्यांत भाग घेण्यासाठीं रवाना झाली होती. तींत प्रांतिक कमिटीचे एक चिटणीस त्र्यं. ब. हरोलीकर हे होते. कांहीं काळ या नागपूर-सत्याग्रहानें देशाचें ध्यान आपल्याकडे वेधून घेतलें होतें. जमनालाल बजाज यांनीं ह्या सत्याग्रहांत तन-मन-धन खर्च करून तो यशस्वी घडवून आणिला.

मे महिन्यांत रत्नागिरी येथें महाराष्ट्राची तिसरी प्रांतिक परिषद भरवि-ण्यांत आली. त्या समयीं दोन प्रांतिक कमिट्यांचा तंटा मिटला नव्हता. फेरवाल्यांतर्फे तिची खटपट चालू होती. नाफेरवाले ती गैरकायदेशीर असल्याचें जाहीर करीत होते. परंतु त्यांचें कांहीं एक न चालतां फेरवाल्यांनीं परिषद भरविलीच. नाफेरवाल्यांनीं आपला सहयोग दिला नाहीं. परिषदेंत कौन्सिल-प्रवेशाचा ठराव पास झाला.

कौन्सिलप्रवेशाची चळवळ करणारा काँग्रेसमधील वर्ग इतका अस्वस्थ व उतावळा झाला, कीं ऑगस्ट महिन्यांत विजगापट्टम् येथें भरलेल्या अखिल भारतीय काँग्रेस समितींत काँग्रेसचें खास अधिवेशन केवळ याच प्रश्नाच्या चर्चेसाठीं बोलावण्याचें ठरलें. याच महिन्यांत लालाजी व अल्लीबंधु सुटले आणि नागपूर झेंडासत्याग्रह यशस्वी होऊन मिटला. त्याविषयीं कौतुकाचे शब्द बोलण्याचे तर राहोच, उलट फेरवाल्यांकडून कुत्सित टीका मात्र झाली. महाराष्ट्रांत विचारसरणींतील भेद इतका व्यक्तिगत रूपांत उतरला

होता कीं, दोन्ही पक्ष जणूं पिढीजाद वैराचा परामर्श घेत होते. पुण्यास २ ऑगस्ट १९२३ रोजीं किर्लोस्कर थिएटरांत एक सभा भरली. बॅ. जयकर वक्ते व केळकर अध्यक्ष होते. वक्त्यांनीं आपल्या भाषणांत म्हटलें, "राजकारण हें इंद्रधनुष्याप्रमाणें नेहमीं बदलणारें असतें. आज अशी स्थिति आहे. उद्यां बदल होईल. राजकारण नाफेर असें कधींही राहणार नाहीं. मराठ्याला शोभेल असें राजकारण करा... महात्माजींना तीन वर्षें सवलत दिली. आतां आम्हांला सवलत द्या. जमेल तर ठीकच. नाहीं तर पुनः आम्ही तुमचे आहोंतच." केळकर म्हणाले, "धर्मबुद्धीला फाजील महत्त्व देऊं नका. आज निवृत्तीला फार महत्त्व आलें आहे. निवृत्ति चांगली नाहीं असें नाहीं, पण साधु व्यवहारांत पडला व साधुत्व गाजवूं लागला तर लोक ऐकत नाहींत. जगांत सर्वत्र संन्यासी होऊं शकत नाहींत. हल्लींचा राजकारणी उपदेश करणारा संन्याशांचा मेळा बोकाळला आहे; त्यांची निवृत्ति फक्त तोंडांतच आहे. वशिष्ठ ऋषि होते. त्यांनीं माया, ब्रह्म वगैरे तात्त्विक गोष्टी सांगितल्या. पण रामाला राज्य कर म्हणून सांगितलें.... आपण स्वतः जन्मभर संन्यासी राहावयाचें व लोकांकडून दणदणीत संसार करवावयाचा."

कौन्सिल-प्रवेशाच्या अभिनिवेशांत महात्माजींना विरक्त संन्यासी मानून त्यांच्या विधायक कार्यक्रमाचा 'निवृत्ति' या नांवाखालीं केळकरांनीं विपर्यास केला. महात्माजींचा संन्यास जीवनांतील परावर्तन नसून जीवनांतील संयमवृत्ति आहे हें काय ते ओळखत नव्हते? सैतानी सरकारला उद्देशून "एष पापो हन्यतां हन्यताम्।" असे उद्गार काढून त्याच्या विध्वंसासाठीं प्रचंड प्रजाकीय चळवळ करणारा संन्यासी केवळ निवृत्तिमार्गी कसा होऊं शकेल! महात्माजी आसुरी राजकारणांत प्रवीण नसल्यामुळें त्यांची साधना वेगळ्या प्रकारची आहे. परंतु कर्मसंन्यास करणाऱ्या लोकांची संघटना होऊं शकत नाहीं हेंही तितकेंच खरें आहे. महात्माजींनीं व्यवहार व आदर्श यांचा समन्वय करण्याचा महान् प्रयत्न चालविला होता. स्वर्ग आणि पृथ्वीचें मधुर मीलन ते करूं पाहत होते. बुद्धिवंतांची बुद्धि, साहसिकांचें साहस, व्यापाऱ्यांचा पैसा व सामान्य जनतेचे श्रम या सर्वांचा उपयोग

ते एका नवयुगाच्या निर्मितीकडे करूं पाहत होते. त्यांचा मार्ग म्हणजे प्रचंड प्रवृत्तींचा एक जबरदस्त प्रवाह होता. त्याचें स्वरूप ज्यांना आवडलें नसतें त्यांना अनुसरण करण्यास दुसरा मार्ग मोकळा होता; परंतु महात्माजींच्या मार्गाला निवृत्तिमार्ग म्हणून जनतेचा बुद्धिभेद करणें अयोग्य होतें.

जादा काँग्रेस या वादाचा निर्णय लावण्यासाठींच बोलावली गेली होती, तरी देखील धीर न राहून केळकरांनीं मुंबईच्या मारवाडी सभेंतील सभेंत जाहीर केलें कीं, " जादा काँग्रेसनें जरी कौन्सिलबहिष्काराचा पुन्हा ठराव पास केला तरी आम्ही तें थोडेंच ऐकणार आहोंत!" अखिल भारत स्वराज्य पक्ष स्थापन झाला होता. दासबाबू त्याचे अध्वर्यु होते. या पक्षानें आपले उमेदवारही निवडणुकीसाठीं उभे केले होते. केळकरांचें नांव मध्यवर्ती कायदेमंडळासाठीं होतें. काँग्रेसची अनुमति मिळण्यापूर्वींच निवडणुकीची मोहीम सुरू झाली होती. असहकारितेच्या प्रभावापुढें निस्तेज झालेला वकीलवर्ग पुन्हा उचल खाऊं लागला होता. कायदेमंडळांत आपलें तेज दाखवूं अशी उमेद त्याला वाटत होती. सप्टेंबरमध्यें दिल्लीं येथें काँग्रेसचें खास अधिवेशन भरलें व दोन्ही पक्षांत समेट होऊन स्वराज्यपक्षास काँग्रेसनें कौन्सिलप्रवेश करण्याची मान्यता दिली.

वादविवाद आणि तंटे यांमुळें देश कंटाळून गेला होता. काँग्रेसमध्यें शिस्तीचा प्रभाव अजून पडावयाचा होता. दोन्ही पक्ष एकमेकांना शिव्यागाळी देण्यांत दंग होते. रचनात्मक काम कोणासच सुचत नव्हतें. अशा वेळीं क्षेत्राची वांटणी करून कलह मिटविल्यामुळें जनतेनें समाधानाचा सुस्कारा सोडला. आपल्यासमोरील यक्षप्रश्न काँग्रेसनें अशा प्रकारें कसा तरी सोडविला.

लगेच प्रांतीय व मध्यवर्ति निवडणुकी झाल्या व स्वराज्यपक्षाचे पुष्कळ उमेदवार निवडून आले; परंतु मध्य प्रांताखेरीज निश्चित बहुमत कोठेंही मिळालें नाहीं. स्वराज्यपक्षानें दिवाणगिऱ्या नाकारण्याचें व सरकारच्या गाड्यास खीळ घालण्याचें ठरविलें होतें. 'केसरी'नेंही उत्साहभरांत लिहिलें, " दिवाणगिऱ्या न स्वीकारणें ही गोष्ट इतर कोणास चुकीची वाटली तरी स्वराज्यपक्षाच्या दृष्टीनें ती सर्वस्वी बरोबरच आहे. द्विदल राज्यपद्धति मोडून

टाका व प्रांतिक स्वायत्तता द्या अशी मागणी करण्याला या निरपेक्ष व बाणेदार वर्तनापेक्षां दुसरें अधिक भक्कम अधिष्ठान मिळणें शक्य नव्हतें."

कौन्सिलप्रवेशाबरोबर परदेशीप्रचार ही बाबही कार्यक्रमांत घुसली. महात्माजींनीं या पोकळ बाबीवर शक्ति, समय व पैसा यांचा अनाठायीं ऱ्हास होतो म्हणून ती बंद करविली होती. परदेशीप्रचारानें राष्ट्राची अंतर्गत शक्ति वाढल्याचा पुरावा कधींच मिळाला नाहीं. तरीसुद्धां स्वराज्यपक्षाला त्याचा मोह आवरला नाहीं. सत्यमूर्तींना विलायतेस प्रचारार्थ पाठवण्यांत आलें व केळकरांनीं "केसरीकडून त्यांना पांचशें रुपयांची मदत केली."

# १९ श्रेयार्थी अध्यापक



असहकारितेच्या चळवळीनंतर महाराष्ट्रांत राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्था सुरू झाल्या खऱ्या, पण त्या शिष्ट लोकांच्या रूढ मार्गानेंच समाजांत प्रविष्ट झाल्या; शिक्षणक्षेत्रांत वैचारिक क्रांति त्या वेळीं होऊं शकली नाहीं. पुष्कळ वर्षांनीं महात्माजींनींच वर्धा-योजना काढून समाजाच्या विचारसरणीला धक्का दिला. परंतु १९२१ सालीं ती वेळ आली नव्हती.

तरी देखील राष्ट्रीय शिक्षणाचे प्रचारक बंडखोर या नात्यानेंच प्रयोग करण्यास मैदानावर उतरले. महाराष्ट्राला हा प्रयोग अगदींच नवा नव्हता. परंतु शिक्षणशास्त्र बरेंच लंगडें होतें. स्वतःच्या पायावर उभें राहणें त्यास दीर्घकालपर्यंत जमलें नाहीं; आणि म्हणून जीवनसिद्धीकडे एकाग्र लक्ष न देतां किंवा मानवतेची उपासना हीच साधना न मानतां अन्न, वस्त्र आणि निर्भयता हीं प्राप्त होतील अशाच प्रकारचें व्यवहार व पुस्तक यांचें मिश्र शिक्षण देण्याकडे बहुतेकांचें वळण होतें.

असहकारितेची प्रचंड लाट येतांच सरकारचा संबंध तोडण्यासाठींच बहुतेक राष्ट्रीय संस्था निघाल्या. चळवळींत उडी घेणाऱ्या साऱ्या शिक्षकांच्या किंवा विद्यार्थ्यांच्या नजरेसमोर केवळ एक काल्पनिक सृष्टि दिसत होती असें म्हणतां येणार नाहीं. कायदेभंगासाठीं राष्ट्र तयार करावयाचें होतें. देश तर दारिद्र्यामुळें आणि पाश्चिमात्य शिक्षणपद्धतीमुळें निस्तेज झाला होता. त्याची जीवनशक्ति पुन्हा उज्ज्वल करणारें शिक्षण नवयुवकांना द्यावयाचें होतें. परंतु स्वस्त व स्वावलंबी शिक्षण कसें असतें त्याची कल्पना मात्र त्या वेळीं कोणाला स्फुरली नाहीं.

त्यामुळें जवळ जवळ सरकारी शाळांच्या नमुन्यावर पण राष्ट्रीय वळण असलेल्या कित्येक संस्था महाराष्ट्रांत निर्माण झाल्या. खुद्द पुण्यांत 'टिळक महाविद्यालय' नांवाची संस्था स्थापन झाल्याचें मागें सांगितलेंच आहे. उच्च शिक्षणाचे विद्यार्थी बहुसंख्य होतांच टिळक महाराष्ट्र विद्यापीठ या संस्थेला

लागूनच निघालें. या संस्थांची व्यवस्था चालविणारें "राष्ट्रीय शिक्षण मंडळ" म्हणून होतें. पुष्कळ वर्षें श्री. केळकर हे त्याचे अध्यक्ष व चिं. वि. वैद्य उपाध्यक्ष राहिले.

या विद्यापीठाची व्याप्ति क्रमाक्रमानें वाढत गेली. पहिल्या वर्षी सरकारी शाळा-कॉलेजांवर बहिष्कार घालून आलेल्या विद्यार्थ्यांची परीक्षा घेण्याचेंच काम विद्यापीठानें केलें. तरी पुढें या नवतरुणांपैकीं पुष्कळांनीं स्वतःस राष्ट्रीय शिक्षणाच्याच कामास वाहून घेतल्यामुळें विद्यापीठाचा वृक्षविस्तार होत गेला. दोन वर्षांत तीन उच्च शिक्षणाच्या संस्था—टिळक महाविद्यालय, पुणें; नॅशनल मेडिकल कॉलेज, मुंबई, व व्यापारी विद्यालय, पुणें; बेळगांव, मुंबई, अकोट, शिंदी, शेंदूरजना येथील दुय्यम शिक्षण-शाळा; निपाणी, बेळगांव, पुणें, चिंचवड, बारामती, सातारा, सोलापूर, नगर, जळगांव भुसावळ, मुंबई, महाड, दापोडी, रत्नागिरी, वेंगुर्लें व मालवण येथील विद्यालयें हीं सर्व या विद्यापीठाला जोडलीं गेलीं. ( कॉंग्रेस ) महाराष्ट्राबाहेर, खामगांव, अकोला, उमरावती, हिंगणघाट, वरोरा, धामणगांव, नागपूर वगैरे ठिकाणच्या शाळाही विद्यापीठास जोडलेल्या होत्या. असहकारितेच्या ऐन सुरुवातीस नागपूरला पहिली राष्ट्रीय शाळा स्थापन झाली. तिच्या-इतकें भव्य स्वरूप इतर कोणत्याही शाळेला कधींच मिळालें नाहीं असें म्हटल्यास चालेल.

या सर्व शाळांतून पुस्तकी शिक्षणाबरोबर कांतणें, पिंजणें व विणणें यांचेंही शिक्षण दिलें जाई. क्वचित् सुतारकाम हेंही शिकवलें जात असे. धंदे शिक्षणां-तून संस्था स्वावलंबी होण्याचा संभव फार असतो; परंतु वर्षानुवर्षें गुलामींत खितपत पडलेल्या प्रजेंत तेजस्वी स्वावलंबनवृत्ति कोठून असणार? आंदोलना-चा पहिला आवेग ओसरल्यावर स्वराज्य दूरच असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतांच बहुतेक विद्यार्थ्यांना आपली 'करियर' बुडण्याची भीति वाटूं लागली. पालकांनाही मुलांना सरकारी नोकऱ्या मिळणार नाहींत ही भीति वाटली. केळकरांसारखे नेते तर एक वर्षाची मुदत संपल्यावर प्रयोग बंद करण्याचा उपदेश करीत होते. एवंच, राष्ट्रीय शाळा साऱ्याच्या साऱ्या कांहीं शेवटपर्यंत टिकल्या नाहींत. विद्यार्थी पुन्हा सरकारी शाळांत प्रविष्ट होऊं लागले.

राष्ट्रीय शाळा ओस पडूं लागल्या. तरी सुद्धां १९३० च्या चळवळीपर्यंत ज्यांनीं टिकाव धरिला, व आपणांतून कर्ते सेवक निर्माण केले अशा कांहीं संस्थांचा उल्लेख करतां येईल. त्या म्हणजे चिंचवड येथील स्वावलंबन राष्ट्रीय पाठशाला, नगर येथील राष्ट्रीय शाळा, सातारा येथील घाणेकरांची टिळक राष्ट्रीय शाळा, पुणें येथील टिळक महाविद्यालय, सासवनें येथील वैश्य विद्याश्रम, येवलें येथील विनयमंदिर. या शाळांतून त्यागी व उत्साही शिक्षकांनीं चंदनाप्रमाणें आपलें आयुष्य झिजवून राष्ट्राभिमानी विद्यार्थी निर्माण केले आणि १९३० च्या चळवळींत आपल्या श्रमाचें सार्थक झालेलें समाजास दाखवून दिलें.

वरील संस्थांचे चालक केवळ शिक्षकच नव्हते. देशांतील राजकीय स्थितीचें ते निरीक्षण करीत, आपल्या विद्यार्थ्यांस तिचें ज्ञान करून देत, वेळोवेळीं होणाऱ्या राष्ट्रीय चळवळींत स्वतः भाग घेऊन विद्यार्थ्यांसही तसें करण्याची प्रेरणा देत आणि संस्था स्वावलंबी न होऊं शकल्यामुळें संस्थांसाठीं भिक्षाही मागीत. या संस्थांतील कांहीं शिक्षक पुढें राजकारणांतही चमकले. महाराष्ट्राच्या राजकारणावर महात्माजींचा प्रभाव पडावा म्हणून झटणाऱ्या राजकारणी पुरुषांच्या बरोबरीनें या शिक्षकांनींही नंतर काम केलें. त्यांपैकीं कित्येक तर आजमितीसही वेगवेगळ्या जिल्ह्यांतून काम करीत आहेत. अर्थात् साधारणपणें १९३० पूर्वी त्यांपैकीं बऱ्याचजणांनीं शैक्षणिक क्षेत्राबाहेर फारसें पाऊल टाकलें नव्हतें. परंतु त्यांच्या अंगच्या शक्तीचा विकास चालूच होता. प्रसंग येतांच आंतले गुण प्रकट झाले.

मुळशी-सत्याग्रहांत प्रामुख्यानें भाग घेणारी संस्था चिंचवडची पाठशाला होती. तिचे संस्थापक बाळूकाका कानिटकर हे सुप्रसिद्ध लेखक रावसाहेब कानिटकर यांचे पुतणे होत. त्यांचें मूळ गांव बावधन. पुण्यांतील जुने कार्यकर्ते हरिभाऊ फाटक यांच्या प्रेरणेनें बाळूकाकांना देशसेवेची स्फूर्ति झाली. त्यांनीं सेवेसाठीं शिक्षणक्षेत्र पसंत केलें. पुण्यांत पहिलें अनाथ विद्यार्थिगृह त्यांनीं स्थापलें ( १९०९ ). पांच मुलांपासून सुरुवात केली. सुरुवातीस त्यांनीं घरोघर माधुकरी मागितली. दहा वर्षांत तिचें एका मोठ्या संस्थेंत रूपांतर झालें ! असहकारितेची चळवळ सुरू होतांच संस्थेनें स्वतःस गांधीविचारास

पूर्णपणें वाहून घेतलें. लोकमान्यांपासून महात्माजींपर्यंत सर्व थोर पुरुषांनीं संस्थेस भेटी दिल्या. आर्थिक मदतही केली. ती संस्था अगोदर पुण्यास होती. केतकर व कानिटकर यांच्यांत मतभेद होतांच कानिटकरांनीं आपली संस्था १९१२ त पूर्वीच्या घरांतून हालविली. कांहीं काल स्वतःच्या घरांत वसवून नंतर १९१४ त चिंचवडला नेली. अमेरिकेंतील टस्केजी संस्थेच्या अनुकरणाची कांहींशी पहिली कल्पना होती. संस्थेंत स्वावलंबी शिक्षण दिलें जाई. सात-आठ प्रकारचे उद्योगधंदे ठेविले होते. १९१९ पर्यंत बाळूकाकांनीं स्वतःच्या जबाबदारीवर संस्था चालविली. पण पुढें संस्थेच्या उत्पन्नाची व खर्चाची तोंडमिळवणी होईना. त्यांना दहा-बारा हजार रुपये कर्जही झालें. बाळूकाकांनीं संस्थेसाठीं खूप झीज सोसली. त्यांना स्वतःच्या पत्नीचे दागिने गहाण ठेवावे लागले. परंतु १२५ विद्यार्थ्यांचा खर्च झेपेना. बाळूकाका आपल्या वडिलांचे एकुलते एक चिरंजीव होते. त्यांच्या चुलत्याला पांच मुलें होतीं. पण बाळूकाकांनीं वांटणीच्या वेळीं सहावा हिस्साच घेतला व तो बहुतेक संस्थेपायीं खर्च केला. या वेळीं ते निर्धन झाले होते. तेव्हां शेवटीं त्यांनीं हरिभाऊ फाटक यांचेकडे जाऊन मदत मागितली. हरिभाऊंनीं तात्या देशपांडे व अण्णा सहस्रबुद्धे या दोघां तरुण होतकरूंना चिंचवडला जाऊन संस्थेस मदत करण्यास सांगितलें. त्या दोघांशिवाय आणखी चारजण श्री. कारखानीस, फणसळकर, लिमये वगैरे या मित्र-मंडळांत सामील झाले. तात्यांशिवाय बाकीचे पांचजण जानेवारींत चिंचवडला गेले. तात्या मे महिन्यांत टिळक विद्यापीठाची वाङ्मय विशारदाची परीक्षा संपवून गेले. डॉ. खैर व परुळेकर हे त्यांच्यापूर्वी शिक्षक होते. त्यांचें व मुलांचें जमत नव्हतें. पुण्याची तुकडी जातांच अध्यापन नीट चालूं लागलें. बाळूकाकांना पैसे गोळा करण्यासाठीं दौरे काढण्यास मोकळें ठेवून या मंडळींनीं अंतर्गत व्यवस्था आपले हातीं घेतली. महात्माजींशीं बाळूकाकांनीं नंतर पत्रव्यवहार करून टिळक फंडांतून १५,००० रु. संस्थेसाठीं मिळविले. महात्माजींनीं 'अनाथ विद्यार्थिगृह' हें नांव बदलून 'स्वावलंबन राष्ट्रीय पाठशाळा' हें नांव ठेवण्यास सुचविलें. 'अनाथ' हा शब्द त्यांना आवडला नाहीं. संस्थेंत चार तास बौद्धिक व चार तास औद्योगिक शिक्षण चाले. विणकाम, कांतण,

पिंजण, शेती, वगैरे उद्योग चालत. ग्रामीण सेवक निर्माण करण्याचें कामही या संस्थेनें केलें. आसपासच्या तीन-चार मैलांच्या परिघांत सात आठ रात्रीच्या शाळा चालत. सुमारें २०० लोक शिकत. त्यांत अस्पृश्यही असत. पुढें चळवळीचा आवेग ओसरल्यावर शाळेंतील संख्या ७५ वर घसरली.

१९२४ सालीं महात्माजी कै. चिपळूणकरांच्या अर्धपुतळ्याचा अनावरण समारंभ करण्यांत पुण्यास आले असतां ते चिंचवडला आले होते. बेलापूरच्या आगाशे नांवाच्या गृहस्थांनीं अण्णा सहस्त्रबुद्धे यांस स्वावलंबी शेतीची आकर्षक कल्पना सांगितली. त्यांनीं ती महात्माजींस विदित करून प्रयोगासाठीं मदतीची याचना केली. महात्माजींना ती कल्पना असंभाव्य वाटली. पण अण्णांची समजूत पटेना. तेव्हां महात्माजींनीं त्यांस १०,००० रु. दिले. अण्णा व काका कारखानीस सात-आठ विद्यार्थी घेऊन बेलापुरास गेले व त्यांनीं प्रयोग सुरू केला. त्या वेळीं तात्या व फणसळकर हे चिंचवड येथें शाळेची शेती करीत राहिले. थोड्याच महिन्यांत भ्रमनिरास झाला व प्रयोग अंगाशीं आला. महात्माजी पुन्हा आले तेव्हां त्या उभयतांनीं पराजयाची कबूली दिली. पण महात्माजींनीं थोर मनानें सारें पोटांत घातलें व त्यांना प्रयोग विसर्जन करण्याचा सल्ला दिला. अण्णा साबरमतीस निघून गेले. बाकीचे शिक्षकही हळूहळू पांगले. बाळूकाका, फाटक व फणसळकर यांनीं नंतर कसेंबसें काम चालविलें. पण संस्थाही नंतर बहुतेक स्वधामाला गेली.

चिंचवडच्या शाळेंत शिक्षक म्हणून काम करणारे तात्या कालांतरानें राजकारणांत पडून महाराष्ट्र प्रांतिकचे अनेक वर्षे चिटणीस बनले. त्यांचा जन्म इंदापूर येथें ८।९।१८९९ रोजीं झाला. त्यांचे वडील हेडमास्तर होते. तात्यांचें शिक्षण पुण्यास झालें. असहकारितेच्या चळवळीपूर्वी ते फर्ग्युसनमध्यें होते. अण्णा सहस्त्रबुद्धे हे त्यांचे शाळासोबती. हरिभाऊ फाटक यांच्याशीं त्यांची ओळख होती. त्यांनीं तात्यांना १९१५ त स्वदेशी संघांत दाखल केलें. तात्यांची सेवावृत्ति लहानपणापासूनच व्यक्त होऊं लागली. न्यू इंग्लिश स्कूलमध्यें असतांना त्यांनीं Poor Boys' Union, Volunteers' Union व Book-Exchanging Association अशा तीन संस्था काढल्या होत्या. तात्यांना मॅट्रिक वर्गांत "चांगल्या वर्तणुकी"बद्दल शाळेचें वार्षिक बक्षीस मिळालें होतें.

पुढें कॉलेजांत गेल्यावर ते अडीच वर्षें Indian Defence Force मध्यें होते. १९१८ त इन्फ्लुएंझाची सांथ आली तेव्हां तात्यांनीं तीन महिने सेवाकार्य केलें. मुळशीची पहिली पाहणी त्यांनींच करून भुस्कुट्यांना दिली. सीनियर बी. ए. त असतां त्यांना महात्माजींच्या मुक्कामावर दाराशीं पहारा करण्याचें काम मिळालें होतें. रात्रीं सहज महात्माजींशीं बोलणें झालें व तात्यांना प्रेरणा झाली. तात्यांनीं १९२१ च्या जानेवारींत कॉलेज सोडलें व ते मेमध्यें टिळक महाविद्यालयाचे वाङ्मय-विशारद झाले व नंतर चिंचवडला गेले.

श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे यांचा जन्म ७ ऑक्टोबर १८९७ रोजीं पुण्यांत झाला. त्यांचे वडील वऱ्हाडांत शाळामास्तर होते; तिकडेच त्यांचें शिक्षण इंग्रजी पाहिलीपर्यंत झालें. नंतर ते पुण्यास आले व बी. ए.पर्यंतचा शिक्षणक्रम त्यांनीं पुण्यांत संपविला. तात्या देशपांड्यांपेक्षां ते एक वर्ष पुढें होते. डिबेटिंग क्लबमध्यें दोघांची ओळख होऊन तिची परिणति स्नेहांत झाली. १९२० सालीं बी. ए. होऊन अण्णा यवतमाळ जिल्ह्यांत एका दुय्यम शिक्षणाच्या शाळेंत हेडमास्तर म्हणून रुजू झाले. चारपांच महिन्यांत असहकारितेची चळवळ सुरू झाली; तसे ते नोकरी सोडून पुण्यास आले. पुण्यास पहिली राष्ट्रीय शाळा निघण्याचें ठरतांच त्यांनीं तींत जाण्याचें ठरविलें होतें. परंतु तेथें आवश्यकता नाहीं असें वाटल्यावरून अण्णांनीं तो विचार बदलला. पुढें हरिभाऊ फाटकांच्या प्रेरणेनें ते चिंचवड येथील पाठशाळेंत प्रविष्ट झाले व तेथें त्यांनीं सहा वर्षें सेवा केली. १९२७ मध्यें ते साबरमती येथील सत्याग्रहाश्रमांत दाखल झाले.

साताऱ्याची शाळा नाथ घाणेकर चालवीत होते. या शाळेंत खास शिक्षणक्रम नव्हता. विद्यार्थ्यांना देशभक्तीचे संस्कार देऊन चळवळसमर्थ शूर शिपाई बनविण्याचें कार्य त्या संस्थेनें केलें. त्या शाळेंत ५०-६० विद्यार्थी असत. दादा साखवळकर हे शिक्षक होते. शाळेंतील विद्यार्थ्यांसमोर आदर्श असा खुद्द घाणेकरांचाच होता. घाणेकरांचा जन्म १८८८ त झाला. त्यांचें शिक्षण कॉलेजपर्यंत झालें. परंतु विद्याभ्यासापेक्षां राष्ट्रीय चळवळींकडे त्यांचें लक्ष विशेष असे. त्यांना टिळकांपासून स्फूर्ति मिळाली. त्यांचें जीवन त्यागी व तपस्वी बनलें. बी. ए. पास होण्याचे प्रयत्न

सिद्धीस जाईनात तेव्हां त्यांनीं तो नाद सोडला व पोटाचा व्यवसाय म्हणून मास्तरकी स्वीकारली. १९१६ पासून त्यांचा विद्यार्थ्यांशीं विशेष संबंध येऊं लागला. त्यांनीं सातारा येथें अनाथ विद्यार्थिगृह सुरू केलें. हरिजनवस्तींत शाळा उघडली. मिशनऱ्यांच्या कार्याला विरोध केला. मोफत वाचनालयासाठीं खटपट केली. कित्येक सामाजिक चळवळीही केल्या. पुढें होमरूल लीगची चळवळ सुरू झाल्यावर त्यांनीं सरकारी नोकरी सोडली. नंतर त्यांनीं पुष्कळ काळपर्यंत खेड्यांतून दौरा काढून गरीबांचा संसार यथार्थपणें पाहिला. नागपूर कॉंग्रेसनंतर त्यांनीं साताऱ्यास टिळक राष्ट्रीय शाळा काढली. त्यांनीं खादी वापरण्यास सुरुवात केली व असहकारितेच्या कार्यक्रमाशीं ते पूर्णपणें एकजीव झाले. नाथांना प्रापंचिक व शारीरिक अडचणी अतिशय सोसाव्या लागल्या. परंतु आपल्या हृदयधर्माला ते शेवटपर्यंत इमानदार राहिले. मुळशी-सत्याग्रहांत सामील होण्यासाठीं ते गेले होते. पण प्रचारकार्य करण्याचेंच काम त्यांना देण्यांत आलें. नंतर त्यांची प्रकृति बिघडली तेव्हां ते साताऱ्यास परत फिरले. पुढें कांहीं काळ त्यांची प्रकृति नादुरुस्त राहिली.

नाथांचे मित्र साताऱ्यांतील दुसरे कार्यकर्ते म्हणजे डॉ. आठल्ये. हे गृहस्थ पूर्वी क्रान्तिवादी होते व अगदीं तरुण वयांत त्यांना पांच वर्षें येरवड्याची हवा खावी लागली होती. त्यांची नवविवाहिता तरुण पत्नी फार धीराची म्हटली पाहिजे. आठल्यांना लहानपणीं निरनिराळ्या अनेक गांवीं राहावें लागलें होतें व लहानपणापासून त्यांची वृत्ति तेजस्वी होती. त्याचीच परिणति त्यांच्या क्रांतिवादी बनण्यांत झाली. ते परत आल्यावर सरकारच्या धास्तीनें त्यांच्याजवळ कोणी जाईना. अशा वेळीं नाथ घाणेकर यांनीं त्यांच्याशीं मैत्री केली व नंतरच्या कालांत सर्व प्रकारच्या सार्वजनिक कामांत त्यांची जोडी अखंड राहिली.

नगरला दादा चौधरी, हिरे, सठ्ठा व चिंचोरकर या चौघांनीं राष्ट्रीय शाळा उत्तम प्रकारें चालविली. त्यांची शाळा फारच भरभराटीस आली होती. नेहमीं १२५।१५० मुलें असत. प्राथमिक शिक्षणापासून हायस्कूलपर्यंत सर्व वर्ग शाळेंत शिकविले जात. याशिवाय शिवणकाम आणि छापखाना यांचेंही शिक्षण देण्यांत येई. सठ्ठा हे पारशी गृहस्थ आणि दादा चौधरी हे दोघेही

सांघिक कवायतींत तज्ज्ञ होते. त्यांनीं १५० स्वयंसेवकांचें एक पथक तयार केलें होतें. त्यांत राष्ट्रीय शाळेंतील त्याचप्रमाणें बाहेरील सुद्धां मुलें असत. १९३० च्या चळवळींत त्यांनीं सारा जिल्हा जागृत केला.

भुसावळला दास्तान्यांनीं एक शाळा चालविली होती. जळगांवलाही एक होती. ती देवकीनंदन नारायण व वाळुंजकर चालवीत होते. देवकीनंदन यांचें घराणें मूळ आग्र्याकडील. त्यांचे वडील महाराष्ट्रांत येऊन जळगांवचे रहिवासी झाले होते. देवकीनंदन महाराष्ट्रीय संस्कृतींतच वाढले. त्यांचें उच्च शिक्षण पुण्यास झालें. सीनियर बी. ए. त असतांनाच त्यांनीं चळवळींत कॉलेज सोडलें. कांहीं दिवस 'केसरी'पक्षातर्फे चालविण्यांत आलेल्या वृत्तपत्र-व्यवसायाच्या वर्गांत काढले व परीक्षा न देतांच ते जळगांवला जाऊन राष्ट्रीय शाळेंत काम करूं लागले. नाफेरवाल्या पंथाचे ते कट्टे पुरस्कर्ते होते आणि प्रांतिकमधील स्पर्धाप्रसंगीं खानदेश-गटाचें संघटित पुढारीपण स्वीकारीत; दास्तान्यांच्या बरोबर राहून त्यांनीं देवांना राजकारणप्रसंगीं आपल्या पक्षाचें बहुमत करण्यांत वेळोवेळीं मदत केली होती व प्रत्येक वेळीं भरपूर हुकुमी पाठिंबा दिला होता.

रत्नागिरीला आप्पासाहेब पटवर्धन यांनींही दोन वर्षें राष्ट्रीय शाळा चालविली होती. परंतु १९२४ त महात्माजी सुटले व बेळगांव कॉंग्रेसनंतर जेव्हां त्यांनीं खादीप्रचाराचें कार्य हातीं घेतलें तेव्हां महाराष्ट्रांतील कित्येक नाफेरवाले कार्यकर्ते त्याच कार्यांत पडले. खेरीज शाळांचें जीवनही बऱ्याच ठिकाणीं संपुष्टांत आलें होतें. म्हणून पुष्कळ शिक्षकांनीं शाळा सोडून स्वतःस खादी-कार्यास वाहून घेतलें.

पुण्याच्या संस्था मात्र संघटिपणें पुष्कळ वर्षें चालल्या. त्यांना पैशाची मदतही मिळत गेली. विद्यार्थीही चांगल्या प्रमाणांत येत राहिले आणि शिक्षकवर्ग उत्तम मिळाला. पुणें हें विद्वानांचें केन्द्र असल्यामुळें पुष्कळ बुद्धिमान् लोक टिळक-महाविद्यालयांत रोज मोफत एकदोन तास शिकवीत. केळकर, परांजपे, दामले, तात्यासाहेब करंदीकर, वा. गो. आपटे, भावे, दिवेकर, चित्राव, चिं. वि. वैद्य वगैरे मंडळी नियमानें शिकविण्यास जात.

टिळक महाराष्ट्र विद्यापीठ व या कालांतील महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचा

प्रयत्न यांचा एक स्वतंत्र इतिहास लिहिला गेला पाहिजे. प्रस्तुत पुस्तकाचें तें प्रयोजन नसल्यामुळें संक्षेपांत सांगणें भाग आहे. मागें सांगितलेंच आहे कीं, पुण्यांतील शिक्षणसंस्था स्थापल्या जातांना केळकर एका वर्षाच्या प्रयोगाच्या दृष्टीनेंच त्यांकडे पाहत होते. त्या वेळीं राजकारणांत केळकरांचेंच वर्चस्व होतें; परंतु एक वर्ष संपल्यावरही संस्था चालूच राहिल्या. विधायक कार्यक्रम असा पुण्यांत तरी त्या वेळीं राष्ट्रीय शिक्षणप्रचार हाच होता. बहुजनसमाजावर उपनेत्यांचें वर्चस्व नव्हतें. पुण्यांतला ब्राह्मणेतर वर्ग ब्राह्मण कार्यकर्त्यांपासून फटकून असे. खादीशास्त्र त्या वेळीं जन्मास आलें नव्हतें. त्यामुळें श्रमजीवी लोकांशीं संबंध ठेवण्यास साधन नव्हतें. तेव्हां उपनेत्यांना आपल्या हातचा असा वर्ग म्हणजे विद्यार्थिवर्गच होता. त्यालाच संस्कार देण्याचें कार्य त्यांनीं चालविलें.

शिक्षण खरें जीवनस्पर्शी करावयाचें असेल तर शिक्षणसंस्थांतून प्रयोगवीर निर्माण झाले पाहिजेत; भविष्यकालचा विचार करणारे आदर्शदर्शी तरुण तयार झाले पाहिजेत. टिळक महाविद्यालय उमेदीनें निघालें खरें परंतु त्याच्या कर्तृत्वाचा इतिहास एकसूत्री नाहीं. प्रथम कांहीं वर्षें त्यावर केळकर व त्यांच्या विचारसरणीची छाप राहिली. पुष्कळ वर्षें विविध विचारसरणीचीं व प्रकृतीचीं माणसें विद्यार्थ्यांना संस्कार देत राहिलीं. वर्तमानकाळास ओळखून भविष्यकाळाची दिशा ठरविणारे व मार्गदर्शन करणारे बुद्धिमंत महाविद्यालयाला कांहीं काळ लाभले नाहींत. देशांत महान् युद्धप्रसंग चालू असतां आपसांत भांडणकज्जे करून समाजाला विनाशाकडे नेणारे कार्यकर्ते त्या तरुण मनांना आरंभींचीं कांहीं वर्षें तरी शिकवीत होते. उदार मनानें आपसांतील ईर्ष्या विसरून पराक्रम सिद्ध करणारे शिक्षक विद्यार्थ्यांना अखंड स्फूर्तीचे निर्झर बनतात. तसें कांहीं या संस्थेंत झालें नाहीं. विद्यार्थ्यांच्या आसपास वातावरण दूषित होतें. हृदयाला उन्नत व पवित्र बनविण्याचे संस्कार शब्दवीर कोठून देणार? महात्माजींच्या नेतृत्वाबरोबर एक प्रचंड शक्ति व तीबरोबर एक अभिनव व उज्ज्वल तत्त्वज्ञान देशांत अवतीर्ण झालें आहे, त्यांनीं प्रारंभ केलेल्या महत्कार्यासाठीं, राष्ट्रव्यापी आंदोलनासाठीं, विशिष्ट पद्धतीनें विद्यार्थी तयार केले पाहिजेत, सूत्रधाराच्या उद्देशांशीं त्यांचीं मनें संलग्न होतील अशा प्रकारचे

श्रद्धाळू सैनिक बनविले पाहिजेत ही कल्पना त्या विद्वानांच्या डोक्यांत कधींच आली नाहीं. वस्तुतः पाहतां त्यांना स्वतःलाच खरें भान नव्हतें. त्यामुळें महाविद्यालयांतून व्रती, श्रद्धावान्, सेवक फारसे निर्माण झाले नाहींत. इतकेंच नव्हे तर वर्षे जातांच पुष्कळसे विद्यार्थी प्रतिगामी मनोवृत्तीचे व कॉंग्रेसची निंदा करणारे निघाले.

सुरुवातीस पदवीधर होऊन बाहेर पडलेल्या तरुणांना काय उद्योग द्यावा याचा विचार चालला असतां, केळकरांनीं त्यांच्यासाठीं वृत्तपत्रव्यवसाय हा धंदा सुचविला व त्याचें शिक्षण देवविण्याकरितां 'केसरी' संस्थेतर्फे एक वर्ग सुरू केला. त्या वर्गात शिक्षण घेऊन बाहेर पडलेले युवक कॉंग्रेसचे विरोधक निघाले!

महाविद्यालयाच्या सेवेस ज्यांनीं स्वतःस वाहून घेतलें असे कित्येक सेवक प्रथम सरकारी कॉलेजांतून अध्यापक किंवा विद्यार्थी होते. अध्यापकांपैकीं प्रसिद्ध म्हणजे प्रो. घारपुरे व प्रो. फडके हे होत. हे दोघेही प्रथम न्यू पूना कॉलेजांत होते. प्रो. घारपुरे यांनीं कित्येक वर्षे राष्ट्रीय शिक्षण व राजकारण या दोन्ही क्षेत्रांतून महत्त्वाची कामगिरी करून पुणें गाजवलें. त्यांचा जन्म पुणें येथें १० जुलै १८९० रोजीं झाला. त्यांचें पूर्ववय दारिद्र्यांत गेलें. पनवेल व सातारा येथें त्यांचें दुय्यम शिक्षण झालें. उच्च शिक्षण पुण्यांत झालें. १९१० सालीं ते बी. ए. झाले व तीन वर्षांनीं एम्. ए., बी. एस्‌सी. झाले. वर्षभर त्यांनीं नोकरी केली. पुढें १९१५ च्या जानेवारींत ते शिक्षणप्रसारक मंडळीचे तहाहयात सभासद झाले. पुढल्या वर्षी न्यू पूना कॉलेजांत ते प्रोफेसर झाले. त्या कॉलेजांत १९१८ मध्यें महात्माजींनीं खादीवर एक व्याख्यान दिलें होतें. तें तत्त्वज्ञान नवीन वाटल्यामुळें प्रोफेसरमजकूर त्याजकडे आकर्षिले गेले. आप्पासाहेब पटवर्धनही त्या वेळीं त्याच कॉलेजांत होते. घारपुरे आप्पांना संस्थेचे आमरण सभासद होण्यास आग्रह करीत होते. मार्च १९२० मध्यें आप्पांना त्यांनीं नक्की उत्तर देण्यास आग्रह केला पण आप्पांवर महात्मा गांधींच्या तत्त्वज्ञानाचा पगडा बसला होता, म्हणून त्यांनीं नकार दिला. घारपुऱ्यांवर आप्पांनीं या नवीन विचारप्रणालीचे संस्कार केले. एकपरी आप्पा त्यांचे 'गुरु' बनले. घारपुरे १९१५ पासून कॉंग्रेसला जात. प्रथम ते

नेमस्त होते. नंतर टिळकानुयायी बनले. पुढें असहकारितेची लाट येतांच घारपुरे तिकडे वळले व २५ ऑक्टोबर १९२० रोजीं त्यांनीं कॉलेजचा राजीनामा दिला. दोन तासांनीं त्यांचे मित्र प्रो. फडके यांनींही दिला. घारपुऱ्यांची मनोवृत्ति व्यक्तिविशिष्ट असल्यामुळें ते खेडेगांवांत जाऊन बसण्याचा विचार करीत होते. इतक्यांत फडके आले त्यामुळें या जोडगोळीनें पुण्यांत मोहीम सुरू केली. पुण्यांत राष्ट्रीय शिक्षणाकडे लक्ष देणारे ठळक लोक सुरुवातीस न आल्यामुळें 'कोणी पुढें येत नसेल तेव्हां मी पुढें सरेन' या वृत्तीचे घारपुरे पुढें आले. त्यांनीं केळकरांची भेट घेतली. प्रथम त्यांचा सल्ला निरुत्साह करणाराच होता. तथापि घारपुऱ्यांचा निश्चय पाहून त्यांनीं एक योजना सांगितली. प्रो. माटे यांनीं तिची जबाबदारी आपल्या शिरावर घेण्याचें प्रथम घाटत होतें. परंतु प्रो. घारपुरे पुढें आल्यामुळें ती जबाबदारी त्यांच्या शिरावर टाकिली गेली. केळकरांनीं त्यानंतर घारपुऱ्यांवर पूर्ण विश्वास टाकिला व सारें काम त्यांच्यावर सोपवून दिलें व ते मागत ती मदत मोकळेपणानें देत गेले. त्यांच्या योजनेचा कार्यक्रम दोन वर्षांचा होता. घारपुरे खूप हिंडले. त्यांनीं व फडक्यांनीं व्याख्यानें देऊन विद्यार्थ्यांस कॉलेजांवर बहिष्कार घालण्यास प्रवृत्त केलें. पुण्या-मुंबईशिवाय इतर ठिकाणीं विद्यार्थ्यांनीं शाळांवरही बहिष्कार टाकिला; परंतु केळकरांनीं शाळा-बहिष्काराला पाठिंबा दिला नाहीं. पुण्याची शाळा फार वेळ चालली नाहीं.

केळकरांच्या मताप्रमाणें एक वर्षानंतर बहिष्कार उठविण्याची वेळ आली होती. परंतु घारपुरे पूर्णपणें महात्माजींचे अनुयायी असल्यामुळें त्यांनीं राष्ट्रीय संस्था चालू ठेवण्याचा आग्रह धरिला व कॉलेजास जोडून विद्यापीठ निर्माण करविलें. कारण पास झालेल्या विद्यार्थ्यांस पदव्या देण्याची आवश्यकता होती. घारपुरे सर्व कांहीं केळकरांना विचारून करीत व केळकरांनीं चार वर्षें त्यांना मनःपूर्वक पाठिंबा दिला. वसईच्या महाराष्ट्र प्रांतिक परिषदेनंतर ( डॉ. कुर्तकोटी ) श्रीशंकराचार्यांच्या अध्यक्षतेखालीं स्वतंत्र परिषद भरवून तींत राष्ट्रीय शिक्षणाचा ठराव केला व त्याअन्वयें विद्यापीठ स्थापलें गेलें. घारपुरे व फडके सांगलीसही प्रचारार्थ गेले होते व त्यांनीं अशी चळवळ केली, कीं तिकडील कॉलेज ओस पडलें. पुढें तिकडील मुलें पुढील

आदेशासाठीं केसरीकडे डोळे लावून बसलीं, तों केसरींत कॉलेज-बहिष्काराचा कार्यक्रम एका वर्षापुरता असल्याचा लेख प्रसिद्ध झाला. तेव्हां तीं पुन्हा जुन्या कॉलेजांत प्रविष्ट झालीं. सांगलींतील विद्यार्थ्यांचा एक मित्रसंघ—ज्याचे सभासद पुण्यामुंबईच्या सरकारी कॉलेजांतून पांगले होते—पुढें टिळक विद्यापीठास येऊन मिळाला. तो संघ म्हणजे लागू लिमये-प्रभृतींचा होय.

आचार्य लिमये व डॉ. लागू हेही त्याच वेळीं कॉलेजांत विद्यार्थी होते. दोघेही सांगलीचे रहिवासी. लिमयांचा जन्म २८ एप्रिल १९०० रोजीं सांगलीस झाला. सत्राव्या वर्षी ते मॅट्रिक झाले. त्यांना जगन्नाथ शंकरशेठ स्कॉलर्शिप मिळाली होती. समर्थ व्यायामशाळेंत ते नेहमीं जात. तेथेंच त्यांना देशभक्तीची प्रेरणा मिळाली. लागू व बुवा गोसावी हे त्यांचे दोस्त होते. बुवा लिमयांपेक्षां थोडे वडील असून समर्थपंचायतनांतील आनंदमूर्ति यांचे ते प्रत्यक्ष वंशज आहेत. लागूंचा जन्म २३।८।१८९५ सालीं सोलापूर जिल्ह्यांत चिंचली येथें झाला. त्यांचे वडील सांगली येथें नोकरीस होते, त्यामुळें त्यांचीं इंग्रजी शिक्षणाचीं सात वर्षें सांगलीस गेलीं. बुवा आर्ट्स-कडे वळले. लागूंनीं वैद्यक घेतलें. वंगभंग व स्वदेशीच्या चळवळीनें दोघांना-ही स्फूर्ति मिळाली. लोकमान्य त्यांचे वीर होते. त्या वेळीं व्यायामशाळांतून क्रांतिवाद्यांचे संघ निर्माण होत. लागू, लिमये व बुवा हे अशाच मनःस्थितीं-तून बाहेर पडले होते. उच्च शिक्षणासाठीं तिघेही कॉलेजांत प्रविष्ट झाले. लागू वैद्यकासाठीं मुंबईस ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें गेले. पुढें १९२१ सालीं मारवाडी विद्यालयांत त्यांनीं पुढाऱ्यांचीं व्याख्यानें ऐकलीं. बुवा बी. ए., एल्‌एल्. बी. झाले होते. पण लागूंचें शेवटचें वर्ष होतें तरी त्यांनीं उत्साहानें कॉलेज सोडलें. लागूंचे वडील १९१८ त वारले होते. मागलीं पांच भावंडें होतीं. १९१७ सालीं त्यांचा विवाह झाला होता. नातलगांनीं कॉलेज न सोडण्याबद्दल आग्रह केला. पण लागूंचा निश्चय कायम राहिला. हिंमत, दृढनिश्चय व चिवट मेहनत यांचें लागू एक उत्तम उदाहरण आहेत. त्यांच्याचबरोबर डॉ. खाडिलकर, डॉ. दातार व डॉ. अंत्रोळीकर—जे त्या वेळीं त्याच कॉलेजांत शिकत होते—यांनींही कॉलेज सोडलें. एकंदर ७५ लोकांनीं कॉलेज सोडलें. त्यांच्यासाठीं डॉ. साठे व डॉ. भडकमकर यांच्या प्रयत्नांनीं

नॅशनल मेडिकल कॉलेज निघालें. टिळक विद्यापीठाची परीक्षा देऊन लागू पास झाले व सहा महिने त्यांनीं नॅशनल मेडिकल कॉलेजमध्यें अध्यापक म्हणून काम केलें. पण घरच्या परिस्थितीमुळें पैसा कमावणें आवश्यक वाटून त्यांनीं पुण्यांतच दवाखाना घातला. लागूंचें जीवन पुढें यशस्वी झालें. त्यांनीं प्रपंच व परार्थ दोन्ही साधले. संसार करीत असतां त्यांनीं सेवाही अविरत चालू ठेविली. बुवा प्रथम दोन वर्षें पुण्याच्या सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीच्या ग्रंथालयाचे व्यवस्थापक होते. नंतर ते साताऱ्याकडे वकिली करूं लागले. लागू टिळक महाविद्यालयांतील आयुर्वेदशाखेंत जाऊन शिकवूं लागले. लिमये यांनीं सीनियर बी. ए.त असतां कॉलेज सोडून दिलें. तेही टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या परीक्षेस बसले व पहिल्या वर्गांत पहिले येऊन वाङ्मयविशारद झाले. यानंतर त्यांनीं पुष्कळ वर्षें अध्यापकाचें काम त्याच संस्थेंत केलें व १९२४ सालपासून १९३२ पर्यंत ते त्याचे अधिपति होते. १९२२ सालीं विद्यापीठ स्थापन झालें. घारपुरे कार्यवाह बनले. १९२४ सालीं एप्रिलमध्यें राष्ट्रीय शिक्षण मंडळ स्थापलें गेलें. लिमये, कै. रबडे, हर्षे, लागू, नानल हे सर्व त्याचे आजन्म सदस्य बनले. रबडे हेही न्यू पूना कॉलेजमधील बुद्धिमान् विद्यार्थी होते. देशभक्तीनें प्रेरित होऊन त्यांनींही कॉलेज सोडलें. पुण्यांत कॉलेज सोडणारे ते पहिले विद्यार्थी होत. नंतर त्यांनीं स्वतःस राष्ट्रीय शिक्षण कार्यास वाहून घेतलें. ही सर्व मंडळी राष्ट्रीय शिक्षणाचा प्रचार करीत असतांना दारू-गुत्त्यांवरील निरोधन, टिळक स्वराज्यफंड वगैरे चळवळींतही भाग घेत. मुळशी सत्याग्रहांतही महाविद्यालयाच्या अध्यापकांनीं व विद्यार्थ्यांनीं भाग घेतला होता. प्रांतिक राजकारणांत मात्र घारपुऱ्यांशिवाय कोणी भाग घेत नसे. नाहीं म्हणावयास लागू व लिमये नंतर स्वराज्यपक्षाचे सदस्य बनले होते, परंतु प्रत्यक्ष अशी मेहनत त्यांनीं केली नाहीं. कौन्सिल-प्रवेशास त्यांची मान्यता होती. १९३० पर्यंत ते दोघेही केळकरांच्या प्रभावाखालीं होते. गांधींची सर्वच विचारप्रणालि त्यांना पसंत नव्हती. परंतु स्वातंत्र्याची चळवळ मान्य होती. काँग्रेसाविषयीं आदर होता. म्हणून शिस्तीस धरून त्यांनीं स्वराज्यपक्षास मदत केली.

घारपुरे विद्यालयांत पुष्कळ काळ अध्यापकाचें काम करीत होते; परंतु फडक्यांची वृत्ति स्थिर नव्हती. त्यांना अडचणीही पुष्कळ सोसाव्या लागल्या यांत शंका नाहीं. परंतु कणखर वृत्ति नसल्यामुळें ते या जीवनांत फार काळ टिकले नाहींत. शाळाबहिष्कार मागें घेण्याच्या बेझवाड्याच्या ठरावानें त्यांच्या मनानें उचल खाल्ली व त्यांनीं महाविद्यालय सोडलें. घारपुरे विद्यापीठाची सेवा करीत राहिले. चिंतामणराव वैद्य कुलगुरु होते त्यांनीं अनन्यनिष्ठेनें विद्यापीठाच्या उत्कर्षासाठीं अथांग मेहनत केली.

घारपुरे विद्यापीठाचें व टिळकमहाविद्यालयाचें काम करीत असतांना प्रांतिक राजकारणांतही मन घालीत असत हें मागें सांगितलेंच आहे. राजकीय क्षेत्रांत ते शंकरराव देवांनाच मानीत व त्यांना मदत करीत. बारामतीस मुळशी परिषद झाल्यावर एके रात्रीं देव व भुस्कुटे त्यांचेकडे आले व सांगूं लागले कीं, “ मुळशी-सत्याग्रहांत उडी घेण्यास आम्हा दोघांखेरीज तिसऱ्या कोणाचेंही नांव येत नाहीं. तेव्हां तुम्ही तिसरे व्हा.” इतर कोणी पुढें सरत नसल्यास स्वतः पुढें व्हावें ही घारपुऱ्यांची वृत्ति असल्यामुळें आपल्या शिरावरील संस्थाविषयक जबाबदारी मुळींच लक्षांत न आणतां त्यांनीं चटकन् रुकार दिला. परंतु घारपुऱ्यांना सत्याग्रहांत भाग घेण्याची पाळी आली नाहीं. परांजपे, डॉ. फाटक, दामले, करंदीकर वगैरे कार्यकर्ते एकामागून एक तुरुंगांत गेले व घारपुऱ्यांना राष्ट्रीय शिक्षणसंस्थांची जबाबदारी सोडण्याची मनाई करण्यांत आली.

पुढें जिल्हा व शहर काँग्रेस कमिट्या नाफेरवाल्यांच्या ताब्यांत घेण्यास त्यांनीं बाळूकाकांस मदत केली व विरारच्या बैठकींत सुद्धां त्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. गया-काँग्रेसनंतर प्रांतिकचा जो वाद सुरू झाला त्यांत पुण्यांतील वातावरण फारच गढूळ झालें आणि घारपुऱ्यांनीं १९२३ च्या गणपति-उत्सवांत केळकरांविरुद्ध भाषण केलें. त्यानंतर केळकरांचें मन त्यांचेबद्दल दूषित झालें. “ विद्यापीठ माझें नाहीं ” असें ते बोलूं लागले व घारपुऱ्यांशीं असलेलें त्यांचें स्नेहाचें धोरण बदललें. शिवाय मागें कायदेभंग-चौकशीच्या कमिटीसमोर केळकरांनीं जी कैफियत दिली होती तिच्यावर घारपुऱ्यांनीं व्याख्यानांत केलेली टीका त्यांना शल्याप्रमाणें बोचत होतीच. तींत ही भर

पडली. चार दिवस पुण्यांत केळकर पक्षाचीं व्याख्यानें चालून त्यांतून घारपुऱ्यांवर कडक टीका करण्यांत आली. टीकेची झोड उडविणाऱ्यांपैकीं एक श्री. न. वि. गाडगीळ हे होते. ते त्या वेळीं केसरीपक्षाचे होते. शेवटच्या दिवशीं केळकरांनीं व्याख्यान देऊन कळस चढविला. त्यांत केळकरांचा गैरसमज झालेला दिसल्यामुळें घारपुरे यांनीं त्यांच्या घरीं जाऊन त्यांस सर्व वस्तुस्थिति सांगून टाकली; पण विशेष कांहीं परिणाम झाला नाहीं. संस्था त्या वेळीं केळकरांच्या सहानुभूतीवर चालत होती. ते व त्यांच्या पक्षाचे लोक वर्गण्या मिळवून देऊन संस्थेला मदत करीत. तरीसुद्धां घारपुरे विद्यार्थ्यांना इतके प्रिय होते कीं, टिळक महाविद्यालयाच्या सर्व विद्यार्थ्यांनीं सभा भरवून घारपुरे यांवर आपला पूर्ण विश्वास असल्याचा ठराव मंजूर केला व तो केळकरांकडे पाठवून दिला. केळकरांनीं घारपुऱ्यांना कार्यवाहाच्या जागेवरून काढण्याचा बेत केला. परंतु सिंडिकेटच्या बैठकींत भारताचार्य वैद्य व शि. म. परांजपे त्यांच्या बाजूचे असल्यामुळें केळकरांचा हा बेत साधूं शकला नाहीं. मार्च १९२४ मध्यें लागू व लिमये यांनीं ठराव आणला कीं, विद्यापीठाच्या कार्यवाहानें विद्यापीठाच्या कामांकडेच आपला सर्व वेळ दिला पाहिजे. परंतु बहुमत घारपुऱ्यांच्या बाजूनेंच असल्यामुळें तोही ठराव नापास झाला. नंतर ते पुन्हा कार्यवाह झाले. परंतु या सर्व प्रकारामुळें त्यांचें मन विटलें होतें. महात्माजींच्या सांगण्यावरून जेव्हां देव-दास्तान्यांनीं प्रांतिकमधून आपलें अंग काढून घेतलें तेव्हांच त्यांनींही पुणें सोडावयाचें ठरविलें. १९२६ च्या मार्चमध्यें कार्यवाह-पदाची त्यांची मुदत संपल्यावर ते मुंबईस गेले. ते १९३७ सालीं विद्यापीठाचे कुलगुरु बनल्यावर पुन्हा विद्यापीठाचें काम पाहूं लागले.

घारपुऱ्यांनंतर हर्षे कार्यवाह बनले.

त्यानंतर महाविद्यालयास एका विद्वद्रत्नाचा लाभ झाला. ते म्हणजे आचार्य जावडेकर हे होत. या विपुलबुद्धिशाली तत्त्वचिंतकाच्या प्राप्तीमुळें महाविद्यालयाच्या एरवींच्या शांत जीवनांत अभिजात्य निर्माण झालें.

शंकरराव जावडेकर यांचा जन्म विशाळगड संस्थानांत मलकापूर येथें २६ सप्टेंबर १८९४ रोजीं झाला. त्यांचे वडील तेथील राजाचे खाजगी चिटणीस होते. वयाला दोन वर्षे झालीं नाहींत तों मातोश्रींचा काळ झाला. १९१०

पर्यंत त्यांचे वडील नोकरींत होते. पुढें प्रो. विजापूरकरांशीं त्यांची असलेली दोस्ती आड येऊन त्यांना नोकरींतून निवृत्त व्हावें लागलें. नंतर ते इस्लामपूरला गेले. जावडेकर आपल्या वडिलांबरोबरच असत. १९१२त मॅट्रिक होऊन ते पुणें येथील डेक्कन कॉलेजांत प्रविष्ट झाले. तेथें चार वर्षें राहून बी. ए. झाले. बाळपणीं त्यांना विजापूरकरांकडून संस्कार मिळाले होते. म्हणून त्यांच्यांत देशाभिमान चांगलाच मुरला होता. प्रो. आळतेकर त्यांच्या वडिलांचे स्नेही होते. जावडेकरांपेक्षां ते तीनचार वर्षांनीं वडील होते; ( भाई ) रुईकर त्यांचे बाळमित्र होते व कॉलेजमध्यें असतांना ते दोघे सार्वजानिक प्रश्नांचा एकत्र अभ्यास करीत. १९१५ सालीं रुईकर-जावडेकरांनीं संकल्प केला कीं, कॉलेज कार्यक्रमानंतर राष्ट्रकार्यांत पडावयाचें. मुंबईच्या कॉंग्रेसमध्यें त्यांनीं स्वयंसेवकांचें काम केलें होतें. बी. ए. झाल्यावर कोणत्या पक्षांत सामील व्हावें अशा विचारांत ते पडले. निर्णय होईना तेव्हां दोन वर्षांनीं ठरवावें असा विचार त्यांनीं केला. महात्मा गांधी दक्षिण आफ्रिकेंतून परत आले तेव्हां हे त्यांना पाहावयास मोलवर गेले होते. टिळक हयात असतांना देखील जावडेकरांना गांधींचें आकर्षण होतें. पुढें महात्माजींनीं सत्याग्रहाच्या चळवळी सुरू करितांच जावडेकरांचें मन निश्चितपणें गांधींकडेच वळले. असहकारितेची चळवळ सुरू झाली, त्या वर्षीं ते एम्. ए. ला बसणार होते. आदल्या दिवशीं त्यांनीं ६० रुपये भरले व दुसऱ्या दिवशीं ठरविलें कीं, परीक्षेला बसावयाचें नाहीं. पुढें काय करावें तें मात्र त्यांना कळेना. त्या वेळीं ते पुण्यांत राहत असत आणि न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिकवीत असत. त्यांचे एक मित्र माधवराव गद्रे यांच्या मध्यस्थीनें त्यांची शंकरराव देवांशीं गांठ पडली. त्या वेळीं देवांबद्दल त्यांच्या मनावर विशेष छाप पडली नाहीं. पुढें काय करावें या प्रश्नाची चर्चा त्यांनीं देवांशीं केली. देवांना लोकसंग्रह करावयाचा होता. त्यांनीं जावडेकरांस आपल्याबरोबर कार्य करावयास बोलावलें. पण त्या वेळीं जावडेकरांची कबुली मिळाली नाहीं. ते इस्लामपुरास परत गेले. आणि श्री. ग. वि. कौजलगी यांच्या जोडीनें दोन वर्षें तालुका कॉंग्रेस कमिटीचें कार्य त्यांनीं केलें. महात्माजी तुरुंगांत जातांच त्यांनीं पेठ येथें महार-वसतिगृह स्थापन केलें व तें तीन-चार वर्षें चालविलें. त्या काळांत त्यांनीं "राजनीतिशास्त्र-परिचय" हें पुस्तक लिहिलें. जावडेकरांची मनोभूमिका तत्त्वचिंतकाची व जीवनवाद्याची

असल्यामुळें त्यांचें पुस्तक व्यापक व पोषक विचारांनीं ओतप्रोत भरलेलें असेंच निर्माण झालें. त्या पुस्तकामुळें त्यांची प्रसिद्धि झाली. त्या पुस्तकप्रकाशना-पूर्वी त्यांनीं "हिंदी राजकारणाचें स्वरूप" या नांवाचें पुस्तक लिहून तयार केलें होतें. १९२४ च्या बेळगांव कॉंग्रेसला ते गेले असतां देवांची पुन्हा भेट झाली व पूर्वपरिचय वाढला. पुढें महात्माजींचा दौरा महाराष्ट्रांत निघणार होता. त्याच्या पूर्वतयारीसाठीं देव इस्लामपूरला आले. त्या वेळीं जावडेकर व देव यांचा विशेष परिचय झाला. देवांना जावडेकरांच्या पुस्तकाची गोष्ट माहीत झाली. जावडेकरांचा 'स्वधर्म' त्यांना कळून चुकला. म्हणूनच जेव्हां पुण्यास परत गेल्यावर देवांनीं 'स्वराज्य' पत्र चालविण्यासाठीं आपल्या हातीं घेतलें, तेव्हां जावडेकरांजवळ त्यांच्या पुस्तकाची व लेखांची मागणी केली. त्यांनीं रुकार दिला. पुढें दोघांचा पत्रव्यवहार चालू झाला. जावडेकरांनीं पुण्यास यावें म्हणून देवांचा आग्रह चालू होता. तिकडे लिमयांची एकदां दौऱ्यावर असतांना जावडेकरांशीं गांठ पडली व महाविद्यालयांत त्यांना बोलावण्याची कल्पना त्यांस सुचली. पुष्कळ भवति न भवति झाल्यावर जावडेकर १९२६ सालीं पुण्यांत आले व "इतिहास-अर्थशास्त्र-राजकारण" या विषयाचे अध्यापक म्हणून महाविद्यालयांत रुजू झाले.

महाराष्ट्रीय राजकारणाचा साकल्यानें विचार करणारे जे अगदींच तुरळक कार्यकर्ते त्या समयीं होते त्यांत जावडेकरांची गणना करतां येईल. त्यांच्यांत लढवय्या वृत्ति नसल्यामुळें ते प्रांतिक राजकारणांत पडले नाहींत. परंतु त्यांची विचारसरणी प्रबळ व प्रगतिमान असल्यामुळें प्रांतांतील हालचालींवर त्यांची कुशाग्रबुद्धि जागृतपणें लक्ष ठेवीत असे. वर्तमानकाळाचें आकलन करून ते भविष्यांतील घटना ओळखीत. त्यांना राजकारणाची पारखही चांगली होती. त्यामुळें सर्व घडामोडींचा वेध ते घेऊं शकत. या नवीन अध्यापकाची कुशलता, सदभिरुचि, जीवनाकडे पाहण्याची दृष्टि व तें उन्नत करण्याबाबतचे विचार यांमुळें विद्यार्थ्यांना एक अपूर्व रसायन मिळूं लागलें.

आणखी एका वर्षानें आचार्य लिमये आणि हर्षे यांच्या प्रयत्नांनीं दुसरे एक अध्यापक महाविद्यालयांत दाखल झाले. आचार्य भागवत यांचा जन्म महाड येथें २६ एप्रिल १९०३ रोजीं झाला. त्यांचे वडील रत्नागिरी

जिल्ह्यांतील खेड तालुक्यांतील एका बाळबोध घराण्यांपैकीं होते. त्यांच्या घराण्यांत रामदासी संप्रदायाचें वर्चस्व होतें. शिक्षणासाठीं वडील लहान वयांतच घरून पळून साताऱ्यास गेले होते व पुढें आपल्या कर्तृत्वाच्या बळावर शिक्षण संपादून सर्व्हे खात्यांत नोकर राहिले. वर्षांतून आठ महिने ते फिरतीवर असत व चार महिने पुण्यास स्थायी राहत. ते भक्त, वेदान्ती व मोठे कर्मठ होते. त्यांची सत्यनिष्ठा जाज्वल्य होती. नोकरीवर असतां ते प्रामाणिकपणें काम करीत त्यामुळें त्यांना पैसा मिळाला नाहीं; परंतु सत्यनिष्ठ म्हणून त्यांनीं ख्याति मिळविली होती. त्यांची पत्नी वयानें त्यांच्यापेक्षां फार लहान होती. उतारवयांत त्यांना मुलें झालीं. वडील चिरंजीव ते आचार्य भागवत. त्यांच्या मातृवंशाकडूनही त्यांना वैदिकपणाचा वारसा मिळाला.

भागवतांचें शिक्षण फार लवकर व घरीं सुरू झालें. वयाच्या बाराव्या वर्षी ते मराठी सातवींत गेले. सोळावें वर्ष लागल्याशिवाय फायनलला बसूं देत नसत. खेरीज भागवतांना इंग्रजी शिकण्याची इच्छा होती. वडिलांची आर्थिक परिस्थिति त्यांना इंग्रजी शिक्षण देण्याइतकी समाधानकारक नव्हती. परंतु घरीं बसण्यापेक्षां शिक्षण देणें बरें असा विचार करून वडिलांनीं त्यांना प्रसिद्ध ओकशास्त्री यांचे बंधु वासुदेवराव ओक त्यांचे शेजारीं राहत त्यांचेकडे इंग्रजी शिकण्यास पाठविलें. महाडांत १९०७-८ च्या सुमारास रायगडावरील शिवजयन्तीच्या उत्सवास टिळक व परांजपे आले होते आणि त्यामुळें इंग्रजी शाळेंतील शिक्षक स्वदेशीच्या चळवळीनें भारावून गेले होते. ओक त्यांपैकींच एक असून, सरकारच्या दडपशाहींत त्यांचीं बोटें चांगलींच भाजून निघालीं होतीं. भागवतांनीं मॅट्रिकपर्यंतच्या इयत्ता पांच वर्षांत संपविल्या व ते मुंबईस धुइल्सनमध्यें प्रविष्ट झाले. शाळेंत असतांनाच त्यांनीं वक्तृत्वकलेचा पद्धतशीर अभ्यास केला होता. भागवतांनीं इंग्रजी, मराठी, संस्कृत इत्यादि भाषा व धार्मिक विषय यांचें खूप अध्ययन केलें होतें. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या निबंधमालेनें त्यांना देशाभिमानाची स्फूर्ति दिली. आर्थिक अडचणींमुळें त्यांना कॉलेजचें शिक्षण चालू राखणें अशक्य झालें. त्यामुळें कॉलेज सोडण्याचा त्यांचा विचार चाललाच होता. तेवढ्यांत असहकारितेची चळवळ आली तीमुळें तर निश्चयच झाला. मॅट्रिकच्या परीक्षेनंतर लगेच

भागवतांचा विवाह झाला होता. त्यांचे मेहुणे श्री. विनायकराव उपाध्ये हे एक विद्वान् पदवीधर व राष्ट्रीय वृत्तीचे शिक्षक होते. मॅट्रिकच्या वर्गात असतां भागवत हे त्यांचे विद्यार्थी होते. त्यांनीं महाड येथें एक राष्ट्रीय शाळा काढली व भागवतांना स्वतःच्या मदतीस पाचारण केलें. त्याप्रमाणें भागवत राष्ट्रीय शाळेंत शिक्षक झाले व त्या दोघांनीं ती शाळा १९२५ पर्यंत उत्तम प्रकारें चालविली. पुढें कौटुंबिक व आर्थिक अडचणींमुळें अनिच्छेनें उपाध्ये यांस शाळा सोडणें भाग पडलें, तरी भागवतांनीं ती पुढें आणखी एक वर्ष चालविली. नंतर अनुकूल वातावरण न राहिल्यामुळें ती बंद करावी लागली.

भागवत कोंकणच्या संस्कृतींत वाढले होते. शाळेंत असतांना ते कर्मठ सनातनी होते; परंतु महात्माजींच्या प्रभावामुळें त्यांना जीवनाची स्पष्ट कल्पना आली व ते साधक बनले. रामदासी वाङ्मयाचा त्यांच्या मनावर खोल परिणाम झाला होता. भर्तृहरीची पंडिताची व्याख्या "एकान्ततो निस्पृहः" त्यांना शोभेल. सारें उच्च वाङ्मय त्यांनीं पालथें घातलें होतें. त्यांच्या जीवनांत एकच मोठी महत्त्वाकांक्षा होती. ती म्हणजे ज्ञानार्जन. त्यांचें स्वतः-चें एक उत्कृष्ट ग्रंथालय होतें. १९२६ अखेर शाळा बंद झाल्यावर ते नाशिक येथें डॉ. कुर्तकोटी शंकराचार्यांच्या संस्कृत विद्यापीठांत उच्च अध्ययनासाठीं गेले. तेथें विद्वद्रत्न दफ्तरी व श्री. लक्ष्मणशास्त्री मुरगुडकर यांचेकडे त्यांनीं संस्कृत धर्मशास्त्राचा अभ्यास केला. पण संस्थेची व्यवस्था समाधान-कारक नसल्यामुळें ते परत महाडला गेले. १९२७ च्या उन्हाळ्यांत पुण्यास गेले असतां त्यांना आचार्य लिमये यांनीं पकडलें व टिळक महाविद्यालयांत येण्याची गळ घातली. १९२७ च्या सप्टेंबरमध्यें ते पुण्यास गेले. प्रथमचे कांहीं महिने त्यांस विद्यापीठास आर्थिक मदत मिळविण्यासाठीं नागपूर, दिल्ली, कलकत्ता इकडील महाराष्ट्रीय मंडळींत प्रचार करावा लागला. या वेळीं त्यांनीं गुरुकुल ( कांगडी ), विश्वभारती इत्यादि संस्था पाहिल्या. नंतर पुढील वर्षी ते विद्यापीठांत अध्यापक म्हणून प्रविष्ट झाले. महाडला राष्ट्रीय शाळेंत शिक्षक झाल्याबरोबरच त्यांनीं खासगी अभ्यास करून विद्यापीठाची वाङ्मय-विशारद पदवी मिळविली होती. विद्यापीठांत असतां आचार्य जावडेकरांचे संगतींत त्यांनीं पाश्चात्यांच्या सामाजिक शास्त्रांचें परिशीलन केलें.

भागवतांचें जीवन म्हणजे अध्ययन-अध्यापनात्मक ब्रह्मकर्मांचा एक अखंड झरा होता. त्यांची सरस्वती-वैखरी मोठी प्रासादिक होती. महात्मा-जींच्या चळवळींत ते पडले ते केवळ भावनावश होऊन पडले नाहींत. महात्माजींच्या तत्त्वज्ञानाचा त्यांनीं दीर्घकाल व सखोल अभ्यास केला व सारे सिद्धान्त बुद्धिसात् केले. त्यांची प्रगाढ बुद्धि, अफाट वाचन आणि ओजस्वी शब्दशक्ति यांची कीर्ति दूरवर झाली होतीच. परंतु महाराष्ट्रांत कोणासही प्रांतीय प्रसिद्धि पुण्यास आल्याखेरीज मिळतच नाहीं. पुण्यांत गाजला तो महाराष्ट्रांत गाजला ! सारे रस्ते पुण्याकडे नेतात. आचार्य भागवत पुण्यांत येतांच त्यांची महती लोक जाणूं लागले. मोठेपणा मिळविणें ही कठीण गोष्ट खरी, पण मोठेपणा ओळखला जाणें अतिशय दुर्लभ आहे. असो. आचार्य भागवत महाविद्यालयांत अध्यापक म्हणून आले तेव्हां त्यांना वसतिगृहाचे स्वामी करण्यांत आलें. जावडेकर व भागवत यांचीं राजकीय व इतर पुष्कळ मतें जुळत; त्यामुळें त्यांच्यांत मैत्री जमली. आणि इतरांच्या वृत्तीपासून भिन्न वृत्तीच्या या गृहस्थांनीं महाविद्यालयांत एक नवीन तेज निर्माण केलें. दोघेही केळकर-धोरणाचे विरोधी होते आणि महात्मा गांधींचे परमभक्त होते. दोघांचीही बुद्धि व विचार जाज्वल्य होते. दोघांचेंही वाचन जबरदस्त होतें व आपल्या विषयांत हातखंडा होता. राज्यनीति व अर्थशास्त्र हे जावडेकरांचे विषय होते. साहित्य व तत्त्वज्ञान हे भागवतांचे विषय होते. आपापल्या विषयांत पूर्ण पारंगत असल्यामुळें विद्यार्थ्यांसमोर सुंदर वाङ्मयरस ओतला जाई. त्यांच्यांत कृपणता नव्हती. 'इष्टैःसह भुज्यताम्' या प्राचीन आज्ञेप्रमाणें ते आपलें ज्ञान विद्यार्थ्यांसमोर मोकळेपणानें ओतीत व छात्र आणि अध्यापक या उभयतांचें जीवन परिपुष्ट होण्यास मदत करीत.

राष्ट्रीय शिक्षणांत पडून पुढेंही दीर्घ काल राजकारणांत कार्य करणाऱ्या सेवकांचें वर्णन आतांपर्यंत केलें. याशिवाय राष्ट्रीय शिक्षणक्षेत्रांत काम करणारे दुसरेही कित्येक होते. 'लोकशिक्षण'कार जांभेकर व स्वामी कुवलयानंद यांनीं अमळनेरच्या शाळेंत व बापू देसाई यांनीं समर्थ विद्यालयांत केलेली कामगिरी स्पृहणीय आहे. सासवनें येथील वैश्य विद्याश्रमांत आचार्य ढवण, नाना काणे व चिंतामणशास्त्री जोशी उर्फ शास्त्रीजी यांनींही खूप कालपर्यंत सेवा

केली. पैकीं नाना काणे दिवंगत झाले. त्यांचें स्वतंत्र चरित्र प्रसिद्ध झालेंच आहे. त्यांच्या मृत्यूनें महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाच्या चळवळीचें नुकसान झालें. इतकेंच नव्हे तर एका सज्जन व शीलवान् सेवकास प्रांत मुकला.

परंतु या राष्ट्रीय शाळांबद्दल एक ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट नमूद केली पाहिजे. विशेषेंकरून पुण्याबाहेरच्या महाराष्ट्रांत राष्ट्रीयशाळा याच कॉंग्रेस-विचारसरणीच्या केन्द्र बनल्या होत्या. नवीन राजकीय विचारप्रणालीची ज्योति या शिक्षक-सेवकांनीं तेवत ठेवली होती. या शाळांच्या विद्यार्थ्यांतूनच खादीसेवक व १९३० च्या सत्याग्रहांतील सैनिक निर्माण झाले. राष्ट्रीय उत्सव, खादी-उत्पत्ति, खादी-प्रचार वगैरे कार्यें याच संस्थांनीं चालू ठेविलीं. नंतरच्या दशकांत जनतासंबंधाची चळवळ सुरू झाली. तिच्यासाठीं ग्रामसेवक निर्माण करण्याचें कार्यही याच संस्थांनीं केलें.

---

# २० विधायक खादी कीं विनाशक उन्माद ?



हिमालयाच्या पायथ्याशीं सोलन नांवाचें गांव वसलें आहे. लाला लजपतराय तेथें विश्रांति घेत होते. 'केसरी'च्या बातमीदारानें त्यांची मुलाखत घेतली व महाराष्ट्रांतील दुफळीसंबंधानें त्यांच्याशीं चर्चा केली. लालाजी म्हणाले, " महाराष्ट्रांतील बेकीच्या मुळाशीं तत्त्वनिष्ठा थोडी असून व्यक्तिद्वेष व व्यक्तिमत्सर अधिक आहेत."

बंगाल, पंजाब, संयुक्तप्रांत, गुजरात वगैरे प्रांतांचें नशीब म्हटलें पाहिजे कीं, त्या काळीं त्या त्या प्रांतांतून एक सर्वमान्य व्यक्तिविशेष नेता म्हणून गाजत होता. लोकमान्यांच्या मागून कोणी व्यक्तिविशेष महाराष्ट्रांत राहिला नाहीं. जुन्या पिढीचे सारे कार्यकर्ते बरोबरीचेच होते. नव्या पिढीचेही तसेच होते. त्यामुळें स्पर्धा करण्यास पुष्कळ जागा होती.

डिसेंबर १९२३ अखेर कोकोनाडा येथें मौ. महंमदअली यांच्या अध्यक्षतेखालीं राष्ट्रीय अधिवेशन भरलें व दिल्लीच्या समेटाचें त्यानें समर्थन केलें.

पुढील महिन्यांत दोन गोष्टी घडून आल्या—एक म्हणजे बॅ. सावरकर यांची येरवड्यांतून मुक्तता झाली व दुसरी म्हणजे महात्माजी आजारी पडून कैदेंतून सुटले. ५ फेब्रुवारी रोजीं महात्माजींच्या सुटकेचा हुकूम आला, त्या दिवशीं पुणें म्युनिसिपल स्कूल बोर्डाचे चेअरमन ल. ब. भोपटकर यांनीं हुकूम काढून म्युनिसिपल मुलांमुलींच्या शाळांना रजा दिली. संध्याकाळीं रे-मार्केटच्या मैदानावर प्रचंड सभा झाली. अलीबंधु हजर होते. भोपटकरांचें व्याख्यान झालें. त्याचा मथितार्थ असाः—" महात्माजींना सोडलें हा परमेश्वराचा मोठा अनुग्रहच झालेला आहे यांत बिलकुल शंका नाहीं. सरकारनें मोठेपणा दाखविला आणि तें धन्यवादाला पात्र आहे असें मला वाटत नाहीं. सर्व जगांत ज्याच्या तोडीचा कोणीच नाहीं अशा महात्माजींना—कीं जे न्यायाच्या व सत्याच्या मार्गाचा शांततेनें अवलंब करीत होते त्यांना—तुरुंगांत टाकून सरकारनें पाप केलें होतें. त्या पापापासून सरकार मुक्त झालें

एवढेंच ! ही ५ वी तारीख हिंदुस्थानच्या इतिहासांत संस्मरणीय अशीच आहे. स्वराज्य नोकरशाहीनें द्यावयाचें नसून राष्ट्रीय सभेच्या अनुयायांनीं तें मिळवावयाचें आहे. महात्माजी व अलीबंधु हे पुढारी सांगतील त्याप्रमाणें वागण्यास आपण सर्वांनीं जरूर लागलें पाहिजे."

या वर्षी महाराष्ट्र प्रांतिक परिषद जळगांव येथें बोलावण्याचें ठरलें होतें. देव व दास्ताने ती यशस्वी करण्याच्या खटपटींत होते. तितक्यांत देवांना तळमळ वाटण्यासारखी एक गोष्ट घडून आली. येत्या कॉंग्रेससाठीं कर्नाटकानें निमंत्रण दिलें. त्याप्रमाणें १९२४ ची कॉंग्रेस कर्नाटकांत करण्याचें ठरलें. देवांचा महाराष्ट्राबद्दलचा अभिमान प्रदीप्त होऊन उठला. आतांपर्यंत एकदांच पुण्यांत अधिवेशन भरलें होतें व तेंही महाराष्ट्राच्या अशा आमंत्रणावरून नव्हे. त्या वेळीं सारा मुंबई इलाखाच एकजिनसी घेतला जाई. भाषावार प्रांतभेद केल्यावर नव्या कर्नाटक प्रांतानें अवघ्या चार वर्षांत कॉंग्रेसचें अधिवेशन भरविण्याची आकांक्षा धरावी व सर्व गोष्टींत अग्रेसर म्हणून मिरविणाऱ्या महाराष्ट्रांत दुफळी माजून त्याची इभ्रत उतरावी याचें त्यांना दुःख वाटलें. त्यांना महाराष्ट्राचा अभिमान वाटत होता. त्यांनीं "महाराष्ट्रांत कॉंग्रेस बोलवा" अशी चळवळ सुरू केली.

"येत्या महाराष्ट्र परिषदेपुढें विचारार्थ जे अनेक विषय येतील त्यांमध्यें "महाराष्ट्रांत राष्ट्रीय सभेला आमंत्रण देणें" हाहि विषय यावा अशी माझी सर्व महाराष्ट्रीयांना विनंति आहे. महाराष्ट्रांत राष्ट्रीय सभेचें अधिवेशन होऊन तीस वर्षें झालीं. कोणत्या ना कोणत्या कारणामुळें का होईना, १८९५ सालनंतर महाराष्ट्रांत राष्ट्रीय सभा झाली नाहीं.

"महाराष्ट्रांत वाढलेला पक्षभेद व त्यामुळें राष्ट्रीय कार्यांत उत्पन्न झालेलें औदासिन्य व आलेली शिथिलता जाऊन महाराष्ट्राला राष्ट्राच्या राजकारणांत पूर्वीचें स्थान मिळवून देण्याला राष्ट्रीय सभेचें अधिवेशन हें एक उत्तम साधन आहे. जबाबदारीची जाणीव ही मनुष्याला जितकी कार्यक्षम व दुसऱ्याशीं सहकार्य करण्याला उत्सुक करिते तितकी दुसरी कोणतीही गोष्ट करीत नाहीं." असें पत्रक त्यांनीं काढलें.

जळगांवची परिषद यशस्वी करून दाखविण्याची जबाबदारी प्रांतिकवर

होती व प्रांतिक नाफेरवाल्या पक्षाच्या हातीं असल्यामुळें पर्यायानें त्यांचेवरच ही जबाबदारी पडली. खानदेशच्या लोकांनीं उत्साहानें चळवळ सुरू केली. पूर्वीच्या परिषदांपेक्षां या परिषदेचा विशेष म्हणजे परिषदेबरोबरच एक खादीप्रदर्शन उघडण्याचा चालकांचा विचार होता. देव व दास्ताने यांनीं महाराष्ट्रभर दौरे काढून पैसा गोळा करण्यास आरंभ केला. तिकडे फेरवाल्या पक्षानें परिषदेवर बहिष्कार घातला. दास्तान्यांनीं केळकरांना पत्र लिहून जळगांवचें आमंत्रण दिलें. केळकरांनीं उत्तरांत रत्नागिरीची आठवण देऊन आमंत्रणास नकार दिला. त्यावर देवांनीं पत्रक काढलें —

" सर्वच जळगांवला चला " या लेखांत ते म्हणतात, " रत्नागिरीच्या वेळेस कौन्सिलमधील कार्य व त्याचें फळ हा मुत्सद्द्यांच्या मतभेदाचा विषय होता, तर तो आज इतिहासकारांचा झाला आहे. कौन्सिलमधील पहिली चकमक झडली असून हा लढा आणखी थोडा वेळ लांबला अगर लांबविला तरी त्याचा शेवटीं परिणाम काय होणार हें बहुतेक निश्चित झाल्यासारखें झालें आहे... विधायक कार्यक्रमावर फिरून दोन्ही पक्षांचें एकमत होऊन कायदेभंगाच्या लढ्याची तयारी करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. प्रांताला आलेलें शैथिल्य घालवून त्याला जर कार्यक्षम करावयाचें असेल तर विधायक कार्यक्रम फिरून जोरानें सुरू करणें आवश्यक आहे. दोन्ही पक्षांच्या सहकार्याशिवाय या बाबतींत विशेष काम होईल असें मला वाटत नाहीं. दोन्ही पक्ष एक होऊन जर कार्याला लागतील तर महाराष्ट्रांत विधायक कार्यक्रमाचें काम पर्वताएवढें पडलें आहे. महाराष्ट्र त्याला अनुकूल आहे व महाराष्ट्राला त्याची जरूरीही आहे...... आकाशांत एखादा दुसरा बारीक ढग दिसूं लागला आहे. ( हिंदुमुसलमान तंटा ) तो मोठा होऊन त्यानें सर्व आकाश व्यापलें नाहीं तोंच तो नाहींसा करणें दोन्ही जातींच्या एकीच्या व हिताच्या दृष्टीनें अत्यंत जरूर आहे. परंतु याहीपेक्षां अत्यंत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे ब्राह्मणब्राह्मणेतरांचा वाद होय. हा वाद म्हणजे महाराष्ट्रांतील सर्व कार्यांच्या मुळाला लागलेली कीड होय. या प्रश्नामुळें राष्ट्रीय सभेचें कार्य करणें कांहीं ठिकाणीं अशक्य होऊन बसत आहे. इतकेंच नव्हे तर हा वाद जोंपर्यंत मिटणार नाहीं तोंपर्यंत महाराष्ट्रांत कोणतेंच कार्य मोठ्या प्रमाणावर होणें शक्य नाहीं... अनत्याचारी क्रान्ति हें मूठभर लोकांचें

कार्य नव्हे. ती मूठभर लोकांनीं जनतेकरितां करावयाची नसून जनतेनें ती स्वतः करावयाची असते."

या विनवणीचा कांहीं परिणाम झाला नाहीं. विधायक कार्यक्रमाचें महत्त्व फार थोड्या लोकांस पटलें होतें. फेरवाले तर त्याची टर उडवीत होते. महात्माजींच्या पुनरागमनामुळें नाफेरवाल्यांना विशेष चालना मिळाली होती इतकेंच. जळगांवची परिषद फार यशस्वी झाली असें म्हणण्यापेक्षां तेथील खादी-प्रदर्शन अपूर्व झालें असें म्हणणें विशेष योग्य ठरेल. त्यासाठीं महिना दीड महिना दौरे काढून १२,००० रु. गोळा करण्यांत आले होते. खादी-निदर्शनेंही पुष्कळ ठेविलीं होतीं. सामान्य लोकांत प्रचार खूप झाला. प्रदर्शन खाडिलकरांनीं उघडलें. परिषदेचे अध्यक्ष गंगाधरराव देशपांडे होते. गंगाधरराव जरी स्वतःस कर्नाटकचे म्हणवीत व त्या प्रांतांत त्यांचें नेतृत्व संशयातीत होतें तरी टिळकांच्या वेळेपासून त्यांचा महाराष्ट्राशीं कायमचा संबंध जडला होता. पूर्वी महाराष्ट्र व कर्नाटक वेगळे नसल्यामुळें सारें संयुक्त राजकारण चालत असे. प्रांत वेगळे झाल्यावर नाफेरवाल्यांत आपल्या चारित्र्यानें व गांधी-निष्ठेमुळें, तसेंच वयाच्या अधिकारामुळेंही ते सर्वमान्य बनले. महाराष्ट्रांतील जुन्या पिढीच्या असहकारितावाद्यांत गंगाधररावां-इतका ध्येयनिष्ठ राजकारणी पुरुष नव्हता. महाराष्ट्रांतील नव्या पिढीच्या कित्येक असहकारितावाद्यांना गंगाधररावांकडून प्रोत्साहन मिळालें होतें व मिळतही होतें. केळकरपक्षांतही त्यांचे मित्र होते. एवंच, गंगाधररावांसारख्या वृद्ध व सन्मान्य कार्यकर्त्यास अध्यक्ष करून चालकांनीं परिषदेचा गौरव वाढविला. आपल्या अध्यक्षीय भाषणांत गंगाधररावांनीं स्वतःचा दृष्टिकोण विशद केला. "माझ्या मतें दोन्ही कार्यक्रम एकत्र राहणें शक्य नाहीं. स्वावलंबनाच्या मार्गावर राष्ट्र असतांना कौन्सिलचा परावलंबी मार्ग जवळ राहणें शक्य नाहीं. दोनतीन वर्षांत आपला विधायक कार्यक्रम पुढें आला नाहीं याचें कारण हेंच आहे."

महाराष्ट्र, गुजरात व कर्नाटक यांच्या प्रांतिक परिषदा क्रमाक्रमानें जळगांव, बोरसद व गोकर्ण येथें भरल्या व सर्वांनीं महात्माजींचें नेतृत्व मान्य केलें.

* * *

तिकडे मुळशीचें वातावरण गढूळ होत चाललें होतें. मुळशी-सत्याग्रहाचें

नेतृत्व सेनापति बापटांकडे गेल्याचें मागें लिहिलेंच आहे. सत्याग्रहाबाबत महात्माजींचा सल्ला घेतला असतां सत्याग्रहासाठीं त्यांनीं दोन अटींवर जोर दिला होता : (१) अनत्याचाराचें तत्त्व कसोशीनें पाळलें पाहिजे. (२) मुळशींतल्या मावळ्यांनींच त्यागास तयार झालें पाहिजे व सत्याग्रह घडवून आणला पाहिजे. केवळ बाहेरच्या लोकांच्या मदतीनें ही गोष्ट तडीस जाणार नाहीं.

या अटी स्पष्ट असतां सेनापति बापटांसारख्या सशस्त्र क्रान्तिवाद्याच्या हातीं सत्याग्रहाचीं सूत्रें देण्यांत पहिल्या अटीचा भंग करण्यांत आला. आणि १९२४ च्या सुरुवातीस जेव्हां " मुळशीकर मावळ्यांची सर्वतोपरी दैन्यावस्था पाहून " सेनापति बापटांनीं त्यांना सत्याग्रहाच्या वचनांतून मुक्त करून सारी जबाबदारी महाराष्ट्रीयांवर टाकली तेव्हां दुसरीही अट मोडली गेली. परिणामीं विनिपात झाला हें सांगणें नकोच.

पुढें एक मुळशी परिषद बोलावण्यांत आली तींत सेनापतींनीं विचित्र भाषण केलें:—

" अधर्म उघड दिसत आहे. त्याचा प्रतिकार झालाच पाहिजे. सद्धर्माच्या स्थापनेसाठीं उपयुक्त अशा सर्व धर्मसंमत साधनांचा उपयोग करणें हा काय अधर्म आहे? कृत्रिम बंधनांत स्वतःला कायमचें जखडून घेण्यांत काय राम आहे ?...महात्माजींनीं जर्मन युद्धाच्या वेळीं जर्मनांना ठार करण्यासाठीं सैनिक गोळा करण्याची खटपट केली...महात्माजींची खरी शिकवण ध्यानांत घ्या."

ही खरी शिकवण ते आपल्या आत्मचरित्रांत सांगतातः—

'विनवीलें मियां तेथें द्या मला मिति निश्चित ।
सामसत्याग्रह नसे हरिमान्य सदोदित ॥
पायावरी विपक्षाच्या डोई हा सत्यआग्रह ।
डोईवरी विपक्षाच्या पाय ही सत्यआग्रह ॥
यथाधर्मे, यथान्याय पायरी पायरी क्रमें ।
सत्याग्रहाची चढणें हें सुयोग्य मजला गमे ॥ '

— "आमचे सेनापति"

सेनापति केवळ बोलून राहिले नाहींत. मावळ्यांच्या आधिपत्याबरोबर स्वतःस शिवाजीच्या जागीं कल्पून त्यांनीं शिवाजीच्या दिल्लीहून झालेल्या

अद्‌भुत सुटकेवर व इतर युक्त्यांप्रयुक्त्यांवर ताण करतील अशा अनेक बहुरूपी क्लृप्त्या करून पोलिसांच्या हातांवर तुरी दिल्या.

अशा प्रकारें शुद्ध अहिंसा व सत्य यांचा लोप होतांच सत्याग्रहाचें रूपच पालटून गेलें. सरकार व कंपनी यांचेंही धोरण कडक झालें. सेनापतींना पकडून सहा महिन्यांची शिक्षा देण्यांत आली. तुरुंगांत सुद्धां सेनापति काव्यें करून कैद्यांकरवीं तोंडपाठ करवीत व त्यांच्या सुटकेबरोबर हे काव्यवजा निरोप बाहेर जात. त्या काव्याच्या रूपानें त्यांनीं आपली विचारसरणी बाहेरील समाजांत ओतण्यास आरंभ केला. मुळशीच्या सत्याग्रहांतून भलतेंच पिलूं बाहेर पडलें. बापटांचा असा एक संप्रदाय कांहीं महाराष्ट्रांत निघाला नाहीं; पण त्यांच्या विचारसरणीमुळें महाराष्ट्राचें नुकसान झालें. भीरु व दुर्बल समाजाचा नैतिक दर्जा वाढविण्याचा प्रयत्न महात्माजी शुद्ध मार्गांनीं करीत असतां त्यांच्याच 'सत्याग्रह'कल्पनेंत आपल्या अशुद्ध कल्पना घुसडून जनतेचा बुद्धिभेद करण्याचा प्रयत्न बापटांनीं केला. महाराष्ट्रांतील बहुजनसमाजांत त्याचा प्रवेश झाला नाहीं खरा; परंतु सुशिक्षित समाजांत त्यानें वैमनस्याचें आणखी एक बीज पेरलें.

कंपनीही मेटाकुटीला आली होती. आपण केलेला अन्याय तिला डाचत होता. तिनें जमिनीची किंमत मोठ्या प्रमाणांत देऊं केली. हजार रुपये एकरापर्यंत जमिनीच्या किंमती वाढल्या. मावळ्यांची सत्याग्रहाची उमेद तर खचत चाललीच होती. त्यांनीं हा वेळपर्यंत जो निग्रह दाखविला होता व कष्ट सोसले होते त्यांचा मोबदला त्यांना मिळत होता. चळवळीचा सूत्रधार शाहणा व दूरदर्शी असता तर त्यानें चळवळीस यश देऊन मावळ्यांसही संतोष दिला असता. परंतु दुर्दैवानें नेतृत्व अपुरें पडलें; कार्यकर्ते हट्ट सोडीनात. पण मावळ्यांची शक्ति संपल्यामुळें बाहेरच्या चळवळ्यांचा हठाग्रह उपयोगी पडला नाहीं. सत्याग्रहाला आर्थिक मदत करणारे लोकही चळवळीचें स्वरूप पालटलेलें पाहतांच बिथरले. पुण्यांतील ज्या कार्यकर्त्यांनीं प्रारंभीं चळवळीला मदत केली व तिच्यासाठीं हाल सोसले त्यांनींही या प्रकरणांतून आपलें अंग काढून घेतलें. सेनापति बापट तुरुंगांत होते. बाळूकाका व इतर मंडळी कसाबसा सत्याग्रह (!) चालवीत होती; पण पूर्वीचा रंग येईना; मावळे जमिनी विकूं लागले.

फेब्रुवारी १९२३ मध्यें बापट सुटले. मुळशीसाठीं प्रचारार्थ त्यांनीं दौरा काढला. ठिकठिकाणीं ते भाषणें करीत. बेळगांवकडील एक भाषणांत त्यांनीं "आतां बॉंब ठोकण्याचे दिवस संपत आले आहेत—बॉंब फेकण्याचे जवळ येत आहेत" अशा अर्थाचे उद्गार काढले. परिणामीं सरकारनें त्यांस एक वर्षाची सजा केली.

त्याग आणि शौर्य यांची बापटांत कमतरता नाहीं. त्यांना जें रास्त वाटत होतें त्यासाठीं त्यांनीं तपस्याही पुष्कळ केली. परंतु तपस्या तामस, राजस वा सात्त्विक तीन प्रकारची असूं शकते. कांट्यावर झोंपणें, पंचाग्निसाधन करणें, पायावर सतत उभें राहणें या गोष्टी करण्यासाठींही एक प्रकारचें सामर्थ्य लागतें; परंतु ही तपस्या तामस झाली. मळ्यांतील गरीब मजुरांना छळून व पिळून साऱ्या समाजाला चहा पुरविणें हें राजस तप झालें. पण समाजहिताच्या कामासाठीं केवळ स्वतः क्लेश सहन करणें तेंच सात्त्विक व श्रेष्ठ तप होय.

बापटांनीं कैदेंतून सुटल्यावर शुद्ध सत्याग्रहाची जी नवी टूम काढली व टाटा कंपनीच्या मजुरांची गाडी अडवून शस्त्रांच्या योगानें त्यांना जखमा केल्या त्याचें समर्थन "सत्याची सेवा करण्याचे अनेक मार्ग आहेत—त्यांत दुर्जनांना जखमा आणि देहान्त दंड यांचाही अंतर्भाव होतो" असें सांगून करितां येणार नाहीं. ज्या भांडवलदारांकडून पिळले जाण्याबद्दल त्यांनीं शेत-कऱ्यांची कींव केली त्यांचेचकडे राबणारे ते पोटार्थी मजूर होते व समाजां-तील इतर दलितवर्गांतच त्यांचाही अंतर्भाव होत होता. त्यांना जखमी करून टाटांचें काय अनहित साधलें असतें ? आणि असल्या हिंस्र मार्गानें देशोद्धाराला तरी कशी मदत झाली असती ? मुळशीच्या मावळ्यांना तरी लढा पुढें चालविण्याची स्फूर्ति अशा प्रकारानें कशी यावी ? महात्माजींना हें वर्तमान कळतांच त्यांनीं १८ डिसेंबर १९२४ च्या 'यंग इंडिया'त "बेताल देशभक्ति" या सदराखालीं लेख लिहून साऱ्या कृत्याचा निषेध केला ! "सद् वा असद् साध्यासाठीं केलेला अत्याचार हा केव्हांही खराबच असतो....जनरल डायरनें जालियनवाला बागेंतील कत्तल केली ती निःसंशय त्याला उचित वाटणाऱ्या साध्यासाठीं केली (आणि हजारों इंग्रज स्त्री-पुरुषांना त्याच्याप्रमाणेंच वाटलें) ......ज्या क्षणीं माझेंच म्हणणें बरोबर आहे असा टेंभा मी मिरवितों

त्याच क्षणीं ईश्वराचा अधिकार मी लुबाडून घेतों. आणि सत्याचें परिपूर्ण व सर्वसाधारण असें प्रमाण नसल्यामुळें हरएक गोष्टींत अत्याचार गैरवाजवी समजला पाहिजे. म्हणजे शुद्ध हेतु अशुद्ध अथवा हिंसक साधनाचें समर्थन करूं शकत नाहींत. आणि म्हणून गुन्हेगार स्वखुषीनें अधिकाऱ्यांच्या स्वाधीन झाले याबद्दल मला त्यांचें अभिनंदन करतां येत नाहीं. त्यानें गुन्हा शमत तर नाहींच. ती निवळ फुशारकीही संभवेल."

सेनापतींना सात वर्षांची शिक्षा झाली. त्यांच्या सोबत्यांनाही दीर्घ मुदतीच्या शिक्षा झाल्या. ज्या मुळशीच्या मावळ्यांच्या नांवानें हा खटाटोप झाला त्यांना कंपनीनें अगोदरच नुकसानभरपाई देऊं केली होती. केसरी-कार्यालयांत केळकरांच्या मध्यस्थीनें हा बनाव जुळैंत म्हणजे अगोदरच घडून आला होता. मावळ्यांनीं भराभर आपल्या जमिनी विकल्या आणि त्यांना किंमत मिळवून देण्याच्या कामीं पुण्याचे न. वि. गाडगीळ यांनीं मेहनत घेतली.

"सत्याचें मुख सोन्याच्या थाळीनें झांकलेलें आहे." असें जें एक वाक्य उपनिषदांत आहे तें अगदीं बरोबर आहे. न्यायासाठीं देखील पाप करितां कामा नये हा उच्चतम सिद्धान्त समाज कधीं शिकेल तो शिको– कर्म निष्पाप नसेल तर फल उन्नतिकर मिळणार नाहीं हें निश्चित. माणसें जगतात तींच अनेकांचें ऋण घेऊन जगतात. असें असतां हत्या करून किंवा रक्तपात करून हरामाचें ऋण कां वाढवावें ? परंतु मानवांच्या हृदयांत उतावळेपणाच्या रूपानेंही हिंसाच अधिष्ठित असते, ती त्याला अनेक मुखांनीं अनेक बहाणे दाखवून हिंसेकडेच ओढीत नेत असते. या उतावळेपणाची पराकोटी म्हणजेच उन्माद ! खासगी व्यक्तीला उन्माद झाल्यास वैद्यकीय उपचार करण्यांत येतात. सार्वजनिक कार्यकर्त्यांचा उन्माद महाभयंकर असतो. कारण तो धर्माच्या वा पंथाच्या रूपानें येऊन सांसर्गिक बनतो आणि समाजाकडून आपली वीरपूजा करून घेतो. मग विवेकभ्रष्ट होण्यास वेळ कितीसा लागणार !

बापटांच्या डोक्यांत एकंदरींत विचारांचा गोंधळच दृष्टोत्पत्तीस येतो. रत्नागिरी तुरुंगांत असतां त्यांनीं एक पुस्तक लिहिलें. त्याच्या प्रस्तावनेंत त्यांनीं सत्याग्रहाचें समर्थन केलें आहे. परंतु त्यांची प्रकृति जालीम असल्या-मुळें निष्ठा अनन्य नाहीं. त्यांचा कल दोहोंकडे झुकतो.

# २१ महात्माजींचा कौल

स्वराज्यपक्षानें कौन्सिलांत प्रवेश करितांच बंगाल व मध्यप्रांत येथील गव्हर्नरांनीं अनुक्रमें दास व मुंजे यांस बोलावून घेऊन सोंपीव खातीं त्यांस देऊं केलीं. परंतु दोघांनींही पक्षाच्या धोरणास अनुसरून त्यांचा स्वीकार केला नाहीं.

'केसरी'नें याबद्दल लिहिलें, "दिवाणागिऱ्या पत्करून नेमस्तांनीं जें केलें नाहीं तें स्वराज्यपक्षीयांनीं करावें, म्हणजे आपलें मत गव्हर्नर व राखीव खात्याचे अधिकारी यांजवर लादण्याचा प्रयत्न करावा व तो निष्फळ झाल्यास मग राजीनामे देऊन बाहेर पडावें व सरकारची बेइमानी किंवा बेअब्रू वेशीवर टांगावी, असाहि एक मार्ग किंवा पर्याय त्यांतल्या त्यांत निघण्यासारखा आहे असें कित्येक लोक मानतात, हें आम्हांस माहीत आहे. पण हा नवा मार्ग चोखाळावयाचा झालाच तरी तो स्वराज्यपक्षानेंच न स्वीकारतां स्वतंत्र म्हणविणाऱ्या लोकांस तो मोकळा ठेवावा, म्हणजे त्यांचीही त्यांत आपोआप परीक्षा होईल......दिवाणागिऱ्या न स्वीकारणें ही गोष्ट इतर कोणास चुकीची वाटली तरी स्वराज्यपक्षाच्या दृष्टीनें ती सर्वस्वीं बरोबरच आहे. द्विदल राज्यपद्धति मोडून टाका व प्रांतिक स्वायत्तता द्या अशी मागणी करण्याला या निरपेक्ष व बाणेदार वर्तनापेक्षां दुसरें अधिक भक्कम अधिष्ठान मिळणें शक्य नव्हतें."

कौन्सिलांत स्वराज्यपक्षानें अडवणुकीचें धोरण चालविलें होतें. सरकारनें आपल्या पसंतीनें दिवाण नेमले होते. फक्त मध्यप्रांतांतील स्वराज्यपक्ष दिवाणांवर अविश्वासाचा ठराव पास करूं शकला; परंतु सरकारच्या हातीं सर्व सत्ता असल्यामुळें गव्हर्नरनें सोंपीव खातीं स्वतःकडे घेतलीं आणि राज्यकारभार चालू ठेवला. सरकारचें सामर्थ्य अबाधित असल्याचे पुरावे मिळतच गेले. ना. चिंतामणी यांना राजीनामा द्यावा लागला ( संयुक्तप्रांत ), ना. परांजपे यांस साठे-परांजपे योजना दडपून टाकावी लागली ( मुंबई ), मद्रासच्या दिवाणांना युरोपियन प्रिन्सिपलच्या नेमणुकीला संमति द्यावी लागली आणि

ना. जाधव मुंबईतील शिक्षणखात्याचे दिवाण असतांना त्यांनाही एल्फिन्स्टन हायस्कूलसाठीं युरोपियन प्रिन्सिपल शोधावा लागला.

पुढें बंगालमधील स्वराज्यपक्षानेंही सरकारचा पराभव केला. परंतु सरकारची सत्ता अमर्याद असल्यामुळें देशाच्या पदरीं कांहींच भरीव वस्तु पडली नाहीं. या थोर पुढाऱ्यांनीं कौन्सिलांत जाऊन आपली चमक दाखविली. पण सरकारला व्हेटो व सर्टिफिकेशनचे अधिकार पुष्कळच होते. त्यामुळें सरकार आपला ग्रास सुखानें घेत असतां कायदेमंडळांना निराश व नाउमेद होऊन तोंडाकडे बघत बसणें भाग पडलें. बारीक-सारीक गोष्टींत सुद्धां सरकार कायदेमंडळांच्या इच्छेला आदर दाखवीत नव्हतें.

महात्मा गांधी जुहू येथें असतां ते व स्वराज्यपक्ष यांच्यांत वाटाघाटी झाल्या. महात्माजींनीं कौन्सिलप्रवेशाच्या विरुद्ध मत दिलें. दास-नेहरूंची विचारसरणी त्यांना पसंत नव्हती. कौन्सिलप्रवेश केल्यास काय करावें या बाबतींतही त्यांचें मत त्यांनीं प्रांजलपणानें सांगून टाकलें:—

" कौन्सिलांतील कामासंबंधानें माझें मत असें आहे. **त्यांचा कांहीं फायदा होत असेल तरच मी कौन्सिलांत जाईन.** जर मी कौन्सिलांत गेलों तर सर्वसाधारण अडवणुकीचें धोरण न स्वीकारतां कॉंग्रेसच्या विधायक कार्यक्रमास पुष्टि देण्याचा मी प्रयत्न करीन; यासाठीं मी, सरकारनें लागणारें कापड खादीचें घ्यावें, परदेशी कापडावर प्रतिबंधक जकात बसवावी आणि दारू व अमली पदार्थांचें उत्पन्न सोडून देऊन निदान तेवढ्यापुरता तरी लष्करी खर्च कमी करावा असे ठराव असेंब्लींत किंवा कौन्सिलांत मांडीन. सरकारनें हे ठराव अमलांत आणावयाचें नाकारिलें तर मी सरकारला कौन्सिलें बरखास्त करण्यास सांगेन आणि या मुद्द्यांवर मतदारांचीं मतें अजमावीन. सरकारनें कौन्सिलें बरखास्त केलीं नाहीं तर मी आपल्या जागेचा राजीनामा देईन आणि देश कायदेभंगाला तयार करीन...कायदेभंगाच्या तयारीची माझी कसोटी पूर्वींचीच आहे."

पं. मोतीलाल व दासबाबूंनीं उत्तर दिलें, " आमचें कौन्सिलांतील धोरण obstruction या पार्लमेंटरी शब्दानें नीट व्यक्त होत नाहीं. आमची अडवणूक पार्लमेंटरी ऑब्स्ट्रक्शन नसून नोकरशाहीनें आमच्या मार्गांत घातलेल्या

अडथळ्यांना विरोध असा त्याचा अर्थ आहे. ... आम्ही कौन्सिलांत लोकांची व पार्लमेंटची तडजोड होईतों बजेट फेटाळून लावणार. नोकरशाही आपलें आसन दृढ करण्यासाठीं आणील ते ठराव हाणून पाडणार, राष्ट्रवर्धक विषयांचे ठराव व बिलें मांडणार, नोकरशाहीला नागवणूक करूं न देणारें निश्चित आर्थिक धोरण स्वीकारणार, हें धोरण फलदायी करण्यासाठीं आम्ही कौन्सिलांतील निवडून यावयाची प्रत्येक जागा भरून काढणार; इतकेंच नव्हे तर निवडून यावयाच्या जागा व कमिट्यांवरील जागा स्वीकारणार... कौन्सिलबाहेर आम्ही मनःपूर्वक विधायक कार्यक्रम अमलांत आणणार; कारण आमचें कौन्सिलमधील कार्य फलद्रूप व्हावयाचें असेल तर आम्हांला बाहेरच्या लोकशक्तीचाच पाठिंबा घेतला पाहिजे. **महात्मा गांधींनीं सुचविलेले ठराव आम्हांस मान्य आहेत व त्यांची कायदेभंगाची सूचनाही कबूल आहे. स्वाभिमानाला सोडल्याशिवाय कौन्सिलांत काम करतां येणें अशक्य वाटलें तर आम्ही कौन्सिलांतून जरूर बाहेर पडूं आणि तोंपर्यंत देश कायदेभंगास तयार झाला नसल्यास गांधींच्या हाताखालीं काम करून तो तयार करूं.**”

तिकडे केळकरांनींही आपला अभिप्राय केसरींत प्रकट केलाः—

“ कायदेभंगासंबंधींही “ पुनश्च बार्डोली ” हेंच महात्माजींचें धोरण कायम असून तें प्रसिद्ध झालें आहे. ... कायदेभंगास एकंदर सहा अटी सांगितल्या आहेत. जो तालुका कायदेभंग करण्यास तयार करावयाचा असेल त्यांतील प्रत्येक पुरुषानें, स्त्रीनें व मुलानें त्याच तालुक्यांत तयार झालेली हातसुताची व हातविणीची खादी वापरली पाहिजे; दारू व अफू यांचें एकही दुकान शिल्लक राहतां उपयोगी नाहीं. हिंदु-मुसलमानांत पूर्ण प्रेम व सलोखा असला पाहिजे; अस्पृश्यता नाहींशी होऊन अस्पृश्य मुलांचा राष्ट्रीय शाळेंत प्रवेश झाला पाहिजे, आणि कोणत्याही विहिरीवर पाणी काढण्यास व कोणत्याही देवळांत देवदर्शन घेण्याकरितां शिरण्यास त्यांना प्रत्यवाय असतां कामा नये; सर्वत्र राष्ट्रीय शाळा स्थापून सर्व खटले लवादपंचायतीनें मिटविले पाहिजेत ! आणि शेवटीं इतकी तयारी परिपूर्ण झाल्यावर कायदेभंग करण्याची जरूरीच राहणार नाहीं

असेंही ते म्हणतात ! कारण इतकी तयारी झाल्यावर सरकारला लोकांशीं विरोध करावा असें वाटणार नाहीं, त्यांचें अंतःकरणच बदलून जाईल ! वरील ध्येयवादाची भाषा जाणण्यांत ध्येयवादीच समर्थ होतील ! व्यावहारिक भाषेनें बोलावयाचें झाल्यास पूर्ण तयारी झाल्याशिवाय कायदेभंग होत नाहीं व पूर्ण तयारी झाल्यावर मग त्याची जरूरच उरत नाहीं. म्हणजे दोहोंतही " नाहीं " हाच साधारणविभाज्य शिल्लक राहतो- सारांश, बहिष्कारत्रयी व कायदेभंग या दोन मुख्य गोष्टींसंबंधानें गांधींचे मतें कोणास पसंत नसलीं तरी त्यांवर मोठें वादाचें रण माजण्यासारखें त्यांत कांहीं नाहीं."—" गांधी बोलले, पुढें काय ? "

महात्माजींनीं एकामागून एक दोन पत्रकें प्रसिद्ध केलीं. पहिल्या पत्रकांत असहकारितेवरील आपली श्रद्धा प्रकट करून स्वतःशीं मतभेद असलेल्यांना कौन्सिलप्रवेशाचा कार्यक्रम करण्यास मुभा दिली होती व कट्टरांना आपलें सर्व चित्त विधायक कार्यक्रमांवर केन्द्रित करण्यास आज्ञा केली होती. यानंतर दुसरें पत्रक त्यांनीं काढिलें. त्यांत महात्माजींनीं जाहीर केलें कीं, ज्यांनीं सरकारी पदव्या, शिक्षणसंस्था, कोर्टें आणि कौन्सिलें यांवर बहिष्कार घातला नाहीं व विधायक कार्यक्रमावरील आपला विश्वास जे सूत कांतून दर्शवीत नाहींत, त्यांनीं कॉंग्रेसच्या कार्यकारी-मंडळावर राहूं नये.

कॉंग्रेस संस्थेला कायदेभंगासाठीं तयार करावें म्हणून तींत शिस्त व एक-सूत्रीपणा आणण्यासाठीं महात्माजींनीं हें पाऊल घेतलें; परंतु स्वराजिस्ट पक्षानें त्याविरुद्ध ओरड केली. "आम्हांला कॉंग्रेसमधून हाकलून देण्यासाठींच हा सर्वाधिकारी हुकूम काढला " असें ते म्हणूं लागले.

केळकरांनीं महाराष्ट्र प्रांतिकचा राजीनामा देतांना असें प्रतिपादन केलें होतें कीं, "एखादा मनुष्य कॉंग्रेसचा ठराव सर्वस्वीं पाळण्यास असमर्थ असला किंवा कॉंग्रेसच्या ठरावांत फेरबदल व्हावे असें मोघम प्रतिपादीत असला किंवा अमुक ठरावांतलि अमुक एक गोष्टी असाव्या तशा नाहींत किंवा आहेत तशा नसाव्यात असें उघड म्हणत असला, पण असाही मनुष्य एखाद्या कॉंग्रेस कमिटीच्या एखाद्या अधिकाराच्या जागेवर इतर कारणांकरितां असावा असें मतदारांस वाटून त्यांना त्याची त्या जागीं निवड करावयाची असली तर त्या गोष्टीला हरकत असूं नये, असें माझें मत आहे."

काँग्रेस म्हणजे ‘ सर्वपंथपरिषद ’ मानून तींत संघटित अनुशासनाची किंवा एकसूत्रीपणाची आवश्यकता मुळींच नसल्याचें प्रतिपादन करणाऱ्या मनोदशेला महात्माजींची पथ्यकर शिफारस कितीशी रुचणार ! “ ही संघटना का विटंबना ! ” या लेखांत केळकरांनीं महात्माजींवर कडक टीका केली. “ महात्माजींनीं लोकशाहीच्या तत्त्वाला मूठमाती देऊन झारशाही सुरू केली ”, “ असल्या बेकायदेशीर व अन्यायमूलक फर्मानास ...... ठिकठिकाणचे मतदारसंघ योग्य वेळीं सनदशीर मार्गानें उत्तर देतीलच ” इतकें लिहून पुढें अधिक मनोवेधक विधान केलें आहे. “ राष्ट्रीय सभेची स्थापना कोणत्या कार्योद्देशानें व कोणत्या धोरणानें झाली याचाच अलीकडे कित्येक सभासदांस विसर पडल्यासारखा दिसतो. राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमांतून राजकारणास दिवसेंदिवस फांटा मिळत चालला आहे .... असहकारितेच्या भपक्यामुळें खऱ्या राजकारणाला प्रथम कांहीं दिवस गौणत्व आलें; पुढें बार्डोलीचा विधायक कार्यक्रम पुढें आल्यामुळें तर राजकारणाला कांहीं दिवस अज्ञातवास भोगावा लागला. नंतर स्वराज्यपक्षानें दीर्घ प्रयत्नानें व चिकाटीनें त्या राजकारणाला अज्ञातवासांतून काढून उजळ माथ्यानें वावरण्याची संधि दिली. परंतु आतां महात्माजींनीं पुन्हा बहिष्कारपंचकाचीं मढीं उकरून काढून राजकारणाला भेडसावण्याचा व स्वराज्यपक्षाला नामशेष करण्याचा डाव सुरू केला आहे. अशा वेळीं स्वराज्यप्राप्ति करून देण्याला विधायक कार्यक्रम हा कार्यक्षम आहे कीं काय आणि राजकारणाचें वावडें मानून बसल्यानें स्वराज्यप्राप्ति सुसाध्य होते का दुःसाध्य होते याचा ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या सभासदांनीं शांतपणें व दूरदृष्टीनें विचार केला पाहिजे.”

प्रजेला कायदेभंगासाठीं तयार करून साम्राज्यशाहीला नामशेष करूं पाहण्याचें महात्माजींचें धोरण राजकारणी नव्हतें व कायदेमंडळांतील अडवणुकीचा कार्यक्रम मात्र मूर्तिमंत राजकारण होता असा वरील बुद्धिवादाचा कयास दिसतो.

विरारच्या बैठकीनंतर नाफेरवाल्यांच्या हातीं महाराष्ट्र प्रांतिक आल्याचें सांगितलेंच आहे. परंतु नंतर दोन वर्षें महाराष्ट्रांतील दुफळी व द्वेष इतक्या थरास पोंचले होते कीं, विधायक काम धड होऊंच शकलें नाहीं. सार्वजनिक

वातावरण अतिशय विषारी बनलें होतें. महात्माजींच्या तत्त्वज्ञानाची हेटाळणी करण्यासही लोकांनीं कमी केलें नाहीं. ता. १०-९-२४ रोजीं भालाकार भोपटकर यांनीं गायकवाडवाड्यांत "लोकमान्य टिळक व लोकविचक्षण गांधी" या विषयावर व्याख्यान देऊन गुजराती समाज व महात्माजी यांवर विचित्र कोट्या केल्या. त्यामुळें पुण्यांतील गुजराती समाज संतापला व त्यांच्या निषेधाच्या सभा भरल्या. केलकर त्या वेळीं दिल्लीस होते. त्यांना हें कळल्यावर त्यांनीं चौकशी केली व गायकवाडवाड्यांतील गणपत्युत्सवांत भालाकारांचें भाषण झाल्यामुळें स्वतःवर जबाबदारी घेऊन त्यांनीं माफी मागितली. तरी सुद्धां माफीपत्रकांत "गणपत्युत्सवांतून स्वतःवर, स्वराज्यपक्षावर व ब्राह्मणजातीवर निंदाव्यंजक शब्दप्रयोग केल्याची माफी इतरांनीं न मागित याबद्दल" त्यांनीं कुरकुर केलीच.

महाजन यांनीं महाराष्ट्रांतील निवडणुकी प्रांतिक कमिटीनें निःपक्षपातीपणानं करविल्या नाहींत असा आरोप केला. त्याची चौकशी वर्किंग कमिटी व अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटी यांच्यापर्यंत जाऊन, बरेच दिवस तें प्रकरण चिघळून, शेवटीं चिटणीस जवाहरलाल नेहरू यांनीं निर्णय देऊन महाराष्ट्र प्रांतिकच्या पूर्वीच्याच निवडणुकी कायम केल्या.

प्रांतिकमधील अल्पसंख्याक लोकांनीं याप्रमाणें बहुसंख्याकांना स्वस्थपणें काम करूं दिलें नाहीं. बहुसंख्याकांचे पुढारी परांजपे यांस विधायक कार्यक्रमाचें महत्त्व फारसें वाटत नव्हतें. त्यामुळें इतरांचीही कुचंबणा होऊं लागली. "राजकारण खेळावें" तर व्यर्थ कालक्षेप व शक्तिक्षेप होतो; न खेळावें तर "आपला पक्ष" नामोहरम होतो. देव-दास्ताने वगैरे लोकांनीं महात्माजींकडे सल्ला मागितला. महात्माजींनीं त्यांस प्रांतिकमधून दूर होऊन विधायक कार्यक्रम करण्यास सांगितलें. महात्माजींची आज्ञा वंद्य मानून दास्तान्यांनीं परांजपे यांस कळविलें कीं, "आम्ही यापुढें प्रांतिकच्या राजकारणांत पडणार नाहीं." खवळून परांजपे उसळले, "गांधींची अहिंसा काय कळणार ?" पण दास्तान्यांनीं मनावर न घेतां आपला निश्चय कायम केला. त्यानंतर असहकारितावादी नव्या कार्यकर्त्यांनीं प्रांतिकचा संबंध कांहीं काल सोडला व खादीकार्याकडे आपलें मन वळविलें.

यानंतर प्रांतिकचे अध्यक्ष नगरचे वृद्ध कार्यकर्ते चौकर हे झाले. भोपटकरांनीं दिलेलीं नांवेंच निवडून आलीं. चिपळूणचे वकील साठे, जमनादास मेहता, भाऊसाहेब सोमण व माळशिरसचे धडफळे हे उपाध्यक्ष बनले; सर्व कार्यकारी मंडळही भोपटकरांच्या मतानें निवडलें गेलें. मात्र विरोधी पक्षाशीं तडजोड करून हीं नांवें पुढें करण्यांत आलीं.

याप्रमाणें नाफेरवाले महाराष्ट्र प्रांतिक कमिटी सोडून गेले आणि महात्माजींनीं आस्ते आस्ते स्वराज्यपक्षाला वाट करून देण्याचें जें धोरण पुढें स्वीकारिलें त्याची सुरुवात त्यांनीं महाराष्ट्रांतूनच करून दिली.

---

# २२ महाराष्ट्रांतील खादीकार्य

महात्माजींची आज्ञा होतांच देवांनीं मुकाट्यानें प्रांतिक सोडून विधायक कार्यक्रमाकडे मन घातलें. प्रांतिकजवळ ८००० रुपये शिल्लक होते. ते तसेच त्यांनीं प्रतिस्पर्धी गटाच्या स्वाधीन केले आणि आपली जबाबदारी दूर केली.

यानंतर देवांची दृष्टि थोडी बदलली. त्यांची महात्माजींच्या चळवळींकडे राजकीय हेतूनें पाहण्याची वृत्ति मावळली आणि तात्त्विक दृष्टीनें ते तिकडे पाहूं लागले. विधायक कार्यक्रमाचीं संस्थारूपानें अस्तित्वांत आलेलीं दोनच अंगें त्या वेळीं होतीं:-(१) राष्ट्रीय शिक्षण व (२) खादीकार्य. शिक्षणाकडे देवांचा कल नव्हताच. साहित्य हा त्यांचा विषयच नव्हे. शिक्षकाला जीवनाचें सूक्ष्म निरीक्षण करण्याची कला माहीत असली पाहिजे, सर्व प्रकारच्या भावनांची खोल परीक्षा करितां आली पाहिजे, विद्यार्थिमानसाशीं एकरूप होतां आलें पाहिजे; अनेक प्रकारचे प्रयोग करण्याचा व ते तपासून पाहण्याचा गुण पाहिजे. देवांच्या अंगीं यांपैकीं एकही गोष्ट नव्हती. त्यामुळें शिक्षणविषयाकडे ते वळूं शकले नाहींत. खादीकार्याबद्दल सांगावयाचें म्हणजे त्या कार्यालाही संशोधन, प्रयोग व शास्त्रीय दृष्टि यांची अनिवार्य आवश्यकता होती. एका ठिकाणीं ठाण मांडून बसण्याची जरूरी होती. देवांचें आयुष्य चळवळी करण्यांत आणि प्रांतभर दौरे काढण्यांत गेलें होतें. त्यांना स्थायी जीवन कसें झेपावें ? त्या लढवय्या प्रकृतीच्या कार्यकर्त्यांची कसोटी होण्याचा प्रसंग येऊन ठेपला.

देवांची मुख्य मदार दास्तान्यांवर होती, दास्तान्यांची खानदेशावर होती. खानदेशांत कापूस खूप पिकतो. महायुद्धांत खानदेशांतील लोकांनीं कापसावर खूप नफा मिळविला होता. खानदेशांत सुबत्ता होती. खानदेशचे कार्यकर्ते स्वतःस गांधीवादी म्हणवीत होते. नुकतेंच जळगांवचें खादी-प्रदर्शन त्यांनीं यशस्वी करून दाखविलें होतें. तेव्हां आतां खादीकेन्द्रें उघडण्याचा प्रयोग

फारशा अडचणी न येतां सिद्धीस जाईल अशी अटकळ या दोघां राजकारण-पटूंनीं केली व कधीं न केलेल्या प्रयोगास हात घातला.

कधींही व्यापारधंदा न केलेल्या विद्वानांचाच प्रयोग तो ! दास्तान्यांनीं प्रथम खादीचें दुकान उघडलें. सबंध खानदेशांत वर्षभर खपविण्यासाठीं १३०० रुपयांची खादी विकत घेतली; पुण्यांत खपविण्यासाठीं ५०० रुपयांची घेतली; भुसावळ व जळगांव येथें दुकानें काढलीं; आणि पद्धतशीर प्रचार (!) सुरू केला. देवांनीं खांद्यावर खादीचे गठ्ठे घेऊन महाराष्ट्रभर दौरा काढून खादी विकण्यास सुरुवात केली. कमलाकर सुमंत हे या कामीं त्यांस जोडीदार लाभले. खादीकार्यांतसुद्धां देवांनीं पायपीट सोडली नाहीं आणि व्याख्यानांचीही झोड उडविली. शिवाय महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं खादीचीं प्रदर्शनें भरविलीं व तीं लोकप्रिय झालीं. गायकवाडवाड्यांतही एक प्रदर्शन भरविण्यांत आलें.

याप्रमाणें खादीची विक्री ऊर्फ प्रचार झाल्यावर खादीची उत्पत्ति करण्याचें दास्तान्यांनीं मनांत योजलें. अमळनेरचे प्रतापशेठ यांनीं ११००० रुपये टिळक स्वराज्यफंडासाठीं देऊं केले होते. जमनालालजींच्या मध्यस्थीनें दास्तान्यांनीं ते खानदेशांतील खादीकार्यासाठीं मिळविले. खादी-कार्यकर्ते निर्माण करणें पैशाशिवाय कसें शक्य व्हावें ? दास्तान्यांनीं चोपडे तालुक्यांत बा. रा. देशपांडे यांच्या देखरेखीखालीं एक खादी-केन्द्र सुरू केलें. १९२५ सालीं कडगांव येथें एक उद्योगमंदिर सुरू केलें. देवांनीं खादी विकण्याचें कार्य केलें तरी खादीशास्त्रांत त्यांची गति यथातथाच होती. म्हणून कडगांवला देव, ठकार, चितळे वगैरे कार्यकर्ते कांहीं महिने राहिले व खादीचें शिक्षण त्यांनीं घेतलें. मंदिराचे संचालक दास्ताने, ना. म. गोखले व बाबूराव जोशी हे होते. गोखले व जोशी साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमांत चार महिने राहून कांतणें, पिंजणें व विणणें शिकून आले होते. त्यांनीं महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांना खादीविद्येंत पारंगत करण्याची उमेद धरिली. परंतु एवढे मोठे लायक कार्यकर्ते शिकविण्यास आले तरी स्थानिक लोकांत यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें जादू होईना ! कष्ट अधिक झाले, प्रोत्साहन मिळेना. दास्तान्यांच्या पत्नी सौ. वारूबाईही त्या समयीं कडगांवला होत्या.

दास्तान्यांचा विवाह १९०० सालीं झाला होता; पण खरें सुखी वैवाहिक जीवन त्यांनीं कडगांवलाच अनुभविलें. बाहेरच्या राजकारणांत फांकलेली वृत्ति अंतर्मुख करून आत्मशोधन करण्याचा तो काळ होता. राजकारणांत पडलेल्या विवाहित कार्यकर्त्यांना बाहेरचें जग सुधारण्याची अतोनात हौस असते! अर्धांगीकडे पाहण्यास क्षणाची फुरसत नसते! दास्तान्यांना पत्नीबाबतच्या आपल्या कर्तव्याची जाणीव कडगांवला प्रथम झाली. त्यांनीं पत्नीला संस्कार देण्यास प्रारंभ केला. १९२१ मध्यें चर्खासंघाची स्थापना झाली व पुढील वर्षी महाराष्ट्र चर्खासंघाची एजन्सी दास्तान्यांकडे आली. त्याच वर्षी त्यांनीं आपलें उद्योगमंदिर पिंपराळ्याला नेलें; तें १९३२ पर्यंत चाललें. कडगांवला पावसाळ्यांत फार हाल होत. मलेरियाचेंही प्राबल्य होतें. वारूबाईना तें जीवन सहन न होऊन त्या दरम्यान जळगांवला जाऊन राहिल्या होत्या. दास्ताने पिंपराळ्यास येतांच त्या तिकडे जाऊन राहिल्या.

खादीची संघटना करण्याचें काम चालू असतांना महाराष्ट्राची संघटना करण्याचें स्वप्न देव-दास्तान्यांना पडतच होतें. रचनात्मक कामाला सुरुवात करून तर दिली; तें कोणाही सामान्य कार्यकर्त्यानें पुढें करावें. महत्कार्य हें पुढाऱ्यांसाठींच असतें. हरिभाऊ फाटकांनीं १००० रुपये महाराष्ट्राच्या संघटनेसाठीं म्हणून दिले. देव, दास्ताने व फाटक यांनीं संघटनेसाठीं म्हणून महाराष्ट्रभर दौरा काढला व त्या द्रव्याचा सदुपयोग केला! त्या सर्व दौऱ्यानंतर दास्तान्यांनीं निष्कर्ष काढला कीं, पुण्यास राजकारणाचें केन्द्र असावें असें आपणांस वाटत होतें ती चूक होती. खरें कार्य पुण्या-बाहेरच अधिक चांगलें होऊं शकेल.

पण देवांना पुण्याचें आकर्षण सुटलें नव्हतें. "पुण्यावर राज्य करण्याची" त्यांची आकांक्षा त्यांना पुण्याकडे पुनः पुन्हा खेचून नेत होती. 'सत्याग्रही' पत्राचा बोजवारा उडून तें पत्र कधींच बंद पडलें होतें. देवांना आदर्शवादाचा व्यवहाराशीं मेळ घालतां आला नाहीं, त्याला वर्तमानपत्रानें काय करावें? परंतु देवांनीं हिंमत सोडली नाहीं. त्यांनीं परांजपे यांचें "स्वराज्य" पत्र विकत घेतलें, आणि महात्माजींच्या Young India च्या धर्तीवर तें

चालविण्याची-उमेद बाळगली ! खटपट करून त्यांनीं स्वराज्य पत्रासाठीं ५००० रुपये जमविले. आदर्शवाद्याची दृष्टि अस्मानाकडे असते आणि त्याच्या हातांतील द्रव्याची पाताळाकडे असते हा धडा देवांनीं आणखी एकदां गिरविला.

अखिल भारत चर्खासंघ स्थापन झाल्यावर महात्माजींनीं महाराष्ट्रांत एक दौरा काढला. भंडाऱ्यापासून शिरोड्यापर्यंत ते फिरले. देव-दास्ताने सर्व दौऱ्यांत त्यांचेबरोबर होते. या दौऱ्यांत महात्माजींना दीड लाख रुपये मिळाले. महाराष्ट्राला महात्माजींची कदर किती होती हें प्रत्ययास आलें.

'स्वराज्य'पत्र घेतल्यावर देवांचें कार्य पुण्यांतच सुरू झालें. हरोलीकर प्रकाशक बनले. भुस्कुटे संपादक वर्गात दाखल झाले. जावडेकरही 'स्वराज्यां'त लेख लिहीत.

खादीकार्यामागें सतत ध्यान देणें व एका ठायीं अधिष्ठान घालणें या गोष्टी न घडल्यामुळें त्याचा विस्तार झाला नाहीं. कुर्डुवाडीलाही एक केन्द्र काढण्यांत आलें होतें. १०-१२ हजारांची खादी निर्माण झाली व तें बंद पडलें. बाकीच्या ठिकाणीं देखील ३५ हजारांपर्यंत उत्पत्ति झाली व नंतर काम बारगळलें. गांवोगांवीं मिळून एकंदर १॥-१॥। लाखांची खादी मात्र विकली गेली. विधायक कार्यक्रमाला अव्यभिचारी निष्ठा दिली पाहिजे. तिच्या कसोटींत फक्त अण्णा सहस्रबुद्धे हेच उतरू शकले हें चर्खासंघाच्या इतिहासांत दिसून येईल. राजकारणी पुरुषांचे " प्रयोग " वायां जरी गेले नाहींत तरी सफळही झाले नाहींत.

देव-दास्तान्यांनीं पूर्व खानदेशांत खादीचा प्रयोग केला तर पश्चिम खानदेशांत ठकार व बाळूभाई मेहता यांनीं केला. ठकारांची माहिती मागें आलीच आहे. बाळूभाई मेहता नंदुरबारचे रहिवासी. त्यांचा जन्म २६ जुलै १८८९ सालीं झाला. १९०९ मध्यें ते मॅट्रिक झाले. वंगभंगाच्या चळवळीनें त्यांचें लक्ष राजकारणाकडे खेंचलें. त्या वेळीं धुळ्यास शंकर श्रीकृष्ण देव हे लोकमान्यांचे शिष्य समजले जात व राजकीय चळवळी चालवीत. बाळूभाईंना स्वदेशी-बहिष्काराच्या चळवळींत गोडी वाटली.

ते १९१४ त बी. ए. झाले. नंतर दोन वर्षांत एम. ए. होऊन त्यांनीं पहिली कायद्याची परीक्षाही दिली. परंतु नंतर दोन-तीन वर्षे ते मलेरियाच्या सपाट्यांत सांपडले. १९२० मध्यें त्यांनीं कायद्याची दुसरी परीक्षाही दिली. विवेकानंदांचीं पुस्तकें वाचल्यावर त्यांनीं ठरविलें कीं, आपलें ध्येय पैसे मिळविणें नव्हे; आध्यात्मिक उन्नति करून घेतली पाहिजे. असहकारितेची चळवळ सुरू होतांच त्यांनीं वकिली न करण्याचें ठरविलें. ते नागपूर कॉंग्रेसला हजर होते. असहकारितेचा ठराव [illegible] त्याच दिवशीं पहाटे ते महात्माजींना भेटले. एका गृहस्थानें "हे M. A., LL. B. आहेत" अशी त्यांची ओळख करून दिली. "त्याचें मला काय?" महात्माजींनीं विचारलें. त्यावर "हे सेवा करूं इच्छितात" असें उत्तर देण्यांत आलें. "मग ठीक आहे", महात्माजींनीं म्हटलें. त्यानंतर बाळूभाई तीन महिने साबरमतीच्या आश्रमांत राहिले. तेथें आचार्य कालेलकर, श्री. नरहरिभाई परीख यांची ओळख झाली. बाळूभाईंचें लग्न १९१७ त झालें होतें. बाळूभाई आश्रमांत गेल्याचें वैषम्य वाटून, घरच्या व सासुरवाडीच्या मंडळींनीं त्यांस सतावण्यास सुरुवात केली. "आपल्या पत्नीस घेऊन जा," असा लकडा त्यांच्या मागें लाविला. आश्रमांत तर पत्नीस राहायला जागा नव्हती. पत्नीच्या निमित्तानें तरी बाळूभाई आश्रमजीवनापासून परावृत्त होतील अशी नातलगांची अपेक्षा होती. पण बाळूभाईंनीं राष्ट्रीय सेवेचें व्रत घेतलें तें घेतलें. तीन महिने अहमदाबाद येथील 'आदर्श विनयमंदिरां'त शिक्षक म्हणून राहिले. पुढें त्यांची अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीवर नेमणूक झाली. १९२१ नंतर ते जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष झाले व त्यांनीं पश्चिम खानदेशांत राजकीय चळवळी चालविल्या. १९२३ ते १९२६ पर्यंत ते 'प्रबोध'चे संपादक होते व गांधी-नेतृत्वाचा त्यांनीं त्यांतून पुरस्कार केला. डिसेंबर १९२६ मध्यें त्यांनीं प्रबोधचा राजीनामा दिला. १९२७ मध्यें चार महिने ते वर्ध्यांतील आश्रमांत राहिले. नंतर महात्माजी व जमनालालजींच्या सूचनेवरून त्यांनीं खादीकेन्द्रांचें निरीक्षण करण्यासाठीं पंजाबशिवाय साऱ्या प्रांतांतून प्रवास केला. त्या वेळीं त्यांचेबरोबर ठकार सपत्नीक होते.

ठकार अमळनेरच्या शाळेंत शिक्षक होते. ती जेव्हां निमसरकारी बनली

तेव्हां ठकारांनीं तिचा त्याग केला. शंकरराव देवांनीं त्यांना नूतन मराठी शाळेंतून बोलावलें होतें तेव्हां ठकार गेले नव्हते. परंतु तेव्हांपासूनचा देवांचा परिचय कायम होता. अमळनेरची शाळा सुटल्यावर देवांनीं ठकारांची महाराष्ट्र प्रांतिक खादी मंडळाच्या चिटणीस-पदावर योजना केली. बाळूभाई त्याचे अध्यक्ष होते. महाराष्ट्रांतील खादी-कार्य करणारी ही पहिलीच संस्था होय. ठकारांचें अमळनेर येथील जीवन सार्वजनिक सेवेंत गेलें. पैही खर्च न करितां ते तेथील म्युनिसिपालिटीवर निवडून आले व दोन वर्षें त्यांनीं गांवाची सेवा केली. पुढें तीन वर्षें खादीमंडळाचें कार्य त्यांनीं केलें. मुख्य कार्यालय धुळयास होतें. १९२५ मध्यें चार महिन्यांत पश्चिम खानदेशांत आठदहा हजारांची खादी तयार झाली. ठकारांना कारकुनी. पेशा आवडेना. खेड्यांशीं जास्त संबंध यावा असें त्यांना वाटे. शेवटीं पश्चिम खानदेशांत ‘ जिल्हामंडळ ’ नांवाची संस्था स्थापन झाली तसे ठकार तिचे प्रचारक बनले. वर्षभर तें काम त्यांनीं केलें. त्यांच्या पत्नी सौ. पार्वतीबाई यांची मदत त्यांना या कामीं मिळाली. बाळूभाईचा इतिहास यापेक्षां निराळा झाला. त्यांच्या पत्नीला त्यांचें सेवामय जीवन आवडत नसे. त्यामुळें जीवनांत क्लेश फार भोगावे लागले.

१९२७ मध्यें महात्माजींचा दौरा महाराष्ट्रांत झाला तेव्हां ठकार त्यांना भेटले. महात्माजींनीं त्यांना सपत्नीक जाऊन ग्रामसेवेचीं केन्द्रें पाहून येण्याचा सल्ला दिला. त्याप्रमाणें बाळूभाई, ठकार व पार्वतीबाई इतकी मंडळी प्रवासास निघाली. १९२८ च्या मार्चमध्यें बाळूभाई नंदुरबार तालुक्यांत ‘ नहावद ’ खेड्यांत भिल्लांच्या सेवेसाठीं राहिले. ठकार ‘सवाई मुकटी’ येथें वसले. तेथें त्यांनीं खादीकेन्द्र सुरू केलें. तें कांहीं वर्षें चाललें. परंतु महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांना एक मोठी ग्रहदशा आहे. सर्वच बहुधा राजकारणांत ओढले जातात. विधायक कार्यक्रमाकडे संपूर्णतया लक्ष देणें त्यांच्यानें होत नाहीं. त्यामुळें विधायक कार्यक्रम- वेळोवेळीं अडतो. हे सारे कार्यकर्ते जिल्ह्याचें राजकारण पाहत व प्रांतिकचेही बहुधा सभासद असत. महाराष्ट्रांतील दुफळीमुळें आपलें राजकीय वर्चस्व प्रस्थापित करणें हेंही त्यांना कर्तव्य वाटत होतें. पुढें तर १९३० ची चळवळ सुरू झाली. त्याबरोबर

सारे कार्यकर्ते आपापलें काम सोडून तुरुंगांत गेले. परिणामीं जागेवर पाहणारा कोणी न राहिल्यामुळें ठिकठिकाणचीं कामें बंद पडलीं.

१९२५ सालांतील अहवालाप्रमाणें महाराष्ट्र प्रांतिक कमिटीमार्फत ५५ ते ६० हजार रुपये महाराष्ट्रांतील खादीकार्यांत खर्च झाले. (हा रिपोर्ट फेरवाल्यांच्या कमिटीकडून प्रसिद्ध झाला) पैकीं ३५ हजार रुपये १९२३ पूर्वी म्हणजे प्रांतिक खादी-मंडळें अस्तित्वांत येण्यापूर्वी खर्च झाले. बाकीचे निरनिराळ्या गृहस्थांस खादीकार्यासाठीं कर्ज म्हणून देण्यांत आले.

'स्वराज्य' पत्रावरील खटल्यानंतर शंकरराव देव हे तुरुंगांत गेल्यावर महाराष्ट्र खादीसंघाचें पहिलें संमेलन १३-५-२८ रोजीं टिळकमंदिर, पुणें, येथें भरलें. धुळ्याचें समर्थभक्त शंकर श्रीकृष्ण देव हे खादीभक्त अध्यक्ष होते. त्यांच्या भाषणांत पुढील उल्लेख होताः—

"मार्च ११ व १२ रोजीं धुळें व पुणें येथून मंडळी महात्माजींकडे साबरमतीस गेली होती. महाराष्ट्रांत खादीला मिळावी तितकी सहानुभूति मिळत नाहीं; विरोध भासतो म्हणून खादीसंघ काढण्याचें ठरलें. दोष कार्यकर्त्यांचा आहे. १ ऑगस्टला देव व केळकर यांचा समेट झाला. त्यांत खादीचा पुरस्कार दोन्ही पक्षांनीं करावयाचें ठरलें. आतांपर्यंत खादीसंघाचे सभासद चाळीस गांवांतून १२११ आहेत. गेल्या वर्षांत महाराष्ट्रांत दोन लाखांची खादी-विक्री झाली. शंकरराव देवांची वाण तर भासतच आहे."

बापूराव गोखले यांनींही भाषण करून खादीचें समर्थन केलें. "इंग्रजांच्या तडाक्यांतून सुटून स्वातंत्र्य स्थापण्याचा निश्चय आपण केलेला आहे आणि या निश्चयाच्या पूर्ततेसाठीं आपण खादी वापरणें आवश्यक आहे. शुद्ध स्वदेशी म्हणजे खादी यांत बिलकुल शंका नाहीं. बहिष्कार यशस्वी करण्याच्या साधनांतील खादी हें एक मुख्य साधन आहे यांत बिलकुल शंका नाहीं."

दास्तान्यांच्या भाषणांत आलें कीं, त्या वेळीं महाराष्ट्रांत २५ खादीभांडारें होतीं. पुणें, जळगांव व नागपूर येथील भरभराटींत होतीं. खादीचीं मुख्य केन्द्रें १३ होतीं. सावली केन्द्र २॥ लाख वार खादी निर्माण करील असें सांगून भांडवलाची अपेक्षा करण्यांत आली.

आप्पा पटवर्धन म्हणाले, " १९२२ मध्यें रत्नागिरींत खादीमंडळ स्थापण्यांत आलें. १९२६ मध्यें जिल्ह्यांत अनेक प्रदर्शनें भरावलीं. दोन महिन्यांत ५००० ची विक्री झाली. महात्माजींच्या दौऱ्याचे वेळीं ८॥ हजार रुपये जमले व खादी-विक्रीही बरीच झाली. दौऱ्यामुळें सावंतवाडी संस्थानांत खादीचा प्रवेश झाला. राणीसाहेब चर्खा फिरवूं लागल्या. मुलकी दिवाण सूत कांतूं लागले. रत्नागिरी, खेड, चिपळूण, राजापूर, मालवण, खारेपाटण येथें भांडारें आहेत. वेंगुर्ला येथें एक खादी-कार्यालय आहे."

या संमेलनांत पुढील सालासाठीं खादी-प्रचाराकरितां कार्यक्रम योजण्यांत आला. एक कार्यकारी कमिटी नेमण्यांत आली. शं. श्री. देव तिचे अध्यक्ष, आप्पा पटवर्धन उपाध्यक्ष, हरिभाऊ फाटक व काकासाहेब बर्वे चिटणीस आणि दत्तोपंत घारपुरे खजिनदार ठरले.

महाराष्ट्राचे नऊ विभाग कल्पून प्रत्येक भागांत प्रचार करण्यासाठीं प्रचारक नेमण्यांत आले.

श्री. आनंदीबाई जोगळेकर यांनीं महाराष्ट्रांत दौरा काढून स्त्रियांत खादीचा प्रचार करावा असें ठरलें.

आनंदीबाई या शंकरराव देव ज्या जोशी कुटुंबांत वाढले त्या कुटुंबांतील ज्येष्ठ कन्या म्हणजे, पर्यायानें देवांच्या ज्येष्ठ भगिनी होत. पुण्यांतील सूत कमिटीच्या संचालकांपेकीं त्या एक होत्या. पुण्यांतील स्त्रियांच्या चळवळी घडवून आणण्यांत त्याही भाग घेत असत.

बृहन्महाराष्ट्रांतील खादीच्या उत्पत्तिकार्याला प्रेरणा विनोबा भावे यांचे कडून मिळत गेली. देवांचे बडोदा कॉलेजांतील ते सहाध्यायी होत. परंतु त्यांची वृत्ति मूळपासूनच तपस्व्याची असल्यामुळें त्यांनीं कॉलेज-अध्ययन पूर्ण केलेंच नाहीं. १९१९ मध्यें ते साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमांत प्रविष्ट झाले. तेथें त्यांची साधना व बुद्धिमत्ता यांचा सर्वांवर विलक्षण परिणाम झाला. महात्मा-जींच्या तत्त्वज्ञानानें त्यांच्या जीवनांत पूर्णपणें प्रवेश केला. पुढें श्री. जमना-लालजींनीं महात्माजींजवळ 'वर्धा येथें मी आश्रम काढूं इच्छितों. संचालक म्हणून एक लायक कार्यकर्ता मला द्यावा," अशी विनंति केली. तेव्हां महात्माजींनीं विनोबांस पाठवून दिलें. विनोबा, धोत्रे, कृष्णदासभाई गांधी,

गोपाळराव काळे वगैरे सहा सोबत्यांसह वर्ध्यास येऊन दाखल झाले. ओसाड जागेंत त्यांना झोंपडी बांधून देण्यांत आली. तेथें त्यांनीं शरीरपरिश्रमांस सुरुवात केली. या वेळीं असहकारितेचें आंदोलन जोरांत चाललें होतें. मध्यप्रांतांत जमनालालजी बजाज त्या कामीं आपली शक्ति व द्रव्य यांचा पूर्णपणें उपयोग करीत होते. त्यांच्या मदतीनें विनोबांनीं वर्ध्यास खादीउत्पत्तीचें कार्य सुरू केलें. शेंकडों चर्खे घरोघरीं चालूं लागले. मागही चालू झाले. त्यांस जोडून विनोबांनीं एक सरंजाम कार्यालय काढलें. असहकारिता चालू होती तोंवर लोक लाटेंत वाहत गेले. चळवळ ओसरल्यावर उत्साहही ओसरत आला. परंतु विनोबांनीं त्या काळांत पुष्कळ कार्यकर्ते तयार केले. याच कार्यकर्त्यांनीं पुढें बृहन्महाराष्ट्रांत खादी-उत्पत्ति-कार्याची उभारणी केली.

भंडारा जिल्ह्यांत कीन्ही येथें त्यांच्या प्रेरणेनें शंकरराव वेले यांनीं एक उत्पत्तिकेन्द्र काढलें. नंतर १९२७त सांवली येथें खादीकेन्द्र सुरू झालें. तिकडे धोत्रे यांनीं खूप मेहनत घेतली. सुरुवातीस संयुक्त प्रांतांत नर्मदाप्रसाद नांवाचे एक गृहस्थ दास्तान्यांतर्फे तेथें काम करीत होते. प्रथम तोटा येऊं लागला. पण विनोबांनीं धोत्र्यांस तिकडे पाठवून नवी कार्यपद्धति लावून दिली, तेव्हां काम सुरळीत चालूं लागलें.

महात्माजींच्या प्रेरणेनें अखिल भारतीय चर्खा-संघ ही संस्था १९२५ सालीं स्थापन होतांच तिच्या प्रांतीय उपशाखाही अस्तित्वांत आल्या. बृहन्महाराष्ट्रासाठीं एक स्वतंत्र शाखा निर्माण झाली. श्री. दास्ताने हे या शाखेचे संचालक नियुक्त करण्यांत आले. त्यांनीं प्रथमतः महाराष्ट्रांत खादीची विक्री वाढविण्याचा उपक्रम केला. पूर्व खानदेशांत जामनेर येथें राहणारे श्री. रिषभदास हे खादीविक्री करण्यांत अपूर्व बुद्धिमत्ता दाखवीत. त्यांच्या कर्तबगारीनें खादीची विक्री खूप वाढली. पुढें १९२९त श्री. श्रीकृष्णदास जाजू हे महाराष्ट्र चर्खासंघाचे चिटणीस बनले. तेव्हांपासून संघाची भरभराट होऊं लागली.

अण्णासाहेब सहस्रबुद्धे साबरमतीस गेले ते कांहीं महिन्यांनीं १९२८ च्या एप्रिलमध्यें मुंबईस गेले व तेथील खादीभांडारांत त्यांनीं पांच महिने काम केलें. तेथून ते हुदली येथील 'कुमरी' आश्रमांत श्री. गंगाधरराव देशपांडे

यांजवळ २।।-३ महिने राहिले. तेथून श्री. जाजूजींच्या बरोबर मोंगलाईंत मेटपल्ली येथें फिरण्यास गेले. तेरा दिवस फिरून सर्व परिस्थिति पाहिल्यावर तेथें खादी उत्पत्ति-केन्द्र काढण्याचें ठरलें व अण्णा तेथें एक वर्ष राहिले. सांवली व मेटपल्ली येथील दोन्ही केन्द्रांची पुढें फारच भरभराट झाली.

याशिवाय आणखी दोन कार्यकर्त्यांचा उल्लेख केला पाहिजे. महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें १९२२ त वि. ना. आपटे व महाजन यांस खादी-विद्यार्थी म्हणून सत्याग्रहाश्रमांत पाठविलें. शिक्षण पूर्ण झाल्यावर दोघेही कामास लागले. आपटे १९२६ त धुळ्याजवळ दोंडाईचे येथें केन्द्र चालवीत होते. १९३० पूर्वी तेथें ५०० रहाट व २० माग चालत होते. महाजन हे नगर जिल्ह्यांत अकोला तालुक्यांत एक केन्द्र चालवूं लागले. त्यांनीं उत्तम गालिचे काढले आणि रु. ४००० ची खादी निर्माण केली. परंतु पुढें तोटा येऊं लागला. दोन्ही केन्द्रें पुढें बंद झालीं.

आपटे सत्याग्रहाश्रमांतून निघाल्यावर कित्येक दिवस चिंचवडच्या पाठ-शाळेंतही होते. सारे अचाट प्रयोग त्यांनीं व सहस्रबुद्धे यांनीं मिळून तेथें केले, पण यश मिळालें नाहीं.

पुढें १९३० च्या चळवळींत सहस्रबुद्धे प्रविष्ट झाले. विनोबाही १९३२ च्या चळवळींत तुरुंगांत गेले. मात्र विनोबांनीं खादीकार्य सतत चालू ठेवलें व आपल्या विलक्षण बुद्धिमत्तेनें त्यांत पुष्कळ संशोधन केलें. झेंडा-सत्याग्रहांत ते व त्यांचा सारा आश्रम सामील झाला होता. एवढें उदाहरण सोडल्यास ते राजकारणांत फारसे पडले नाहींत.

# २३ " दणदणीत संसार "

" राष्ट्रीय सभेचें सर्व काम बहुमतानेंच होत असतें व तसें होणें इष्ट आणि आवश्यकही आहे.... कसेंही झालें तरी एवढी गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, लोकनियुक्त सार्वजनिक सभेंत जे ठराव मंजूर व्हावयाचे ते प्रायः बहुमतानेंच व्हावयाचे आणि एकदां अशा रीतीनें ते मंजूर झाले म्हणजे मंजूर होण्यापूर्वीं ज्यांचें मत त्यांविरुद्ध असतें त्यांनींही तें बहुमत म्हणून मान्य करून त्याप्रमाणें सभेचें वर्तन राहील अशी खबरदारी घेतली पाहिजे. प्रतिनिधि राज्यसत्ताक पद्धतीचें पहिलें आणि महत्त्वाचें तत्त्व हेंच होय. हें तत्त्व ज्यांस कबूल नाहीं त्यांच्या हातून असल्या संस्था कधींही चालावयाच्या नाहींत व त्या चालविण्यास ते पात्रही नाहींत...... सनदशीर आणि कायदेशीर हक्क आम्हांस पाहिजेत म्हणून सरकारपाशीं भांडणाऱ्या आमच्या पुढाऱ्यांनींच जर हें तत्त्व राष्ट्रीय सभेच्या कामकाज करण्याच्या पद्धतींत धाब्यावर बसविलें तर वृक्षाच्या फांदीवर बसून फांदीच्या मुळाशीं कुऱ्हाडीचे घाव मारणाऱ्या वेड्यापिरांत त्याची गणना करावी लागेल. "

—लो. टिळक

मध्यवर्ती कायदेमंडळांत एकंदर १४४ सभासदांपैकीं 'स्वराज्यपक्षा'चे ४५ सभासद होते. इतर पक्षांपेक्षां 'स्वराज्यपक्षा'ची संख्या अधिक होती खरी पण तें रोकडें बहुमत नव्हतें. त्यामुळें इतर पक्षांना आपल्याकडे वळवून त्यांना स्वतःचें बहुमत करावें लागे व सरकारचीं बिलें नामंजूर करावीं लागत. त्याप्रमाणें सुरुवातीसच 'स्वराज्यपक्षा'नें सरकारचें कर लादण्याचें बिल नामंजूर केलें.

व्हाइसरॉयनीं आपल्या सहीनें तें मंजूर केलें.

केळकरांच्या शब्दांत " मतदारांच्या परीक्षेची वेळ " आली:—

" 'स्वराज्यपक्षा'नें सरकारची रसद मारली पण सरकारनें सर्टिफिकेशननें ती फिरून जिवंत केली. अर्थात् जें हें एकदां झालें तें तसेंच नित्य होत जाणार काय ? व तसेंच तें होत जाणार असल्यास त्यांत मौज ती काय राहिली ?

असा प्रश्न कित्येक उतावळ्या लोकांना सुचूं लागला आहे. अर्थात् पुढें काय? या प्रश्नाचें उत्तर नक्की मिळत नाहीं म्हणून पूर्वी झालें त्यांत कांहीं विशेष झालें नाहीं असें म्हणण्याकडे त्यांची प्रवृत्ति हळूहळू होण्याचा संभव दिसतो."

ही भीति व्यक्त केल्यावर आपल्या पक्षाच्या समर्थनार्थ त्यांनीं पुढील मुद्दे सुचविले आहेतः— ( १ ) आमचा हा प्रयोग आहे. ( २ ) आम्हीं नक्की मुदत दिली नव्हती. ( ३ ) तीन वर्षे तरी आम्हांस वाव पाहिजे. ( ४ ) योग्य वाटल्यास महात्माजींनीं आपला अभिप्राय इतक्यांत न देतां एकदोन वर्षे मौन घ्यावें. ( ५ ) राष्ट्रीय सभेनें उत्तेजन वा संमति न देतां उदासीनता ठेविली होती. ( ६ ) राष्ट्रीय सभा दिल्लीस बहिष्कार पुकारील तरी आपण तो जुमानणार नाहीं असें मनांत धरून कित्येक लोकांनीं अगोदरच उमेदवाऱ्या जाहीर केल्या होत्या.

" तात्पर्य, अशा परिस्थितींत व अशा निश्चयानें कौन्सिलांत गेलेले **लोक उद्यां कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें किंवा खुद्द महात्माजींनींहि तसा हुकूम फर्मावला म्हणून थोडेच बाहेर येणार आहेत।** मात्र तसा हुकूम फर्मावला गेल्यास नसते वाद फिरून उकरून निघून समाजांतील वितुष्ट वाढेल आणि विधायक वगैरे उपयुक्त कार्यक्रमाची प्रगति आधींच। हटली आहे ती आणखी हटेल." —केसरी १५-४-२४.

या अवतरणांतील धमकीवजा आशय वर दिलेल्या लो. टिळकांच्या अवतरणांतील भावार्थाशीं ताडून पाहावा.

१९२४ च्या जून महिन्यांत अहमदाबाद येथें अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीची बैठक भरली. नाफेरवाले व स्वराज्यपक्षीय चंग बांधून आले होते. दोन वर्षांनीं महात्मा गांधी एका अंतर्गत यादवीच्या प्रसंगीं कॉंग्रेस कार्यास वळण लावण्यास उपस्थित झाले होते. कॉंग्रेसचा कारभार एकमुखी असला पाहिजे अशी घोषणा त्यांनीं जुहूहून केलीच होती. बैठकींत भयंकर रण माजलें. दास-नेहरू संतापले. त्यांनीं सभात्याग केला. परंतु बहुमतानें महात्माजींची सूचना पसार झाली. महात्माजींना अनिवार दुःख झालें होतें. ज्या कॉंग्रेस संस्थेला त्यांनीं प्रभावी बनविलें होतें आणि जिच्या यशाची पताका जगभर

फडकविली होती तिच्या संघटनेचा असा बोजवारा उडावा आणि मोठमोठ्या प्रांतीय नेत्यांनीं हेकडपणा चालवून लाथाळी माजवावी हें त्यांना असह्य झालें. कट्टर नाफेरवाल्यांची क्रियाशून्यता, वाचाळपणा आणि विसंघटितपणा यांमुळें देखील त्यांना परमावधीचें दुःख झालें. त्यांतच गोपीनाथ सहा यांच्याबद्दलच्या ठरावाची भर पडली. त्यांचें हृदय वेदनांनीं व्याकुळ होऊन त्यांच्या डोळ्यांतून अश्रु टपकूं लागले. त्याचा परिणाम इतरांवर अतिशय झाला. सर्वांनीं दिलगिरी प्रदर्शित केली. परंतु महात्माजींनीं कांहीं एक निश्चय कायम केला व स्वराज्यपक्षाशीं तडजोड केली. यानंतर त्यांनीं कॉंग्रेसमधील प्रत्यक्ष राजकारणांतून अंग काढून घेण्यास सुरुवात केली व आपलें ध्यान ते अधिकाधिक विधायक कार्यक्रमाकडे गुंतवूं लागले.

तिकडे मुंबईच्या कायदे-मंडळांतही स्वराज्यपक्षाचा फारसा उजेड पडेना. 'केसरी'नें अग्रलेखांत त्याच्या अडचणी सांगून त्याचें अल्पमत प्रभावी होऊं शकत नसल्याबद्दल तक्रार केली. 'सरकारच्या कारवायां'वरही टीका करून या परिस्थितीस तोंड देण्यास दोन उपाय सुचविलेः-( १ ) स्वराज्याची मागणी सौम्य करून ब्राह्मणेतरांना वश करणें, व ( २ ) या उपायानें यश मिळालें नाहीं तर दंड व भेद म्हणजे मतदारांना त्यांचेपासून फोडणें. इतका कडू अनुभव येत असतांही—कौन्सिलांत मनाजोगें काम न झाल्यास राजीनामे देणें त्यांनीं वाजवी मानलें नाहीं. सतत विरोध हेंच तत्त्व मानलें. " इतर पक्षांना आपल्या पक्षांत खेचण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कांहीं मान्याचीं ठाणीं, कांहीं धरून ठेवण्याचीं... "

इतका खटाटोप करण्यास किंमत किती द्यावी लागली त्याचा हिशोब नाहीं. कलकत्ता येथें 'स्वराज्यपक्षा'ची परिषद ता. १६-८-२४ रोजीं भरली होती. मोतीलाल नेहरूंनीं पक्षाच्या कामगिरीचा अहवाल वाचला. निवडणुकीकरितां हजारों रुपये कर्जाऊ काढण्यांत आले. बंगाल्यांतच दासबाबूंनीं ३०,००० रु. काढले. संयुक्तप्रांतांत २९,००० काढले गेले. खासगी किती खर्च झाले असतील त्याचा हिशोब नाहींच. सरकारनें तर दिवाणगिऱ्यांचा लिलांव पुकारला होता. बंगाल सरकारनें जाहीर पत्रक काढून सरकारपक्षास मत देणाऱ्यांतून तिसरा दिवाण नेमण्याचें जाहीर केलें होतें.

पुढें ७-११-२४ रोजीं महात्माजी व स्वराज्यपक्ष यांच्यांत कलकत्ता येथें समेट झाला. येत्या बेळगांवच्या कॉंग्रेसमध्यें सर्वपक्षीय समेट घडवून आणवावा, परदेशी कापडावरील बहिष्काराशिवाय असहकारितेचा सर्व कार्यक्रम स्थगित करावा, कॉंग्रेस-कार्य वेगवेगळ्या खात्यांत विभागलें जावें, स्वराज्यपक्षाचें एक वेगळें खातें मानलें जावें आणि कॉंग्रेस सभासदांना सूतवर्गणी सक्तीची असावी; तसेंच कॉंग्रेस-अधिकाऱ्यांना सर्व कॉंग्रेस-कार्यप्रसंगीं खादीवेष सक्तीचा असावा इतक्या गोष्टी ठरल्या.

डिसेंबर १९२४ मध्यें बेळगांवला कॉंग्रेस भरली. महात्मा गांधी अध्यक्ष होते. कलकत्त्याचा समेट ठराव रूपानें पास झाला. महाराष्ट्र प्रांतिक कमिटींत त्या वेळीं केळकर-पक्षाचें बहुमत होतें. बेळगांव कॉंग्रेसमध्यें घातलेली सुताची अट त्या पक्षाला बिलकुल मान्य नव्हती आणि तीविरुद्ध चळवळ करण्यास या पक्षानें सुरुवात केली. कॉंग्रेसचे सामान्य सभासद आपल्या वैयक्तिक ज़बाबदारीवर अशा चळवळी करूं शकतात. त्यांनीं लवकरच साताऱ्यास महाराष्ट्र प्रांतिक परिषद भरणार होती, तिच्यांत सूत-अट काढून टाकण्याबद्दल शिफारसवजा ठराव आणण्याचें ठरविलें. महाराष्ट्रांतील असहकारितावाद्यांनीं परिषदेला हजर न राहण्याचा बेत केला.

पुढें १० मे रोजीं साताऱ्यास प्रांतिक कमिटी भरली. अध्यक्ष चौकर गैर-हजर होते. अध्यक्षांचें राहणें नगरला असे व मुख्य कचेरी नगरला नेण्याची त्यांची इच्छा होती. त्याप्रमाणें कचेरी नगरला गेली होती. प्रांतिकमध्यें भोपट-करांचेंच वजन होतें. चौकरांचा बोज राहत नव्हता. सातारच्या बैठकीबाबत असाच कांहीं गोंधळ होऊन चौकर गैरहजर राहिले. उपाध्यक्ष धडफळे काम-चलाऊ अध्यक्ष बनले. कित्येक सभासद गिरणीचे कपडे घालून आले होते. ठकारांनीं अध्यक्षांच्या नजरेस ही गोष्ट आणली. अध्यक्षांनीं ठकारांच्या बाजूनें रूलिंग दिलें. सभेंत मुख्य कचेरी नगरहून पुण्यास आणण्याचा ठराव पास झाला. यानंतर ११–६–२५ रोजीं चौकरांनीं आपल्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला.

सातारा परिषदेंत सूत-अट काढण्याचा ठराव भोपटकर यांनीं आणला व विठ्ठलभाई पटेल यांनीं त्यांना अनुमोदन दिलें. रामराव देशमुख ( मध्यप्रांत )

अध्यक्ष होते. त्यांनीं " महात्माजी कॉंग्रेस सोडून गेल्यास बरें होईल " असे उद्गार काढले. त्यावर पुण्यास निषेधाची सभा झाली.

बेळगांवानंतर महात्माजी आपल्या आश्वासनाप्रमाणें वागले. त्यांनीं स्वराज्यपक्षाचा बहुमान केला व कट्टरांनाही त्याच्याशीं विरोध न करण्याची आज्ञा दिली. परंतु स्वराज्यपक्षांतच तट होऊं लागले होते. दास-नेहरू व केळकरपक्ष यांची विचारसरणी जुळेनाशी झाली. दिल्लीच्या असेंब्लींत सरकारच्या मिठावरील कराच्या बिलाविरुद्ध स्वराज्यपक्षानें मोठा व्यूह रचूनही ऐनवेळीं स्वतंत्रपक्षानें उलट खाऊन सरकारला मतें दिलीं. त्यामुळें स्वराज्यपक्षाला धक्काच बसला. सर बेसिल ब्लॅकेट यांनीं प्रांतिक खंडण्यांत सूट द्यायची कबूल केली. त्या " गळाला मासे अखेर अडकले " व स्वराज्यपक्षाला टांग मिळाली.

तिकडे बंगालमध्यें दासबाबूंनीं दिवाणांचा पगार नामंजूर केला. दिवाणांनीं राजीनामे दिले. गव्हर्नरनीं सोंपीव खातीं स्वतःकडे घेतलीं. त्या मोकळ्या जागांसाठीं स्पर्धा सुरू होतांच ७-४-१९२५ च्या अग्रलेखांत केळकरांनीं लिहिलें:—" ही दोन रुपयांची दिवाणगिरी, हा आंबट खट्टा बहर देवाला दिलेलें हें पहिलें दान किंवा ओवाळून रस्त्यावर टाकलेला हा नैवेद्य ज्या पक्षाला घ्यावयाचा असेल त्यानें तो खुशाल घ्यावा."

वरील शब्द लिहून सहा महिने झाले नाहींत तोंच मध्यप्रांतांत तांबे या स्वराजिस्ट सभासदानें सरकारची दिवाणगिरी स्वीकारल्याबद्दल केळकरांनीं त्यांना ताबडतोब अभिनंदनाची तार पाठविली.

याबद्दल 'गतगोष्टी'त ते समर्थन करितातः—

" या पक्षांतील ( स्वराज्य ) महाराष्ट्रीय लोक टिळकांच्या परंपरेंत वाढलेले. यामुळें मिळेल ती जागा घ्यावी, राबवावी, ताबडावी असें त्यांचें खरें खासगी मत होतें." आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ वऱ्हाडांतील बाबा परांजपे यांच्याही पत्राचा त्यांनीं दाखला दिला आहे. " सरकारच्या ताब्यांतील जागांवर सरसकट बहिष्कार घालण्याच्या स्वराज्यपक्षाच्या धोरणाला वऱ्हाडांतील आम्ही बहुतेक कार्यकर्ते ( यांत बापूजीही येतात ) त्या वेळीं अगदीं कंटाळला होतों. अशा परिस्थितींत तांबे यांनीं गृहमंत्रिपदाची जागा स्वीकारली...

माझी स्वतःची तर या कृत्याला पूर्ण संमति होतीच; पण बापूजींचीही या कृत्याला मूकसंमति होती, अशी माझी समजूत आहे."

बॅ. जयकर यांनीं एक मुलाखत देऊन जाहीर केलें कीं, "पटेल व तांबे हे एकाच गोटांत येतात. पटेल सरकारी खजिन्यांतून पगार खातात (असेंब्लीचे अध्यक्ष होऊन). मोतीलालजी स्कीन कमिटींत गेले होते; त्यांत गैर नाहीं." स्कीन कमिटीच्या सभासदांना भत्ता मिळत असे. मोतीलाल-जींनीं नंतर त्या कमिटीचा राजीनामा दिला.

परंतु तांब्यांनीं स्वराज्यपक्षाची परवानगी घेतल्याशिवाय गृहमंत्रिपद स्वीकारलें ही त्यांची चूक केळकर व त्यांच्या पक्षांतील सर्व लोकांनीं कबूल केली व तार पाठवण्यांत उतावळेपणा झाला हेंही मान्य केलें. तरी देखील मोतीलालजींनीं एकदम जाहीर मुलाखत देऊन, "महाराष्ट्रीय पक्ष हा स्वराज्य-पक्षरूपी शरीराचा कुजलेला भाग आहे; तो कापूनच काढला पाहिजे" अशी घोषणा केल्याबद्दल "माझा जसा अविचार तसाच पंडितजींचा हा प्रत्यविचार" झाल्याबद्दल केळकरांनीं त्यांनाच दूषण दिलें व स्वराज्यपक्षांतून महाराष्ट्रीय पक्षानें राजीनामे देऊन आपला वेगळा प्रतिसहकारपक्ष काढला.

स्वराज्यपक्षाचा इतिहास शेवटीं दोन उपपक्षांच्या भांडणाचा इतिहास ठरला. एक उपपक्ष अडवणुकीचें निःस्पृह धोरण अंगिकारावें अशा मताचा होता. दुसरा पक्ष दिवाणगिऱ्या घेऊन त्यांचा उपयोग राष्ट्रीय हितसंवर्धनाकडे करावा असें म्हणत होता. पहिल्याचे पुढारी दास-नेहरू होते; दुसऱ्याचे केळकर होते.

१९२६ च्या अखेरीस सर्वसाधारण निवडणुकी व्हावयाच्या होत्या. स्वराज्य-पक्षाचें धोरण एवढी संघटना व मेहनत करूनही फुकट जात असलेलें पाहून महाराष्ट्रपक्ष कंटाळलाच होता. सरकारशीं चालविलेल्या या तंट्यांत राष्ट्र किती पुढें गेलें व गरीब जनतेचें काय कल्याण झालें हा हिशोब त्यांना देतां येईना. तेव्हां निदान दिवाणगिऱ्या घेतल्यानें जी थोडी कार्यवाही सत्ता हातीं येईल तिचा तरी उपयोग करतां आल्यास पाहावा या हेतूनें व निवड-णुकीचा काळ जवळ येत असलेला लक्षांत घेऊन, १९२५ च्या जूनपासूनच "प्रतियोगी सहकारिते"चा प्रचार त्यांनीं सुरू केला होता. जुलैमध्यें दासबाबू

वारले व नेहरू स्वराज्यपक्षाचे पुढारी झाले. नंतर लवकरच महात्माजींनीं नेहरूंना पत्र लिहून, स्वराज्यपक्षाला आदल्या वर्षाच्या करारांतून मुक्त केलें व कॉंग्रेसचीं सर्व सूत्रें त्यांच्या हातीं दिलीं. याप्रमाणें महात्माजींनीं स्वराज्यपक्षाला आपलें बळ वाढविण्यास व आपला प्रयोग सिद्ध करण्यास पूर्णपणें वाव दिला. नेहरूंनीं कृतज्ञतापूर्वक त्या देणगीचा स्वीकार केला.

'केसरी'त नेहमींप्रमाणें " फलश्रुति " सांगण्यांत आलीच. परंतु " जगांत संसारी माणसें फार; म्हणून त्यांना सन्मार्ग दाखविणें हाच निवृत्तीचा उपयोग होय ! आपण स्वतः जन्मभर संन्यासी राहावयाचें व लोकांकडून दणदणीत संसार करवावयाचा," या दोन वर्षांपूर्वी पुण्याच्या किर्लोस्कर थिएटरांत उच्चारलेल्या महावाक्यांची शब्दशः पूर्ति वास्तवसृष्टींत व्हावयाची होती. महात्माजींचा " गयाळ, गबाळ, गचाळ कार्यक्रम " जाऊन त्या जागीं " असहकारितेचें तेजस्वी स्वरूप " उद्दीपित व्हावयाचें होतें. त्यामुळें नेहरूंच्या अर्थात् पर्यायानें स्वराज्यपक्षाच्या हातीं राजकारणाचीं सारीं सूत्रें आलीं तरी समाधान न होऊन ता. २-८-२५ रोजीं ना. खापर्डे यांनीं टिळक-मंदिरांतील व्याख्यानांत " विशेषतः सांप्रत काळीं आपणांपुढें जीं कोडीं उपस्थित झालीं आहेत त्यांच्या संबंधाचा लोकमान्यांच्या चरित्रांतला भाग असेल त्याकडे आपणांस लक्ष दिलें पाहिजे " असे उद्गार काढून **स्वराज्यपक्षांत हल्लीं अधिकाराचें केन्द्रीकरण अतिरेकाला गेलें आहे. तें किंचित् ढिलें करून**, प्रत्येक प्रांताला आपापल्यापुरतें धोरण आंखण्याला स्वातंत्र्य दिलें, गेलें तर त्या पक्षाची कामगिरी याहून वाखाणण्याजोगी होईल," अशी सूचना दिली. शेवटीं "प्रतियोगी सहकारिते"चें निशाण उभारा म्हणजे सर्व पक्ष त्या झेंड्याखालीं एकत्रित होतील " असेंही भरतवाक्य त्यांनीं म्हटलें.

पुढें पाटणा येथील अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीच्या बैठकींत सूतवर्गणी काढून टाकण्यांत आली. कारभार स्वराज्यपक्षाकडे सोंपविण्यांत आला. "कॉंग्रेस ही पुनः राजकारणी बनल्याचा थोडाबहुत प्रभाव पाटणा येथें दिसून आला " तरी सुद्धां "कांहीं जुन्या व कांहीं नव्या अशा अप्रयोजक व जाचक गोष्टी अजून शिल्लक राहिल्या आहेत व त्यांचेंही दिग्दर्शन, अप्रियता सहन करून देखील,

करण्याचें परंपरागत व क्रमप्राप्त कार्य महाराष्ट्रीयांनींच केलें पाहिजे," असें केसरीनें जाहीर केलें आणि "थोड्याच वेळांत हेंही अप्रिय कार्य सर्वमान्य होईल अशीही आजपर्यंतच्या अनुभवावरूनच आम्हांस खात्री वाटते," असा निर्वाळा दिला.

पण 'दैवमन्यत्रचिंतयेत्' या म्हणीप्रमाणें खात्रीचा अतिरेक झाल्याचा पुरावा लवकरच मिळाला. तांबे यांचें मंत्रिपदस्वीकार-प्रकरण घडून येतांच नेहरू संतापले व त्यांनीं जाहीर खुलासा करून कळविलें कीं, "पटेल व मीं यांनीं पत्करिलेल्या जागा व तांबे यांनीं पत्करिलेली जागा यांत कांहींच साम्य नाहीं. म्हणून तांबे यांनीं शिस्त मोडल्याबद्दल आपण त्यांचा निषेध करूंच करूं. पण जयकर व केळकर यांनीं आपला जो खुलासा प्रसिद्ध केला तो प्रसिद्ध केला नसता तर बरें झालें असतें. कारण त्या खुलाशामध्यें स्वराज्यपक्षाच्या धोरणावर एक प्रकारची गर्भित टीका आहे. आणि स्वराज्यपक्षाचा राजीनामा देऊन जोंपर्यंत कोणी सभासद बाहेर पडला नाहीं तोंपर्यंत त्याला अशी टीका करितां येत नाहीं." नेहरूंनीं ताकीद देऊनही केसरींत स्वसमर्थन व स्वराज्यपक्षाच्या धोरणावर टीका आलीच. तिकडे वऱ्हाडच्या स्वराज्यपक्षानें उमरावतीस सभा भरवून स्वराज्यपक्षाच्या नियमाविरुद्ध ठराव पास केला. अध्यक्षांनीं तांब्यांचा राजीनामा एक्झिक्यूटिव्ह कमिटीकडे पाठविण्यास सांगितलें असतां ऐकलें नाहीं व स्वतःच त्याचा स्वीकार केला. त्यामुळें स्वराज्यपक्षाच्या कार्यकारी मंडळाला या गोष्टीचा निषेध करावा लागला.

"एकदां वाद सुरू झाला म्हणजे मन कलुषित झाल्याविना राहत नाहीं." असे उद्गार केळकरांनीं १७-११-२५ च्या सभेंत काढले. त्यांच्या स्वतःच्या मनोवृत्तीचें उत्तम दिग्दर्शन त्या उद्गारांत त्यांनीं केलें. आणखीही दोन वाक्यांत त्यांनीं "राजकारणी" लोकांची मीमांसा केली, तिचाही उपयोग तत्कालीन महाराष्ट्रीय पुढाऱ्यांची मनोवृत्ति पारखण्यांत होऊं शकेल. केळकर म्हणाले, "राजकारणाचा विचार करणारे कांहीं लोक असतात, त्यांना नवीन चुरचुरीत असें कांहीं तरी लागत असतें. त्यांना आजचा प्रसंग उपयुक्त आहे. हा अप्रिय प्रसंग आहे; परंतु असे अप्रिय प्रसंग उत्पन्न होतात त्याला उपाय नाहीं; व ते आल्यावर त्यांचा आपद्धर्म म्हणून स्वीकार केल्याशिवाय गत्यंतर नसतें. बाजूला होत नाहीं तें शिंगावर घेणें भाग आहे."

" हल्लीं नेहरू व मी यांच्यामध्यें युद्ध सुरू आहे. तें रंगभूमीवर आज सुरू असलेल्या कृष्णार्जुनयुद्धासारखें वाटतें. कारण कृष्ण व अर्जुन यांचा खेळीमेळीचा स्नेहसंबंध होता तसाच आम्हां उभयतांमधील आहे. मीं आजवर कोणाची सेवा केली नाहीं व माझी सेवा कोणी करावी अशीही माझी इच्छा नसते. **ईश्वरानें मला कोणाचा सेवक होणें हें दिलेंच नाहीं.**"

" ईश्वरानें मला कोणाचा सेवक होणें हें दिलेंच नाहीं," हीच तर महाराष्ट्राच्या दुर्दैवाची कहाणी आहे. अशीच वृत्ति लो. टिळकांच्या सुद्धां किती कामीं आली असेल तें ईश्वरच जाणे. महात्माजींच्या कार्यौघांत तर वेळोवेळीं या वृत्तीनें अडथळे आणलेच. नंतर स्वराज्यपक्षाला सारें भांडवल सोंपून महात्माजी दूर झाले, तर नेहरूंशीं केळकरांनीं बेबनाव केला. महात्माजीच शेवटीं थोर वैद्य ठरले. त्यांनीं रोगाचें बरोबर निदान करून त्याला उमळून वर येण्याची संधि दिली. त्यांच्या औषध-योजनेचा अचूक परिणाम घडून आला. कानपूर येथें मोतीलालजींनीं २४-१०-२५ रोजीं पुढील आशयाचें भाषण केलें:—

" सरकारला आमचेकडून जितकें सहकार्य मिळत आलें आहे त्याहून अधिक सहकार्याची अपेक्षा त्यांना करतां येणार नाहीं. या बाबतींत आम्हांला कधींच भ्रम नव्हता. परंतु आम्हीं सरकारला पूर्ण संधि दिली. त्यांनीं तिचा चांगलाच उपयोग केला असून सहकार्य आतां पेटींत दफन होऊन पडलें आहे......आम्ही स्वराज्यपक्षाचे लोक वादळाच्या शक्य तितक्या जवळून गेलों. आणखी पुढें जाणें आम्हांला शक्य नाहीं व हा धोक्याचा मार्ग सोडून देऊन अधिक माहितीच्या रस्त्याकडे पुन्हा वळण्यासाठीं आम्ही कानपूरच्या फर्मानाची वाट पाहत आहोंत. ...हें फर्मान कॉंग्रेसनें द्यावें अशी मी मागणी करीन व ती पूर्ण होईल याविषयीं मला शंका नाहीं. लाटसाहेबांना इष्ट असलेल्या सहकार्याच्या रूपाचें तें फर्मान खास नाहीं. परिणाम काय होणार तें आम्ही जाणून आहोंत व त्याविषयीं आमची तयारीही आहे."

खापर्डे, कानिटकर, काणे, बाबासाहेब परांजपे व केळकर यांनीं तांब्यांचें अभिनंदन केलें. देशमुख, अभ्यंकर, शेवडे यांनीं निषेध केला.

१०-११-२५ रोजीं जयकर-केळकरांनीं स्वराज्यपक्षाच्या कार्यकारी मंडळावरील आपल्या जागांचे राजीनामे दिले.

१९ तारखेस अण्यांनीं राजीनामा दिला. अर्थात् या वादामुळें आपल्या प्रतिस्पर्ध्यांना या गमतीजमती फुकट पाहावयास मिळून "वादानें गुदगुल्या" होत होत्या, त्याचेंही केळकरांना वाईट वाटत होतें. "एका टवाळखोरानें असें पिकविलें कीं, सर मॉरिस हेवर्ड यांच्यानंतर मी (केळकर) मुंबई कौन्सिलमध्यें गृहमंत्री होणार आहे. ...या वादाचें माझें शेवटचें कारण हेंच कीं, त्यानें महाराष्ट्रावर बंडखोरीचा आरोप पूर्वी एकदां आला तसा पुनः एक वेळ येणार...पण माझ्या मनाला समाधान इतकेंच वाटतें कीं, हा अप्रिय वाद अंगावर घ्यावा लागला तरी त्यांत मी निर्दोषी आहे. असेल चूक तर ती पंडितजींचीच आहे."

१९२५च्या नोव्हेंबरांत प्रतियोगी सहकार पक्षाची स्थापना झाली. डिसेंबरअखेरीस कानपूरला कॉंग्रेसचें अधिवेशन भरणार होतें. तत्पूर्वी त्रिदळ महाराष्ट्रांत विचित्र देखावा दृष्टीस पडूं लागला. मोतीलाल नेहरूंनीं वऱ्हाडनागपूर प्रांतांत दौरा काढून महाराष्ट्रपक्षावर झोड उठविण्यास सुरुवात केली. तिकडे महाराष्ट्रपक्षानें ठाणें-मुंबईकडे जिल्हा परिषद व सभा भरवून स्वराज्यपक्षाचे वाभाडे काढण्यास आरंभ केला. ही तोंडातोंडी इतकी कडेलोटास पोंचली कीं, शेवटीं पं. नेहरूंनीं स्वतःच पत्र लिहून मुंबईस संयुक्त बैठक भरवून तडजोड करण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्याप्रमाणें मुंबईस दोन्ही पक्षांचे लोक व श्रीनिवास आयंगार, सरोजिनीदेवी वगैरे मध्यस्थ एकत्र जुळून कानपूर-कॉंग्रेसपर्यंत सर्व चळवळ बंद करण्याचें ठरलें.

कानपूरला सरोजिनीदेवी अध्यक्ष होत्या. "बंडाचा झेंडा जोरानें पुढें ढकलणार" या ईर्ष्येनें केळकर कानपुरास गेले. अधिवेशनांत मोतीलाल नेहरूंचेंच वर्चस्व दिसून आलें व "सविनय कायदेभंगासाठीं लोकांस तयार करण्यासाठीं किंवा समर्थ करण्यासाठीं जो कार्यक्रम उपयोगी पडेल तोच हातीं घेण्यांत येईल व त्यास विरोधी अशा कोणत्याही चळवळींत कॉंग्रेस भाग घेणार नाहीं," असा ठराव पास झाला.

त्यानंतर केळकर, जयकर, अणे वगैरे प्रतियोगी सहकारपक्षाच्या सभासदांनीं स्वराज्यपक्षाचे राजीनामे सादर केले. अकोला येथें १४-२-२६ रोजीं मोठी

परिषद जयकरांच्या अध्यक्षतेखालीं भरून प्रतियोगी सहकारपक्षाची शास्त्रोक्त स्थापना झाली. त्यानंतर मोतीलालजींना " नेहरूपक्ष चंचल आहे, विसंगत आहे, त्याला उठवळ आली आहे " इत्यादि शब्दांचा अहेर करण्यास केळकर मोकळे झाले.

प्रतियोगी सहकारपक्षानें सर्व प्रांतांना आपापल्या परिस्थितीप्रमाणें कॉंग्रेसचे सभासद व्हावें वा न व्हावें याबद्दल सूट दिली होती, तरी त्रिदळ महाराष्ट्रापुरती कॉंग्रेस सभासदत्वाची सक्ती होती.

मुंबईस मि. चिंतामणी यांच्या खटपटीनें भरणाऱ्या संयुक्त परिषदेच्या अध्यक्षांकडून केळकरांना हजर राहण्याचें आमंत्रण आलें. हजर राहणें शक्य नसल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करणारें पत्र त्यांनीं पाठविलें. पण त्या सुदीर्घ पत्रांत त्यांनीं आपले अनेक विचार ग्रथित करून शेवटीं कळविलें कीं, " परिषदेच्या उद्देशाविषयीं माझी पूर्ण सहानुभूति आहे व संयुक्त हिंदी राष्ट्रीय पक्षाची स्थापना व्हावी अशी माझी मनापासून इच्छा आहे. असा पक्ष स्थापन झाल्यास व माझ्या पत्रकांतील बहुतेक सर्व मुद्दे परिषदेनें मान्य केल्यास मी त्याचा सभासद खास होईन. पण **जुन्या होमरूल लीग अथवा टिळक-स्वराज्यसंघ यांसारख्या संस्थेमार्फत चळवळ करण्याचा हक्क मी राखून ठेवीन व त्याचप्रमाणें प्रति. सह. पक्षाच्या वतीनें त्या पक्षाच्या कमिटीचे निर्णयानुसार निवडणुकी लढविण्याचा हक्कही मी राखून ठेवीन.**"

नेहमीं " हातचा " ठेवण्याचें केळकरांचें धोरण येथेंही प्रकट झालेंच.

पुढें ६ व ७ मार्च १९२६ रोजीं साबरमतीस दोन्ही पक्षांचा एक करार होऊन सह्या झाल्या. त्यांत " सरकारकडून कॉंग्रेसला समाधानकारक जाब मिळेपर्यंत सरकारच्या हातीं असलेली कोणतीही जागा पत्करावयाची नाहीं व वर्किंग कमिटीनें वेगळा कांहीं हुकूम दिला नसेल तर बजेट व खर्चाच्या मागण्या नामंजूर करावयाच्या " असा एक ठराव होता. दोन महिन्यांच्या आंत करार मोडला गेला व दोन्ही पक्ष एकमेकांस दोष देऊं लागले. वरील ठरावाच्या अर्थाबाबत उभयतांत मतभेद झाले. सरोजिनीदेवींनीं प्रतियोगी सहकारपक्षास अहमदाबादच्या अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटींत हजर राहून तडजोड करण्यास बोलाविलें; पण केळकरांनीं व त्यांच्या पक्षानें स्वच्छ नकार दिला.

यानंतर प्रतियोगी सहकारपक्षातर्फे चळवळ सुरू झाली. मुंजे, अणे, जयंकर, केळकर यांनीं व्याख्यानांच्या फेरी सुरू केल्या. 'दणदणीत संसार'चें निदर्शन चव्हाट्यावर होऊं लागलें. शेवटीं त्या सालच्या अखेरी-अखेरीस निवडणुकी झाल्या तेव्हां प्रतियोगी सहकारपक्षाच्या सभासदांनीं स्वतंत्रपणें निवडणुकी लढविल्या. परिणामीं स्वराज्यपार्टीचा 'दणदणीतपणा' अदृश्य होऊन यादवीचें भयानक दृश्य पाहण्याचें देशाच्या नशीबीं आलें आणि पुढल्या कायदेमंडळांतून केंविलवाणा देखावा दिसूं लागला ! !

" वृक्षाच्या फांदीवर बसून फांदीच्या मुळाशीं कुऱ्हाडीचे घाव " मारण्याचा लो. टिळकांनीं दिलेला दृष्टान्त किती समर्पक आहे हें वेगळें सांगावयास नकोच. हिंदुस्थानच्या आजपर्यंतच्या इतिहासांत असे प्रसंग जागोजाग आढळतात.



# २४ महाराष्ट्राचें गुरुत्वमध्य

“ महाराष्ट्रांतील बहुसंख्याक मराठ्यांची उन्नति झाल्याखेरीज महाराष्ट्राची उन्नती होणें शक्य नाहीं आणि मराठ्यांची धार्मिक गुलामगिरी नाहींशी झाल्याखेरीज त्या समाजाची उन्नति होणें शक्य नाहीं.” —कोल्हापूरचे राजाराम महाराज यांचें एका मानपत्रास उत्तर.

कोल्हापूरच्या शाहूमहाराजांच्या प्रोत्साहनानें महाराष्ट्रांत ब्राह्मणेतरपक्ष संघटित प्रकारें बळावत गेल्याचें मागें सांगितलेंच आहे. मॉंटफर्ड सुधारणान्वयें निवडणुकी झाल्या तेव्हां त्या पक्षानें राजकीय हक्कांच्या आकांक्षेनें निवडणुकी लढविल्या. पहिल्या खेपेस कॉंग्रेसनें कायदेमंडळांवर बहिष्कारच टाकला होता. दुसऱ्या खेपेस स्वराज्यपक्ष कायदेमंडळांत प्रविष्ट झाला. परंतु तीन दिवाणगिऱ्यांपैकीं एक जागा ना. जाधव या ब्राह्मणेतर पुढाऱ्यास मिळाली व ब्राह्मणेतरपक्षाला आपल्या आकांक्षांची किंचित् पूर्ति झाल्याचें समाधान मिळालें.

ब्राह्मणेतरपक्षाचीं स्वतःचीं अशीं कित्येक वर्तमानपत्रें होतीं. ‘ विजयी मराठा ’ पत्र शिंदे चालवीत. ‘जागरूक’ पत्र कोठारी चालवीत. बडोद्यास ‘जागृति’, बेळगांव येथें ‘राष्ट्रवीर’, तरवडी येथें “ दीनमित्र ” आणि कोल्हापूर येथें ‘हंटर’ अशीं मुखपत्रें प्रसिद्ध होत. याशिवाय ‘मजूर’ नांवाचेंही एक वर्तमानपत्र होतें. या साऱ्या पत्रांतून गायकवाडवाडा व ‘केसरी-कंपू’ यांविषयीं तिरस्काराचे व विरोधाचे लेख नेहमीं येत. सत्यशोधक समाजाची स्थापना सुधारणा-तत्त्वावर झाली तरी ‘भटशाही’वर त्या समाजाचा मोठा कटाक्ष होता आणि ‘भटशाही’चें केन्द्र जें पुणें तेथेंच ब्राह्मणेतर समाजानें आपलेंही केन्द्र स्थापन केलें. जेधे कुटुंबानें या चळवळीचें पुढारीपण स्वतःकडे घेतलें व जेधे-मॅन्शनमध्यें पद्धतशीरपणें आंदोलन सुरू केलें.

या चळवळीचे पुढारी भास्करराव जाधव, श्रीपतराव शिंदे, बाबूराव जेधे, अण्णासाहेब लठ्ठे, वालचंद कोठारी व केशवराव बागडे हेच प्रसिद्ध होते, तरी ते जवळ जवळ दिग्दर्शक होते. बाबूराव जेध्यांचे कनिष्ठ बंधु केशवराव जेव्हां या चळवळींत पडले तेव्हां तिच्यांत चढाऊ वृत्ति निर्माण झाली. कारण केशव-

रावांत लढाऊ वृत्ति असून त्यांचा स्वभाव चळवळ्या आणि मेहनती होता. त्यांनीं तरुण मराठ्यांचें नेतृत्व घेतलें व पुण्यांत आणि पुण्याबाहेर ब्राह्मणेतर समाजांत नवा दम निर्माण केला.

केशवराव जेधे यांचा जन्म १८९६ त पुणें येथें झाला. पुण्यांतच ते वाढले व शिकले. मागासलेल्या वस्तींतील एका शाळेंत ते जात. कुंभार, कोळी, मुसलमान अशा लोकांच्या वस्तींत नेहमीं ये-जा होत असल्यामुळें त्यांचा संबंध त्याच जातींशीं फार आला. ते मुसलमानांशीं जेवणखाणही करीत, तालमींत कसरत करीत, अस्पृश्यांशीं मैत्री जोडीत. ब्राह्मणांशीं मात्र त्यांचा संबंध कधींच आला नाहीं. ब्राह्मणांच्या संमेलनांत वेगळ्या पंक्ती होत म्हणून ते तसल्या संमेलनांत कधींच जात नसत. केसरीसुद्धां वाचीत नसत. टिळक ' पुण्याचे राजे ' म्हटले जात. पण त्यांचें व्याख्यानसुद्धां जेध्यांनीं एकदांच ऐकलें. राजकीय बाबींकडे त्यांचें वळण फारसें नसे. सामाजिक बाबींत त्यांना गोडी होती. स्वभावतःच मागासलेल्या लोकांकडे त्यांचा ओढा होता. त्यामुळें सुधारणावादी गोखल्यांविषयीं त्यांच्या मनांत आदर होता व मेळ्यांतून समाजसुधारकांवर होणारी टीका जेध्यांना पसंत नसे. १९१७ त ब्राह्मणेतर चळवळ सुरू होतांच जेध्यांना राजकीय व सामाजिक भूमिका समजूं लागली. त्यानंतर त्यांच्यांत राजकीय आकांक्षा प्रादुर्भूत झाल्या. त्यांनीं टिळकांस विरोध करण्याचें धोरण स्वीकारिलें. त्यांना वाटे, ' टिळकांची चळवळ एका विशिष्ट वर्गासाठींच आहे.' पांचसहा वर्षांत त्यांनीं २०० मागासलेल्या विद्यार्थ्यांचा एक संघ तयार केला व " भिक्षुकशाही " विरुद्ध दंगा करूनसुद्धां चळवळी करण्यांत त्यांस तरबेज केलें. ब्राह्मणवर्ग ब्राह्मणेतरांशीं फटकून वागे. टिळकांच्या राजकीय आकांक्षा उदार असल्या तरी बहुजनसमाजांत प्रवेश करून, लोकांच्या अंतःकरणांत शिरून त्या त्यांना समजावण्याचें कार्य टिळकानुयायांनीं केलेंच नाहीं. परिणामीं ब्राह्मणेतरांचा ब्राह्मणांवर कटाक्ष राहिला. जेध्यांनीं आपली चळवळ शेतकऱ्यांपर्यंत नेली. प्रारंभीं इंग्रजांविरुद्ध ते नव्हते. हिंदु समाजांत आपणांस समान दर्जा मिळावा ही त्यांची आकांक्षा होती. त्यासाठीं रीतसर प्रचार करण्यास जेध्यांनीं शक्कल काढली. त्यांनीं " छत्रपति मेळा " तयार केला व दर वर्षी

त्याच्यामार्फत पुण्यांत जोराचा प्रचार केला. तसेच आणखी बरेच मेळे खेडेपाडीं निघाले. त्यामुळें खेड्यापाड्यांतील अजाण लोकांत जाणीव उत्पन्न झाली. तो मेळा पुण्यांत एक 'धास्ती' होऊन राहिला होता. प्रसंगीं हजारों लोकांना गोळा करून त्यांच्या मिरवणुकी तो काढी. १९२४ सालीं पुण्यांत गणपति-उत्सवप्रसंगीं खूप मेळे गाजले. निदान ७० तरी असावेत असा कयास आहे. बहुतेक सर्व खादीच्या गणवेषांत असत. मुसलमानांचा देखील एक मेळा होता. या मेळ्यांमार्फत सर्व पंथ एकमेकांची निंदा व कुचाळकी करीत.

" **आला छत्रपती मेळा। भटांनो पळा पळा रे पळा ॥** किंवा **कुठेंहि आडवा भट आला । राज्याचाही निकाल होइल जाइल नाशाला ॥** असलीं गाणीं गाऊन छत्रपति मेळा गायकवाडवाडा व 'भटें' यांविषयीं आपला द्वेषभाव प्रकट करीत होता. त्या वर्षी त्यानें गायकवाडवाड्यांत आमंत्रणाशिवाय घुसण्याचा प्रयत्न केला. त्याला अर्थात् विरोध झाला. त्यामुळें दंगा होऊन गायकवाडवाडयाच्या दरवाजावर केसरी ऑफिसमधील लोक व मेळेवाले यांच्यांत मारामारी झाली व रक्त सांडलें.

पुण्यांतील ब्राह्मणेतर समाजास या ब्राह्मणेतरांबद्दल आपलेपणा वाटे. छत्रपति मेळ्यांत महात्माजींवरही कित्येक गाणीं होतीं व तीं प्रशंसापर होतीं. महात्माजींची अस्पृश्यांविषयींची कळकळ जेध्यांच्या हृदयास जाऊन भिडली व म्हणून ते महात्माजींकडे आदरानें पाहूं लागले. १९२६ मध्यें महात्माजी पुण्यास आले असतां, त्यांस जेधे-मॅन्शनमध्यें पानसुपारी झाली. त्या समयीं केशवरावांनीं स्वकृत पद म्हटलें होतें.

१९२४ चा गणेशोत्सव दंग्यांत गेल्यामुळें दुसऱ्या वर्षी उत्सवप्रसंगीं पुण्यांत पोलीस-बंदोबस्त जादा ठेवण्यांत आला. त्याच समयीं म्युनिसिपालिटींत एक वादाचा प्रश्न उपस्थित झाला. केशवराव जेधे पुणें म्युनिसिपालिटींत सभासद होते. त्यांनीं ठराव आणिला कीं, वीस हजार रुपये खर्चून म्युनिसिपालिटीनें स्व. ज्योतिबा फुले यांचा पुतळा उभारावा. हा ठराव म्युनिसिपालिटीनें मंजूर केला नाहीं. विरुद्ध मतें देणाऱ्यांत खुद्द फुल्यांचे नातलग व कित्येक ब्राह्मणेतर लोक होतेच. परंतु तो प्रश्न म्युनिसिपालिटी-

पुरताच न राहतां शहरांतही पसरला. दोन्ही पक्षांनीं आपापलीं मतें जनतेपुढें मांडण्याचा प्रयत्न केला. जेध्यांनीं आणखी असेच बारा ठराव म्युनिसिपालिटींत पुढें आणले होते. अध्यक्षांनीं बहुतेक सारे नियमबाह्य ठरविले. परंतु म्युनिसिपालिटीनें त्यांतून प्रकट होणाऱ्या मनोवृत्तीबद्दल जेध्यांवर निंदाव्यंजक ठराव पास केला. लोकांच्या मनोवृत्ति इतक्या क्षुब्ध झाल्या होत्या कीं, तीन-साडेतीन हजार लोकांची मोठी सभा भरून, तींत "केशवराव जेधे यांनीं आणलेला ठराव समाजांत निरर्थक दुही माजवणारा, हिंदुधर्मभावनांना दुखवणारा व तो अनेक दृष्टींनीं अयोग्य असल्यामुळें" म्युनिसिपालिटीनें तो नामंजूर केल्याबद्दल तिचें अभिनंदन करण्याचा ठराव पास झाला.

त्याच सभेंत न. वि. गाडगीळ यांनीं जेध्यांच्या इतर आक्षेपार्ह ठरावांबद्दल म्युनिसिपालिटीनें त्यांचेवर जो निंदाव्यंजक ठराव पास केला त्यास संमति देण्याचा ठराव आणिला व तोही पास झाला.

जेध्यांनीं हौदावरील नळ सार्वजनिक करण्याचा ठराव म्युनिसिपालिटींत आणिला होता; पण तो एका मतानें पडला. जेधे प्रकृतीनेंच लढवय्ये असल्यामुळें त्यांना जें योग्य दिसे तें भांडूनतंडूनसुद्धां प्राप्त करून घेण्याची त्यांची वृत्ति होती. मुत्सद्दिगिरीचें दूरदृष्टित्व त्यांच्यांत नव्हतें, त्यामुळें त्या कडू भावना बोकाळलेल्या काळांत त्यांच्या सुधारणावादी मतांचें समर्थन करणारे लोक राष्ट्रीयपक्षांत देखील मिळणें कठीण झालें.

'मजूर' पत्रांतून पूज्य विभूतींची निंदा अमर्याद येऊं लागली; तेव्हां त्या पत्रावर खटला झाला. संपादकाला माफी मागावी लागली. त्या 'मजूर' पत्राला उत्तर देण्यास 'संग्राम' पत्र सुरू करण्यांत आलें. त्याचे नाममात्र संपादक नलावडे होते, पण बापूराव गोखले यांचे कनिष्ठ बंधु नानासाहेब गोखले व हरिभाऊ जोशी हे त्यांत लिहीत. दोन्ही पत्रांनीं कुत्सित व बीभत्स शैलीचा एकमेकांवर असा मारा चालवला कीं, कोणाची सरशी झाली तें सांगतां येणें कठीण होतें. कोणी कोणास हार जाईना.

हरिभाऊ जोशी व न. वि. गाडगीळ हे त्या काळचे "केसरी-कंपू"तील प्रतिष्ठित लोक होते. १९३० नंतर त्यांत परिवर्तन घडून ते, कॉंग्रेस नेतृत्वा-

खालीं आले व दोघांनींही मोठी कामगिरी केली. तेव्हां त्यांचें पूर्वचारित्रहि जाणून घेतलें पाहिजे.

हरिभाऊ जोशी १९०१ सालीं कोल्हापुरांतील कागल संस्थानांत जन्मले. १९१४ सालीं ते पुण्यास आले व इंग्रजी पहिलींत बसले. इंग्रजी ७ वींत असतांना त्यांचा विवाह झाला (१९१९). पुढें असहकारितेची चळवळ सुरू होतांच ते परीक्षेला बसलेच नाहींत. टिळक महाराष्ट्र विद्यापीठाची परीक्षा देऊन ते महाविद्यालयांत दाखल झाले. पण त्यांना मनांत असंतोष वाटतच होता. तीही संस्था सोडून ते डॉ. कुर्तकोटी यांच्या संस्थेंत गेले. पूर्वीपासून त्यांची प्रवृत्ति शिकण्याकडे नव्हती. इंग्रजी तिसरीपासून ते हस्तलिखित मासिक चालवीत. त्यांच्यांत स्वाभाविकपणें लेखनशक्ति वसली आहे. पांचसहा महिने ते डॉ. कुर्तकोटींचे चिटणीस होते. 'स्वधर्म' पत्राचे ते संपादकही होते. कुर्तकोटींबरोबर राहिल्यानें त्यांना हिंदुस्थानभर फिरण्याची संधि मिळाली. दरम्यान त्यांनीं महाराष्ट्र हिंदुमहासभेचें चिटणीस म्हणून काम केलें. १९२९ अखेरपर्यंत त्यांची फिरती चालू होती. मध्यंतरीं दोनतीन वर्षें ते पुण्यास होते. तेव्हां नारायण छापखान्यांत 'संग्राम' छापलें जाई. हरिभाऊ त्यांतहि बहुधा लिहीत. त्यांत राजकारणही असे. तसेंच 'मजूर' पत्राला त्याच्याच भाषाशैलींत 'खमंग' उत्तरें दिलीं जात. त्यांचा केळकर-पक्षाशीं मित्रसंबंध होता. नाफेरवाल्यांविषयीं त्यांना विशेषसा आदर नव्हता. गांधींचे चेले दांभिक, एककल्ली आहेत असें त्यांना वाटे. शंकरराव देवांविषयींहि त्यांचें मत विशेषसें चांगलें नव्हतें. असहकार त्यांना पसंत होता; पण अस्पृश्यतानिवारणाची चळवळ मान्य नव्हती. कौन्सिल-प्रवेश आवश्यक वाटे. ते महाराष्ट्र हिंदुधर्मपरिषदेचे चिटणीस होते, हिंदु-संघटना जोरदार असावी असें त्यांना वाटे. पण कोहटला दंगा झाला त्यांत हिंदुसभावाल्यांची पारख झाली. कांहीं प्रत्यक्ष पाऊल टाकण्यास हिंदुसभावाले तयार होईनात; तेव्हां हरिभाऊंना पहिला धक्का मिळाला. भोपटकरांविषयीं हरिभाऊंचें चांगलें मत होतें. गंगाधररावांशिवाय कोणाही पुढाऱ्यांशीं प्रत्यक्ष परिचय करण्याचा प्रयत्न हरिभाऊंनीं केला नाहीं. गंगाधररावांविषयीं त्यांना आदर वाटे.

हरिभाऊ वक्रोक्तीच्या कविता करीत त्यांना खूप मागणी असे. १९२१ च्या सुमारास त्यांनीं पांच-सहा महिने चित्रशाळेंत नोकरी केली तेव्हां त्यांची देवगिरीकरांशीं ओळख झाली. देवगिरीकरांचा मनमिळाऊ स्वभाव व आकर्षक चारित्र्य यामुळें उभयतांचा विशेष स्नेह जडला. त्या वेळीं देवगिरीकर लेखन-व्यवसायांत मग्न होते. नोकरीमुळें ते सार्वजनिक कार्यांत पडूं शकत नसत. परंतु त्यांचीं मतें गांधी-नेतृत्वाच्या बाबतींत निश्चित होतीं. त्यांमुळें गांधीवादाबद्दलची हरिभाऊंची सहानुभूति वाढत गेली. १९२५ मध्यें ते मुंबईस हिंदुसभेच्या अधिवेशनास गेले असतां तेथें जावडेकरांची गांठ पडली. गाडींत दोघांचाही मोठा वाद झाला. त्यावेळीं उभयतांचा एकमेकांशीं कांहीं परिचय नव्हता तरी त्याचा परिणाम असा झाला कीं, हरिभाऊंना जावडेकरांविषयीं आदर उत्पन्न झाला. एवढीं एकदोन उदाहरणें वगळल्यास हरिभाऊंना सर्वसाधारणपणें गांधींचे चेले सामान्य दर्जाचे वाटत.

न. वि. गाडगीळ हे वयानें जेध्यांचेच समकालीन होत. त्यांचा जन्म राजपुतान्यांत मल्हारगड येथें झाला. प्राथमिक शिक्षण पुण्यांत, हिंदी निमच येथें व उच्च शिक्षण बडोदा व फर्ग्युसन कॉलेजांत झालें. इतिहास व अर्थशास्त्र हे त्यांचे विषय होते. पुण्यांतील त्यांचे सहाध्यायी बापूसाहेब गुप्ते होते. गुप्त्यांचे चुलते नामांकित थिऑसॉफिस्ट होते. त्यामुळें गाडगीळांच्या वाढत्या वयांत त्यांच्यावर थिऑसॉफीचा पुष्कळ परिणाम झाला. गाडगीळ राहत त्याच गल्लींत प्रसिद्ध आंकडेशास्त्री ग. व्यं. जोशी राहत असत. त्यांच्या पुस्तकालयांत गाडगीळांस वाचनाची गोडी लागली. १९०८ पूर्वी ते सभांना जात असत तेव्हां त्यांना फार ज्ञान नव्हतें. पण १९१५ नंतर होमरूल चळवळ सुरू झाली तेव्हां निरीक्षक म्हणून जाऊं लागले. पुढें फर्ग्युसन कॉलेजमध्यें प्रो. काळे यांच्या वर्गात बसूं लागले. काळ्यांनीं युरोपियन इतिहास शिकवितांना एक नवी दृष्टि दिली. तेव्हांपासून समाजवादाकडे गाडगीळांचें "मन झुकूं लागलें (१९१७)." १९२० सालीं त्यांनीं वकिली-ची सनद घेतली. १९२१-२३ पर्यंत ते जिल्ह्याचे चिटणीस होते. परंतु महाराष्ट्रांत फेर-नाफेरवाल्यांचा झगडा चालू असतां गाडगीळ केळकर-पक्षांत होते. १९२२ च्या ऑक्टोबरांत बाळूकाका व त्यांचा नाफेरवालपक्ष यांनीं

शहर व जिल्हा कॉंग्रेस कमिट्यांचा ताबा घेतांच केळकर व त्यांच्या पक्षांतील लोकांनीं एक निषेधाचें जाहीर पत्रक काढून निवडणुकीच्या उमेदवारींतून आपलीं नांवें परत घेतलीं; त्या पत्रकांत सही देणाऱ्यांपैकीं गाडगीळ हे एक होते. महात्माजींचा अहिंसावाद त्यांना कधींच पटला नाहीं व १९३० पर्यंत महात्माजींचें नेतृत्व सुद्धां त्यांना मान्य नव्हतें. गाडगीळांचा ब्राह्मणेतरांशीं संबंध १९२४ नंतर आला व त्याची सुरुवात जेध्यांवरील निषेधपर ठरावाचें समर्थन करण्यापासून झाली.

जेध्यांच्या ब्राह्मणविरोधी चळवळींत जवळकर या नांवाचे एक सहकारी होते. छत्रपति मेळ्याच्या पदांचा संग्रह करून त्यांनीं छापला. त्यामध्यें टिळक-निंदेचीं दोन पदें होतीं. त्यांत टिळकांची बे-अदबी झाली होती. तीं छापून प्रकाशित करण्याची जबाबदारी जवळकर व लाड यांवर आली. त्या दोघांवर टिळकांच्या मुलानें कोर्टांत फिर्याद केली. मॅजिस्ट्रेटनें दोघांस ५०० रु. दंड केला. अपीलांत दंड ५० रु. करण्यांत आला.

परंतु नुसत्या अब्रू-नुकसानीपर्यंत प्रकरण थांबलें नाहीं. कु. द्वारकाबाई बावडेकर या ब्राह्मण मुलीवर हरि नारायण धनवडे नांवाच्या एका ब्राह्मणेतर तरुणानें हात टाकण्याचा प्रयत्न केला. धनवडे पकडला जाऊन त्यास ९ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा झाली; परंतु पुण्यांतील वातावरण या प्रकरणा-नें क्षुब्ध झालें. पुण्यांत स्त्रियांची जाहीर सभा झाली. तींत या प्रकरणाचा निषेध करण्यांत तर आलाच; परंतु तत्कालीन गलिच्छ वाङ्मयाचाही निषेध करण्याचा ठराव त्या सभेंत पास झाला.

या वेळीं गव्हर्नरकडे ब्राह्मणांचें रक्षण करावें म्हणून एक शिष्टमंडळ गेलें. त्यांत रँ. परांजपे, तात्यासाहेब गोखले वकील व केसरी-पक्षांतील कांहीं मंडळी होती. धनवडेचा ब्राह्मणेतर चळवळीशीं कांहीं संबंध नव्हता परंतु ही गोष्ट ब्राह्मणांचा क्षोभ वाढविण्यास कारणीभूत झाली.

ब्राह्मण-ब्राह्मणेतर प्रकरणानें महाराष्ट्रांत पुष्कळच धुडगूस घातला. तिकडे राजकारणाची चिरफाड चालली होती, तर इकडे हिंदुसमाजाचें काळीज चिरलें जात होतें. 'देशाचें दुश्मन' हें एक चोपडें सन १९२५ मध्यें प्रसिद्ध झालें होतें; त्यांतही टिळक व चिपळूणकर यांची बेअदबी करणारा भरपूर

मजकूर होता. त्याबद्दल प्रकाशक जेधे, लेखक जवळकर, प्रस्तावनालेखक बागडे व मुद्रक लाड यांवर खटला होऊन, जवळकरांस १ वर्षाची व इतरांस ६-६ महिन्यांची शिक्षा झाली. ब्राह्मणेतरांनीं महात्माजींच्या नांवाचाही उपयोग करून 'महात्माजी वर्णाश्रमाविरुद्ध आहेत' असा प्रचार चालविला. वऱ्हाडचे नाफेरवाले त्यागी व शूर पुढारी वीर वामनराव जोशी हे १-६-२५ च्या 'महाराष्ट्रधर्मा'च्या अंकांत प्रसिद्ध झालेला म. गांधींचा ब्राह्मणेतरांस विनंति-वजा लेख घेऊन पुण्यास आले व त्यांनीं ब्राह्मणेतरांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं एक पत्रक छापून त्यांत महात्माजींचें वरील म्हणणें जाहीर केलें.

'आपण वर्णाश्रमाविरुद्ध आहों' या गोष्टीचा इन्कार करून महात्माजींनीं ब्राह्मणेतरांस सल्ला दिला होताः—

"ब्राह्मणांशीं असहकार करण्याच्या गोष्टी तुम्ही बोलतां; पण असहकारितेचें पवित्र नांव उच्चारण्यासही अंगीं पावित्र्य पाहिजे. ब्राह्मणांविरुद्ध न्याय पाहिजे असेल तर त्यांच्यासारखी तपश्चर्या करा. माझी ब्राह्मणेतरांस विनंति आहे कीं, तुम्ही पहिल्यानें हिंदुस्थानला स्वतंत्र करा, मग पाहिजे तर ब्राह्मणांचा गळा कापा."

या विनंतीचा कितीसा आदर करण्यांत आला तें माहीत नाहीं. परंतु ब्राह्मणेतरांचे डोळे उघडण्यास दुसरेंच एक कारण घडून आलें. ब्राह्मणांशीं व कॉंग्रेसशीं भांडून त्यांनीं ज्या आपल्या प्रतिनिधींस व पुढाऱ्यांस कायदेमंडळां-त पाठविलें होतें ते जबाबदारीची जाणीव सोडून नोकऱ्यांसाठीं आपसांत भांडूं लागले. आपल्या समाजाचें कल्याण त्यांच्या नजरेपुढून दूर झालें. कंगाल शेतकरीसमाज तसाच अज्ञानपंकांत पिचत होता. त्याचें त्यांना काय ? जुने पुढारी स्वार्थी बनले. नव्या मंडळींना अजून तात्त्विक भूमिकेची महती वाटत होती. त्यामुळें ब्राह्मणेतर समाजांतच फूट पडूं लागली. एवंच, योग्य नेतृत्वाच्या अभावीं लढाऊ वृत्ति अंगीं असूनही सामाजिक दृष्ट्या क्रान्तिवादी असा हा समाज राजकारणांत प्रतिगामी वृत्तीचा राहिला. जेध्यांची भूमिका मूळपासून तात्त्विक होती. त्यांना स्वार्थीपणाची चीड होती. त्यामुळें त्या जुन्या पुढाऱ्यांविषयीं त्यांच्या मनांत वीट उत्पन्न झाला. विठ्ठल

रामजी शिंदे यांस प्रथम टिळकांचें राजकारण पसंत होतें. त्यांची भगिनी वारली तेव्हां सनातनी मराठ्यांनीं खांदा दिला नाहीं, कारण शिंदे अस्पृश्यता मानीत नव्हते. उलट त्यांची सेवा करीत. नव्या पिढीनें शवास खांदा दिला. जेध्यांचा स्वभाव इतका तत्त्वकठोर होता कीं, १९१९ सालीं त्यांनीं सहभोजन केलें म्हणून तीन वर्षें त्यांच्यावर त्यांच्या जातीनें बहिष्कार घातला, पण जेध्यांनीं दाद दिली नाहीं. जरी ते कॉंग्रेसला मिळाले नव्हते तरी सरकारशींही त्यांचें धोरण तुसडेंच होतें. म्युनिसिपालिटीचे सभासद असतां छोट्याबड्या लाटसाहेबांना द्यावयाचीं मानपत्रें त्यांनीं स्वतः विरोध करून हाणून पाडलीं.

स्व. ज्योतिबा फुले मूर्तिपूजेविरुद्ध होते तरी ब्राह्मणांविरुद्ध ऊर्फ 'भिक्षुकशाही'विरुद्ध चळवळ करणारे ब्राह्मणेतर सारे मूर्तिपूजकच होते ही लक्षांत घेण्यासारखी गोष्ट आहे. १९२५ त पुणें, भुसावळ, मुंबई, तुळजापूर, नारायणगांव वगैरे गांवीं ब्राह्मणेतर लोकांनीं श्रावणी करून घेतली. गणेशोत्सव, हरितालिका वगैरे उत्सवही त्यांनीं स्वतंत्रपणें केले. लग्न वगैरे विधींतून ब्राह्मण पौरोहित्य काढून टाकण्याचा प्रयत्न केला, पण बदल्यांत मराठा पुरोहित कामीं लावले.

या ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादांत अत्याचार होऊं लागतांच खटलेही खूप झाले व ब्राह्मणेतर आततायींना शिक्षा झाल्या. त्याचें वैषम्य वाटून व इंग्रजसरकार "भटाळल्या"ची शंका येऊन " विजयी मराठा " पत्रानें आपल्या लेखांत सरकारविरुद्ध तक्रार केली:—

" प्रिन्स ऑफ् वेल्सच्या आगमनप्रसंगींची पुणें शहरांतल्या ब्राह्मण चळवळ्यांनीं उत्पन्न केलेली परिस्थिति तरी टाइम्सपुढें उभी राहावयास पाहिजे होती. त्या वेळीं आणि आजतागायतही महाराष्ट्रांत जी शांतता राहिली याचें कारण केवळ महात्मा फुले यांचे अनुयायी किंवा ब्राह्मणेतरपक्षाचे लोक होत. ब्राह्मणांच्या ब्रिटिशद्वेषाच्या चळवळीला आळा बसला असला तर त्याचें कारणही हेच लोक होत. पण ब्रिटिश साम्राज्याच्या या दोस्तांवरच आज टाइम्सकार आग पाखडीत असून, साम्राज्य उलथून पाडणाऱ्यांच्या गळ्याला ते मिठी मारीत आहेत."

हे उद्गार टाइम्समधील टीकेला उत्तर म्हणून आहेत हें उघड आहे. परंतु

या उद्गारांत पुष्कळ अर्थ भरला आहे. वि. का. राजवाडे यांनीं जें म्हटलें आहे कीं, "महाराष्ट्र देशाचें गुरुत्वमध्य उपरिनिर्दिष्ट चार जातींच्या ( मराठा क्षत्रिय, मराठा कुणबी, शूद्र कुणबी व नागवंशी महार ) ठायीं आहे आणि ते म्हणतील ती, बहुत कालांतरानें का होईना, पण पूर्वदिशा होते, करित शहाजी-शिवाजींनीं ह्या जातींचें साहाय्य पैदा केलें आणि मराठा तेवढा मेळवावा हा सिद्धान्त रामदासांनीं उच्च स्वरानें पुकारिला." त्याची साक्ष विजयी मराठ्यांतील वरील उद्गारांतून मिळते.

हळूहळू वादाची तीव्रता कमी होत गेली; आणि दिल्लीच्या 'पेशवा' या उर्दू पत्रानें जेव्हां शिवाजीमहाराजांविषयीं अश्लाघ्य उद्गार काढले तेव्हां निषेधार्थ पुण्यांत झालेल्या जाहीर सभेंत ब्राह्मणब्राह्मणेतर एका व्यासपीठावर जमल्याचें अपूर्व दृश्य नजरेस आलें. (८-८-२७.)

# २५ वीरव्रताचें पालन

चौकरांनीं महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचा राजीनामा दिल्यावर भोपटकर अध्यक्ष झाले व तीन वर्षें तेच अध्यक्ष राहिले.

केळकरपक्ष स्वराज्य-पक्षांतून फुटून वेगळा होतांच त्याचा कॉंग्रेसशीं असलेला संबंध दुरावत चालला. मध्यवर्ती कमिटीचें धोरण व महाराष्ट्र प्रांतिकचें धोरण यांत साहजिकच फरक दिसूं लागला. १९२६ च्या निवडणुका प्रतिसहकार पक्षानें लढविल्या तशा नाफेरवाल्या पक्षानेंही स्वराज्यपक्षाच्या उमेदवारांसाठीं लढविल्या. पुण्यांत महाराष्ट्र इलेक्शन कमिटी नेमली गेली. जमनादास मेहता तिचे अध्यक्ष असून शंकरराव देव व नाना मराठे हे चिटणीस होते.

पूर्वखानदेशांत देव व शिवरामपंत परांजपे यांनीं दौरा काढला. या प्रसंगीं प्रतिस्पर्धी पक्षांतील त्वेष इतक्या थरास पोंचला कीं, येवलें येथें सभेचें काम त्यांनीं होऊं दिलें नाहीं; व भुसावळ येथील सभेंत अध्यक्षांवर जोडा फेकला गेला आणि वक्ते व अध्यक्ष यांवर धूळ फेकण्यांत आली.

उमरावतीचे वीर वामनराव जोशी हे कट्टर नाफेरवाले महाराष्ट्रांत दौरा काढण्यास आले होते. त्यांच्याबद्दल लोकांत आदर होता व त्यांचीं भाषणेंही जाज्वल्य होत. केळकर-जयकर निवडून आले. नागपूरकडे अभ्यंकर पडले, मुंजे निवडून आले.

२-५-२७ रोजीं कॉंग्रेसचे अध्यक्ष श्रीनिवास आयंगार हे पुण्यास आले असतां प्रांतिकची बैठक झाली. अध्यक्ष भोपटकर खादीच्या पोषाकांत होते पण केळकर व केसरी ऑफिसांतील इतर सभासद यांच्या अंगावर खादी नव्हती. श्री. संगमनेरकर यांनीं ही गोष्ट अध्यक्षांच्या लक्षांत आणून दिली; पण त्यांनीं तिकडे पूर्ण दुर्लक्ष करून काम चालू ठेवलें व ठरावही पास केले.

कॉंग्रेसमधील दुफळी आतां फेरवाले व नाफेरवाले यांच्यामध्यें न राहतां फेरवाल्यांतच चालली होती. ती मिटवण्यासाठीं श्रीनिवास आयंगार पुण्यास आले होते. पण त्या एकंदर कौन्सिलवादीपक्षाचें एवढें पतन झालें होतें कीं,

कॉंग्रेसची इभ्रत कोणीच राखीत नव्हते. राष्ट्राची शक्ति वाढविण्यास म्हणून गेलेले हे लोक आपसांत मारामाऱ्या करून उलट शक्तीचा क्षय करीत होते. दुफळी माजलेल्या दोन्ही पक्षांनीं कॉंग्रेसच्या आज्ञा मोडल्या होत्या. दोन्ही पक्षांच्या धोरणांत विशेष फरक राहिलाच नव्हता. दिवाणगिऱ्यांबाबत काय तो थोडासा मतभेद होता. द्विदल राज्यपद्धति मोडण्याची भाषा संपुष्टांत आली होती व दाणे टाकून कोंबड्या झुंजविणारी नोकरशाही दुरून गंमत पाहत होती. कौन्सिलवरील कॉंग्रेसचें उरलेंसुरलें नियंत्रणसुद्धां काढून टाका असा प्रतिसहकार पक्ष हट्ट करीत होता; मात्र कॉंग्रेसच्या कारभारांत आमचें म्हणणें ऐकलें पाहिजे ही त्याची अट कायम होती.

महात्माजींनीं या प्रकरणांतून पुरता हात काढून घेतला होता. आपल्या विधायक कार्यक्रमाची वृद्धि व संघटना करण्याकडे ते आपलें सर्व लक्ष पुरवीत होते. अखिल भारत चर्खासंघ ही संस्था त्यांनीं नुकतीच काढली होती. नंतर 'गोसेवासंघ' नांवाची दुसरी संस्था त्यांनीं काढली. तुर्कांनीं केमालपाशांच्या नेतृत्वाखालीं आपला देश स्वतंत्र करून घेतला व सुलतानाला काढून लावलें; आणि इब्न सौद यानें मुसलमानांचीं पवित्र क्षेत्रें आपल्या ताब्यांत घेतलीं. त्यामुळें खिलाफतीचा प्रश्न तर मिटलाच होता; परंतु सत्याग्रहाचें चैतन्य देशांत हळूहळू खेळूं लागलें होतें हें निश्चित. लहान लहान प्रमाणावर देशभर चहूंकडे सत्याग्रहाच्या चळवळी होत होत्या व त्यांना यश येत होतें. पंजाबांत अकाली शिखांनीं सत्याग्रह करून गुरुद्वारें ताब्यांत घेतलीं. दक्षिणेंत वैकोम सत्याग्रह यशस्वी झाला. गुजरातेंत बोरसद येथें सत्याग्रह होऊन सरकारला जुलमी पोलीस मागें घ्यावे लागले. नागपूरचा झेंडा-सत्याग्रह तर हिंदुस्थानभर गाजला. यानंतर नागपूरला राजबंद्यांसाठीं दुसरा आर्म्स ॲक्ट मोडणारा सत्याग्रह सुरू झाला. तसा बंगालमध्यें पतुरवाली येथें हिंदूंनीं वाद्यें वाजविण्याचा सत्याग्रह आरंभिला. मिरज संस्थानांत सारावाढबिद्दल सत्याग्रह झाला व तो श्री. शिखरे आणि श्री. पुण्डलीकजी यांनीं यशस्वी करून दाखविला. त्या काळांत एकंदर सोळा सत्याग्रह झाले.

असहकारिता बाह्यदर्शनीं थंड पडल्यासारखी वाटत होती; परंतु वस्तुतः तिचें तेज देशांत प्रविष्ट झालें होतें. प्रचंड पुराप्रमाणें तिचा ओघ देशांत

एकदम आल्यामुळें जनतेला विचार करण्यास फुरसद मिळाली नाहीं हें खरें आहे. पुराबरोबर आलेली घाण उघडयावर पडली, पण फलदायी रेंदा मात्र हिंदभूमींत कायमचा रुतून बसला. त्या मातींतून जीवनस्पर्शी माणसें उदयास आलीं व त्यांनीं आपल्या नेत्याचें कार्य खेडोपाडीं शांतपणें, मूकपणें चालविलें.

महात्माजींच्या महाराष्ट्रांतील दौऱ्यांत देव त्यांचेबरोबर सतत होते. देवांनीं महाराष्ट्राकडून कमींत कमी पन्नास हजार रुपयांची अपेक्षा ठेविली होती. महाराष्ट्रानें दुप्पटीहून जास्त रक्कम दिली. देवांनीं खानदेशामधील कार्य कधींच पुरें केलें होतें व पुण्यास ठाणें दिलें होतें. महाराष्ट्रभर त्यांचे नित्य दौरे चालत. त्यांनीं 'स्वराज्य' साप्ताहिक विकत घेतल्याचा उल्लेख मागें आलाच आहे. नाफेरवाल्यांचेंच नव्हे, तर विधायक कार्यक्रमवाल्यांचेंही तें मुखपत्र होतें. त्यांत नवजीवनांतील लेख, खादीकार्य, ग्रामसंघटना, महात्माजींचें आत्मचरित्र, व विधायक कार्यक्रमाचे मिळतील तसे अहवाल प्रसिद्ध होत. महाराष्ट्रांतील विधायक कार्यक्रम करणाऱ्यांची संघटना व्हावी अशी देवांची तळमळ होती; व त्याप्रीत्यर्थ त्यांची धडपड चालत असे. परंतु जुन्या पिढीचे नेते वयानें व मानानें वडील असल्यामुळें देवांकडे ते " त्वां काय कर्म करिजे लघुलेंकरानें ! " या दृष्टीनें पाहत. नव्या पिढीचे लोक वयानें देवांच्या बरोबरीचेच होते व देवांमध्यें त्या सर्वांपेक्षां विशेष उच्च असा गुण नव्हता, त्यामुळें समानवयस्कांवर त्यांचें तेज पडत नसे. परंतु देवांत चिकाटी फार असल्यामुळें, व चोवीस तास ते तनुमनानें आपलें कार्य करीत गेल्यामुळें, महाराष्ट्राचें ज्ञान व सान्निध्य त्यांच्याइतकें कोणाही कार्यकर्त्यास लाभलें नाहीं. देवांचें धोरणही प्रथमपासून सुसंगत राहिलें, त्याचाही त्यांना फायदा झाला.

पुण्यांत फेरवाले व नाफेरवाले यांच्यांतील दुहीमुळें वातावरण गढूळ होत असलेलें पाहून व त्यामुळें कोणाचाच फायदा न होतां नुकसान मात्र सर्वांचेंच होतें ही गोष्ट लक्षांत घेऊन, देवांनीं दोन्ही पक्षांचा समेट घडवून आणण्याची उमेद धरली. नाफेरवाल्यांतील परांजपे-गटाला ही गोष्ट मान्य नव्हती. परंतु नव्या पिढीच्या कांहीं तरुण कार्यकर्त्यांना ती पसंत पडली. टिळक-पुण्यतिथीच्या

दिवशीं प्रांतांतील सर्व टिळक-भक्तांचें संमेलन पुण्यांत करण्यांत येई. १९२७ सालीं, या संमेलनाला देवप्रभृति असहकारवादी मंडळींना आमंत्रण करण्यांत आलें असतां, देवप्रभृति समेट करूं इच्छिणारे कार्यकर्ते आमंत्रणाचा स्वीकार करून संमेलनास हजर राहिले. केळकरगटाचेही बहुसंख्याक लोक हजर होते. एकंदर २७५ लोक हजर होते. देवांनीं समेटाची सूचना करितांच केळकरांनीं ती उचलून धरिली. दा. वि. गोखले व कित्येक लोकांनीं तीस विरोध केला; परंतु वैमनस्य मिटविण्यास केळकरही उत्सुक असल्यामुळें त्यांनीं शेवटपर्यंत आग्रह धरून दोन्ही पक्षांचा समेट आपल्या व देवांच्या सहीनें करारनामा करून घडवून आणिला. करारनाम्यांत प्रत्येक पक्षास आपला कौन्सिलवादी वा विधायक कार्यक्रम करण्यास मोकळीक देण्यांत आली.

केळकर, विजापूरचे श्रीनिवासराव कौजलगी, देव, भोपटकर, सोमण, गोखले, डॉ. फाटक व बामणगांवकर यांची कमिटी नेमण्यांत आली. त्यांनीं चर्चा करून एकंदर दहा ठराव सभेसमोर आणले व ते पास झाले. त्यांचें क्षेत्र राष्ट्रीय शिक्षण, कॉंग्रेस कमिट्या स्थापणें, दारूबंदी, जंगल-तक्रारी, ग्राम-संघटना, जमीनबाब, मजूरसंघटना, अस्पृश्यतानिवारण, शारीरिक शिक्षण सक्तीचें व लष्करी शिक्षण सार्वत्रिक करण्याबद्दल चळवळ, सेवादलें, देशी संस्थानांतील प्रजेला स्वराज्याचे हक्क संपादन करून देण्याबाबत प्रयत्न करणें इतक्या विषयांचा समावेश करणारें होतें. स्वदेशी, बहिष्कार व कौन्सिलें यांबाबत एकमत झालें नव्हतें. वादाचे मुद्दे देव व केळकर यांनीं सभेस निवेदन केले. नंतर सर्वमान्य असा एक मसुदा तयार करून मतास घालून तो मंजूर करण्यांत आला :-

टिळक स्वराज्यसंघातर्फे कौन्सिलबाबतींत प्रचार खालीलप्रमाणें असावा:-

( १ ) गोहत्ती कॉंग्रेसच्या कौन्सिलसंबंधींच्या ठरावांतील सी, डी, ई, एफ् या कलमांतील धोरण मान्य करावें.

( २ ) ए व बी हीं कलमें बदलण्याचा प्रयत्न करावा व अधिकाराच्या जागा स्वीकारून कौन्सिलकार्य करावें.

( ३ ) टिळक स्वराज्यसंघानें स्वदेशीच्या प्रचारांत कापडाचे बाबतींत प्रचार करावयाचा तो फक्त खादीचाच करावा.

( ४ ) इतर हरतऱ्हेच्या स्वदेशी वस्तूंना व उद्योगधंद्यांना उत्तेजन द्यावें.

( ५ ) सर्व प्रकारच्या ब्रिटिश मालावर राजकीय दृष्टीनें बहिष्कार यशस्वी करण्याचा प्रयत्न करावा.

( ६ ) काँग्रेसची खादी पोषाकाची सभासदत्वाची अट काढून टाकण्याचा प्रयत्न करावा.

हेंच देवांचें असहकारयुगांतलें शेवटचें विधायक कार्य झालें. कारण लवकरच कारागृहाचें द्वार त्यांच्यासाठीं मोकळें होणार होतें.

त्या वेळीं हिंदी आकाश हिंदुमुसलमानांच्या दंग्यांनीं मलिन झालें होतें. खिलाफत-प्रकरण मिटतांच हिंदु-मुसलमान तेढ वाढूं लागली. आतांपर्यंत काँग्रेसनें केलेले एकीचे प्रयत्न राजकीय स्वरूपाचे होते. महात्माजींच्या शिफारशीस अनुसरून हिंदूंनीं मुसलमानांच्या जीवनांत प्रवेश करण्याचा प्रयत्न कधींच केला नव्हता. उत्तरेस लालाजी व श्रद्धानंदजी यांनीं शुद्धि-संघटनेची चळवळ मुसलमानांच्या ताजीम-तब्लीघला तोडीस तोड म्हणून काढली होती. अल्लीबंधूंनीं महात्माजींचा पक्ष सोडून कडवेपणा धारण करण्यास आरंभ केला होता. देशभर दंगे चालले होते तसे महाराष्ट्रांतही सुरू झाले. देवांनीं स्वराज्य पत्रांतून या प्रश्नांवर आपलीं मतें उघडपणें देण्यास प्रारंभ केला. त्यांना जातीय प्रश्नाचा निर्णय सरकारकडे सोपवावा या गोष्टीची चीड होती. त्यांनीं सडेतोडपणें हिंदुमुसलमानांस "एकोप्यानें निर्णय घेतां येत नसेल तर सरळ युद्ध करा; पण सरकारकडे गाऱ्हाणें नेऊं नका" असा उपदेश केला.

याच वेळीं हिंदुस्थानांत रॉयल कमिशनच्या भावी आगमनाची बातमी आली होती. १९१९ च्या सुधारणा कशा राबविल्या जातात, त्याचें निरीक्षण-परीक्षण हें कमिशन करणार होतें. देवांनीं 'स्वराज्यां'तून व भाषणांतून ह्या कमिशनवर बहिष्कार टाकण्यासंबंधीं प्रचार आरंभिला. कमिशन पुढच्या वर्षी येणार होतें, परंतु देवांना तेवढा धीर नव्हता. त्यांनीं असंतोषाची वावटळ पुष्कळ अगोदर सुरू केली. खेरीज काँग्रेस-क्रीड बदलून पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव येत्या अधिवेशनांत पास करवून घेण्याबाबतही ते चळवळ करूं लागले. महाराष्ट्रांत सर्वांआधीं देवांनींच या दोन्ही चळवळी सुरू केल्या. साहजिकच सरकारची रोषदृष्टि त्यांचेकडे वळल्यास नवल नाहीं. सरकार निमित्त शोधीत होतें व तें लवकरच मिळालें.

सोलापूरला गणपतिविसर्जनप्रसंगीं ( १९२७ ) हिंदुमुसलमान जमातींत दंगा झाला. तळेगांव दाभाडे येथेंही क्षुल्लक कारणावरून दोन्ही जमातींत दंगा झाला. दोन्ही हकीकती वाचून देवांनीं तारण काढिलें कीं, मुसलमानांपेक्षां सरकारच त्या दंग्यांना जास्त जबाबदार आहे. अर्थात् विचार मनांत आल्याबरोबर देवांच्या स्वभावाप्रमाणें तो लेखणींत उतरला.

बाहेर युद्ध चालत नव्हतें तरी देवांच्या हृदयांत युद्धाचा अस्त झाला नव्हता. ५ मे १९२७ रोजीं त्यांनीं "क्रांतीखेरीज स्वराज्य नाहीं" हा लेख लिहून शिवछत्रपतींच्या त्रिशताब्दि उत्सवाची सांगता केली होती. पुढच्याच आठवड्यांत "युद्ध जाहीर करा" हा लेख प्रसिद्ध झाला. त्यांत त्यांनीं सरकारवर हिंदुमुसलमान दंग्याबाबत दुर्बलतेचा किंवा मुद्दाम काणाडोळा करण्याचा आरोप केला. दिवसेंदिवस दंग्याचें स्वरूप उग्र होत गेलें तसे देवांचे लेखही विशेष कडक होत गेले. शेवटीं सोलापूर-तळेगांव प्रकरणें घडतांच देवांनीं १५ सप्टेंबर रोजीं "निदान धर्मयुद्ध करा" असा लेख लिहिला आणि सरकारला योग्य निमित्त दिलें.

या लेखावर महाभारतांतील एक वचन उद्धृत केलें होतें व तें जावडेकरांनीं त्यांना सुचाविलें होतेः—

**अहं वो रक्षितेत्युक्त्वा यो न रक्षति भूमिपः ।**
**स संहत्य निहन्तव्यः श्वेव सोन्माद आतुरः ॥**

हा लेख सप्टेंबरांत लिहिला गेला. पुढच्याच महिन्यांत संपादक देव व मुद्रक-प्रकाशक हरोलीकर यांस पकडण्याच्या अफवा चोहोंकडे उठल्या. परंतु देवांनीं निश्चिंतपणें आपलें कार्य पुढें चालविलें होतें. सायमन कमिशनवर सर्वपक्षीय बहिष्कार घालण्याची चळवळ ते करीत होते. महाराष्ट्र प्रांतिकची पेण येथें बैठक झाली तींत त्यांनीं आपलें दीर्घकालचें स्वप्न होऊन बसलेला, कॉंग्रेस महाराष्ट्रांत बोलावण्याचा ठराव पुढें आणिला, पण तो सर्वानुमतें पास होणार नाहीं असें वाटल्यावरून अध्यक्ष भोपटकरांनीं तो परत घेण्याची त्यांस विनंति केली व देवांनीं ठराव परत घेतला.

येतें अधिवेशन मद्रास येथें भरणार होतें. देवांनीं अधिवेशनांत पुढील ठराव आणण्याची नोटीस दिलीः—

" कॉंग्रेसक्रीडमधील ' स्वराज्य संपादन करणें ' हे शब्द काढून ' स्वराज्य स्थापन करणें' हे शब्द घालावेत."

दुसरें " वर्किंग कमिटीचे सभासद निवडण्याची सध्यांची पद्धति काढून कॅबिनेट पद्धति अमलांत आणावी व सभासद अध्यक्षांनींच नेमावे."

दोन्ही ठराव ते त्यासमयीं आणूं शकले नाहींत; परंतु भविष्यकालीं ते अमलांत आलेले पाहण्याचें भाग्य त्यांच्या नशीबांत होतें.

डिसेंबरच्या २ तारखेस स्वराज्य कचेरींत देव व हरोलीकर पकडले गेले. त्यांच्यावर दोन कलमान्वयें आरोप लागू करण्यांत आले होते. १२१ व १२४ (अ). १२१ कलमाला इस्टेटजप्ती–फांशी–जन्मठेप काळें पाणी– असली भयंकर शिक्षा मिळते. देवांच्या स्नेह्यांनीं व हितचिंतकांनीं त्यांस वकील देऊन बचाव करण्याची आग्रहाची विनंति केली. प्रतिस्पर्ध्यांनींही ' युक्तीच्या चार ' गोष्टी खऱ्या मनानें सांगितल्या. दादासाहेब करंदीकरांसारखे प्रसिद्ध वकील खटला चालविण्यास तयार झाले. परंतु देवांचा वकील न देण्याचा दृढनिश्चय ढळला नाहीं. त्यांची ध्येयनिष्ठा रेंसभरही चळली नाहीं.

खुद्द महात्माजींकडून तसा सल्ला मिळाल्यास देव ऐकतील या समजुतीनें त्यांच्या स्नेह्यांनीं महात्माजींच्या कानांवर या गोष्टी घालून त्यांच्याकडून देवांना पत्र आणविलें. महात्माजींच्या पत्रांत एक मोठें मार्मिक व सुंदर वाक्य होतें–"If he defends it will not be dishonourable; but there is glory if he does not. But he need not bid for glory." (त्यांनीं बचाव केल्यास त्यांत लज्जास्पद कांहींच नाहीं; पण बचाव केला नाहीं तर गौरवास्पद होईल. पण गौरवासाठीं त्यांनीं अकारण साहस करण्याची जरूरी नाहीं.) देवांना आणखी काय पाहिजे होतें ? हरोलीकर यांनींही वीरोचित शांत वृत्तीनें देवांच्या कृतीला अनुमोदन दिलें व त्यांच्याच विधिलेखांत सहभागी होण्याचें ठरविलें.

९ डिसेंबर रोजीं दोघांनाही कोर्टांत हजर करण्यांत आलें. दुसऱ्या दिवशीं त्यांचा खटला सेशनकमिट करण्यांत आला.

कोर्टांत देवांनीं लेखी जबानी दिली. तींत " निदान धर्मयुद्ध करा " या

अग्रलेखाची पूर्ण जबाबदारी त्यांनीं कबूल केली. जबानी फार विस्तृत होती. तींतील कित्येक उतारे देण्यासारखे आहेतः—

" ज्या अर्थी स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे, त्या अर्थी स्वराज्याच्या प्रस्थापनेच्या कामीं परमेश्वरी कायद्याखेरीज इतर कोणत्याही कायद्याचें बंधन मी पाळीत नाहीं. ...मी जन्मानें ब्राह्मण आहें. आणि माझ्या कल्पनेनुसार व शक्तीनुसार वैदिक धर्मांतर्गत चातुर्वर्ण्यांतील एक या नात्यानें ब्राह्मणांचा जो धर्म सांगितला आहे, त्याचप्रमाणें वागण्याची माझी इच्छा आहे. या धर्माप्रमाणें ब्राह्मण या नात्यानें अहिंसा हें माझें ब्रीद आहे...या दुर्दैवी देशांत मी जन्मलों हें देखील मी आपलें भाग्यच समजतों. कारण विसाव्या शतकांतील हिंदुस्थानाच्या परिस्थितीच्या दृष्टीनें धोरण म्हणून तरी अहिंसेचा स्वीकार करण्याखेरीज या देशास गत्यंतरच नाहीं...महात्मा गांधींनीं सांगितलेल्या अहिंसेंत केवळ हिंदुस्थानचीच मुक्तता आहे असें नसून, सर्व राष्ट्रांतील गांजलेल्या प्रजेची मुक्तता त्यांतच आहे, असें माझी मनोदेवता मला सांगते. ...हा लेख लिहिण्याचा मुख्य उद्देश असा होता कीं, हिंदु व मुसलमान या दोघांसही सांगावें कीं, जर आपापल्या धर्माचें रक्षण करणें असेल तर तें केवळ स्वराज्यस्थापनेनेंच ते करूं शकतील; आणि तें करण्याची रीत म्हणजे चालू राज्यपद्धतीवर अर्थात् कोर्टांवर बहिष्कार घालणें.... सदर लेखास जो मथळा दिला आहे त्याचा अर्थ असा कीं, जर तुम्हांस लढावयाचेंच असेल, तर निदान नीतीस धरून म्हणजे खऱ्या सामन्याच्या कायद्यास अनुसरून लढा.... मी अनत्याचारी असहकारितेचा निःसीम भक्त आहें व माझी अशी दृढ श्रद्धा आहे कीं, हिंदुस्थानास स्वराज्य मिळविण्यास तोच एक मार्ग आहे. आणि स्वराज्यप्रस्थापनेच्या कामीं शस्त्रबलाचा उपयोग करण्याचें मत मी प्रतिपादन करीत नाहीं. म्हणूनच बादशहांविरुद्ध युद्धास मदत केल्याच्या आरोपाचा मी स्पष्टपणें इन्कार करितों. कारण त्यांत शस्त्रबलाचा खालीनें समावेश होतो....प्रचलित राज्यपद्धतीबद्दल माझ्या अंतःकरणांत प्रेम उद्‌भवणें अशक्य आहे; व माझ्या कोणत्याही देशबांधवाच्या अंतःकरणांत तें उत्पन्न होऊं शकेल असें मला वाटत नाहीं. कारण ही गोष्टच निसर्गविरुद्ध आहे. अशा या नालायक राज्यपद्धतीविरुद्ध लोकांत असंतोष

उत्पन्न करणें हें मी आपलें पवित्र कर्तव्य समजतों... व मी तें यथाशक्ति बजावीन. ईश्वराची तशी आज्ञा आहे, अशी माझी श्रद्धा आहे. आणि परकीय सरकार कोणतीही शिक्षा देवो, त्याची पर्वा न करितां मी ही ईश्वराची आज्ञा पाळीन."

जज्जांनीं ज्यूरीला खटला समजावून सांगितला. ज्यूरींत सात गृहस्थ होते. कोर्टांत उत्सुक लोकांची गर्दी अनावर झाली होती. शेवटीं ज्यूरीनें आरोपी १२१ कलमाखालीं निर्दोषी व १२४ ( अ ) खालीं दोषी असल्याचा एकमतानें निर्णय दिला. जज्जांचेंही म्हणणें तेंच पडून त्यांनीं दोघांही आरोपींना दोन-दोन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली.

या खटल्यांत देवांनीं जें धीरोदत्त वर्तन दाखविलें त्याचा समाजावर फार परिणाम झाला. २० तारखेस पुण्यांत जाहीरसभा होऊन तींत मुक्तकंठानें त्यांची प्रशंसा करण्यांत आली. अध्यक्ष हरिभाऊ तुळपुळे यांनीं " दादासाहेब करंदीकरांसारखे वाकबगार वकील पदरमोड करून खटला चालविण्यास तयार असतांनाही देव-हरोलीकरांनीं वकील दिला नाहीं हें अनत्याचारी असहकारितेवर पूर्ण विश्वास असल्याचें लक्षण नव्हे काय ? " असे उद्गार काढले.

सभेंत गाडगीळ यांनीं अभिनंदनाचा ठराव मांडला. रे-मार्केटमध्येंही प्रचंड सभा भरली होती. हिंदु-मुसलमान बहुसंख्येनें हजर होते. पुष्कळ वक्त्यांचीं भाषणें झालीं. बापूराव गोखले म्हणाले, " लोकांमध्यें राजकर्त्यांविषयीं द्वेष व असंतोष पसरविणें हा विस्तवाशीं खेळ असतांना सुद्धां देवहरोलीकर यांनीं तो खेळ खेळला आहे."

" देव-दानवांच्या झगड्यांत देव कधींच माघार घेणार नाहींत. तें पुढेंच पाऊल टाकीत राहतील. त्याचप्रमाणें देवांनीं तुरुंगवास पत्करून एक पाऊल पुढें टाकलेलें आहे." असे दि. वा. दिवेकर यांनीं उद्‌गार काढले.

ता. २४-२-२८ च्या 'यंग इण्डियां'त लेख लिहून महात्माजींनीं दोघांही वीरांचें अभिनन्दन केलें:—

" आरोपींना असेंही सांगण्यांत आलें कीं, अलीकडे कायद्याची मदत घेण्याचा सार्वत्रिक प्रघात पडत चालला असून त्यामुळें कोणत्याही तऱ्हेचा दोषारोप

त्यांच्यावर होण्याची भीति नाहीं. तथापि या असहकाऱ्यांचा निश्चय मेरूप्रमाणें अविचलित राहिला. इतर लोक कसे वागतात. याची त्यांनीं फिकीर केली नाहीं. तत्त्वतः असहकारी असल्यामुळें दूरदर्शित्वावर आधारलेल्या उपदेशाकडे लक्ष देण्याची इच्छाच त्यांना झाली नाहीं. श्रीयुत देवांशीं माझी ओळख येरवड्याच्या तुरुंगांत झाली. श्री. दास्ताने व देव यांनीं कडक उपोषण चालू ठेवलें होतें व त्यापासून त्या उभयतांस परावृत्त करण्यास मला फार प्रयास पडले. आपल्या निश्चयाला दृढपणें चिकटून राहणाऱ्या या मित्रांचें मी अभिनंदन करितों. कारण माझी खात्री आहे कीं, अशाच लोकांमुळें स्वराज्य प्राप्त होईल. आपल्या स्फटिकाप्रमाणें निर्मळ आत्मयज्ञानें त्यांनीं स्वराज्य निःसंशय जवळ आणलें आहे. असल्या एकाकी वैयक्तिक यज्ञाचा राष्ट्रसंवर्धनास कांहींच उपयोग नाहीं अगर त्याचा मोठासा परिणामही होत नाहीं, असा गैरसमज कोणींही करून घेऊं नये. अन्तिम महत्त्व वस्तुतः पवित्रतम आत्मयज्ञालाच असतें. त्याच्याच जोरावर स्वराज्याचा निश्चित व निर्भेळ पाया घालतां येतो.

...देवांचा लेख मीं अनेकवार वाचला असून, मीं त्यांची भाषा वापरली नसती तरी त्या लेखांत असा एकही युक्तिवाद नाहीं कीं, जो मला पत्क-रितां येणार नाहीं. ...पूर्वग्रहदूषित टीकाकार महाभारतांतून उद्धृत केलेल्या श्लोकाबद्दल निष्कारण वाद माजवितील; परंतु पूर्वापरसंदर्भ पाहिल्यास त्याच्या अर्थाबद्दल मुळींच संदेह राहणार नाहीं.... कायद्याच्या पवित्र नांवा-खालीं नंगा नाच घालणारी राज्यपद्धति येथें चालू आहे.... राज्य कुजलेलें, दुष्ट व प्रजेंतील चैतन्याचा नाश करणारें असल्यामुळें त्याच्या नाशासाठीं कितीही किंमत द्यावी लागली तरी अधिक होणार नाहीं. देव व त्यांच्या-सारखे लोक जी किंमत द्यावयास तयार झाले आहेत ती त्यांच्या अनत्याचारित्वाच्या तत्त्वाशीं विसंगत असतां कामा नये...त्यांच्या स्वराज्य-स्थापनेच्या कल्पनेला या अपरिहार्य अशा मर्यादा आहेत. आणि म्हणूनच खटला करण्याला, अगर अधिक योग्य शब्द वापरावयाचा असल्यास छळ करण्याला, याच दोघां निरपराधी कार्यकर्त्यांना कां निवडण्यांत आलें हें समजणें अत्यंत कठीण झालें आहे.... ”

पुण्यांतील सनातनी गृहस्थ भालाकार भोपटकर यांना “गांधाळ” लोकां-

विषयीं आदर नव्हता, परंतु या वीरोचित प्रसंगानें त्यांच्याही मनावर परिणाम होऊन त्यांनीं आपल्या पत्रांत एक खास स्फुट लिहून देवांचा व हरोलीकरांचा गौरव केलाः—

"...सदर खटल्यांत इतर कोणताही भाग न घेऊन त्यांनीं (आरोपींनीं) आपली शंभर नंबरी असहकारिता प्रत्यक्ष आचरणांत आणून दाखविली ... **महाराष्ट्र वरील दोन देशभक्तांना दोन वर्षे अंतरला ही अत्यंत मोठी राजकीय हानि झाली.** महाराष्ट्रीय तरुणांपुढें आदर्शभूत तरुण ठेवण्यास आम्हांस कोणी सांगितल्यास, आम्ही दे. भ. शंकरराव देवांकडे झटकन बोट दाखवूं. विद्वान् व कर्तृत्ववान्, निर्व्यसनी व निगर्वी, गरीबींत भूषण मानणारा व देशभक्तीनें अंतःकरण ओथंबलेला **असा दुसरा तरुण देशभक्त सबंध महाराष्ट्रांत हल्लीं तरी आमच्या दृष्टीसमोर नाहीं.** अनेक मित्रांनीं व हितचिंतकांनीं परोपरीनें विनविलें असतांही व डोळ्यांपुढें जन्मठेप काळेपाण्याची शिक्षा आ पसरून उभी असतांही जो करारी व तत्त्वनिष्ठ तरुण देशभक्त शेवटपर्यंत आपल्या तत्त्वाला चिकटून राहिला, अशा देशभक्ताला सर्व महाराष्ट्रीयांनीं यापुढें "शूर शंकरराव" असेंच संबोधून त्यांचा गौरव करणें योग्य आहे."

---

# २६ युवकावतार

"देशाची जर कांहीं उन्नति व्हावयाची असेल, तर ती जोमदार तरुण पिढीच्या हातूनच पुढें होणार आहे."

"कोणतीही चळवळ यशस्वी होण्यास शरीराची पर्वा न करणारे तरुण त्या चळवळीच्या भजनीं आहेत असें प्रथम सिद्ध व्हावें लागतें."

"क्षुब्ध झालेल्या राष्ट्राच्या मनोवृत्ति तरुणांच्या कृतीनेंच प्रगट व्हावयाच्या; म्हाताऱ्यांच्या कृतीनें नव्हे." —लोकमान्य टिळक

केवळ स्वतःच्या योगक्षेमाचेंच चिंतन करण्याचें शिक्षण घेणाऱ्या तरुणांसमोर महात्मा गांधींनीं प्रत्यक्ष लोकसेवेचा आदर्श ठेवून नवें शिक्षण देण्यास सुरुवात केली, तेव्हांपासून तरुणांना जिवंतपणाची कल्पना येऊं लागली. भारतमातेच्या भक्तींतून जीवनाची उपासना करण्याचे संस्कार त्यांस मिळाले आणि म्हणून जुन्या व्यवहारदृष्टीच्या लोकांपेक्षां त्यांची सेवा करण्याची उमेद अधिक बलवत्तर व निःस्वार्थी बनली.

वातावरण पुन्हा उचंबळत होतें. तरुणांच्या भावना क्षुब्ध होत होत्या. सत्याग्रहाच्या जीवनव्यापी सिद्धान्तानें राष्ट्राच्या आंतरवृत्तींत प्रचंड फेरफार घडवून आणिले होते. राष्ट्रांतील तरुण उत्सुक होऊन प्राणवान बनूं पाहत होते. राष्ट्रभर ठिकठिकाणीं होत असलेले लहानमोठे सांघिक व वैयक्तिक सत्याग्रह त्यांना प्रेरणा देत होते.

राष्ट्राचें उत्थान होतें तेव्हां साहित्यप्रवाहालाही भरती आली पाहिजे, असें पुष्कळदां आढळून येतें. परंतु महाराष्ट्राच्या साहित्याचा इतिहास वेगळाच आहे. महाराष्ट्रांतील सुशिक्षित वाङ्मयसेवकांना राष्ट्रांतील प्रचंड आंदोलनामुळें स्फूर्ति आली नाहीं. राष्ट्राच्या हृदयांतील भाव त्यांच्या कवितांतून, कादंबऱ्यांतून, लेखांतून प्रसादयुक्त शैलींत प्रकट झाला नाहीं. मुळशी-सत्याग्रहानें 'कुंजविहारी'सारख्या कवींना स्फूर्ति दिली. तरी अशीं

उदाहरणें महाराष्ट्राच्या साहित्येतिहासांत तुरळक सांपडतील. सर्वसाधारणपणें महाराष्ट्रांतील साहित्यकार, कवि, कथालेखक, संपादक सर्वच बहुधा या नव्या युगधर्माबाबत उदासीन राहिले. क्षुद्र योग्यतेच्या लघुकथालेखकांनीं कधीं कधीं मासिकांतून वा वर्तमानपत्रांतून गोष्टी लिहून चळवळीची छाया त्यांवर पाडण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यांतून खरी जीवनस्पर्शी कथा निर्माण झाली नाहीं.

त्रीस कोटि यात्रिनकी नैया, डूबि रही मझधार।
आज एक 'मोहन' बिन याको कौन लगावे पार?॥

अशी राष्ट्रीय भावना प्रकट करणारे कवि आणि लेखक महाराष्ट्रांत फार थोडे झाले. सामान्य वाङ्मयी सेवा हेंच साहित्यकारांचें सर्वसाधारण धोरण राहिलें. बोधशून्य मनोरंजन करणें हेंच अनेकांचें कार्य होतें. पक्षाभिनिवेशानें उद्युक्त होऊन कित्येक राजकारणी पुरुष लेखक बनले. तेव्हां त्यांनीं मात्र राष्ट्रीय साहित्य निर्माण करण्याचा प्रयत्न नेणतेपणीं केला. पण धर्मासाठीं, समाजकल्याणासाठीं, लोकमताविरुद्ध जाऊन वीरकर्माची वाङ्मयी उपासना करण्याचें साहस महाराष्ट्रीय साहित्यकारांच्यानें झालें नाहीं. मग परप्रत्ययनेयबुद्धि अशा वाङ्मयसेवकांच्या हातून विचारप्रगति ती कशी होणार?

महाराष्ट्रांतील सुशिक्षित तरुण, जे सरकारी शाळा-कॉलेजांतून शिक्षण घेत होते, त्यांचें जीवन समृद्ध करणारें वातावरण त्यांच्या आसपास नव्हतेंच. शिक्षणसंस्थांच्या बाहेर वाङ्मयापासून स्फूर्ति मिळावी तर तीही असंभवनीय होती. परंतु साहित्यसेवकांनीं प्रेरणा दिली नाहीं म्हणून समाजाचें कर्तृत्व थोडेंच हीन होतें? समाजानें आपल्या पुरुषार्थरूपी साहित्यांतूनच तरुणांना संस्कार दिले व हिंदुस्थानांत एक नवी चळवळ सुरू झाली. देशांतील युवक जागे झाले.

महायुद्धानंतर जगभर जें अशांतीचें व अस्वस्थतेचें वातावरण फैलावलें होतें त्याचा परिणाम युवकवर्गाला विशेष जाणवला. हिंदुस्थानांत प्रजा वाढूं लागली तशी बेकारीही वाढूं लागली. परकीय सत्तेचा जुलूम इतर कोणत्याही गोष्टीपेक्षां पोटापाण्याच्या संबंधांत विशेष जाणवला जातो. निकृष्ट शेती, उद्योगधंद्यांचा अभाव, निःसत्त्व करणारें शिक्षण, वरिष्ठ नोकऱ्यांतून

गच्चांडी व प्रचंड लष्करी खर्चाचें ओझें यांमुळें जगण्याची कला कांहीं केल्या तरुण पिढीच्या हातीं येईना. दिवसेंदिवस प्रश्न बिकट होत गेला.

असहकारितेच्या चळवळींत पुष्कळ तरुण पडले ते एक अगम्य आशावाद हृदयाशीं धरून; परंतु ती चळवळ ओसरतांच कित्येक असंतुष्ट हृदयें दुसरें आशास्थळ शोधूं लागलीं. त्या चळवळीचा आध्यात्मिक भाग त्यांच्या आकलनाबाहेरचा होता. समाजाला मार्गदर्शन करण्यास बुद्धिशक्तीच पुरे आहे, नैतिक शक्तीची अथवा चारित्र्याची काय आवश्यकता आहे? असे विचार कांहीं तरुणांना स्फुरूं लागले. विशेषतः खादीचा व चरख्यांचा कार्यक्रम तर त्यांस मूर्खपणाचा वाटूं लागला.

चिरकाल दाबलेल्या वृत्तींचा स्फोट जेव्हां रशियामध्यें झाला व तेथें बोल्शेव्हिक राज्यपद्धति सुरू झाली, तेव्हां लेनिनच्या महान् व्यक्तिमत्वाची छाप त्याच्या असाधारण प्रयोगाच्या दर्शनी यशाबरोबरच दिगंतरीं पसरली व जगांतील अनेक तरुण त्याच्याकडे 'प्रेषित' या दृष्टीनें पाहूं लागले. रशियांत थर्ड इंटरनॅशनल स्थापन होऊन जगभर बोल्शेव्हिझमचा प्रचार करण्याचें ठरतांच हिंदुस्थानांतही प्रचारकार्यास सुरुवात झाली व मुंबईसारख्या शहरांतील असंतुष्ट सुशिक्षित तरुण या कार्याचे " मिशनरी " बनले.

हें कार्य अर्थात् सोपें नव्हतें. महात्माजींच्या चळवळीला बहुजनसमाजाचा, तसाच आदर्शवादी धनिकांचाही पाठिंबा मिळाला. परंतु हें नवीन तत्त्वज्ञान सर्वमान्य होण्यासारखें नव्हतें. या प्रचारांत सत्याग्रही उघडपणाही नव्हता. सशस्त्र क्रांतिवादी विचारसरणीपेक्षां एक विशेष गुण या पद्धतीचा एवढाच कीं, यांत व्यक्तीला महत्त्व नसून समुदायाला होतें. नव्हे, सामुदायिक क्रियेंतूनच या चळवळीचें उत्थान होणार होतें. परंतु इंग्रज सरकार या बाबतींत विशेष जागरूक राहिल्यामुळें सुरुवातीस ही चळवळ उघडपणें मोठ्या प्रमाणावर चालू शकली नाहीं. प्रारंभीं समाजवादाच्या गोष्टी बोलत बोलत तरुण सनदशीरपणा व्यक्त करूं लागले. हिंदुस्थानांत खेडीं सात लाख व त्यांतून वसणारे लोक अठावीस कोटि! इतक्यांची संघटना मूठभर साम्यवादी कसे करणार? शिवाय शेतकऱ्यांत उचल खाण्याची वृत्ति फार कमीच असते. शहरांतील मजूर मात्र या बाबतींत सर्वांवर ताण करतात असा विचार करून

हिंदुस्थानांत मजूरसंख्या जरी केवळ पंधरा लाख असली तरी त्यांचीच संघटना करण्याचें या लोकांनीं ठरविलें.

परंतु सरकार स्वस्थ बसलें नव्हतें. त्यानें पकडवॉरंटें काढून आठ साम्य-वाद्यांना पकडण्यास पोलीस पाठवले. पैकीं चारजण हातीं आले त्यांत एक महाराष्ट्रीय तरुण डांगे हे होते. या चौघांवर कानपूर येथें खटला होऊन चौघांना चार-चार वर्षांची सजा करण्यांत आली.

हाल सोसून स्वतःच्या विचारप्रणालीची श्रेष्ठता सिद्ध करणाऱ्या या वीर-युवकांनीं समाजाचें लक्ष स्वतःकडे वेधून घेतलें. यापुढें मार्क्सच्या साहित्याकडे युवकवर्ग विशेष ध्यान देऊं लागला. रशियाचे प्रयोग उत्तरोत्तर वाढते व यशस्वी होत गेले. युरोपांतील थोर थोर विद्वान् व वैज्ञानिक लोकांचीं मनें त्यांनीं आकर्षून घेतलीं. त्याचा परिणाम हिंदुस्थानांतील जनमनावर होऊन साम्यवादाचा शास्त्रीय क्रान्तिवाद दिवसेंदिवस तरुणांना आवडूं लागला.

कांहीं तरी करून हातपाय हालवावे असें तरुणांना वाटतांच युवकसंघटने-ची कल्पना उद्भवली. पं. जवाहरलाल हे त्या समयीं तरुणांचे आवडते पुढारी होते. ते स्वतः युवकसंघटनेचे पुरस्कर्ते असून, बेल्जममध्यें पहिली जागतिक युवक-परिषद भरली तिला हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून ते हजर होते. ते रशियालाही जाऊन आले व परत येतांना 'पूर्ण स्वातंत्र्या'ची कल्पना घेऊन आले. त्यांच्या 'सोव्हिएट रशिया' या पुस्तकानें तरुणांस विचार करावयास लाविलें. हिंदुस्थानांतील युवकसंघटनेच्या चळवळीस मुंबई इलाख्यांतील युवकांनीं आरंभ करून दिला. मुंबई येथें २१ व २२ जानेवारी १९२८ रोजीं पहिली युवकपरिषद भरली. मुंबईचे पार्शी नगरपिते श्री. नरीमन अध्यक्ष होते. चळवळीच्या दृष्टीनें परिषद यशस्वी झाली. या परिषदेंत मुंबई इलाख्यांतील सर्व प्रांतांचे प्रतिनिधि होते. तींतून पुढें प्रांतीय व स्थानिक शाखा निघाल्या व लोकक्षोभाचें काम सतत चालू ठेवण्यासाठीं निरनिराळे प्रश्न हातीं घेण्याचें ठरलें. ३-२-२८ रोजीं सायमन कमिशन हिंदुस्थानांत येणार होतें. त्यावर बहिष्कार घालण्याचें बहुतेक सर्व राजकीय पक्षांनीं ठरविलें होतें. देशांतील क्षोभ उत्कटपणें वाढत होता. तरुणांनीं त्याला वाट करून दिली.

मुंबईंत पहिलें पदार्पण करितांच सायमन कमिशनचा बंदरावरच तरुणांनीं

निषेध केला. त्यांचें निदर्शन दिवसभर चाललें. या चळवळीमुळें हिंदुस्थानांतील इतर प्रांतांत तरुणांना प्रोत्साहन मिळून त्यांच्यांतही अशांति व क्षोभ हीं फैलावलीं.

मेच्या ३ व ४ तारखांस सहावी महाराष्ट्र प्रांतिक परिषद पुण्यास भरली. या परिषदेंत फेरवाले व नाफेरवाले एक होऊन काम करीत होते. शिवरामपंत परांजपे स्वागताध्यक्ष व श्री. सुभाषचंद्र बोस हे अध्यक्ष निवडले गेले. या परिषदेंत स्वदेशीचा प्रचार, ब्रिटिश मालावर बहिष्कार, स्वातंत्र्याचें ध्येय व सुधारणाकमिटीवर बहिष्कार इत्यादि ठराव पास झाले. अस्पृश्यतानिवारण हा मुद्दा रचनात्मक कार्यक्रमांत घ्यावा अशी या सभेंत जावडेकरांनीं सूचना आणिली. गुंजाळांनीं विरोध केला. परांजप्यांनीं तडजोड केली तसें जावडेकर, भुस्कुटे वगैरे लोक परिषदेंतून उठून गेले.

युवक-समाजानें वेळोवेळीं सभांतून व लेखांतून जुन्या पुढाऱ्यांच्या दांभिकपणाबद्दल व असहिष्णुतेबद्दल टीका केली व युवकसंघ स्वार्थापासून अलिप्त असल्यामुळें सेवेचा मार्ग निश्चयानें व निःपक्षपाती भूमिकेवरून चोखाळील अशी आशा प्रदर्शित केली. महाराष्ट्रांत युवक-चळवळ सुरू होतांच एक नवीन विचारसरणी निर्माण झाली. युवकवर्ग त्या वेळच्या कोणत्याही पक्षांत उतरला नाहीं. त्याचें स्वतंत्र व्यासपीठ होतें. राजकीय क्षेत्रांत त्याची भूमिका चळवळ्याची होती. सामाजिक क्षेत्रांत त्याची वृत्ति संयम सोडून विकारद्योतक (self-expressive) होण्याकडे होती.आणि धार्मिक क्षेत्रांत उदासीन होती, जींतून पुढें संशयवादी अथवा नास्तिकाची भूमिका निर्माण झाली. त्यामुळें महाराष्ट्रांतील कोणत्याही पक्षाला तो जवळही नव्हता व दूरही नव्हता. दूर नव्हता अशा दृष्टीनें कीं, त्याला प्रोत्साहन दिल्यानें पक्षापुरतें आपलें नुकसान होईल असें त्या वेळीं तरी राजकीय पक्षांना वाटलें नाहीं. आणि महाराष्ट्रांतील साहित्यिकांनींच नवमतवाद उत्पन्न केल्यामुळें 'बंधनाच्या पलीकडे' जाऊं पाहणाऱ्या या नवागतांचें त्यांनीं अभिनंदन केलें.

महात्माजींची धार्मिक दृष्टि जहाल क्रांतिवादी होती, शक्तिमान होती. तिनें अस्पृश्यता, बालविवाह वगैरे अनिष्ट चालींवर 'मूले कुठारः' केल्यामुळें सनातनी असंतुष्ट होते. महात्माजींचें सर्वधर्मसमभावाचें प्रभावी धोरण हिंदु-

सभावादी महाराष्ट्रीयांना जाचक वाटत होतें. महाराष्ट्रांत हिंदुसभावादी मनोवृत्ति पसरत होती. निदान फेरवाल्यांपैकीं बहुतेक लोक हिंदुसभावादी झाले होते किंवा होत होते. १९२४ नंतर उत्तरेंत श्रद्धानंद व परमानंद यांनीं हिंदुसंघटनेची चळवळ चालू केली, तिचे पडसाद मुंबई व महाराष्ट्रांत उठले. राजकारणांत चढाईचें धोरण स्वीकारण्याकडे वृत्ति नव्हती व समाजांत प्रतिष्ठा तर हवी होती. दोन्ही गोष्टी साध्य करण्यास हिंदुसभावादी होणें पथ्यावर पडलें. कारण सरकारशीं युद्ध करण्याचा कार्यक्रम नसल्यामुळें त्याचा रोष साहजिकच भोगावा लागत नव्हता. आणि मुसलमानांविरुद्ध द्वेष पिकविण्यांत आंतरिक हिंसावादाला भरपूर खाद्य मिळत होतें.

बॅ. जयकरांसारखे पुढारीही हिंदुमहासभेच्या वर्चस्वाखालीं कसे येत होते त्याचें प्रत्यंतर त्यांच्या ३-८-२९ च्या केळकरांस लिहिलेल्या पत्रावरून दिसून येईल:—

" येत्या ऑगस्टमध्यें जी गांधी-जिना परिषद भरणार त्यासंबंधानें माझ्याप्रमाणेंच तुम्हांलाही डॉ. मुंजे यांचें पत्र आलें असेल. तडजोडीच्या नांवाखालीं मागें ज्याप्रमाणें मुसलमानांनीं अधिक हक्क मिळविण्याचा कावेबाज प्रयत्न केला, त्याप्रमाणेंच जिना व सरोजिनी नायडू यांना पुढें करून हा दुसरा प्रयत्न चालू आहे. पण या तडजोडींतून हिंदुमहासभेला मात्र वगळलेलें आहे. "

टिळक महाविद्यालयाच्या सुरुवातीस महात्मा गांधी व असहकारितावादी पुढाऱ्यांना व्याख्यानांस बोलाविण्याचा रिवाज होता. पुढें पुढें हिंदुमहासभावादी लोकांचीं व्याख्यानें होऊं लागलीं. विद्यार्थ्यांस नवीनच शिक्षाप्रणाली मिळूं लागली. शंकराचार्य कुर्तकोटी विद्यापीठाचे कुलपति बनले. १९२७ सालच्या पदवीदानसमारंभास डॉ. मुंजे यांचें व्याख्यान ठेविलें होतें. व्याख्यात्यांनीं राष्ट्रास स्वतंत्र करण्याच्या मार्गाबद्दल वा साधनाबद्दल न सांगतां जातीय वादाचा एक नमुना देशाच्या भावी आधारस्तंभांसमोर ठेवला:—

" हिंदुस्थान कोणाचा असा प्रश्न विचारला तर त्याला काय उत्तर मिळेल? अरबस्तान अरबांचा, इंग्लंड इंग्रजांचें, बलुचिस्तान पठाणांचा, जपान जपान्यांचा, चीन चिन्यांचा, तुर्कस्तान तुर्कांचा त्याचप्रमाणें हिंदुस्थान कोणाचा या प्रश्नाचें उत्तर हिंदुस्थान हिंदूंचा हें येणें अगदीं स्वाभाविक आहे. ......

हिंदुस्थानांत ख्रिश्चन, युरोपियन आणि मुसलमान राहोत, त्यांच्या सोयीचे कायदे होवोत, पण हिंदुस्थान हिंदूंचाच राहिला पाहिजे आणि तो त्यांचाच आहे हें तत्त्व प्रथम राष्ट्रीय शिक्षणसंस्थेतील विद्यार्थ्यांना शिकविलें पाहिजे. हिंदूंचा हिंदुस्थान हें शिकविण्यांत अराष्ट्रीयत्व बिलकुल नाहीं. आजच्या राष्ट्रीय शिक्षणसंस्थांतून हें शिक्षण देणें जरूर आहे."

राष्ट्रवादाला इतकें संकुचित रूप दिलें जाणें नव्या तरुणांना-निदान युवक-चळवळींत लक्ष घालणाऱ्या तरुणांना—पसंत नव्हतें. लेनिनची विचारसरणी मान्य करणाऱ्या बहुतेकांना 'धर्म ही अफूची गोळी आहे' हा त्याचा सिद्धान्त पटला. आधुनिक भौतिकवादांत वैयक्तिक किंवा सामाजिक सुखोपभोग हाच आदर्श मानला गेला असल्यामुळें, धर्मशास्त्राकडे दुर्लक्ष करून संपत्तिशास्त्रावरच त्याचें लक्ष केन्द्रित झालें आहे. त्यामुळें त्यावरच आधारलेलें त्याचें समाजशास्त्र व शासनशास्त्र याचा पुरातन शास्त्रांशीं मेळ बसेना.

विसाव्या शतकाच्या तिसऱ्या दशकापासून हिंदुस्थानांत नवीन वारा वाहूं लागला. ज्या लोकोत्तर हिंदी पुरुषांच्या विचारप्रणालीचे संस्कार मागल्या पिढीवर झाले होते, ते रामदास, रामकृष्ण परमहंस, विवेकानंद, स्वामी रामतीर्थ, अरविंद घोष हे सर्व तत्त्वज्ञानी पडद्याआड निष्क्रमण करूं लागले; व मार्क्स, एंजल्स, लेनिन, गॉर्की, यांचें साहित्य विद्यार्थीजीवनांत अवतरूं लागलें. भारतवर्षाची प्राचीन सर्वसमन्वयी साधना जाऊन वर्गकलहाच्या पायावर प्रजाजीवनाचे खंड पाडणारा राज्यव्यवहारधर्म अवतीर्ण झाला. १९३० पूर्वी जी युवक-चळवळ सुरू झाली, तिचें तंत्र अशा प्रकारचें होतें.

१९२८ च्या मध्यांत गुजरातेंत बार्डोली सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली ठिकठिकाणीं शहरांतून विद्यार्थ्यांनीं चळवळीसाठीं फंड उभारले व निदर्शनें केलीं. पुण्यांत सायमन कमिशन येणार होतें. त्यावर बहिष्कार घालण्यासाठीं पुण्यांतील युवकांतर्फे धडपड सुरू झाली. न. वि. गाडगीळ यांनीं या कामीं पुढाकार घेतला. त्यांच्या घरीं सभा भरली. अध्यक्ष बाबूराव गोखले व वक्ते नरीमन होते. पुढें कार्यकर्ते म्हणून प्रसिद्धीस आलेले युवक खाडिलकर, गोरे, जोशी हे समाजवादी सेवक याच प्रसंगीं प्रथम सार्वजनिक कार्यांत पडले.

बार्डोलीच्या लढ्यापूर्वी १९२७ सालीं मुंबई सरकारचे गृहमंत्री ना. सर चुनीलाल मेहता यांनीं एक बिल मुंबई कौन्सिलांत आणलें होतें. तें "तुकडे-बिल" या नांवानें पुढें प्रसिद्ध झालें. मुंबई इलाख्यांतील शेतकऱ्यांच्या कंगालीचें मुख्य कारण म्हणजे त्यांची जमीन पिढ्यान्‌पिढ्या वांटली जाऊन तिचे तुकडे होतात; आणि लहान तुकडयांमुळें, श्रम व उत्पन्न आणि खर्च व उत्पन्न यांचा मेळ बसत नाहीं; यामुळें शेतकऱ्यांची, शेती परवडत नाहीं व ती सोडवतही नाहीं अशी, केविलवाणी स्थिति होते या सबबीवर शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याकरितां म्हणून हें बिल पुढें आणलें गेलें. तें बिल पास झालें असतें तर जमिनीचे तुकडे पाडणें बंद होऊन अखंड शेतजमीन वाढत गेली असती व तीमुळें मोठ्या प्रमाणावर शेतकी होऊन जास्त फायदा मिळविता आला असता असें बिलास अनुकूल असलेले म्हणत. परंतु या बिलामुळें सर्वत्र लोकक्षोभ प्रकट झाला. कारण शेतकऱ्याच्या जीवनाशीं दाट परिचय ठेवून त्यांचे प्रश्न समजून घेतलेल्या अनेक विचारी तज्ज्ञांचें मत असें पडलें कीं, शेतकऱ्यांच्या हलाखीचें कारण केवळ शेत-जमिनी अखंड नसतात हें नसून इतरही बरींच कारणें आहेत. तीं कारणें दूर केल्याशिवाय केवळ तुकडे नाहींसे करण्यानें शेतकऱ्यांचें नुकसान होणार आहे. त्यांची मालकी नष्ट होईल, ते मजूर बनतील, परदेशी भांडवलदारांचें फावेल, ते शेतकऱ्यांच्या जमिनींचे तर मालक बनतीलच आणि शिवाय या कायद्यामुळें बेकार झालेल्या शेतकऱ्यांस आपल्या कारखान्यांतून मजूर म्हणून राबवतील. शिवाय त्या कायद्यांत लोकमतास वाव नव्हता म्हणूनही तुकडे-बिल पास होऊं नये याबद्दल जोराची चळवळ मुंबई इलाखाभर करण्यांत आली. या चळवळीसाठीं महाराष्ट्रांत कॉंग्रेसपक्षानें, त्याचप्रमाणें ब्राह्मणेतरपक्षानें, विशेषतः जेधे कुटुंबानें फारच नेटानें काम केलें व शेंकडों शेतकऱ्यांचा मोर्चा कौन्सिल हॉलवर नेला. सरकारतर्फे त्याला सभ्यतेनें वागविण्यांत आलें व लोकमत एवढें क्षुब्ध झालेलें पाहून ना. मेहता यांनीं तें बिल मागें घेतलें.

बार्डोली व तुकडे-बिल या चळवळींत यश मिळतांच शेतकऱ्यांचे प्रश्न सोडविण्यासाठीं एक कायमची संस्था असल्यास बरें असें वाटून कॉंग्रेस-कार्यकर्त्यांनीं 'मुंबई-इलाखा लॅंड लीग' नांवाची संस्था १९२९ मध्यें स्थापन

केली. बार्डोलीमुळें प्रथितयश झालेले सरदार वल्लभभाई तिचे अध्यक्ष होते व इलाख्यांतील महाराष्ट्र, कर्नाटक, गुजरात व सिंध या चार प्रांतांतर्फे अनुक्रमें श्री. न. चिं. केळकर, श्री. गंगाधरराव देशपांडे, रा. सा. दादूभाई देसाई M.L.C. आणि श्री. जयरामदास दौलतराम असे उपाध्यक्ष होते. महादेवभाई देसाई हे जनरल सेक्रेटरी असून, श्री. दि. वा. दिवेकर, श्री. चिकोडी व श्री. नारायणदास बेचर हे इतर चिटणीस होते. मुंबई इलाख्यांतील शेतजमिनींचे मालक, वहिवाटदार व शेतकरी यांचे हक्क व हित यांचें रक्षण करण्याचा तिचा उद्देश होता. वसूल खातें, अबकारी खातें, जंगल व पाणीपट्टीखातें यांपासून शेतकऱ्यांस गैरवाजवी उपसर्ग पोंहोचूं नये याविषयीं खबरदारी घेण्यास लीग बांधली होती.

लवकरच लीगनें आपलें काम सुरू केलें व तिला निमित्तही सांगून आलें. कुलाबा जिल्ह्यांतील कर्जत, रोहें व वसई या तीन तालुक्यांत त्याचप्रमाणें नाशिक जिल्ह्यांतील बागलाण तालुक्यांत व सोलापूर जिल्ह्यांतील सांगोले तालुक्यांत नवीन सर्व्हे होऊन सारावाढ झाली. ती अन्याय्य असल्यामुळें शेतकऱ्यांनीं तक्रार सुरू केली व लीगनें तो प्रश्न हातीं घेतला. विशेषतः वसई तालुक्यांत पुष्कळ प्रचार करण्यांत आला. तेथेंच चळवळीचें केन्द्र स्थापलें जाऊन एक परिषद बोलावण्यांत आली. तिचे दा. वि. गोखले अध्यक्ष होते. पण परिषदेंत सात गृहस्थांचें एक शिष्टमंडळ गव्हर्नरकडे पाठविण्याचें ठरलें. त्याप्रमाणें श्री. केळकर यांचे अध्यक्षतेखालीं एक शिष्टमंडळ गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यांचेकडे गेलें. गव्हर्नरनें त्याची भेट घेतली. ही एक अपूर्व गोष्ट झाली. परंतु बार्डोलीच्या यशस्वी चळवळीमुळें सरकारला चांगलाच धडा मिळाला होता. वसईपुरता ७००० रु. सारा कमी करण्यांत आला. पण पुढें दडपशाहीस सुरुवात झाली. महाराष्ट्रांतील शेतकरीवर्ग तालमींत तयार झाला नव्हता. त्यामुळें तत्त्वासाठीं घरादारांवर पाणी सोडण्यास तो कबूल नव्हता. कार्यकर्त्यांनीं तडजोड काढली कीं, एक रुपया बाकी ठेवून बाकीचा सारा भरावा. सरदार वल्लभभाईस ही गोष्ट पसंत पडली नाहीं. ते लढा शेवटपर्यंत लढवावा अशा मताचे होते, पण त्यांचें कोणी ऐकिलें नाहीं. कांहीं लोकांनीं सर्व सारा भरला. कांहींनीं एक रुपया बाकी

ठेवला. त्या रुपयासाठीं सरकारनें शेतकऱ्यांच्या मालकीच्या जास्ती किंमतीच्या वस्तू पैशापासरी विकल्या. तें सहन न होऊन शेतकरी नरम पडले व त्यांनीं कसा तरी सारा भरून टाकला.

बागलाण तालुक्यांतही खूप चळवळ झाली. बार्डोलीनंतर सरकारचें कडवें धोरण थोडें नरमल्यामुळें बागलाणलाही त्याचा फायदा मिळाला आणि सरकारनें बार्डोली व चोरासी तालुके सोडून इतर तालुक्यांतील सारावाढ अमलांत आणिली नाहीं.

परंतु बार्डोली-सत्याग्रहानें ज्या वर्गावर विशेष परिणाम केला तो म्हणजे महाराष्ट्रांतला शेतकरीवर्ग आणि स्वतःस त्याचे कैवारी मानणारे ब्राह्मणेतर पुढारी. २५ जुलै रोजीं मुंबई इलाखा शेतकरी-परिषद पुण्यास भरली. बाबूराव जेधे स्वागताध्यक्ष होते. वि. रा. शिंदे अध्यक्ष होते. संघटनेचें फळ त्यांनीं बार्डोलीस पाहिलेंच होतें. महात्माजींच्या अमोघ शस्त्राचें बळही त्यांना पूर्णपणें कळून चुकलें होतें. जनतेंत जागृति करून तिला पुरुषार्थी बनविणाऱ्या या अहिंसक शस्त्राचा त्यांच्या मनावर फार परिणाम झाला. तेव्हांपासून ब्राह्मणेतरांचें लक्ष काँग्रेसकडे झुकूं लागलें व शेतकरी-परिषदेनंतर लगेच त्यांनीं सायमन कमिशनवर बहिष्कार घालण्यासाठीं दुसरी परिषद भरविली. श्री. चिकोडी हे अध्यक्ष होते. बागडे यांनीं आपल्या भाषणांत "ज्या देशांत जे लोक राहतात त्या देशाचा त्या लोकांनींच राज्यकारभार चालविला पाहिजे" असें सांगून स्वयंनिर्णयाचें तत्त्व ब्राह्मणेतरांनीं मान्य केल्याचें जाहीरपणें दर्शविलें.

ज्या सत्याग्रहाचें शिक्षण देशास देण्यासाठीं महात्माजी अविरत परिश्रम करीत होते त्याचे स्फुल्लिंग अशा रीतीनें देशांत जागोजाग प्रकटूं लागले. जनतेची खात्री होऊं लागली कीं, महात्माजींचा कार्यक्रम सर्वोदयकारी आहे व त्यांत सर्व धर्मांच्या, जातींच्या लोकांस– स्त्रियांस व पुरुषांस स्थान आहे. सायमन कमिशनच्या रूपानें राष्ट्राचा जो अपमान करण्यांत आला होता त्याचा जागोजाग निषेध होऊन परिणामीं जनतेचा देशाभिमान उद्दीपित झाला. बार्डोलीचें यश तर दोन्ही दृष्टींनीं शुभंकर ठरलें. स्थानिक शेतकऱ्यांना न्याय मिळाला आणि राष्ट्राचा स्वतःच्या बलावरील आत्मविश्वास वाढला.

निःशस्त्र प्रतिकारावर आक्षेप घेणाऱ्या अनेकांचे संशय दूर झाले; आणि सत्याग्रहासाठीं वातावरण तयार होऊं लागलें.

१९२८ च्या ऑगस्टांत लखनौला सर्वपक्षीय परिषद भरली. नेहरू कमिटीनें स्वराज्य-प्रकरणीं केलेला रिपोर्ट तिनें मान्य केला. नेहरू-रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावर त्याचा जनतेंत प्रचार करण्यासाठीं केळकर, परांजपे, काका लिमये, पाषाणकर, मीर शकुल्लाह वगैरे विविध राजकीय पंथांच्या प्रतिनिधींनीं महाराष्ट्रांत दौरा काढला. महाराष्ट्रांत जे तुरळक कॉंग्रेसपंथी मुसलमान कार्यकर्ते होते त्यांत मीर शकुल्लाह यांचें फार मोठें स्थान आहे. त्यांचें संक्षिप्त चरित्र येथें देणें गैरवाजवी होणार नाहीं.

मीर शकुल्लाह मीर फर्जेतल्ली हे जळगांवांत गंध्याचा व्यवसाय करीत असत. त्यांचें सुगंधी तेलांचें मोठें दुकान होतें. ते मूळचे नेपाळांतील बस्ती जिल्ह्याचे रहिवासी होते. त्यांचे वडील १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धांत लढले व पुढें दाणादाण होतांच पळून दक्षिणेंत आले. पुढें जळगावांत ते स्थायी झाले. त्यांचें खानदान उमदें होतें. स्वभाव सौम्य होता. ते तुळशीरामायण गात व शेवटपर्यंत नमाज पढत असत. ते १२५ वर्षांचे होऊन वारले. या शुद्ध व सात्त्विक मुसलमानाच्या पोटीं मीर शकुल्लाह यांचा जन्म झाला. मीरसाहेब आजादीचे भोक्ते व हिंदुमुस्लीम ऐक्यावर श्रद्धा ठेवणारे होते. म्हणूनच १९२१ च्या चळवळींत ते प्रविष्ट झाले व मरेपर्यंत त्यांनीं कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं जनसेवा केली. त्या सेवेपायीं त्यांना मोठेंच दिव्य करावें लागलें. त्यांचा व्यापार बसला व हिंदुमुसलमान-तेढ सुरू होतांच त्यांच्या स्वकीयांनीं त्यांचा संबंध सोडला. त्यांना ते 'बाटलेलें' म्हणत. परंतु मीरसाहेब कॉंग्रेसनिष्ठ असले तरी भाविक मुसलमान होते. खिलाफतीच्या चळवळीपासून ते सार्वजनिक कार्यांत पडले तरी त्यांचा राष्ट्राभिमान जाज्वल्य होता. पूर्वखानदेशच्या जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे ते कांहीं वर्षें अध्यक्ष होते. महात्माजींचें नेतृत्व त्यांस पूर्ण मान्य होतें. खादी ते नेहमीं वापरीत. नियमानें सूत कांतीत. महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांपैकीं देवांवर त्यांची विशेष भक्ति होती. हिंदु-मुसलमान ऐक्यासाठीं त्यांनीं महाराष्ट्रांत दोनदां दौरा काढला. त्यांची देशसेवेची तळमळ उथळ नसल्यामुळें त्यांनीं तिच्यासाठीं सर्वस्व दिलें. ते

उत्तम वक्ते होते. त्यांची उर्दू भाषा हिमालयांतून वाहणाऱ्या गंगेच्या प्रवाहाप्रमाणें ओघवती व ऊर्मिला होती. त्या मतभेदाच्या कालांतसुद्धां त्यांचें कधींच कोणाशीं भांडण झालें नाहीं. असो.

अनुभवी राजकारणी पुरुष नेहरू-रिपोर्टाचा प्रचार करीत असतां तिकडे देशांत वादळ उठतच होतें. जवाहरलाल नेहरूंच्या नेतृत्वाखालीं तरुण पिढी संपूर्ण स्वराज्याची मागणी करीत होती. जुने पुढारी वसाहतीच्या स्वराज्यांत संतोष मानूं पाहत होते. महात्माजी तत्त्वतः दोहोंचा समन्वय करूं पाहत होते परंतु तरुणांचा असंतोष वाढत चालला. ऑक्टोबरच्या १२ तारखेस सायमन कमिशन पुण्यास उतरलें तेव्हां पुण्यामुंबईच्या विद्यार्थ्यांनीं प्रचंड हरताळ घडवून आणिला. शनवारवाड्यासमोर १५००० नागरिकांची मोठी सभा भरली. १९२०-२१ चे दिवस पुनः उगवल्याचा भास झाला. नंतर दोन महिन्यांनीं पुण्यास जेव्हां दुसरी मुंबई इलाखा युवक-परिषद भरली तेव्हां पं. जवाहरलाल यांच्या अध्यक्षतेखालीं युवकांनीं संपूर्ण स्वराज्याची घोषणा केली.

युवक-परिषदेच्या स्वराज्याच्या मागणीला दिवसेंदिवस जोर येत चालला. राष्ट्रीय सभेंत श्रीनिवास आयंगार व जवाहरलाल नेहरू यांनीं संपूर्ण स्वराज्याच्या मागणीस उचलून धरिलें व स्वातंत्र्यवादी संघाची स्थापना केली. कलकत्त्याच्या कॉंग्रेसमध्यें ( १९२८ ) स्वातंत्र्याची मागणी मंजूर करण्याचा हट्ट नवयुवकांनीं व त्यांच्या नेत्यांनीं धरिला. परंतु अध्यक्ष मोतीलाल नेहरू आपल्या 'रिपोर्टा'च्या निमित्तानें वसाहतीच्या स्वराज्याशीं बांधलें गेले होते. त्यामुळें सरकारास एक वर्षाची मुदत देऊन वसाहतीच्या स्वराज्याच्या मागणीलाच पाठिंबा द्यावा अशी तडजोड महात्माजींच्या मध्यस्थीनें झाली.

या वर्षीं युवक-चळवळीच्या बरोबरीनेंच कामगारसंघटनेची चळवळ सुरू झाली होती. महाराष्ट्रांत मुंबई व सोलापूर हींच विशेषेंकरून मजुरांचीं केन्द्रें असल्यामुळें तेथेंच संघटनेचें कार्य सुरू झालें. भाई डांगे बंधमुक्त होऊन आले होते. साम्यवादी पक्ष उघडपणें स्थापन झाला होता. त्या पक्षाच्या कार्यकर्त्यांनीं कामगारांचे संघ स्थापले. हे कामगार बहुतेक गिरण्यांतले कामगार होते. मुंबईत जोराचा संपही घडून आला. तिकडे संप सुरू होतांच

इकडे हिंदु-मुसलमानांचा दंगाही झाला. दोन्ही वेळीं युवक-संघानें जनसेवेचें कार्य केलें.

जनतेंत नवचैतन्य जागृत होत होतें. क्रांतिकारकांच्या चळवळीही सुरू झाल्या होत्या. वरिष्ठ कायदेमंडळांत अध्यक्ष पटेल यांनीं एकदोन प्रसंगीं सरकारला पेंचांत पाडून लोकपक्षाची इभ्रत त्याला पटविली होती. अशा समयीं खुद्द महाराष्ट्रांतील प्रतिसहकार पक्षाला मात्र संशय वाटत होता. खुद्द महाराष्ट्रांत तरुण पिढी त्यांच्या हाताबाहेर जात होती. बहुजनसमाज ब्राह्मणेतरांच्या रूपानें कॉंग्रेसवृत्तीशीं एकरूप होऊं पहात होता, तरी या जागृत होऊं पाहणाऱ्या ज्वालामुखीची कल्पना त्या पक्षाला आली नाहीं. खुद्द महाराष्ट्रांत क्रांतिकारक वा साम्यवादी कार्यकर्ते त्या वेळीं नव्हते. तरी सुद्धां सरकार इतकें बिथरलें होतें कीं, मीरत प्रकरणाचे निमित्तानें महाराष्ट्रांत निष्कारण ठिकठिकाणीं झडत्या घेतल्या गेल्या.

दरम्यान देवगिरीकरांनीं रशियाबद्दल एक खास अंक प्रसिद्ध केला. त्या अंकाकरितां त्यांनीं त्या वेळचे रशियन वाङ्मयाचे अभ्यासु स्प्रॅट, डांगे, वगैरे कम्यूनिस्टांच्या ओळखी करून घेतल्या होत्या. त्यांच्या धरपकडींत देवगिरीकरांनाही सरकारी रोषाची झळ लागली व त्यांच्या कचेरीची सुमारें १० तास कसून झडती घेण्यांत आली. पण कम्यूनिस्टांच्या पत्त्यांशिवाय दुसरें कांहींच आक्षेपार्ह सांपडलें नाहीं. देवगिरीकरांचीं गेलीं पांच वर्षें आजाराशीं झगडण्यांत गेलीं होतीं. लेखनाशिवाय त्यांच्यानें विशेष काम करवलें नाहीं.

१९२९ च्या मे महिन्यांत सातवी महाराष्ट्र प्रांतिक परिषद वांद्रे येथें सरदार पटेल यांच्या अध्यक्षतेखालीं भरली. त्यांत अर्थातच प्रतिगामी धोरणाची पीछेहाट होऊन सत्याग्रहाची भूमिका स्वीकारण्यांत आली.

पुढील महिन्यांत इंग्लंडांत मजूर-मंत्रिमंडळ अधिकारारूढ झालें. हिंदी जनमत प्रत्यक्ष चळवळ करण्यासाठीं उद्युक्त होत होतें, वसाहतीच्या स्वराज्याची मागणी सरकारकडून पूर्ण होण्याची आशा दिसेना. कायदेमंडळें तर निरुपयोगी सिद्धच झालीं होतीं. पं. मोतीलाल यांनीं सप्टेंबरच्या प्रारंभीं अलाहाबादच्या ‘लीडर’ला पत्र लिहिलें:—

"हें वर्ष संपण्याच्या आंत जर ( Dominion Status ) वसाहतीचें स्वराज्य मिळेल तर निर्भेळ स्वराज्यवादी देखील तें स्वीकारण्यास तयार होतील; मग इतरांविषयीं तर बोलावयास नको. परंतु **नुसत्या शाब्दिक चळवळीचे दिवस आतां गेले असून, प्रत्यक्ष कृति** (Direct action) **चे दिवस आले आहेत असें कॉंग्रेसचें मत आहे;** व तिनें आपला निश्चित व सुटसुटीत कार्यक्रम आंखला आहे....आटोकाट स्वार्थत्याग केल्याखेरीज ब्रिटिश सरकारकडून कांहीं एक प्राप्त व्हावयाचें नाहीं... स्वातंत्र्याकरितां द्यावी तेवढी किंमत अपुरीच पडणार आहे."

याप्रमाणें स्वराज्यपक्षाच्या अध्वर्यूनें सत्याग्रहाच्या महत्तम शक्तीची कबूली स्वमुखानें दिली. भारतवर्षाचा प्रियदर्शी नेता या वेळीं काय करीत होता ? गेलीं दहा वर्षें त्याला अतिशय चिंतेचीं व मानसिक क्लेशाचीं गेलीं होतीं. संसाराचा त्याग करून दूर जंगलांत तपोवनाचा आश्रय करणारे महात्मे फार सुखी असतात. पण जीवनांतील दोष, उथळपणा व विषमता यांना काढून टाकून तें शुद्ध व समृद्ध बनविण्याचा प्रयत्न करणारा महात्मा किती क्लेश भोगीत असेल ? विशेषतः राजकीय क्षेत्रांत स्थिर राहून आपली आध्यात्मिक विचारसरणी जनतेस पटवून साधूंचें परित्राण, दुष्टांचें दूरीकरण व धर्माची स्थापना हीं कार्यें एकसमयावच्छेदेंकरून करणाऱ्या महाभागाला किती दिव्यांतून जावें लागलें असेल ? त्याच्या 'एका वर्षांतील स्वराज्या'ची शहाण्या लोकांनीं टिंगल केली होती. बार्डोलीच्या 'उलट्या उडी' चा निषेध केला होता. हिंदु-मुसलमान ऐक्याच्या कल्पनेला अव्यवहार्य ठरविलें होतें. चरख्याला तर खेळण्यापेक्षां अधिक महत्त्व देण्यास 'राजकरणी' पुरुष तयार नव्हते. लजपतराय, दास, मालवीय यांच्यासारख्या जुन्या पुढाऱ्यांचा रोष त्यांनीं ओढून घेतला होता. अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीनें सनातनी हिंदूंचा बहिष्कार सहन केला होता. आणि हें सर्व कशासाठीं ? तर स्वतःस जें सत्य दिसतें त्याच्यासाठीं ही सर्व कुर्बानी होती.

परंतु सत्य-अहिंसेची व्यवहारी उपयुक्तता उमलणाऱ्या फुलाच्या पाकळ्यां-प्रमाणें जगाच्या नजरेसमोर विकसित होत होती. तर्ककर्कश वादविवादानें ज्यांची योग्यता पटली नव्हती तीं तत्त्वें व्यवहारांत उतरतांच राजकीय,

सामाजिक व आर्थिक क्षेत्रांतून चमत्कार घडवून आणूं लागलीं आणि जो परदेशी प्रचार खर्चीळ म्हणून महात्माजींनीं बंद करविला होता तो कमलभृंग-न्यायानें आपोआपच होऊं लागला. बार्डोलीच्या धवल यशाचा परिमळ दिगंतरीं पोंचला व लोकशक्तीनें परकीय जिज्ञासूंना कुतूहलप्रेरित होऊन भारतभूमींत खेंचून आणिलें.

साम्यवादी प्रचारकांना सत्याग्रहाचें तत्त्व मान्य नव्हतें. त्यांची निष्ठा कॉंग्रेसशीं नव्हती, थर्ड इंटरनॅशनलशीं बांधली होती. परंतु सरकारनें त्यांना फार काळ वावरूं दिलें नाहीं. १९२९ मध्यें ३२ साम्यवादी 'मिरत खटल्यांत' गोंवले गेले होते. त्यांपैकीं डांगे, निमकर, जोगळेकर, मिरजकर, घाटे, आळवे, कासले, ठेंगडी, देसाई, अधिकारी वगैरे बरेच महाराष्ट्रीय होते. पुढें त्यांच्या निमित्तानें आलेल्या 'बोल्शे-बिलास' कायदेमंडळासमोर रुजू करण्यास ना. पटेलांनीं मंजुरी न दिल्यामुळें त्यांच्या अध्यक्षीय अधिकारांचें नियंत्रण विलायत सरकारनें केलें. कायदेमंडळाची किंमत दिवसेंदिवस त्याच्या पुरस्कर्त्यांच्या लक्षांत अधिकाधिक येऊं लागली. दडपशाही वाढत चालली होती. बंगालमध्यें कहर चालला होता. दडपशाहीचा एक बळी जतीन दास यानें राजकीय कैद्यांचा स्वतंत्र वर्ग करण्यांत यावा यासाठीं अनशन करून आपलें बलिदान दिलें. त्याच महिन्याच्या म्हणजे सप्टेंबरच्या २७ तारखेस शिवरामपंत परांजपे मधुमेहाच्या आजारानें वारले. त्यामुळें महाराष्ट्रांतील असहकार-पक्षाचा जुना पुढारी नाहींसा झाला.

'बोल्शे-बिलाच्या' निमित्तानें 'नवाकाळ' पत्रांत आलेल्या लेखाबद्दल त्याचे वृद्ध व माननीय संपादक श्री. कृ. प्र. खाडिलकर यांवर सरकारनें खटला केला व त्यांस एक वर्षाची सजा दिली. त्यामुळें खाडिलकरांविषयीं देशाचा मान अधिकच वाढला. टिळकांचे शिष्य म्हणून त्यांची प्रतिष्ठा पूर्वी होतीच. त्यांच्या स्वतंत्र कर्तबगारीनें व साहित्यसेवेनें त्यांनीं महाराष्ट्राच्या हृदयांत कायमचें स्थान मिळविलें होतें. टिळकांच्या मृत्यूनंतरही त्यांनीं देशसेवेचें व क्रान्तिवादी विचारसरणीचा प्रचार करण्याचें व्रत कायम ठेविलें होतें. कॉंग्रेसशीं त्यांची निष्ठा अखंड चालू राहिली व महाराष्ट्रांतील महात्माजींच्या अनुयायांना त्यांचेकडून नित्य मदत मिळत गेली.

ऑक्टोबर महिन्याच्या चौथ्या तारखेस देव व हरोलीकर तुरुंगांतून सुटले. तुरुंगांत असतांना देवांची वृत्ति आध्यात्मिक बनत चालली होती. त्यांनीं गीता, उपनिषदें, शांकरभाष्य व ज्ञानेश्वरीचा अभ्यास पुष्कळच चालविला होता. त्यांची दुय्यम भाषा फ्रेंच असल्यामुळें त्यांना संस्कृतचा परिचय नव्हता, तो त्यांनीं तुरुंगांत करून घेतला. हरोलीकरांनीं त्यांस संस्कृत शिकविलें. देवांनीं गीताभाष्य संपूर्ण वाचलें व गीतेवरील इतर पुष्कळ पुस्तकेंही वाचलीं. त्या भांडवलावर त्यांनीं तुरुंगांतच गीतेवर एक ग्रंथ लिहिला. ज्ञानेश्वरीबद्दल त्यांची भक्ति इतकी उत्कट झाली होती कीं, तुरुगांतून सुटल्याबरोबर ते पायीं चालत आळंदीस गेले. देव तुरुंगांत गेल्यावर परिस्थितींत खूप स्थित्यंतरें झालीं होतीं. जनमनाचें आकर्षण करणाऱ्या अनेकविध गोष्टी नित्य घडत होत्या. त्यामुळें त्यांच्या सुटकेनें महाराष्ट्रांत एक अपूर्व गोष्ट घडल्याचें लोकांना वाटलें नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांचें अभिनंदन करण्यासाठीं सभा भरविण्याचें जाहीर झालें; पण सभेस फारशी मंडळी जमली नाहींत. श्री. केळकर या सभेस मुद्दाम हजर होते. दोघांची मिरवणूक काढण्याचें ठरविलें होतें. पण परांजप्यांच्या मृत्यूमुळें त्या दोघांना मिरवणुकींत मिरविणें योग्य वाटलें नाहीं. सभेला येण्याचेंही त्यांनीं नाइलाजानेंच कबूल केलें होतें. पुढें कांहीं दिवसांनीं श्री. ज. स. करंदीकर यांचे अध्यक्षतेखालीं टिळक-स्मारक मंदिरांत सभा भरवून देवांनीं गीतेवर मौलिक विचारांनीं परिप्लुत असें एक व्याख्यान दिलें.

लवकरच पर्वती-सत्याग्रह सुरू झाला. पर्वतीच्या देवळांत अस्पृश्यांना मज्जाव आहे तो काढून टाकण्यासाठीं चळवळ करण्याचें ठरलें व चळवळीचें पर्यवसान मंदिरांत प्रवेश करण्याचा प्रयत्न करण्यांत झालें. या लोकांचे नेते गाडगीळ, भुस्कुटे व जेधे होते. राजभोज, कांबळे वगैरे त्यांचे साथी होते. अस्पृश्यांना स्पृश्यांनींही सहयोग दिला. परिणामीं प्रवेश करूं इच्छिणाऱ्यांना मार पडला. केळकरांनीं दोन्ही पक्षांना दोष दिला. तरीसुद्धां ते, भोपटकर, माटे वगैरे मंडळींनीं मध्यस्थी करून ट्रस्टी व चळवळ्ये यांत तडजोड घडवून आणण्याचा प्रयत्न केला. महात्माजींनीं १९२८ सालीं अस्पृश्यतानिवारण कमिटी स्थापिली होती. जमनालालजी तिचे अध्यक्ष होते. जमनालालजींनीं स्वामी आनंद यांस पाठवून

पंधरा दिवसांपुरता सत्याग्रह बंद ठेवण्यास सांगितलें. नंतर ते स्वतः, आचार्य कालेलकर वगैरे मंडळी पुण्यास आली व वाटाघाटी सुरू झाल्या. निष्पन्न एवढेंच झालें कीं, 'नवे हक्क निर्माण करणें वा नवी वहिवाट पाडणें आमच्या अधिकारांत नाहीं. सध्यांच्या वहिवाटीला आम्ही चिकटून राहणार," असें विश्वस्तांनीं सांगितलें. या प्रकरणामुळें जनतेचा सुधारकांवरील विश्वास उडाला.

पुढें १ नोव्हेंबर रोजीं व्हाइसरॉय लॉर्ड अर्विन यांनीं १९१९ च्या सुधारणांचें अंतिम पर्यवसान वसाहतीच्या स्वराज्यांत होईल अशा अर्थाचा जो जाहीरनामा काढला त्याला प्रागतिक पुढाऱ्यांनीं पाठिंबा दिला. विशेषतः गोलमेज परिषद भरविण्याचें जें आश्वासन त्यांत होतें त्यानें त्यांचें समाधान झालें. आश्चर्याची गोष्ट ही कीं, जयकरांनीं त्या पत्रकास मान्यता दिली ! अण्यांनीं विरोध केला, केळकरांनीं जयकरांना पाठिंबा दिला आणि राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनीं अविश्वास व असहकारी धोरण जाहीर केलें. पुढें व्हाइसरॉयना भेटण्यास महात्मा गांधी, मोतीलालजी, जिना वगैरे पुढारी गेले असतां त्यांची खात्री झाली कीं, हें सारें पोकळ आश्वासन आहे. तरी सुद्धां केसरींत "व्हाइसरॉयशीं झालेली मुलाखत फुकट गेली" याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करण्यांत आलीच.

या समयीं महाराष्ट्र प्रांतिकचे अध्यक्ष भोपटकर होते. देशांत होमकुंड पेटविण्याची तयारी चालू असतांना प्रतिसहकार पक्ष अजून थंडच होता. प्रांतिकची घसरगुंडी झाली होती. असहकारपक्षाचे वेळीं प्रांतिकवर निवडले गेलेले सभासद ४२५ होते; तर प्रतियोगी सहकारपक्षाच्या ताब्यांत कमिटी असतांना २९५ सभासद निवडले गेले. १३७ लोकांनीं वर्गणीच दिली नाहीं. महाराष्ट्रांतील असहकारितावादी पक्षाची इभ्रत या समयीं वाढली होती. त्यांची संघटनाही पूर्वीपेक्षां विशेष होती. नव्या आंदोलनाची पूर्वतयारी ते करीत होते. सारा देश ऊर्ध्वबाहु होत असतां, महाराष्ट्रच शिळोप्याच्या गोष्टी बोलत आहे ही गोष्ट त्यांना लाजिरवाणी वाटत होती. अजून प्रांतानें कौल दिला नव्हता. त्यांचा नेता अजून सिद्ध झाला नव्हता. प्रतिसहकारपक्ष या पक्षांतील विधायक कार्यक्रम करणाऱ्या सेवकांना 'गांधींचे पगारी नोकर' म्हणून तुच्छतेनें हिणवीत होता. महात्माजीही महाराष्ट्रांत केळकरांचेंच पुढारीपण

मानीत होते. अशा परिस्थितींत या कार्यकर्त्यांची कुचंबणा होत असल्यास आश्चर्य तें काय ?

२२ नोव्हेंबर रोजीं या असहकारितावादी लोकांनीं एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. गेल्या नऊ वर्षांतील महाराष्ट्रीय राजकारणाचें सिंहावलोकन त्यांत केलें होतें. २४ तारखेस प्रांतिकची बैठक भरणार होती तींत किंवा अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीच्या निवडणुकींत भाग घ्यावयाचा नाहीं असें या पक्षानें ठरविलें. देवांना मात्र फेरवाल्यांनीं प्रतिनिधि म्हणून घेतलें.

क्षुद्र मानवानें कितीही हेका धरिला तरी काळ त्याच्या डोक्यावरून जाणारच. डिसेंबरअखेरीस लाहोर येथें पं. जवाहरलालजींच्या अध्यक्षतेखालीं कॉंग्रेस भरली व तिनें स्वातंत्र्याची घोषणा केली. महात्माजींच्या अंगांत दिव्य तेज स्फुरलें होतें. त्यांच्या प्रत्येक शब्दाला मानधन तरुण व वृद्ध शिर नमवीत होते. पण केळकरांनीं त्वेषानें उद्गार काढले, " मीही महात्मा गांधींना सांगतों कीं, तुमचे महात्मावळणाचे ठराव आम्हांला नकोत. तुम्ही आम्हांला पोरें समजतां काय ? महात्माजींच्या या ठरावाबद्दल तीन शब्दांत सांगावयाचें म्हणजे तो Party Vendetta, Political Wisdom आणि Mental Perversity चें चांगलें उदाहरण आहे."

१५०० विरुद्ध १०१२ मतांनीं ठराव पास झाला.

पुण्यांत प्रतियोगी सहकारपक्षांत हाहाःकार वर्तला !

पण राष्ट्राचें हृदय नवोल्लासानें नाचूं लागलें !!

पुन्हा एकदां साबरमतीचा वृद्ध तपस्वी राष्ट्राच्या शिरोभागीं बसला ! येत्या राष्ट्रव्यापी आंदोलनाचीं सर्व सूत्रें देशानें एकमतानें महात्माजींच्या हातीं दिलीं. राष्ट्र वेडें बनलें होतें. शहाण्यांची शिकवण ऐकायला तें तयार होईल तर ना ?

# खंड दुसरा

# आं
# दो
# ल
# न

" महाराष्ट्रांतील तरुणांच्या बुद्धीला कायदेभंगाची मोहीम पटली असून त्यांची तिला मान्यता आहे. ते त्या कार्यांत सामील होण्यास सज्ज आहेत. त्यांच्या मनामध्यें कोणतीही शंका अथवा अप्रीति नाहीं. त्यांच्यामध्यें क्षणभंगुर उतावळेपणा नाहीं, हें चांगलें चिह्न आहे. ते पुढाऱ्याची वाट पाहत आहेत. आणि पुढारी लाभल्यास त्यांच्या अंतःकरणांतील देशभक्ति मूर्तस्वरूपानें तावडतोब प्रकट होईल. जरूर आहे ती केवळ ठिणगीचीच होय."

—राजगोपालाचार्य.

# १ महाराष्ट्र जागा झाला !

सर्व राष्ट्रानें एकमुखानें महात्माजींचा जयजयकार केला व लाहोरच्या ठरावाचा पुरस्कार केला; तथापि महाराष्ट्र प्रांतिकचें प्रतिगामी धोरण चालूच राहिलें. स्वराज्यकामनेनें प्रेरित होऊन काँग्रेसनें संकल्प केला. तो संकल्प पार पाडण्यासाठीं आतां बलिदानपूर्वक तपाचरण करण्याचा समय आला होता. ध्येयनिष्ठ माणसें होमकुंडांत उडी घेण्यास उद्युक्त झालीं होतीं; तर व्यवहारी माणसें सावधपणें चर्चा करीतच होतीं.

" स्वातंत्र्याचा ठराव पास झाल्यानें नोकरशाहीनें देऊं केलेल्या स्वराज्याची देणगी न स्वीकारतां आपण आपल्या सामर्थ्याच्या जोरावर स्वराज्य मिळवूं अशी काँग्रेसनें प्रतिज्ञा केल्याप्रमाणें होणार आहे. परंतु ही प्रतिज्ञा पार पाडण्याइतकें काँग्रेसचें सामर्थ्य आहे काय? आणि आज जर तें नसेल तर तें लवकरच संपादन करण्याइतका काँग्रेसचा निश्चय अढळ आहे काय, हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. पण त्याहून अधिक महत्त्वाचा प्रश्न असा कीं, राष्ट्रीय सभा नुसतें स्वातंत्र्याचें ध्येय जाहीर करून बसणार, का त्याबरोबरच कायदे-कौन्सिलें, शाळा, कोर्टें वगैरेवरही बहिष्कार घालणार ? आणि असा बहिष्कार काँग्रेसनें घातल्यास त्यास राष्ट्रांतून कितपत पाठिंबा मिळणार ? मुस्लीम लीग, हिंदुमहासभा, शीख लीग इत्यादि संस्था हा बहिष्कार पाळतील असें दिसत नाहीं. अशा परिस्थितींत काँग्रेसचें हें तारूं कोठवर वाहवत जाणार व त्याचा परिणाम काय होणार, याचा विचार काँग्रेसचे ठराव जाहीर झाल्यावरच करणें बरें ! "

अशा प्रकारें तर्कवाद लाहोर काँग्रेसपूर्वीच केसरींत चालला होता. काँग्रेस संपल्यावर " कलकत्त्यास ठरलें होतें काय ? व लाहोरास झालें काय ? " असा आर्तनाद करून " अशा रीतीनें केवळ गांधीजींच्या मुर्वतीस्तव पास झालेल्या ठरावांचा भावी राजकारणावर काय परिणाम होणार हा तर मोठाच प्रश्न आहे," असे उद्गार केसरीनें काढिले. लाहोर-काँग्रेसनें कौन्सिल-बहिष्कार पुन्हा एकदां फर्मावला त्याचेंच वैषम्य प्रतिसहकारपक्षास विशेष वाटलें. सर्व

एकनिष्ठ सभासदांनीं कौन्सिल व असेंब्लीचे राजीनामे दिले. जमनादास मेहता यांनींही राजीनामा दिला. जयकरांनीं पत्रक काढून जाहीर केलें; " गांधी-नेहरूंचें करणें जरी तर्कशुद्ध असलें तरी बरोबर नाहीं. प्रतिसहकार पक्षाचे पुढारी व ना. पटेल ही मंडळी कॉंग्रेसच्या प्रतिज्ञापत्रकावर सही करून निवडून आली नसल्यामुळें त्यांनीं राजीनामे देऊं नयेत." डॉ. देशमुखांनीं तर कॉंग्रेस आमदारांनींही राजीनामे देऊं नयेत असें मत जाहीर केलें.

महाराष्ट्र, भाला, प्रगति, प्रभात, परीक्षक, वृत्तसार, ऐक्य, कर्मयोगी, कुलाबा-समाचार, प्रताप, सुदर्शन, प्रबोध, उदय, प्रतियोगी, मौज, लोकशिक्षण ( हैदराबाद ), ह्या सर्व महाराष्ट्रीय वृत्तपत्रांनीं लाहोरच्या ठरावाविरुद्ध लेख लिहिले.

जानेवारीच्या १२ तारखेस महाराष्ट्र प्रांतिकची तांतडीची सभा भरली. केळकरांनीं ठराव पुढें आणून लाहोर येथील स्वातंत्र्याच्या ठरावावर बोळा फिरविण्याचा प्रयत्न केला. " स्वातंत्र्याचा ठराव अमान्य, गोलमेज-बहिष्कार अमान्य आणि कौन्सिलबहिष्कार अमान्य " अशा अर्थाचा तो ठराव होता. डॉ. सावरकरांनीं स्वातंत्र्याच्या ठरावाला मान्यता न देण्यानें महाराष्ट्राचें हंसें होईल असा इशारा दिला तेव्हां तेवढें कलम मागें घेण्यांत आलें. बैठकीस हजर असलेल्या असहकारितावाद्यांनीं केळकरांचीं दुसरीं कलमेंही घातक असल्याचें सांगितलें व लाहोरच्या ठरावास पुष्टि देण्याचा आग्रह केला; पण तो फुकट जाऊन फेरवाल्यांच्या मताधिक्यानें पुढील ठराव पास झालाः—

" राष्ट्रीय सभेच्या प्रतिज्ञापत्रिकेंतील 'स्वराज्य' या शब्दाचा 'स्वातंत्र्य' असा अर्थ करण्यांत आला आहे तो या कमिटीस मान्य आहे. तथापि दिल्लीच्या जाहीर पत्रकांतील अटींवर राउंड टेबल कॉन्फरन्समध्यें भाग घेणें राष्ट्राच्या हिताचें आहे असेंच कमिटीचें विचारपूर्वक मत झालें आहे. तसेंच ही कमिटी असें जाहीर करीत आहे कीं, कौन्सिलबहिष्कार हा ऐक्यास पोषक होणार नाहीं व राष्ट्रीय सभेच्या कार्यकर्त्यांमध्यें तेढ उत्पन्न करील म्हणून वर्किंग कमिटीनें या बहिष्कारावर भर देऊं नये."

हा लज्जास्पद ठराव पास होतांच देवप्रभृति असहकारितावादी सभेंतून उठून गेले. पुढें तो प्रसिद्ध होतांच प्रांतभर असहकारवादी महाराष्ट्रीय

कार्यकर्त्यांत खळबळ उडाली. त्यांनीं पाहिलें कीं, महाराष्ट्र प्रांतिकचें अधः-पतन झालें आहे. सारा देश समर्थपणाच्या आत्मविश्वासानें स्वातंत्र्याभिमुख झाला असतां, महाराष्ट्राचे पुढारी (!) मात्र दुर्बळांचें राजकारण करूं इच्छीत आहेत व त्यांत प्रांताची नाचक्की होत आहे. प्रवर्तमान नवसंदेशाचा जर प्रांतभर योग्य प्रचार झाला नाहीं, तर हें राजकीय दैन्य प्रांताला तसेंच चिकटून राहील अशी भीति त्यांस वाटली. लगेच १४ तारखेस देव, जावडेकर, भुस्कुटे वगैरेंच्या सह्यांचें एक जाहीर पत्रक प्रसिद्ध झालें. पत्रकांत प्रांतिकच्या ठरावाचा त्यांनीं निषेध केला होता. प्रांतिक कमिटी ही अखिल भारतीय कमिटीच्या हाताखालील असल्यामुळें, वरिष्ठ सभेनें मंजूर केलेला ठराव प्रांतिकला बंधनकारक होता. वरिष्ठ सेक्रेटरीनें पत्रक काढून सर्व प्रांतीय कमिट्यांना आपापल्या सभासदांकडून नव्या क्रीडवर सही करवून घेण्यास आज्ञा केली होती. त्याप्रमाणें सही केल्याशिवाय सभेचें काम कायदेशीर रीत्या चालूं शकत नव्हतें असें देवांचें म्हणणें पडलें.

महाराष्ट्रांत सामान्य जनतेंत औत्सुक्य निर्माण झालें होतें. प्रत्यक्ष क्रिया आतां लवकरच सुरू होणार होती व कायदेमंडळाच्या राजीनाम्याबरोबर सुरू झालीच होती. पण या नव्या चळवळीची प्रांतीय जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेऊन प्रांतास मार्गदर्शन करणारा, सैनिक उभारणारा, त्यांना संघटित-पणें कामास लावणारा नेता कोण तेंच निश्चित झालें नव्हतें. केळकरांचें नेतृत्व अशक्य होतें. कारण नवीन धोरण त्यांस मान्य नव्हतें. प्रांतिकचे अध्यक्ष भोपटकर यांनीं जानेवारीच्या 'रत्नाकर'च्या अंकांत लेख लिहून गोलमेज परिषदेवर काँग्रेसनें घातलेल्या बहिष्काराबद्दल आपली नापसंती व्यक्त केली:—

" हा बहिष्कार पुकारणाऱ्या लोकांचा मुख्य ...... समाधानकारक असा नाहीं.... एकांड्या शिलेदाराप्रमाणें आपलेंच घोडें पुढें दामटण्यांत क्षणभर देखावा झाला तरी त्यामुळें कोणतीच कार्यसिद्धि होणार नाहीं; त्यापेक्षां सायमन कमिशनवरील बहिष्काराच्या बाबतींत सर्व पक्षांचें मतैक्य झाल्यामुळें तो ज्या यशस्वीपणें पार पडला व त्याचा विलक्षण परिणाम ब्रिटिश जनतेवर झाला, त्याप्रमाणेंच मतैक्य होण्यासारखीच कार्ययोजना करण्यांत राष्ट्रीय सभेनें पुढाकार घ्यावा. परिषदेवर बहिष्कार घालणें म्हणजे राष्ट्रीय सभेनें

स्वतःवरच बहिष्कार घालण्यासारखें होईल; इतकेंच नव्हे तर अराष्ट्रीय लोकांना सर्व मैदान मोकळें सोडल्यासारखें होईल व शेवटीं देशाचा घातही होईल. हा युक्तिवाद सर्वस्वीं निर्दोष होता. परंतु दुर्दैवानें तो महात्माजींना पसंत पडला नाहीं व त्यांना पसंत पडला नाहीं म्हणून राष्ट्रीय सभेलाही पसंत पडला नाहीं. अशा प्रकारें राष्ट्रीय सभेनें हातची एक सुसंधि गमावली असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं ! या व कायदेमंडळावरील बहिष्कारानें जर कांहीं केलें असेल तर राष्ट्रीय सभेंत दुफळी निर्माण केली आहे."

ता. २९ जानेवारी रोजीं पुणें येथें शिवाजीमंदिरांत भरलेल्या जाहीर-सभेचे अध्यक्ष म्हणून भोपटकर म्हणाले, "**राष्ट्रीय सभेनें राउण्डटेबल कॉन्फरन्समध्यें बिलकुल भाग न घेण्याचा ठराव पास केला आहे तो अगदीं बरोबर आहे.** तेथें कोणत्याही गोष्टीचा निश्चय व्हावयाचा नाहीं. नुसता वादविवाद करायला सर चिमणलाल गेले काय, तेजबहादुर सप्रू गेले काय आणि पं. मोतीलाल गेले काय, सारखेंच आहे."

अवघ्या एक महिन्यांत परस्परविरोधी विधानें करण्यास भोपटकरांना कारण काय झालें तें त्यांचें त्यांनाच माहीत. २६ जानेवारीच्या पहिल्या स्वातंत्र्य-दिनाच्या प्रचंड कार्यक्रमांत जनताजनार्दनाच्या विराट् रूपाचें जें दर्शन झालें व राष्ट्राचा निश्चय अमित शक्तीनें प्रकट झाला त्याच्या तेजानें दिपून त्यांचे विचार बदलले असण्याचा संभव आहे.

परंतु अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीच्या चिटणिसांकडून लवकरच आज्ञापत्र आलें. महाराष्ट्र प्रांतिकच्या अधिकाऱ्यांनीं कॉंग्रेसच्या ठरावाचा स्वीकार न केल्यास त्यांनीं राजीनामा द्यावा अशी आज्ञा होती. यांची प्रथम बंड करण्याची इच्छा होती; पण समाजांत गवगवा फार झाला, भालाकारांनीं मिरासदारीबद्दल कडक टीका केली, तेव्हां कार्यकारी मंडळानें राजीनामा दिला. त्यामुळें कांहीं दिवस महाराष्ट्र प्रांतिक कमिटी कार्यकारी मंडळाशिवाय राहिली.

तिकडे देवांना महाराष्ट्राची संघटना करण्याची अतिशय तळमळ लागली होती. या अपूर्व युद्धाच्या नुसत्या संदेशानेंच साऱ्या देशाला स्फूर्ति दिली असतां, सारे प्रांत आपापल्या क्षेत्रांत सत्याग्रहाची तयारी करीत असतां

महाराष्ट्रच मागें पडून दैन्यवाणा दिसावा याचें त्यांस अपरिमित दुःख होत होतें. प्रांतिकपासून तर आशाच नव्हती. प्रांतांत पुढाकार घेण्यास दुसरी व्यक्ति पुढें आली नाहीं. कोणास कल्पनाही सुचत नव्हती, सुचत असल्यास कोणी अमलांत आणीत नव्हतें. देवांनीं पत्रव्यवहार करून निरनिराळ्या जिल्ह्यांतून २०-२५ निवडक मंडळी पुणें येथें बोलाविली व २ फेब्रुवारी १९३० रोजीं महाराष्ट्र कॉंग्रेसपक्षाची स्थापना केली. त्या पक्षाचा उद्देश “ २६ तारखेच्या पूर्ण स्वराज्याच्या जाहीरनाम्यांतील ध्येय व धोरण यांचा पुरस्कार करणें व त्या ध्येयाच्या धोरणाची व वेळोवेळीं होणाऱ्या राष्ट्रीय सभेच्या ठरावांची अंमलबजावणी करणें ” हा होता. या पक्षाच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष देव हे निवडले गेले. इतर सभासद उपनगरचे गोकुळभाई भट, दास्ताने, ठकार, नगर जिल्ह्याचे रामकृष्णमहाराज, सोलापूरचे जाजू, विष्णुपंत आपटे, डॉ. आठल्ये हे असून हरिभाऊ तुळपुळे हे खजिनदार होते.

पक्षाला आशा वाटत होती कीं, प्रांतिकच्या कार्यकारी मंडळानें राजीनामे दिल्यामुळें प्रांतिक उघडीच पडली होती. तेव्हां तिचें चालकत्व आपण वर्किंग कमिटीच्या ठरावाशीं एकनिष्ठ असल्यामुळें आपणांकडे येण्याचा संभव आहे. तसें चालकत्व मिळल्यास तें घ्यावें असा महाराष्ट्र कॉंग्रेस पक्षाचा अभिप्राय होता.

परंतु प्रांतिकचें कार्यकारी मंडळ इतकें उदार नव्हतें. राजीनामे दिले तरी पुन्हा उभें राहण्याचे त्यानें ठरविलें. त्या वेळीं प्रांतिकमध्यें तीन पक्ष होते. (१) राजीनामे देणाऱ्यांचा, (२) मंडलिकांचा, (३) सातारकरांचा. पहिला पक्ष वर्किंग कमिटीची आज्ञा पाळण्याविरुद्ध होता. मंडलिकांना त्या वेळपर्यंत आज्ञा पाळण्याचीच आवश्यकता वाटत नव्हती. सातारकरांना दोन्ही विचारसरणी मान्य नव्हत्या. आपलीं मतें एकदां मांडल्यावर व पुन्हा वेळ येईल तेव्हां तीं मांडण्याचा अधिकार राखून कॉंग्रेस ठरावांची अंमलबजावणी करावी अशा मताची ती मंडळी होती. मंडलिकपक्षाला कोणी विचारींत नव्हतें. पण एकंदरींत प्रांतिकमध्यें कौन्सिलवादी पक्षाचें बहुमत होतें.

युद्धाची दुंदुभि वाजूं लागली तरी प्रांतिकची कांहींच हालचाल दिसेना. शिवाजीमहाराजांच्या इतिहासाचे धडे बाळपणापासून गिरवलेल्या महाराष्ट्राला स्वातंत्र्यवादाचें वावडें होतें काय ? महाराष्ट्रधर्माची शिकवण देणाऱ्या व

तत्प्रीत्यर्थ जबरदस्त संघटना करणाऱ्या रामदासस्वामींचे तेजस्वी अनुयायी कोठें होते ! हिंदभूच्या इतर प्रांतांतील लोकांचेच महाराष्ट्रीय हे संस्कृतिबांधव नव्हते काय ? आपापल्या प्रांतांतून अन्य लोक कलहमुक्त व लोभमुक्त होऊन, आपसांतील भेद मिटवून, विशुद्ध अंतःकरणानें देशाची सर्वोत्कृष्ट सेवा करण्यास तयार होत होते. आणि महाराष्ट्र— गांधी-युगाला सतत दहा वर्षे विरोध करणारा महाराष्ट्र— "राजकारण हा लौकिक अभ्युदय इच्छिणाऱ्या लोकांचा खेळ आहे" असें म्हणणाऱ्या लोकमान्यांचा महाराष्ट्र अजून कर्तव्याकर्तव्यतेच्या भ्रमांत पडला होता ! देवांच्या मनाला वेदना होऊं लागल्या. प्रांतिकला हलवूनही कांहीं परिणाम होईना. अधिकारी आपल्याच धुंदींत होते. "काँग्रेसचें ध्येय मान्य, गोलमेज परिषद-बहिष्कार देखील मान्य, पण कौन्सिल-बहिष्कार साफ अमान्य" या अटीवर तडजोड करण्यास ते राजी होते. पण अशी व्यभिचारी मान्यता कोणता स्वाभिमानी शिस्तप्रिय पक्ष मान्य करील ?

देवांनीं पाहिलें कीं प्रांतिकच्या नादीं लागणें व्यर्थ आहे. मध्यप्रांतांत देखील काँग्रेस आमदारांनीं कायदेमंडळाचे राजीनामे दिले. अण्यांच्या हृदयांतील स्वातंत्र्याच्या ज्वालेनें पेट घेतला. साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमांत वर्किंग कमिटीनें महात्मा गांधींना सेनानीचे अधिकार अर्पण केले ! स्वतंत्रतादेवी बलिदान मागत होती. तिच्या वेदीवर आपलें शिरकमल अर्पण करण्यासाठीं पुढें जाणाऱ्या तरुणांची अहमहमिका इतर प्रांतांतून सुरू झाली होती. महाराष्ट्र मागें पडणार काय ?

देव खऱ्या महाराष्ट्राच्या भेटीस निघाले. तो महाराष्ट्र पुण्यांत नव्हता, गायकवाडवाड्यांत नव्हता, संपादकाच्या खुर्चीवर नव्हता. तो शेतांतून, रानांवनांतून खपत, निढळाचा घाम काढीत, रस्त्यांवर, उन्हातान्हांतून राबत होता; ईश्वरावर श्रद्धा ठेवणारा, प्राणिमात्रावर दया करणारा, सरळ, संतोषवृत्ति असा हा प्रजेचा पालक दुसऱ्यांना गुलाम बनविण्याची इच्छा नसतांना देखील स्वतः दास्यपंकांत रुतून रक्ताचें पाणी करीत होता. देशांतील अन्यायाला विरोध करण्याचें सामर्थ्य त्याच्यांतच होतें. कारण तोच समाजाची अधिकांत अधिक सेवा करीत होता ना ?

फेब्रुवारीच्या २० तारखेस देव, वासुकाका, राजगोपाळाचार्य व गंगाधरराव

देशपांडे महाराष्ट्राच्या दौऱ्यास निघाले. महाराष्ट्राचें हृदय ते शोधूं लागले. जेव्हां समाजाचे 'धुरीण' स्वार्थपरायण व विवेकभ्रष्ट बनले होते, प्रांतीय राजकारण समाजपीडक बनलें होतें व सत्याग्रहाच्या मोहिमेसाठीं प्रजेची संघटना करण्यास कोणी अग्रेसर होत नव्हतें, तेव्हां अंतःप्रेरणेनें जनमताचा कौल घेण्यासाठीं उत्कंठित हृदयानें देव निघाले. महाराष्ट्राच्या प्रकृतीचें तें संशोधनच नव्हतें काय ?

पण महाराष्ट्र जागा झाला होता. आजारांतून उठल्यावर मनुष्याचे हातपाय स्वाभाविकपणेंच काम करूं लागतात. महाराष्ट्राची तेजस्वी प्रकृति बंडाला उत्सुक होऊन उसळून वर येत होती. महात्माजींनीं महोदधीचें महामंथन सुरू केलें होतें. त्या महाप्रसंगानें मातींतून माणसें निर्माण झालीं. महाराष्ट्रांतील हिरव्या पाल्याच्या नसानसांतून जीवनरस भरपूर वाहत होता.

राजाजी प्रसन्न झाले. "महाराष्ट्रांतील तरुणांच्या बुद्धीला कायदेभंगाची मोहीम पटली असून त्यांची तिला मान्यता आहे" त्यांनीं उद्गार काढले, "ते पुढाऱ्याची वाट पाहत आहेत."

दौरा संपल्यावर देवांनीं २-३-३० रोजीं पत्रक काढिलें:— "...बरोबर एक महिन्यापूर्वीं याच तारखेला महाराष्ट्रांत राष्ट्रीय सभेच्या कार्याचा प्रसार करण्यासाठीं व या स्वातंत्र्याचे लढ्यांत महाराष्ट्राच्या उज्ज्वल पूर्वपरंपरेला साजेल असा भाग उचलण्याला महाराष्ट्राला जागृत करण्यासाठीं महाराष्ट्र कॉंग्रेस पक्षाची स्थापना झाली हाही परमेश्वरी योगच होय. महात्मा गांधी जी स्वातंत्र्याची लढाई सुरू करणार त्यांत महाराष्ट्रातर्फे १०० सैनिक देण्याचा निश्चय महाराष्ट्र कॉंग्रेस पक्षानें त्या वेळेस जाहीर केला आहे. ज्या शक्तीनें, त्यागवृत्तीनें व स्वातंत्र्यप्रेमानें महाराष्ट्रानें पूर्वी स्वातंत्र्यासाठीं दैवी बलिदान केलें आहे ती शक्ति, ती त्यागवृत्ति व तें स्वातंत्र्यप्रेम महाराष्ट्रांत आजही जिवंत आहे असें या स्वातंत्र्याच्या लढ्यांत महाराष्ट्र जगाला सिद्ध करून देईल अशी माझी खात्री आहे. महाराष्ट्रांतील ही शक्ति, त्यागवृत्ति व स्वातंत्र्यप्रेम संघटित करून त्याचा देशाच्या स्वातंत्र्याला उपयोग करून देणें हीच महाराष्ट्र कॉंग्रेस पक्षाची महाराष्ट्राची व देशाची सेवा आहे."

---

## २ शूर संग्रामको देख भागे नहीं ।

देवांच्या पत्रकानंतर पुण्यांत कायदेभंगासाठीं स्वयंसेवक गोळा करण्याचें काम सुरू झालें. तिकडे २३ फेब्रुवारीला प्रांतिकची बैठक होऊन हजर असलेल्या ३२ जणांनीं पूर्वी राजीनामा दिलेल्या पण पुन्हा उभे राहिलेल्या पूर्वाधिकाऱ्यांसच निवडलें. मंडलीक यांनीं राजीनामा दिलाच नव्हता. महाजन यांनीं परत घेतला. पांडूअण्णा शिराळकर, बाबुराव फुले, गोविंदराव वर्तक, पां. म. साठे हे उपाध्यक्ष निवडले गेले. ग. वि. पटवर्धन व डॉ. अंत्रोळीकर हे चिटणीस झाले. दिवेकर व फडके खजिनदार नेमले गेले. अध्यक्षाची निवडणूक मतपत्रिका पाठवून करण्याचें ठरलें.

अशी परिस्थिति पाहिल्यावर देवांनीं काँग्रेसच्या वरिष्ठ कचेरीकडे लिहून कळाविलें कीं, " महाराष्ट्र प्रांतिकच्या कचेरीकडे कायदेभंगाबाबत ज्या ज्या सूचनापत्रिका पाठविल्या जातील त्यांच्या नकला महाराष्ट्र काँग्रेस पक्षाच्या कार्यालयांतही पाठविल्या जाव्यात."

हें पत्र जातांच प्रांतिकला अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या कचेरीकडून तंबी देण्यांत आली व कायदेमंडळाच्या काँग्रेस सभासदांकडून असेंब्लीचे अथवा अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे राजीनामे देण्यांत यावे याबद्दल आज्ञा झाली. तेव्हां केळकरांनीं असहकारिता मान्य नाहीं असें म्हणून काँग्रेस कमिटीचा राजीनामा दिला.

८ मार्च रोजीं ग. वि. केतकर ( लो. टिळकांचे नातु व 'केसरी'च्या संपादक-वर्गापैकीं एक ) हे प्रांतिकचे अध्यक्ष म्हणून निवडून आले. परंतु प्रांतिकला प्रांतांत मान राहिला नव्हता. प्रांताला चर्चा ऐकण्यास फुरसत नव्हती. ७ मार्चला सरदार पटेल पकडले जाऊन त्यांना शिक्षा झाली होती. त्याबद्दल दुसऱ्या दिवशीं अभिनंदनाची जंगी सभा भरून लोकांना सत्याग्रहांत भाग घेण्यास आह्वान करण्यांत आलें. १२ रोजीं महात्माजी दांडीस जाऊन मिठाचा कायदा तोडण्यासाठीं आपल्या तुकडीसमवेत

साबरमतीच्या आश्रमांतून रवाना होणार होते. तुकडींत दहा महाराष्ट्रीय होते ही गोष्ट महाराष्ट्रीयांना स्फुरण चढविण्यास पुरेशी होती. डॉ. आठल्ये यांनीं तर केव्हांच विनंतिपत्रक काढून ( २५-२-३० ) जनतेला सेवादलांत प्रविष्ट होण्यास सूचना दिली होती. १६ मार्च रोजीं बाळूकाका, देवगिरीकर, हरिभाऊ फाटक यांनीं स्वराज्य कचेरींत सभा बोलाविली. तींत प्रतिसहकार-पक्षाची मंडळीही हजर होती. या सभेंत पुण्यापुरती युद्ध-मांत्रिमंडळाची स्थापना झाली.

महाराष्ट्रांतून वेळोवेळीं कायदेभंगासाठीं तुकड्या पाठविण्याचें ठरलें. पहिल्या तुकडींत देव, वासुकाका, केतकर, बाळूकाका, गाडगीळ, देवगिरीकर, जावडेकर, हरिभाऊ जोशी, हरिभाऊ फाटक, बाबूराव भिडे एवढी मंडळी निश्चित झाली.

प्रांतिक कमिटी प्रांताची संघटना करण्यास नालायक ठरतांच लोकांत अस्वस्थता उत्पन्न झाली. सत्याग्रह करण्यास सारेच उत्सुक होते. त्यामुळें वेगवेगळया कार्यकर्त्यांनीं आपापल्या जबाबदारीवर धडपड सुरू केली. सेवा-दलातर्फे डॉ. आठल्ये यांनीं, शहर कॉंग्रेस कमिटीतर्फे बाळूकाका कानिटकर यांनीं, युवकसंघातर्फे जोशीप्रभृतींनीं प्रचार सुरू केला. तिकडे ब्राह्मणेतर समाज स्वस्थ बसला नव्हता. जेध्यांच्या वीरवृत्तीनें उचल खाल्ली. त्यांना साहस आवडतच होतें. ही चळवळ सामान्य जनतेची असून तींत आपल्या स्वाभिमानास व हक्कास जागा आहे असें पाहतांच त्यांनीं तींत उडी घेण्याचा निश्चय केला व प्रचारार्थ एक महिना ते पायीं फिरले. अण्णासाहेब शिंदे हेही चळवळींत सामील झाले. या आंदोलनाची सांसर्गिक शक्ति इतकी जबरदस्त होती कीं, प्रतिसहकारपक्षालाही दूर राहणें बरें वाटेना. केतकर, बापूराव गोखले, बापूराव भिडे, दिवेकर वगैरे मंडळीही ओढली गेली.

याप्रमाणें महाराष्ट्रांत चेतना निर्माण होतांच देवांनीं पाहिलें कीं, प्रांतीय संघटनेची या वेळीं सर्वांत अधिक आवश्यकता आहे. चळवळ एकसूत्री राहिल्यास तींत विशेष जोम येईल आणि लोकांची कार्यक्षमताही वाढेल. वर्षानुवर्षें महाराष्ट्रांत बेशिस्तीचें वातावरण चालू होतें. ती सर्व बेशिस्ती मोडून, सर्व पक्षांची एकजूट करून त्यांत शिस्त व संघटना निर्माण करण्याचें

फार मोठें काम त्यांच्यासमोर पडलें होतें; आणि तें जपून करावयाचें होतें. कारण महाराष्ट्रीयांच्या प्रकृतींतील जागृत अहंकार कधीं उसळून येईल त्याचा नेम नव्हता.

देवांनीं आपल्या सहीनें महाराष्ट्रांतील सर्व कार्यकर्त्यांना उद्देशून निमंत्रण-पत्रिका काढिली. तींत "महाराष्ट्रांत कायदेभंग कोठें व कसा करतां येईल याचा विचार करून, नक्की योजना करण्यासाठीं ता. १८ मार्च १९३० रोजीं भरणाऱ्या सभेस" हजर राहण्यास सर्वांस विनंति केली होती.

त्याप्रमाणें बहुतेक सर्व जिल्ह्यांतील मुख्य मुख्य सुमारें ७५ वर कार्यकर्ते पुण्यास जमा झाले. ठकार, दास्ताने, गोखले, सुमंत, रामकृष्णमहाराज, सठा, देशपांडे ( नगर ), जाजू, राठी, अंत्रोळीकर, डॉ. आठल्ये, गोसावी वकील, गोविंदराव श्रोत्री, पं. सातवळेकर, आप्पासाहेब पटवर्धन, दामले, डॉ. साठ्ये, नाना खाडिलकर, हरिभाऊ तुळपुळे, वासुकाका जोशी, देवगिरीकर, डॉ. लागू, पाषाणकर, आ. भागवत, जावडेकर, रबडे, श्री. सत्यभामाबाई कुवळेकर, केतकर, गाडगीळ, हरिभाऊ फाटक वगैरे मंडळी हजर होती. देव अध्यक्ष-स्थानीं होते; एकंदर चार ठराव पास झाले:—

( १ ) मिठाचा कायदेभंग सुरू करावा, ( २ ) शक्य असल्यास जनतेचीं दुसरीं गाऱ्हाणीं कायदेभंगास घ्यावीं, ( ३ ) रत्नागिरी किंवा विलेपार्लें अथवा दोन्हीं, मिठाच्या कायदेभंगाचीं केन्द्रस्थानें करावीं, व ( ४ ) देव, केतकर, आप्पा पटवर्धन, दास्ताने आणि डॉ. आठल्ये, या पांचजणांचें सत्याग्रहमंडळ नेमावें.

त्याच दिवशीं डॉ. आठल्ये यांचें दुसरें पत्रक निघालें. नागपूर-उमरावती-पासून सावंतवाडी-संकेश्वरापर्यंत स्वयंसेवकभरती झाली होती. बहुतेक सर्व जिल्ह्यांनीं आपापली वर्गणी सेवकरूपानें दिली. मिरज, सावंतवाडी, औंध, कोल्हापूर या संस्थानांतून देखील माणसें आलीं. देव, बाळूकाका, गाडगीळ, आळतेकर, जाजू, आपटे इत्यादि मंडळी सैन्यभरती करीत होतीं. हरिभाऊ फाटक यांनीं प्राथमिक खर्चाकरितां १००० रु. आणून दिले.

याप्रमाणें प्रांतांत गडबड उडाली असतांना तिकडे कायदेमंडळांतून जयकर व केळकर यांचें वक्तृत्व गाजत होतें. कॉंग्रेसनें आपले सभासद काढून

घेतल्यामुळें वरिष्ठ कायदेमंडळांत हाजी बिल नापास झाल्याचें दुःख केळकरांस झालेंच होतें. सरकारवर कडक टीका कितीही केली तरी त्याचा उपयोग होत नाहीं, याचें त्यांस अधिकच दुःख झालें; व म्हणून त्यांनीं असेंब्लींत आपल्या दुःखास वाट करून दिली:—

" इंग्रजी राज्य १०० वर्षें चाललें; त्यांत हिन्दी जनतेच्या चार पिढ्या झाल्या. ...आजची चौथी पिढी अत्यंत कर्तबगार आहे. सरकारवर टीकेचे बाण सोडल्यास ते त्याला पोंचत नाहींत. कारण त्यानें आपल्या अंगावर अडीच इंच जाडीचें कातडी कवच चढविलें आहे; म्हणून आतां सरकारच्या तंगड्या ओढल्या पाहिजेत ( to pull the legs of the Government )."...

* * *

परंतु केळकरांना सत्याग्रहाचा उत्साह वाटत नव्हता तरी 'केसरी'चे रकाने मात्र युद्धाच्या वातावरणानें भरून गेलेले असत. गोखले, करंदीकर, केतकर, भावे ही सर्व मंडळी त्या प्रवाहांत पडली होती. ज्या व्यक्तीच्या हृदयांत कोठें तरी क्रांतिवादाची ठिणगी असण्याचा संभव होता, ती व्यक्ति अशा समयीं मागें राहील हें अशक्य होतें. या राष्ट्रीय उत्थानप्रसंगीं पुरुषच काय, पण स्त्रिया व मुलें हीं देखील चळवळींत सामील झालीं. मीठ 'चोरून' आणणें हें तर बालकांना मर्कटचेष्टा करण्याइतकें सोपें व 'रम्य' कार्य वाटत होतें. तीं देखील या 'सुलभ' देशकार्यांत प्रविष्ट झालीं.

महाराष्ट्राच्या किनाऱ्यावर कायदेभंग करून पाण्याचें मीठ करण्यास अनेक तयार झालेच; पण कांहीं जिल्ह्यांतून खाऱ्या मातींतूनही मीठ करण्याची उत्सुकता पुष्कळांना वाटली. नांवें देणारे हिंदुस्थानांत कोठेंही जायला तयार असत.

आंदोलन सुरू झाल्यानंतर प्रांतांतील सर्व राष्ट्रीय शिक्षणसंस्था तटस्थ कशा राहतील ? ज्या प्रसंगासाठींच त्यांचा जन्म व अस्तित्व हीं होतीं, तो येऊन ठेपतांच त्या सर्व संस्था सेवेस सादर झाल्या.

टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचा व्याप पुष्कळ वाढला होता. महाविद्यालयाच्या वाङ्मय व आयुर्वेद या दोनच शाखा राहिल्या होत्या; पण त्या

भरभराटींत होत्या. शेठ हणमंतराम यांच्या देणगीमुळें आयुर्वेद शाखेचें एक स्वतंत्र हॉस्पिटल उघडलें जात होतें. वैद्य नानल व डॉ. लागू यांच्या सतत मेहनतीचें फळ म्हणून आयुर्वेदशाखेचा उत्कर्ष होत होता. रा. ग. हर्षे अजून कार्यवाह होते. सालोसाल शिक्षण-परिषदा होत. नुकतीच येवल्यास एक यशस्वी शिक्षण-परिषद लिमये यांच्या अध्यक्षतेखालीं झाली होती. मार्च १९ तारखेस विद्यापीठाचा वार्षिक समारंभ कृ. प्र. खाडिलकरांच्या हस्तें झाला व लगेच विद्यापीठाच्या अध्यापकांनीं विद्यार्थ्यांस उद्देशून पत्रक काढिलें. विधायक कार्यक्रमाच्या अंगांपैकीं खादी-कार्याखेरीज विशेष संघटित असें राष्ट्रीय शिक्षणकार्यच महाराष्ट्रांत होतें. त्रिदळ महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं त्याचे 'मठ' अस्तित्वांत असून कार्यही करीत होते. त्यामुळें त्यांतून शिक्षण घेऊन बाहेर पडलेल्या किंवा शिक्षण घेत असलेल्या साऱ्या विद्यार्थ्यांवर व त्यांच्या शिक्षकांवरही एक विशेष जबाबदारी होती. महाराष्ट्राच्या गौरवाची गोष्ट ही कीं, सर्व संस्थांनीं युद्धांत भाग घेऊन आपला जिवंतपणा सिद्ध केला.

प्रांतिकच्या नव्या कार्यकारी मंडळाची सभा १८ मार्च रोजीं रात्रीं भरली. वरून हुकूम आल्यामुळें कांहीं तरी धडपड करणें अवश्य होतें. पण या प्रांतिक-मागें शक्ति कोठें होती ! महाराष्ट्र कॉंग्रेस पक्षानें आधींच प्रांतांतील कार्यकर्ते काबीज केले होते व त्याच दिवशीं दुपारीं सत्याग्रहमंडळाची स्थापना देखील झाली होती. बरीच भवति न भवति झाल्यावर कार्यकारी मंडळानें २५० रु. देऊन देव-केतकर यांची कायदेभंग कमिटी नेमली व आपले सहयोगी पसंत करण्यास त्यांस अधिकार दिले. परिणामीं महाराष्ट्र कायदेभंग-मंडळाचा हक्क प्रांतिकला कबूल करणें भाग पडलें.

महाराष्ट्राचें मुख्य केन्द्र उपनगर जिल्ह्यांत स्थापन झालें. विलेपार्लें येथें जिल्हा सत्याग्रहपरिषद भरली. शेठ जमनालालजी अध्यक्ष होते. सत्याग्रहाला द्रव्यबळ देण्याचें त्या जिल्ह्यानें आश्वासन दिलें. कारण तिकडे गुजराती लोकांची वस्ती अधिक पडली ! विलेपार्लें येथेंच मुख्य छावणी उघडण्यांत आली आणि कायदेभंग-मंडळाचे अध्यक्ष व महाराष्ट्राचे सर्वाधिकारी देव यांनीं तेथेंच आपलें ठाणें दिलें. उपनगरानें पैसा दिला. महाराष्ट्रानें माणसें पुरविलीं.

वर्किंग कमिटीनें सर्व प्रांतिक कमिट्यांना आपापल्या क्षेत्रांतून कायदेभंग

करण्याचे अधिकार देतांच प्रांतिकनें महाराष्ट्र कायदेभंग-मंडळाला सर्वाधिकार दिले. नंतर जिल्हानिहाय युद्धमंडळें स्थापलीं गेलीं व अशा रीतीनें प्रांतीय संघटना होऊं लागली. स्वयंसेवक यावयाचे ते आपापल्या जिल्ह्यांतील अधिकाऱ्यांमार्फत यावे असें ठरलें व स्त्रियांनाही सेविका होण्याची मोकळीक देण्यांत आली. पुणें शहरापुरतें बाळूकाका सर्वाधिकारी बनले. ठकारांनीं प्रभातफेऱ्यांची कल्पना काढली; बाळूकाकांनीं ती अमलांत आणून प्रभात-फेऱ्यांनीं शहर व लष्कर गाजवून सोडलें. चव्हाट्यांवर व्याख्यानें सुरू झालीं; आणि पुण्याचा कित्ता साऱ्या प्रांतभर गिरविला गेला.

एप्रिलच्या सुरुवातीस मालवीय व अणे यांनीं कायदेमंडळाचे राजीनामे दिले. केळकरांनीं प्रांतिकचे अध्यक्ष ग. वि. केतकर यांस पत्र पाठवून प्रांतिकच्या सभासदत्वाचा आपला राजीनामा पाठविला. "कायदेभंगाची चळवळ ही आपल्या राष्ट्रीय पक्षाच्या धोरणांत समाविष्टच आहे. तेव्हां तिचा पुरस्कार अवश्य केलाच पाहिजे यांत संशय नाहीं." असें लिहून केसरी ऑफिसमधील ज्या मंडळींना या चळवळींत सामील व्हावयाचें असेल त्यांस सामील होण्यास परवानगी दिली होती. "स्वतः मीं काय करावें, कोठें काय करावें किंवा काय न करावें, याचा विचार मी स्वतंत्रपणें करीन" असा त्याचा आशय होता.

७ एप्रिल रोजीं केळकरांनीं असेंब्लीच्या सभासदत्वाचा राजीनामा दिला; पण तो खासगी कारणास्तव दिला असें जाहीर केलें.

परंतु महाराष्ट्र त्यांची वाट पाहत नव्हता. सारा प्रांत या महान् सत्याग्रह-युद्धांत सामील होऊं इच्छीत होता. त्याचे हात धरून चालविण्याची किंवा दिशा दाखविण्याची आवश्यकता नव्हती. प्रजा जागृत झाली होती. तिला वर्तमानपत्रांतील दिग्दर्शनाची जरूरी नव्हती. तिचा आत्मविश्वास वाढता होता.

देवगिरीकरांचा आजार सत्याग्रहांत कोठल्या कोठें पळाला. मार्च महिन्यांत साबरमतीस जाऊन सत्याग्रहाचें वातावरण अवलोकन करून ते आले होते. भुस्कुटे व पोतनीस यांनीं दौरा सुरू केला. केशवराव जेधे यांनीं फुले-पथक काढण्याचें ठरविलें. महात्माजींच्या दांडी-कूचच्या रमणीय कथा लोकांच्या कानांवर सारख्या येत होत्या. सारे लोक दांडीच्या सत्याग्रहाची

उत्सुकतेनें वाट पाहत होते. एप्रिल ६ रोजीं राष्ट्राच्या माननीय नेत्यानें पहिला कायदेभंग समुद्रास साक्षी ठेवून केला व समस्त भारतवर्षाच्या रोमारोमांत 'सबरस' ओतला !

विलेपार्लें छावणीचे मुख्य जमनालालजी होते व चिटणीस डॉ. आठल्ये होते. जमनालालजींनीं आपल्या सोबत्यांसह सर्वत्र कायदेभंगाचा धडाका चालविला. दांडीचा सत्याग्रह ही साऱ्या देशास चढाईची तुतारी भासली. देशभर कायदेभंगास ऊत आला.

परंतु स्वातंत्र्याची किंमत ही द्यावीच लागली. सरकारनें सत्याग्रही सैनिकांस भराभर पकडून शिक्षा ठोठावण्यास सुरुवात केली. जमनालालजी, किशोरलालभाई मशरूवाला, विलेपार्लेंचे कार्यकर्ते गोकुळभाई भट, गंगाधरराव देशपांडे वगैरे पुढाऱ्यांस सरकारनें तुरुंगांत डांबलें. परंतु जनता जागी होऊन उठली होती ती अशानें थोडीच ऐकते ? जमनालालजी जातांच छावणीचीं सूत्रें स्वामी आनंद यांनीं आपल्या हातीं घेतलीं. वेगवेगळ्या जिल्ह्यांतून वेगवेगळे कार्यकर्ते कायदेभंगाचें कार्य चालवूं लागले. पूर्व खानदेशांत अमळनेरचे सानेगुरुजी जोरांत प्रचारकार्य करूं लागले. सानेगुरुजींची रसवंती वाणी व बहुजनसमाजाच्या भावना उचंबळून टाकणारी वाग्धारा पूर आलेल्या नदीप्रमाणें वाहूं लागली. पश्चिम खानदेशांत ठकार ठाण मांडून बसलेच होते. कुलाब्यांत देवांच्या आज्ञेवरून आचार्य भागवतांनीं रान उठविलें. आचार्य भागवत हे पुण्याहून कुलाब्यांत जाण्यापूर्वीं दांडीकूचवरील महात्मा गांधी यांची भेट घेऊन व त्यांच्याशीं सत्याग्रहविषयक चर्चा करून आले. त्यांनीं महाड येथें प्रथम प्रचारकार्याला प्रारंभ केला. पेणच्या सत्याग्रह केंद्रासाठीं महाडाहून पांच कायदेभंगी सत्याग्रहींची तुकडी पायीं प्रचार करीत पाठवून दिली व मग पेण, अलिबागकडे प्रचारार्थ ते हिंडावयास गेले. मध्यंतरीं दांडीस महात्माजींबरोबर गेलेल्या सेनेंतील महाराष्ट्रीयांची मागणी देवांनीं महाराष्ट्रासाठीं केली व महात्माजींनीं त्याप्रमाणें त्यांस पाठवून दिलें. त्यांपैकीं नाना काणे व शास्त्रीजी यांनीं कुलाब्यांत चळवळ सुरू केली. आप्पासाहेब पटवर्धन रत्नागिरी जिल्ह्यांत खादीकार्य करीत होते. त्या सालस, एकमार्गी गृहस्थाला आपल्या कामांतच विशेष गोडी होती, परंतु देव व

किशोरलालभाई यांनीं त्यांनाही सत्याग्रहांत ओढलें. त्यांच्या सच्चारित्र्याचा परिणाम जनतेवर झाल्याशिवाय कसा राहील ?

या चळवळीचा पुरस्कार ठिकठिकाणीं पुष्कळ अंशीं राष्ट्रीय शिक्षणास वाहून घेतलेल्या सेवकांनीं केला. खुद्द पुण्यास बाळूकाका, हरोलीकर, रवडे, जावडेकर, भागवत, अतीतकर, तात्या देशपांडे वगैरे मंडळी होतीच. नगरला हिरे, सठा, चौधरी व चिंचोरकर यांनीं अध्वर्युपण घेतलें. सातारला घाणेकर बंधु व सारवळकर यांनीं कार्य चालविलें. येवल्यास आपटेगुरुजी असीम स्वार्थत्याग करून शाळा चालवीत होते. मुळशी-सत्याग्रहापासून त्यांचा देव, दास्ताने वगैरे मंडळीशीं परिचय झाला होता. गांधी-वाङ्मयाचा अभ्यास त्यांनीं यानंतर केला व चळवळ सुरू होतांच ते तनुमनेंकरून तींत पडले.

महाराष्ट्राचा पुरुषार्थ १९३० च्या चळवळींत प्रकट झाला. केळकर-पक्षांत समाविष्ट असलेले परंतु स्वातंत्र्यवादी प्रकृतीचे असे कित्येक लोक एकदम बदलले. बार्डोलीच्या सत्याग्रहानेंच बहुतेकांच्या मनाची पुनर्घटना झाली. विधायक कार्यक्रमांतून प्रत्यक्ष लढाऊ क्रिया निघेलच कशी अशी शंका पुष्कळांना वाटे. तिचें नंतर निरसन झालें. बुवा गोसावी, हरिभाऊ जोशी वगैरे मंडळी चळवळींत दाखल झाली. लागू व लिमये हे कौन्सिलांत शिरूनही कॉंग्रेसनें काम करावें या मताचे होते. परंतु हे सर्व प्रकृतीनेंच स्वातंत्र्यवादी असल्यामुळें १९३० चें आंदोलन सुरू होतांच कौन्सिलपक्ष सोडून ते चळवळींत सामील झाले. दुर्दैवानें लिमये यांची प्रकृति ढांसळली. त्यामुळें ते पहिल्या दोन युद्धांत भाग घेऊं शकले नाहींत. यवतला जाऊन राहणें त्यांना भाग पडलें. पण मनानें ते लाहोर कॉंग्रेसच्या ठरावाला पूर्णपणें अनुकूल होते.

एप्रिल ९ व १० रोजीं पुण्यांतील टिळकस्मारकमंदिरांत राष्ट्रीय पक्षाची सभा होऊन, कॉंग्रेसशीं सहकार्य करून कायदेभंग करण्याचें ठरलें व त्याप्रमाणें त्यानें आपलें स्वतंत्र कायदेभंगमंडळ नेमलें. त्याचे अध्यक्ष केळकर व चिटणीस दिवेकर होते. भोपटकर, गोखले, शिराळकर व पळसुले हे इतर सभासद नेमले गेले. परंतु हें मंडळ कांहींच काम करूं शकलें नाहीं. कारण महाराष्ट्र-कॉंग्रेसपक्षाच्या सत्याग्रहमंडळाच्या शाखा प्रांतभर पसरून केळकर-पक्षांतील

कार्यकर्तेही त्यांच्यांतच प्रविष्ट झाले होते व सत्याग्रह जोरांत सुरू झाला होता. त्यामुळें वरातीमागून घोडें अशांतला हा प्रकार झाला.

केळकरांच्या बुद्धिवादी वृत्तीला 'चळवळ' ही गोष्ट मानवणेंच कठीण. लोक भावनावेगांत स्वतःला विसरून गेले होते याला त्यांचा उपाय नव्हता. "आपलें लोकांस मानेना। लोकांचें आपणांस मानेना। अवघा विकल्पाचि मना। समाधान कैचें?॥" या रामदासांच्या उक्तीप्रमाणें त्यांच्या मनाची अनुकंपनीय स्थिति झाली होती. " ही चळवळ या वेळीं अयुक्त होती असें माझें मत वर दर्शविलेंच आहे. तथापि मला हेंही माहीत होतें कीं, आमच्या पक्षानें नेमस्त किंवा मवाळ किंवा सरकारजमा पक्षाप्रमाणें अशा चळवळीवर बहिष्कार घातलेला नव्हता. ... क्रमप्राप्त असल्यास ती स्वीकारणें योग्य असें आमच्या पक्षाचें मत होतें."—**गतगोष्टी**, पृ. ७३८.

चळवळ कोठल्या वेळीं 'युक्त' होती हें केळकरांनीं आपल्या जीवनांत कधीं तरी स्पष्ट केलें असल्याचें कोणास स्मरण असेलसें वाटत नाहीं. परंतु चळवळीच्या महापुरांत त्यांचे स्वतःचे सोबती सुद्धां वाहूं लागले, कुलाब्याचे कार्यकर्ते व त्यांचे कट्टे पक्षपाती मंडलीक हेही जेव्हां " स्वातंत्र्याची चळवळ सुरू झाली असतां आपण स्वस्थ बसणें योग्य नव्हे " असा विश्वास बाळगून महात्माजींस भेटून त्यांची अनुमति घेऊन आले तेव्हां अर्थात् केळकरांना स्वस्थ बसतां येईना. " पण मला माहीत होतें कीं, पोटांत पाय असणाऱ्या निंदकवर्गांतील कांहीं लोकांच्या मनांतला हा अर्थ असण्याचा संभव कीं, ' तुरुंगांत जाण्याला भिणारे तुम्ही तुम्हांला चळवळींत पडणें न पडणें दोन्ही जिवावर येणार—'." —**गतगोष्टी** पृ. ७४४. तेव्हां " अस्तनींतील निखारे विझविण्याला " त्यांनीं " समर्पक उत्तर " देण्याचें ठरविलें व स्वतः कायदेभंगमंडळाचे अध्यक्ष झाले. नंतर १२ एप्रिल रोजीं शिवाजीमंदिरांत जी सभा झाली तींत त्यांनीं पुढील दुहजबी भाषण केलें:—

" माझा अभिप्राय असा आहे कीं, जरूर तर कायदा मोडून त्याचे परिणाम भोगावे हें ठीक आहे. पण जर साधण्यासारखें असेल, तर सरकारच्या दुष्ट कल्पनेला बिलाचें व बिलाला कायद्याचें स्वरूप येत असतां वाटेंतच ती उलथून पाडणें बरें नव्हे काय ?

" मीं पूर्वी म्हटल्याप्रमाणें कायदेभंग म्हणजे सरकारचा मानभंग इतकाच त्याचा अर्थ. तुरुंगांत जाणें यांतच कांहीं विशेष पुण्य असतें असें नाहीं. परंतु कायदेभंगाचा प्रसंग प्राप्त झाला असतां तुरुंगांत जाण्याची भीति न बाळगतां तो केला पाहिजे इतकेंच. कोणाला कमी शिक्षा होईल तर कोणाला जास्त .... पण सरकार परीक्षा घ्यायला बसलें तर आपणही ती द्यायला तयार असलें पाहिजे. मात्र या गोष्टी ज्यानें त्यानें स्वयंस्फूर्तीनेंच मनाची तयारी करून केल्या पाहिजेत. कोणी कोणास भरीला घालण्याची ही गोष्ट नाहीं .... हल्लींच्या कायदेभंगाला म्हटलें तर धैर्य लागतें, म्हटलें तर लागत नाहीं. कारण प्रस्तुत कायदेभंगांत जास्तींत जास्त शिक्षा ६ महिने व दंड ५०० रु. आहे. वास्तविक ज्यांना अशा गोष्टींचा परिचय नाहीं त्यांनीं ही गोष्ट प्रथम करणें हें अर्थातच धैर्याचें काम म्हटलें पाहिजे. पण देशाकरितां आपलेच कांहीं लोक फांसावर चढतात किंवा जन्मठेपेच्या शिक्षा भोगतात त्या मानानें पाहिलें असतां, या कायदेभंगाला लागणारें धैर्य फार आहे असेंही म्हणतां येणार नाहीं."

समाजानें रुद्रावतार धारण केला होता तेव्हां केळकरांच्या अंतःकरणांत चरम शांति विराजत होती. समाजाला जें रुचलें तें त्यानें घेतलें होतें. केळकर तरी समाजाला सोडून कोठें जाणार होते ? समाजानें चालविलेला प्रयोग कष्ट सोसूनही सहन करणें समाजांतील व्यक्तींना क्रमप्राप्त होतें. पण विसंवादी मन परागतिक बनणारच.

---

# ३ अमृताचे पुत्र !

महाराष्ट्राची नौका महासागराच्या लाटांवर डोलूं लागली ! अशिक्षित लोकसुद्धां अधिकांशानें चळवळींत भाग घेऊं लागले; आणि गांधीयुगाचें स्वागत चारी बाजूंस होऊं लागले हें पाहतांच देवांच्या हृदयांत आनंदाच्या ऊर्मि उसळल्या. परंतु त्यांच्या वीरवृत्तीचें समाधान तेवढ्यानें होण्यासारखें नव्हतें. "महाराष्ट्राचें रक्त सांडलें पाहिजे" असा संकल्प त्यांनीं केला, व तत्प्रीत्यर्थ तें योजना आंखूं लागले.

दांडीस मिठाचा कायदेभंग केला तरी महात्माजींस सरकारनें पकडलें नाहीं, तेव्हां महात्माजींनीं चढाईचें धोरण स्वीकारून धारासणाच्या मिठागारावर हल्ला करण्याचें ठरविलें. देवांनाही कल्पना सुचली. "महाराष्ट्रांत एवढीं मिठागरें आहेत, आपणही इकडे हा प्रयोग कां करूं नये ?" लगेच ते २२ एप्रिल रोजीं महात्माजींस कराडी येथें भेटले व आपली कल्पना अमलांत आणण्यासाठीं त्यांनीं त्यांची परवानगी मागितली. परंतु महात्माजींनीं चढाईचा कार्यक्रम नवीनच म्हणून स्वतःचा प्रयोग झाल्यावर इतरांस परवानगी देण्याचें ठरविलें. तेव्हां देव परत आले व हल्ल्यासाठीं स्थान शोधूं लागले. वडाळा येथें मिठागर होतें. परंतु मुंबईकरांनीं तिकडे मोर्चा नेण्याचें ठरविलें. तेव्हां देवांनीं रत्नागिरी जिल्ह्यांतील सुप्रसिद्ध शिरोडें क्षेत्र पसंत करून संग्रामाची तयारी केली.

जमनालालजींना पकडल्यावर सरकारनें कांहीं दिवस विलेपार्लें येथील छावणीकडे दुर्लक्ष केलें होतें. त्याचा फायदा घेऊन स्वामी आनंद, सॉलिसिटर खेर, वांद्रेकर वगैरे मंडळींच्या मदतीनें देवांनीं उपनगरभागांत फार मोठी योजना आंखली. अनेक उपकेन्द्रें सुरू करून खेड्यांपर्यंत कायदेभंगाची चळवळ पोंचविली.

जे पुढें मुंबई इलाख्याचे मुख्य प्रधान झाले ते श्री. खेर या वेळीं विलेपार्लें येथील छावणींत सामान्य कार्यकर्ते म्हणून सर्वांबरोबर राष्ट्रीय उत्थानाच्या कार्यास

हातमार लावीत होते. हा वेळपावेतों ते मुंबई येथे सॉलिसिटरचा धंदा करीत होते व मुंबईतील सामाजिक सेवा करणाऱ्या अनेक संस्थांशीं आणि प्रवृत्तींशीं त्यांचा संबंध होता. त्यांचा जन्म रत्नागिरी येथें १८८८ त झाला. प्राथमिक शिक्षण धारवाड जिल्ह्यांत कुंदगोळ येथें झालें. त्यांचे वडील त्या वेळीं तेथें नोकरीवर होते. त्यांचेबरोबर फिरत असतां दुय्यम शिक्षण पुणें, मिरज, कोल्हापूर व अहमदनगर या ठिकाणीं झालें. पुढें १९०३ सालीं ते मुंबई-तील विल्सन कॉलेजांत प्रविष्ट झाले. बी. ए. झाल्यावर ते दोन वर्षें फेलो होते. १९१२ व १९१६ सालीं ते इंग्लंडला जाऊन आले व नंतर मुंबईत धंदा करूं लागले. त्यांचा स्वभाव शालीन असल्यामुळें पुष्कळ वर्षें ते राजकारणाचे केवळ निरीक्षक व समाजाचे मूक सेवक राहिले. ते काँग्रेसचे साधे सभा-सद होते. १९२३ सालीं मुंबईतील स्वराज्यपक्षाचे ते पहिले सेक्रेटरी बनले. त्यांना असहकारिता मान्य होती, पण कौन्सिलप्रवेशही महत्त्वाचा आणि उपयुक्त वाटे. पहिल्या पायऱ्या क्रमाक्रमानें चढल्याखेरीज शेवटचीला पोंचणें जनतेला अशक्य होईल असें त्यांचें मत होतें. स्वराज्यपक्षाला ते शेवटपर्यंत चिकटून राहिले. दरम्यान अनेक प्रकारच्या सामाजिक सेवेच्या कार्यात ते भाग घेत. मुंबई प्रांतिक काँग्रेस कमिटीच्या कार्यकारी मंडळाचे ते सभासद होते. युवकसंघाचे ते उपाध्यक्ष होते. १९२८ त महात्माजींनीं नेमलेल्या अस्पृश्यता-निवारण कमिटीच्या कार्यकारी मंडळावर ते होते व त्याच सालापासून त्यांनीं उपनगरांत वास्तव्य केलें. खार येथील चांभारवाड्यांत त्यांनीं हरिजनसेवेचें कार्य सुरू केलें व त्याच सालापासून ते महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटींत प्रविष्ट झाले.

दांडीकूचपूर्वी अहमदाबाद येथें जी अखिल भारतीय काँग्रेस कमिटीची बैठक भरली होती तिला ते हजर होते. पूर्वी ते टिळकांचे अनुयायी होते. दांडीकूचचे वेळीं जंबूसर येथें त्यांनीं महात्माजींची गांठ घेतली, व चळ-वळीच्या प्रवाहांत उडी टाकली.

विलेपार्लें-छावणींत खेरांनीं व त्यांच्या सहकाऱ्यांनीं पुष्कळ काम केलें व सामान्य लोकांत प्रचार चालविला. वेसावें येथील कोळीसमाज उत्साहभरानें मिठाच्या कायदेभंगांत सामील झाला. वेसाव्याचा वाघ म्हणून प्रसिद्ध असलेले

श्री. पोशा नाखवा व त्यांच्या पत्नी गंगाबाई यांच्यासारख्या कोळीसमाजांतील अशिक्षित व्यक्तींनींही पुढाकार घेऊन सामुदायिक कायदेभंगाचा फैलाव केला तेव्हां सरकारनें धरपकड सुरू केली. २० जानेवारीला खेर पकडले गेले व त्यांना ८ महिन्यांची सजा झाली.

रत्नागिरी जिल्ह्यांत दास्ताने, सामंत, आप्पासाहेब पटवर्धन, सी. गो. रानडे, देवागिरीकर, मीर शकुल्लाह वगैरे लोकांनीं सामुदायिक कायदेभंग घडवून आणिले. कुलाबा जिल्ह्यांत मिश्र छावणी निघाली. मंडलीकांना राष्ट्रीय पक्षातर्फे चळवळ करण्याची इच्छा होती. पेणला त्यांनीं शिबिर काढण्याचें ठरविलें. परंतु कॉंग्रेसपक्षाशीं सहकार्य करण्याची त्यांची इच्छा होती. नाना काणे शिबिराचे संचालक बनले. आचार्य भागवतांकडे प्रचारकार्य देण्यांत आलें. तिकडे हरिभाऊ जोशी डॉ. कुर्तकोटींना कंटाळून पुण्यास आले होते. खेड्यांत जाऊन राहावें व शेतकऱ्यांचें कॉंग्रेसवादी वर्तमानपत्र काढावें अशी त्यांची इच्छा होती. त्यांना खेडयांतील कामासाठीं एका वऱ्हाडी मित्राकडून द्रव्याचीही मदत मिळत होती. इतक्यांत दांडीकूचची वार्ता आली तेव्हां हरिभाऊ युद्धांत सामील होण्यास उत्सुक झाले. त्यांचा केतकरपक्षाकडे ओढा होता; पण युद्ध सुरू झालें तरी त्यांची थंडाई पाहून हरिभाऊंना स्वस्थ राहणें अशक्य झालें. हरिभाऊंना त्या वेळीं फारशी श्रद्धा नव्हती. पण युद्धमंडळांत त्यांचें नांव घातल्यामुळें जबाबदारी वाटून त्यांस तुरुंगांत जावेंसें वाटलें. त्यांनीं ६ महिन्यांची तयारी करून केतकर व आनंदीबाई जोगळेकर यांचेसमवेत कुलाब्याकडे कूच केलें. पेणचें केन्द्र चालू झालें होतें. नाना काण्यांच्या नेतृत्वाखालीं मिरवणूक काढण्यांत आली व मिठाचा कायदेभंग करण्यांत आला. हजारों लोक जमले होते. केळकरांचें भाषण झालें; पण तें 'वठलें' नाहीं. संध्याकाळीं आचार्य भागवत व विनायकराव लिमये यांचीं दणदणीत भाषणें झालीं. परिणामीं मंडलीक, केतकर, भागवत वगैरे लोक पकडले गेले व सर्वांस लहान-मोठ्या शिक्षा झाल्या. ठाणें जिल्ह्यांत जमनादास मेहता व बाबूराव गोखले यांनीं कायदेभंग केला. मेहतांना ६ महिन्यांची शिक्षा झाली.

रत्नागिरी जिल्ह्यांत आप्पासाहेब पटवर्धन, देवगिरीकर, राऊत, राजाध्यक्ष, रावसाहेब पटवर्धन वगैरे मंडळींनीं मिठाबाबत अनेक प्रकारचे सत्याग्रह केले.

तेव्हां सरकारनें सर्वांस तुरुंग दाखविला. देवगिरीकरांनीं ४१ दिवसपर्यंत जें काम शिरोड्यास केलें त्याची स्मृति तेथील मंडळीस अद्याप आहे.

महाराष्ट्रांत गाजलेले सत्याग्रह म्हणजे शिरोडें येथील मीठसत्याग्रह, संगमनेर-बागलाणचे जंगल-सत्याग्रह व सोलापूरचा झेंडा-सत्याग्रह.

सोलापूरच्या भयानक लष्करी अमलाच्या कालांतही महाराष्ट्रांतील वीर हृदयांनीं महाराष्ट्राचें नांव राखिलें. चिरनेर-प्रकरणानें तर महाराष्ट्राचें काळीज चिरलें. परंतु महाराष्ट्राची सहनशक्ति कमी नव्हती. चिरनेर-प्रकरण वर्षानुवर्षें चालून अखेरीस महाराष्ट्रानें दिव्य यश मिळविलें व आपली कीर्ति उज्ज्वल केली.

या सर्व रोमहर्षण प्रसंगांचा इतिहास सविस्तर येथें देणें शक्य नाहीं. त्याचें स्वतंत्र वर्णन " कायदेभंगाचा इतिहास " या पुस्तकांत आलें आहे. कथा-सूत्राच्या दृष्टीनें थोडा संदर्भ द्यावा लागेल इतकेंच.

रत्नागिरी जिल्हा समुद्रकिनाऱ्यावर असल्यामुळें, आणि कोळी व भंडारी लोकांची वस्ती त्या भागांत विशेष असल्यामुळें मिठाच्या सत्याग्रहास तें योग्य क्षेत्र मिळालें. चळवळ्ये लोक सरकारविरुद्ध अप्रीति फैलावूं पाहत होते, जनतेस जागृत करूं इच्छीत होते व लोकांची कर्तृत्वशक्ति वाढवून संघटना करण्याचा प्रयत्न करीत होते. जंगल-सत्याग्रहही त्याच भागांत होऊं शकला कीं, जेथें जंगलांच्या कडक कायद्यांनीं लोक हैराण झाले होते. या सर्व अशिक्षित जनसमुदायांना कायदेभंग करावयास लावणें फार धोक्याचें होतें. महात्माजींचें नांव खेड्यांपर्यंत पसरलें होतें व लोक त्यांना साधु मानीत होते ही गोष्ट खरी असली तरी, सत्याग्रहशास्त्राचें सूक्ष्म ज्ञान सुशिक्षितांसही नव्हतें, मग अशिक्षितांस कोठून असणार ? त्या भोळ्या जनतेंत श्रद्धा पुष्कळ होती; आणि चळवळ्यांत वक्तृत्व व कर्तृत्व होतें. जीवन-कलहांत भरडला जाणारा अज्ञ जनसमाज जेव्हां कायदेभंगास उद्युक्त झाला तेव्हां संचालकांना सावध राहणें आवश्यक होतें. कारण ध्येयार्थी मनुष्य जितक्या प्रमाणांत साहस करील तितका चिरतस पोटार्थीही करूं शकेल हा सिद्धान्त आहे. परंतु ध्येयार्थी संकटांना, क्लेशांना जुमानीत नाहीं; पोटार्थी पहिल्या प्रत्याघाताला भेदरून जाईल हें विशेष संभवतें. तसेंच सत्यअहिंसेचें शस्त्रही असें सूक्ष्म आहे कीं, योग्य व्यक्तींनीं त्याचा उपयोग केल्यास तें यश प्राप्त करून देतें; त्याचप्रमाणें अयोग्य व्यक्तींच्या हातीं तें आत्मनाशासही कारणीभूत होतें.

परंतु एक अचाट शक्तिसंपन्न विभूति या अपूर्व शस्त्राचा प्रयोग करीत होती. तिची स्वतःची सामर्थ्यवान् श्रद्धा साऱ्या राष्ट्रांत नवचैतन्य निर्माण करती झाली. महाराष्ट्रांत तिच्या अनुयायांनीं अनेक वर्षे आपण केलेल्या तपाचा परिणाम शुभच येईल अशी आशा बाळगून होम पेटविला.

शिरोड्याचा सत्याग्रह सुरू होण्यापूर्वीच देव १५ महिन्यांच्या सजेवर अटकेंत गेले. जाण्यापूर्वी "महाराष्ट्राचें रक्तसिंचन रणांगणावर होईपर्यंत शिरोड्याचा सत्याग्रह लढविला पाहिजे" असें सांगून ते गेले होते. शिरोड्याचा सत्याग्रह १२ ते २२ मेपर्यंत झाला. या सत्याग्रहांत आप्पासाहेब पटवर्धन, सी. गो. रानडे, देवगिरीकर, जावडेकर, डॉ. लागू, ना. म. गोखले, डॉ. आठल्ये, भुस्कुटे, धर्मानंद कोसंबी, परचुरे, सहस्रबुद्धे, अ. भा. पंडित वगैरे अनेक कार्यकर्त्यांनीं जबाबदारीपूर्वक भाग घेतला होता. ६५ वर्षांचे मीर शकुल्लाह यांनीं सत्याग्रह करून ६ महिन्यांचा कारावास भोगला! एकूण ५८३ स्वयंसेवक शिरोड्यास गोळा झाले होते, ते महाराष्ट्राचे ११ जिल्हे व मुंबई या ठिकाणांहून आले होते. खुद्द रत्नागिरींतले ६५ होते. पण कायदेभंग करणाऱ्या सेवकांपेक्षां त्यांच्या खाण्यापिण्याची व राहण्याची सोय करणाऱ्या स्थानिक बंधु-भगिनींची संख्या फारच मोठी होती. यावरून या चळवळीचीं मुळें किती खोलवर गेलीं होतीं तें दिसून येत होतें. शिरोड्यास पोलिसांनीं सेवकांना बेदम मार दिला व देवांच्या इच्छेप्रमाणें "रणांगणावर महाराष्ट्राचें रक्तसिंचन" झालें. तो संपल्यावर जंगलसत्याग्रहास हात घालावयाचें देव व महाराष्ट्र काँग्रेस युद्धमंडळानें अगोदरच ठरविलें होतें. त्याप्रमाणें नगर जिल्ह्यांतील संगमनेर व अकोला तालुक्यांत सत्याग्रहासाठीं क्षेत्र पसंत करण्याचें ठरलें. आणि त्यासाठीं रामकृष्णदास महाराज, नवरे, डॉ. अंत्रोळीकर व गोविंदराव देशपांडे यांचें मंडळ नेमण्यांत आलें. या जंगलसत्याग्रहांत सरदेसाई, टिकेकर, अच्युतराव पटवर्धन, केशवराव गरूड वगैरे नवीन तरुण मंडळी सामील झाली होती. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी हेही पुढें प्रविष्ट झाले. या सत्याग्रहांत सर्वसाधारण भाग घेणारे शेतकरीच अधिकांश होते. पटवर्धन, गरूड व टिकेकर तालुकाभर फिरून प्रचार करीत होते. त्यांनीं पुष्कळ जागृति घडवून आणिली. जुलै व ऑगस्ट महिन्यांत या ठिकाणीं यशस्वी सत्याग्रह करण्यांत आले.

बागलाण येथें लक्ष्मणशास्त्री जोशी हे मुख्याधिकारी होते. नाशिकचे दादासाहेब गद्रे व लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं प्रचार करून बागलाण येथेंही सत्याग्रह घडवून आणिला.

परंतु दिवसेंदिवस चळवळीचें रूप थोडथोडें विकृत होऊं लागलें. अनुभवी, जाणते व सिद्धान्तवादी लोक तुरुंगांत बसतांच अननुभवी, उतावळ्या व भावनाप्रधान लोकांच्या हातीं चळवळीचीं सूत्रें गेलीं. मध्ययुगीन अद्भुतरम्यतेच्या कल्पना उराशीं बाळगणाऱ्या, महात्माजींची विचारपद्धति नीट न समजावून घेतलेल्या कार्यकर्त्यांनीं पुढें घोटाळे माजवले. छद्मवेष घेऊन फिरणें, छायामंडळें निर्माण करणें, अंधारांतून चळवळींचीं सूत्रें चालविणें असे प्रकार चालू झाले. बागलाणची चळवळ तर पुढें दहशतीमुळें बंद पडली. प्रचंड जनसमुदायाला शांतिमय युद्ध करण्यास प्रवृत्त करणें आणि त्यांच्या संख्येची दहशत पोलिसांवर बसवून आपला मतलब पूर्ण करवून घेणें, यांत फरक आहेच. बागलाणमध्यें गुरांचे कोंडवाडे फोडण्यांत हिंसा झाली. सरकार तर हिंसावादीच होते, त्याच्या हिंसेला अशा प्रकारानें अधिक उन्माद चढला व बागलाणांत तर स्त्रियांवरही लाठीहल्ला चालविण्यापर्यंत पाळी आली. बिळाशी येथेंही लोकक्षोभ झाला. त्यामुळें अत्याचार करण्यास पोलिसांस विशेष फावलें.

सोलापूरचा लष्करी कायदा अशाच सुप्त हिंसेला प्रतिक्रिया म्हणून झाला. परंतु त्या राक्षसी प्रतिक्रियेला स्वतःचें बलिदान देण्यास प्राणांचीही पर्वा न करितां गेलेल्या १७५ लोकांच्या धैर्याचें कौतुक करावें तेवढें थोडें आहे. त्यांतही पहिल्या तुकडींतील वा. वि. साठे, अनंतराव काळे व गिरिनारायण या निधड्या छातीच्या वीरांचें साहस विशेष म्हटलें पाहिजे. बाकीचे कायदेभंग दिवाणी कायद्यांचे होते; पण येथें लष्कराशीं गांठ होती.

चिरनेर प्रकरण तेथील गोळीबारामुळें बरेच दिवस गाजलें. या गोळीबारासही लोकक्षोभ बराचसा कारणीभूत झाला; परंतु हरिभाऊ जोशी व श्री. शंभुशेठ यांनीं श्री. खेर, मुनशी वगैरे लोकांच्या साहाय्यानें अविश्रान्त परिश्रम केल्यामुळें अखेरीस शेवट गोड झाला.

दोन्ही खानदेशांत, तसेंच बिळाशी, कळवण, अलिबाग, महाड वगैरे

ठिकाणींही कायदेभंग झाले. हे कायदेभंग सामुदायिक असत व एखाद्या केन्द्राच्या ठिकाणीं शिबिर निघाले म्हणजे शेजारपाजारच्या जिल्ह्यांतूनही स्वयंसेवकांच्या तुकड्या तेथें येऊन सामील होत. सर्वांत मुख्य केन्द्र विलेपार्ले येथें होतें. सुरुवातीपासूनच तेथें चिंचवड येथील पाठशालेंतील विद्यार्थ्यांची तुकडी अ. वा. सहस्रबुद्धे यांच्या नेतृत्वाखालीं; टिळक महाविद्यालय, पुणें येथील तुकडी रबडे यांच्या नेतृत्वाखालीं; अहमदनगर येथील तुकडी रावसाहेब पटवर्धन यांचें नेतृत्वाखालीं; याप्रमाणें अनेक जिल्ह्यांतून पायीं चालणाऱ्या सेवकांच्या तुकडया साऱ्या प्रदेशांतून प्रचार करीत दाखल झाल्या होत्या. शिस्तपालनाचें महत्त्व सर्वांस इतकें वाटे कीं, महाराष्ट्राचे सर्वाधिकारी देव यांनीं डॉ. लागूंस एकदां सत्याग्रहासाठीं पुण्याहून बोलाविलें असतां लागू संस्थेचें ट्रस्टडीड करण्याच्या गडबडींत असल्यामुळें एक दिवस उशीरां येऊं शकत होते, पण तेंही सांगण्यास ते पुण्याहून विलेपार्ल्यास स्वतः आले.

या चळवळीच्या निमित्तानें परदेशी कापड-बहिष्कार, दारूगुत्त्यांचें निरोधन, परदेशी फटाकडयांवर बहिष्कार व शिरगणती-बहिष्कार जारीनें अमलांत आले. पोलिसांवर जनता इतक्या कडकपणें बहिष्कार घालीत असे कीं, त्यांना अन्न मिळणें मुष्किल होई.

विलेपार्ल्याच्या छावणींतून शेठ अबदुल्ला यांच्या नेतृत्वाखालीं सुमारें ७५ स्वयंसेवक धारासणाला पाठविण्यांत आले. ३१ मे १९३० रोजीं त्यांपैकीं ५९ निवडक स्वयंसेवकांची तुकडी मिठागरावर चाल करून गेली. साऱ्यांनीं घोडयांखालीं आपले देह दिले व बाबू हुले हुतात्मा बनला.

टिळक विद्यापीठाचे ४५ पदवीधर, ८५ अध्यापक, १९२ माजी व १०८ विद्यमान विद्यार्थी अशा ४३० जणांनीं चळवळींत सर्व प्रकारें भाग घेतला. पैकीं २६४ जणांस तुरुंगवास मिळाला.

सर्वांत क्रांतिकारक गोष्ट म्हणजे महाराष्ट्रांतील महिला प्रबुद्ध होऊन उठल्या व त्यांनीं वीरोचित सामर्थ्यानें प्रशंसनीय कामगिरी करून दाखविली. खान-देशांत ठकारांच्या पत्नी श्री. पार्वतीबाई, दास्तान्यांच्या पत्नी श्री. वारूबाई व पुणें येथील सूत कमिटीच्या सभासद श्री. सत्यभामाबाई कुवळेकर यांनीं भुसावळ, जळगांव, वरणगांव, एदलाबाद, चांगदेव, यावल वगैरे ठिकाणीं

फिरून खूप जागृति केली. येवलें येथें आपटेगुरुजी चळवळ चालवीत. ते सप्टेंबरांत पकडले गेल्यावर त्यांच्या कर्तृत्ववान् पत्नी श्री. राधाबाई आपटे यांनीं विनयमंदिरांतील एक शिक्षक ल. ब. कुळकर्णी यांच्या मदतीनें चळवळ चालू ठेविली; न बोलतां राधाबाईनीं काम केलें. एकदां तर पोलिसांचा कायमचा निकाल करण्यास दोन तीन हजार लोक लाठ्या घेऊन धांवत आले असतां, आपल्या अंगच्या जातीय अहिंसेनें स्फुरून राधाबाईनीं त्यांस व्रतपालनाची आठवण करून दिली; व ते सारे लोक लाठ्या टाकून निघून गेले. अनसूयाबाई काळे या मध्यप्रांतांतील कायदेमंडळाच्या सभासद होत्या. त्यांनीं अत्याचारांच्या निषेधार्थ आपल्या जागेचा राजीनामा दिला व कायदेभंग करून त्या तुरुंगांत गेल्या. मध्यप्रांतांतही श्री. दुर्गाबाई जोशी, मालतीबाई थत्ते वगैरे स्त्रियांनीं सत्याग्रहांत भाग घेऊन तुरुंगवास पत्करला.

पुण्यास जी स्त्रियांची सूत कमिटी दहा वर्षे चालली होती तिनेंही गाजावाजा न करितां आपलें कार्य चालू ठेविलें होतें. महाराष्ट्रांत काय किंवा इतरत्र काय, असहकार-युगापासूनच स्त्रिया राजकारणांत भाग घेऊं लागल्या. पुण्यांतील अशा स्त्रियांपैकीं सत्यभामाबाई कुवळेकर, आनंदीबाई जोगळेकर, द्वारकाबाई गुर्जर, रमाबाई बिनीवाले वगैरे होत. यशोदाबाई भट या पूर्वी मुंबईस कार्य करीत. त्या चळवळीपूर्वी पुण्यास येऊन राहिल्या होत्या; व त्यांनीं प्रांतभर दौरे काढून, कीर्तनें करून जागृति केली. पुण्यास जें स्वयंसेवक-शिबिर स्थापलें होतें त्यांत स्त्रियाही होत्या. सुरुवातीस बाळूकाका शिबिराधिपति होते. ते महिन्यांत पकडले गेल्यावर तात्या देशपांडे, जे नगर जिल्ह्यांत आश्वी गांवीं शेतीच्या प्रयोगांत होते ते, तो प्रयोग सोडून, शेती पूर्ण मोडून या चळवळींत भाग घेण्यास मुद्दाम पुण्यास आले व शिबिराधिपति बनले. या शिबिरामार्फत सोलापूरच्या लष्करी कायद्याविरुद्ध झेंडा-सत्याग्रह सुरु झाला, परदेशी कापडाचें निरोधन अत्यंत कडक रीतीनें करण्यांत आलें. जूनमध्यें गांधी-दिनाचे दिवशीं शिबिरांतील या स्वयंसेवकांच्या मिरवणुकीवर लाठीहल्ला करण्यांत आला. त्या वेळीं शिबिरांत ७५वर स्वयंसेवक व जवळजवळ २५ पर्यंत स्त्रिया असत. स्त्रियांवर देखरेख यशोदाबाई व सत्यभामाबाई ठेवीत. नंतर कांहीं दिवसांनीं श्री. लक्ष्मीबाई ठुसे या दाखल झाल्या. लक्ष्मीबाई या मूळ खोपोलीच्या.

वयाच्या अकराव्या वर्षी त्यांना वैधव्य आलें. नंतर त्या इंदुरास जाऊन मिड-विफ्रीचें शिक्षण घेऊन मुंबईस नर्सचा व्यवसाय करीत होत्या. चळवळीपूर्वी कांहीं काळ त्यांनीं आळंदीस गरीबांची सेवा केली. चळवळ सुरू होतांच त्यांनीं शिबिरांत आपलें नांव दिलें. ३ महिने त्या सर्वाधिकारी होत्या. या सर्व स्त्रियांनीं कमालीचे कष्ट करून चळवळीस सहयोग दिला. एकंदर प्रांतांतून सुमारें १००-१२५ स्त्रिया तुरुंगांत गेल्या. लाठीमार खाण्यासही स्त्रियांनीं कमी केलें नाहीं आणि प्रभातफेऱ्यांतून स्वतः भाग घेतला, तसा आपल्या सुनां-लेकींकडूनही घेवविला. स्वयंसेवकांच्या खाण्यापिण्याची सोय करणें, घायाळांची शुश्रूषा करणें, अडलेल्यांस आर्थिक मदत करणें हीं कामें तर सर्रास स्त्री-समाज करीतच होता. परदेशी कापड व दारू यांवर निरोधन करणें हें काम महात्मा-जींनीं त्यांनाच नेमून दिलें होतें. विमलाबाई गुते यांनीं चिरनेरला आपलें देश-सेविकांचें पथक नेलें होतें. पनवेलमधें स्त्रियांचें एक स्वतंत्र शिबिर चाललें. त्याच्या चालक मथुराबाई गांगल, इंदिराबाई पटवर्धन, या असून मनूताई आपटे, कस्तूरबेन ठक्कर वगैरे स्त्रियांनीं चळवळींत भाग घेतला होता. वेसाव्या-च्या गंगूबाई नाखवा यांचा उल्लेख मागें आलाच आहे. जंगल-सत्याग्रहांत भाग घेणाऱ्या शेंकडों अशिक्षित पण शूर शेतकरी स्त्रियांचीं नांवें तर इतिहासा-ला ज्ञातही होणार नाहींत.

स्त्रियाच समरांगणावर दाखल झाल्या तेथें सारीं कुटुंबेंच्या कुटुंबें त्यांच्या मागून जातील यांत काय नवल ! लहान बालकें सुद्धां निर्भय बनून प्रभात-फेऱ्यांतून भाग घेत होतीं, परदेशी फटाकड्यांचा मोह सोडीत होतीं, खादीचे कपडे मागत होतीं. देशाचा आत्माच नवयुगाच्या अमृतसागरांत मग्न झाला होता. त्यांत अवगाहन करून उत्थान पावलेले हे नव्या पिढीचे “ अमृतस्य पुत्राः ” राष्ट्रसेवेच्या महोत्सवांत आनंदाचें लास्य करीत होते !

१९३० च्या चळवळींत महाराष्ट्रांतून जवळ जवळ ४००० लोक तुरुंगांत गेले. महाराष्ट्र कॉंग्रेसपक्षानें आपल्या जाहीरनाम्यांत १०० सैनिकांची मागणी केली होती, तिला हें उत्तर मिळालें. महाराष्ट्रानें पैसाही अपार ओतला; आणि ज्यांच्या सेवेचें व दानाचें मोजमाप होऊं शकलें नाहीं त्या मूक सेवा करणाऱ्या हजारों सेवक-सेविकांचा उल्लेख कसा करावा ?

या अपूर्व लढ्याचा परिणाम समाजाचे विचार, भावना, कल्पना, वर्तमानपत्रें या सर्वांवर झाला होता. रसिक लोकांना नाटक-सिनेमा पाहणेंही रुचत नव्हतें. जीवनांतच अद्भुतरम्य काव्य निर्माण होतांच कृत्रिम काव्यनाटकांमागें कोण धांवणार? तरीसुद्धां लक्षांत घेण्यासारखी गोष्ट म्हणजे पंधरावें महाराष्ट्र साहित्यसंमेलन लढ्याच्या ऐनकाळांत भरलें असतां अध्यक्ष वामन मल्हार जोशी "सौंदर्य व आनंदमीमांसा" चर्चीत होते आणि ज्या सत्याग्रहामुळें एकंदर समाजाच्या जीवनांत अपूर्व सौंदर्य व आनंद यांचें साम्राज्य पसरलें होतें त्याचा उल्लेखसुद्धां त्यांनीं अजीबात गाळला होता! साहित्यांतील आत्मा नष्ट झाला होता!

अनेक वर्तमानपत्रांना दंड झाले तरी त्यांनीं चळवळीला उचलून धरण्याचें सोडलें नाहीं. 'लोकशिक्षण' मासिकानेंही या बाबतींत उत्तम कामगिरी बजाविली व सत्याग्रहाचें शेवटपर्यंत समर्थन केलें.

मध्यप्रांत-वऱ्हाडकडे देखील चळवळ गाजली. महात्माजींना सरकारनें तुरुंगांत पाठवितांच अणे यांचा देशाभिमान जागृत होऊन उठला व त्यांनीं कायदेमंडळांतील आपल्या जागेचा राजीनामा दिला. सुरू झालेलें सत्याग्रहयुद्ध आपणांस स्वातंत्र्याकडे नेईल अशा श्रद्धेनें त्यांनीं युद्धांत उडी घेण्याचें ठरविलें. त्यांच्यांतील लढवय्या वृत्ति त्यांना मजा पाहत बसूं देईना. वऱ्हाड प्रांतिकचे अध्यक्ष वीर वामनराव जोशी यांजकडे त्यांनीं 'सत्याग्रही सैनिक' म्हणून स्वतःचा स्वीकार करण्याबद्दल अर्ज केला. अर्थात् अणे यांच्या कर्तृत्वशाली व्यक्तिमत्त्वाचा परिणाम चहूंदिशीं झाल्याविना राहिला नाहीं. सत्याग्रहाचा वणवा देशभर पेटला असतां वऱ्हाड-मध्यप्रांत मागें राहिलेच नसते. पण अण्यांच्या धडाडीमुळें पक्षोपपक्षांतील मतभेदाचा प्रश्न मिटला व महाराष्ट्राप्रमाणें नांवापुरता का होईना सवता सुभा न होतां, कॉंग्रेसचा एकहाती कारभार सुरू झाला. अण्यांनीं पुसद येथें जंगल-सत्याग्रहांत कायदेभंग करून तुरुंगांत पाऊल टाकलें. त्यांच्या मागोमाग डॉ. मुंजे, जतकर, टेंबे, ओक, बापट वगैरे त्यांचे मित्रही कायदेभंग करून तुरुंगांत गेले. वीर वामनराव जोशी, बॅ. अभ्यंकर, डॉ. शिवाजीराव पटवर्धन वगैरे मंडळीही तुरुंगांत जातच होती. सत्याग्रहयुद्धानें कॉंग्रेसमधील वाद मिटवून सर्वांचा एकोपा करून दिला व एकसूत्रीपणानें संघटनेचा जोर कसा वाढतो त्याचीही प्रतीति सर्वांस आणून दिली.

हिंदुस्थानांत चळवळीचें रूप दिवसेंदिवस उग्र होतांच सरकारचें धाबें दणाणलें. प्रतिसहकारपक्षाचे एक अध्वर्यु जयकर यांनीं हिंदुस्थानांत तड-जोडीचे प्रयत्न सप्रूंच्या मदतीनें केले ते व्यर्थ गेले. नंतर ते लंडनला गोलमेज परिषदेंत भाग घेण्यास गेले.

पहिली परिषद ऑक्टोबरमध्यें भरली. ती लांबत चालली तशी इकडे हिंदुस्थानांतील परिस्थिति आटोक्याबाहेर जात चालली. त्या वेळीं मजूर मंत्रि-मंडळ अधिकारारूढ होतें. मॅक्डोनल्ड मुख्य प्रधान व बेन भारतमंत्री होते. पं. मोतीलाल नेहरू यांनीं मुंबईच्या गिरणीवाल्यांशीं करार केला होता त्याचा परिणाम होऊन ब्रिटिश मालावर हिंदुस्थानांत पडलेला बहिष्कार इंग्लंडला फार जाणवला. तशांत हिंदुस्थान सरकारला राज्य चालवणें अशक्य होऊं लागलें. व्हाइसरॉयनें बेनसाहेबांना खलिता पाठविला, "अशीच परिस्थिति राहि-ल्यास मला देशभर लष्करी कायदा पुकारावा लागेल." लंडनमध्यें गोलमेजा-भोंवतीं इंग्लंड-हिंदुस्थानांतील शहाणे व दूरदर्शी लोक बसून समता-स्वातंत्र्या-च्या गोड गोष्टी बोलत असतां व हिंदुस्थानचें भव्य भवितव्य चर्चेवाटे रचीत असतां, खुद्द हिंदुस्थानांत भयानक वातावरण निर्माण व्हावें ही गोष्ट तितकीशी प्रशस्त नव्हती. मॅक्डोनल्डसाहेबांनीं १९ जानेवारी १९३१ रोजीं हिंदुस्थानास जबाबदारीचें स्वराज्य देण्याची घोषणा केली व सातच दिवसांनीं भारतवर्षाचा विजयी नेता आपल्या सोबत्यांसहवर्तमान कारागृहांतून मुक्त होऊन बाहेर पडला!

ज्या अपूर्व शस्त्रापायीं महात्माजींस निंदा, अविश्वास, उपहास यांच्या रूपानें अनेक क्लेश भोगावे लागले होते, तें शस्त्र अशा प्रकारें राष्ट्रव्यापी पायावर उपयोगांत आणिलें जाऊन जगासमोर 'सिद्ध' होऊन उभें राहिलें तेव्हां साऱ्या देशानेंच नव्हे, तर तमाम जगतानें महात्माजींचा 'नवयुगाचा शांतिदाता प्रेषित' म्हणून गौरव केला.

५ मार्च रोजीं गांधी-आर्विन समेट होऊन चार दिवसांनीं देशांतील सर्व सत्याग्रही कैदी मुक्त झाले!

# ४ पंढरीचे वाटे । बाभळीचे कांटे ॥

न गणस्याग्रतो गच्छेत् सिद्धे कार्ये समं फलम् ।
यदि कार्यविपत्तिःस्यात् मुखरस्तत्र हन्यते ॥ —हितोपदेश

[ लोकांचा पुढारी होऊं नये. कार्यसिद्धि झाली तर सर्वांबरोबर सारखेंच फळ मिळतें; ( पुढाऱ्याला अधिक फळ मिळत नाहीं; ) पण जर का काम फसलें तर पुढाऱ्याला मार खावा लागतो. ]

सर्व कैदी तुरुंगांतून सुटतांच प्रांतभर विजयमहोत्सव सुरू झाला. " आपण जिंकलों, सरकारची जिरवली " याच कल्पनेचा उन्माद सर्वांच्या डोळ्यांवर चढला होता.

स्थूलदृष्टीनें चळवळींत पडलेल्या सर्व व्यक्तींच्या भावनेचें अधिष्ठान स्वातंत्र्यावर होतें तरी अनेक लोक अनेक मतलबांना वश होऊन महापुरांत उडी टाकते झाले. ज्यांनीं वर्षानुवर्षें ध्येयसृष्टीच्या मागें लागून आपलें उत्तम आयुष्य झिजविलें होतें असे कार्यकर्ते समुदायाच्या दृष्टीनें थोडे होते. सामुदायिक कायदेभंगांत साधारण जनतेनें भाग घेतला तो सहसंवेदनांच्या अनुभूतीनें घेतला. प्रचंड धरणीकंपाप्रमाणें चळवळीनें समाजाची उलथापालथ करून टाकिली. तडजोड झाली तरी अजून चळवळ संपली नव्हती. कारण ज्या स्वराज्यलाभाच्या आशेनें हें आंदोलन करण्यांत राष्ट्रानें आपल्या तनुमनधनाचा स्वाहा केला तें स्वराज्य अजून दूर होतें. ब्रिटिश सत्ता अजूनही गोलमेज परिषदेचें मोहनास्त्र पुढें करीत होती. ब्रिटिश सत्तेचें आमंत्रण स्वीकारावें कीं नाहीं याचा निर्णय करण्याकरितां कराचीला कॉंग्रेसचें अधिवेशन मार्चअखेर भरणार होतें.

दरम्यान लाहोर-कटांत सांपडलेले भगतसिंग, राजगुरु, सुखदेव या तिघांस फांशीची शिक्षा होऊं नये म्हणून कॉंग्रेस-पुढाऱ्यांनीं केलेले प्रयत्न व्यर्थ जाऊन त्यांस सरकारनें फांशीं दिलें. तिकडे कानपुरास हिंदुमुसलमानांचे

दंगे होऊन त्यांचा उपशम करण्याचा प्रयत्न करणारे श्री. गणेश शंकर विद्यार्थी दंग्यांत मारले गेले. हे कराचीच्या अधिवेशनास अपशकुनच झाले!

पण अधिवेशन ही नैमित्तिक गोष्ट होती. तिच्या नादांत प्रांताचें राजकारण कसें विसरून जातां येईल ! महाराष्ट्रांतील कार्यकर्ते सुटून आपापल्या स्थानीं येतांच खल सुरू झाला.

ग. वि. केतकर अजून प्रांताध्यक्ष होते. अर्थात् प्रांतिक कमिटी अजून देवांच्या ताब्यांत आली नव्हती. देवांनीं महाराष्ट्र काँग्रेसपक्ष स्थापून, स्वतंत्र सत्याग्रह-मंडळ काढून महाराष्ट्रांतील चळवळ चालविली होती. सत्याग्रह-कालांत एक प्रकारची संघटना प्रांतांत निर्माण झाली होती व तीमुळें महाराष्ट्र उज्ज्वल कार्य करूं शकला. देवांची इच्छा ही संघटना पुढें कायम टिकवावयाची होती. नव्या युगाच्या अवताराबरोबर प्रांतांत नवीन जीवनक्रम सुरू करण्याची आवश्यकता त्यांना वाटत होती. आणि तशी ती इतरही अनेक कार्यकर्त्यांना वाटत असावी. महाराष्ट्राची प्रगति व्हावी असें इच्छिणाऱ्या अनेक जीवांना ती इच्छा नसेल असें म्हणवत नाहीं. पण त्यांत जबाबदारीनें पुढाकार घेणारे देवच निघाले.

एका लेखकानें म्हटलें आहे कीं, "महान् प्रसंग सामान्य मनुष्यालाही महान् बनवितो." देवांच्या बाबतींत कांहीं अंशीं तसें झालें. टिळकांच्या मागून केळकर स्वतःस महाराष्ट्राचे पुढारी म्हणवूं लागले. परंतु महाराष्ट्रांतील एका गटाचें नेतृत्व म्हणजे महाराष्ट्राचें नेतृत्व म्हणतां येणार नाहीं. महाराष्ट्रांतील मूक जनता जागृत झाली नव्हती तोंपर्यंत, महात्माजींच्या अजस्त्र बलौघाशीं टक्कर खाण्याचा प्रयत्न, त्यांनीं महाराष्ट्राच्या नांवानें केला व कांहीं अंशीं त्यांचें बंड सफल झालें. १९३० च्या प्रचंड चळवळींत महात्माजी राष्ट्राचे एकमात्र नेते सिद्ध झाले आणि महाराष्ट्रानें त्यांची आज्ञा वंद्य मानून एकमुखानें त्यांचा जयजयकार केला. त्या महापुरांत जुने विचार व त्यांचे प्रवर्तक वाहून गेले आणि नवा महाराष्ट्र आपल्या संपूर्ण ऐश्वर्यांत उदयास आला. महाराष्ट्रांतील लोकशक्ति जागृत होतांच, पुरुषार्थी मनुष्याशिवाय अन्य कोणालाही प्रांत आपला नेता म्हणून कबूल करील हें असंभवनीय होतें. समस्त भारतवर्षाचा नेता सिद्ध झाला; तरी प्रांतीय नेता असण्याची आवश्यकता होतीच. एरवीं राजकारणाचा झाला तरी संघटित प्रचार कसा होऊं शकला असता ?

परंतु राजकारणांत लोकांनीं स्वयंवर करावयाचें नसतें. पुढारी आपल्या पुरुषार्थानेंच किंवा संघटनाचातुर्यानें लोकांस वश करून आपल्या ताब्यांत आणितो. तो महान् विभूति असेल तर लोक भावनावश होऊन सुद्धां त्याच्या भजनीं लागतात. तो सामान्य मनुष्य असेल, परंतु दोनचार गुण जरी त्यांत प्रामुख्यानें वसत असतील तर दीर्घकालच्या श्रमांनीं तो लोकांचा विश्वास संपादन करितो. आणि पुष्कळ वेळां परिस्थितिही मनुष्याला योग्यतेला चढविते.

महाराष्ट्रानें महात्माजींचें नेतृत्व स्वीकारतांच त्यांच्या विचारशैलीचें समर्थन करणाऱ्या पुढाऱ्याची आवश्यकता त्याला भासूं लागली. १९२० पासून महात्माजींचें नेतृत्व मानणारे व त्यांच्या विचारपद्धतीप्रमाणें आपलें जीवन घडविणारे अनेक महाराष्ट्रीय राजकारणी लोक होते. परंतु प्रांतीय नेतृत्व स्वीकारण्याची योग्यता साऱ्यांतच नव्हती. आश्रमीय जीवनाच्या विकासांतच अंतिम साफल्य मानणारे प्रांतीय राजकारणापासून दूर राहिले. निवळ खादी-कार्य किंवा राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य करणारे मर्यादित क्षेत्रांत स्वतःस बांधते झाले. पुष्कळांचें राजकारण जिल्ह्यांपुरतेंच मर्यादित होतें. प्रांतीय संघटना करण्यास राजकारणाचा वेध घेण्याची जी शक्ति लागते व स्वतःच्या कर्तबगारीबाबत जो आत्मविश्वास लागतो, तो असल्याशिवाय व जोडीला चोवीस तास त्याच कार्यांत रत राहण्यासारखी परिस्थिति असल्याशिवाय पुढारीपण मिळत नाहीं. देवांनीं दहा वर्षें चिकाटीनें प्रांतीय राजकारणांत भाग घेतला होता, कष्ट सोसून, प्रतिपक्षाशीं कधीं झुंजून, तर कधीं बरोबरीच्या दर्जानें समेट घडवून आणून, आपली प्रतिष्ठा समाजावर बसविली होती तीमुळें १९३० च्या आंदोलनांत त्यांच्या अंगच्या कर्तबगारीला वाव मिळाला, क्षेत्र मिळालें व त्यामुळें ते क्षेत्रपाळ झाले.

परंतु महाराष्ट्रांत– स्वतःच्या बुद्धिशक्तीची घमेंड बाळगणाऱ्या महाराष्ट्रांत– थोर व्यक्तींचाही आपल्या अहंमन्यतेंत व हेकडपणांत छळ करणाऱ्या महाराष्ट्रांत– नेता बनणें ही गोष्ट सोपी नव्हती. संघटनाकर्त्याची आवश्यकता असूनही महाराष्ट्र नेतृत्वस्वीकृतीला सुखासुखी तयार झाला नाहीं.

सर्वे यत्र प्रणेतारः सर्वे पंडितमानिनः ।
सर्वे महत्त्वमिच्छन्ति ...............

अशी स्थिति महाराष्ट्रांत अजूनही कायम होती. देवांची उणीवही कमी नव्हती. त्यांनीं बहुजनसमाजाला आपला अनुयायी बनविलें नव्हतें. सामान्य लोकांत त्यांची छाप बसली नव्हती. कार्यकर्त्यांत त्यांचा एक गट होता परंतु तो त्यांना पूर्णपणें वश नव्हता. महात्माजींचे अनुयायी म्हणून गांधीविचारांचा प्रेमी असा एक गट महाराष्ट्रांत होता व ते सर्व एका उद्दिष्टासाठीं एकी करीत. परंतु परस्परांत परस्परांविषयीं बंधुभाव नव्हता. सारेच देवांचे समकालीन होते व त्यांचेकडे ते बरोबरीच्या दृष्टीनेंच पाहत. कार्याच्या दृष्टीनेंही जाहीर जीवनांत साफल्य मिळविण्यासाठीं सर्वांनीं एका व्यक्तीच्या नेतृत्वाखालीं संघटित झालें पाहिजे हें कोणालाच सुचत नव्हतें; सुचत असल्यास कोणी त्या दिशेनें प्रयत्न करीत नव्हते. देवांच्या स्वभावांतही महाराष्ट्रीय तुसडेपणा सुरुवातीस तरी भरपूर होता. वैयक्तिक स्नेहसंबंध वाढविण्याचा व लोकांस आपलेकडे आकर्षून घेण्याचा त्यांनीं प्रयत्न केला नाहीं. ज्या हरोलीकरांनीं त्यांच्याबरोबर दोन वर्षे कारागृहवास भोगला त्यांच्याशीं त्यांचें तुरुंगांतच भांडण झालें. देवांचे अनेक सोबती त्यांच्यावर रुष्ट असत. कारण स्नेहाचा ओलावा देवांकडून कधींही कोणासही मिळणें अशक्य होतें. लोकानुरंजन ही लोकसंग्रहांत फार मोठी बाब आहे व स्नेहाशिवाय तें होतही नसतें. पण देवांची विचारसरणीच वेगळी होती. “ लोकांनीं कार्याकडे पाहून संघटना करावी; वैयक्तिक मोहांत पडूं नये ” असें त्यांचें मत असे. तें त्यांना फार जाचक झालें.

कसेंही असो, १९३० च्या चळवळींत देवांनीं महाराष्ट्रांतील चळवळीस संघटित रूप दिलें. त्यांना प्रापंचिक स्वार्थ नव्हता, आप्तेष्टांचा पाश नव्हता आणि नवे आप्तसंबंध वाढविण्याची इच्छा नव्हती. ते कोणाची नोकरीही करीत नव्हते. त्यामुळें महाराष्ट्राची संघटना हें जें त्यांचें आवडतें उद्दिष्ट त्यासाठीं त्यांना अहोरात्र वर्षानुवर्षे परिश्रम करता आले. स्वतःच्या शक्तीवर त्यांचा पूर्ण विश्वास असल्यामुळें सोबत्यांस आवडो वा न आवडो, ते स्वतःस त्यांच्यावर लादीत गेले.

कराचीस कॉंग्रेस-अधिवेशनप्रसंगीं सर्व महाराष्ट्रीय कार्यकर्ते एकत्र आले असतां देवांनीं महाराष्ट्राच्या संघटनेची कल्पना सर्वांसमोर ठेविली; पण

कोणी फारसा उत्साह दाखविला नाहीं. सर्वांचा आदर, विश्वास व प्रेम यांस पात्र असलेली व्यक्ति सर्वांपेक्षांही वरचढ असावयास हवी होती. तशी कोणीच न आढळल्यामुळें काम नीटसें वठलें नाहीं. एका कार्यकर्त्यानें तर देवांस " आम्ही तुम्हांस आमचे पुढारी मानीत नाहीं " असें स्पष्ट सांगितलें. असें झालें तरी प्रांतिक कमिटी गांधीविचाराच्या लोकांच्या हातीं असली पाहिजे यावर सर्वांचें एकमत होतें. एक तात्पुरतें मंडळ पुण्यास काढावयाचें ठरलें. अध्यक्ष देव व चिटणीस तात्या देशपांडे ठरले. या प्रसंगानंतर तात्यांचा देवांशीं घनिष्ठ संबंध जुळून आला व तात्या प्रत्येक बाबतींत देवांचे विश्वासपात्र बनले. या संघटनाबैठकींत स्वामी आनंद यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. मंडळी पुण्यास आल्यावर काम सुरू झालें.

लवकरच प्रांतिक कमिटीच्या निवडणुकी आल्या. प्रलयानंतर नवी सृष्टि रचण्याचें काम आलें. राजकीय संघटना करावयाची म्हणजे राजकीय अधिकार कोणाच्या हातीं द्यावे, त्यांची वांटणी कशी व्हावी, ती निःपक्षपातीपणानें कशी व्हावी वगैरे गोष्टींचें महत्त्व मनांत बाळगून करावी लागते. सत्याग्रहापूर्वी प्रांतिकचा चालू असलेला अधःपात ज्या कार्यकर्त्यांना असह्य वाटत होता, त्यांचें आतां कर्तव्य होतें कीं, प्रांतिकची पुनर्घटना नव्या पायावर करून जबाबदारी योग्य व्यक्तीच्या शिरावर द्यावी. सत्याग्रहकालांत सर्वकाल बाहेर राहून प्रांताचीं सूत्रें चालविणारी एकाकी व्यक्ति कोणीच नव्हती. परंतु आरंभकालीं तरी सर्व स्फोटक शक्तींना संघटितपणें कामास लावणारी व पुढील कार्याची दिशा लावून देणारी अशी एकच व्यक्ति होती व ती म्हणजे देव होत. अहर्निश राजकारणांत पडलेले, महात्माजींच्या सिद्धान्तांना मानणारे व वीरवृत्तीचे असे एकसमयावच्छेदेंकरून तेच एक कार्यकर्ते असल्यामुळें साहजिकच कित्येकजणांनीं अध्यक्षपदासाठीं त्यांचेंच नांव सुचविलें. त्यांनीं महाराष्ट्राची जी अनन्यसेवा केली होती तीबद्दल बक्षीस म्हणून नव्हे, तर त्या जबाबदार पदाला लायकही तेच होते म्हणून.

पण तत्कालीन राजकारण आरोग्यसंपन्न नव्हतें. १९३० पूर्वी दोन विरोधी पक्षांत झगडा चालत होता. आतां एका पक्षांतच फूट पडली; त्याला अनेक कारणें होतीं. राजकीय क्षेत्रांत विरोध नसेल तर त्यांत तिखटपणा

तरी कसा यावा ? देवांना सहन न करणाऱ्या कित्येक व्यक्ती होत्याच. अनेकांना भिन्नभिन्न कारणास्तव ते नको होते. शिवाय त्या जागेसाठीं स्वतःची लायकी समजणारे कित्येक होतेच. प्रांतिकचा अध्यक्ष हा प्रांताचा पहिला सेवक खरा; परंतु आदर्शवाद आणि व्यवहार हे एकत्र असतां व्यवहार आदर्शवादाला ग्रासून टाकितो. केवळ रानांत बसून जगाचा धिक्कार करणाऱ्या योग्यानें तपःसिद्धि मिळविली तरी जगाला त्याचें कांहीं वाटत नाहीं. परंतु जगांतील भौतिक पदाचा स्वीकार उच्च ध्येयानें प्रेरित होऊन करणाऱ्या ध्येयनिष्ठालाही जगाकडून मार खावा लागतो. आणि सरकारवर विजय मिळविल्यानंतर तर प्रांताध्यक्षाचें पद फारच बहुमानाचें वाटण्याजोगें होतें. तें फुकाफुकी कोण कां सोडील ?

देवांच्या विरुद्ध कारस्थानें सुरू झालीं. ग. वि. केतकर स्वतः उमेदवार राहिले व देवांनीं उभें राहूं नये म्हणून त्यांनीं महात्माजींना पत्र लिहून त्यांचा दाब देवांवर आणण्याचा विफल प्रयत्न केला.

तिकडे देवांच्या राजकीय आयुष्यांतील हा एक परीक्षेचा प्रसंग आला होता. ते उभे राहिले असते तर मताधिक्यानें निवडूनही आले असते. परंतु त्यांनीं आपल्या मनाशीं ठरविलें होतें कीं, कार्यकर्ते एकमतानें आपणांस बोलावतील तरच आपण उभे राहूं. नाहींपेक्षां निवडणूक लढवून वातावरण गढूळ करण्यांत अर्थ नाहीं. प्रांतांतील राजकारण शुद्ध व प्रागतिक राहावयाचें असेल तर जबाबदार कार्यकर्त्यांनें अनाग्रही व उदार राहिलें पाहिजे, असा विचार करून देवांनीं उमेदवारी केली नाहीं. केतकरांना प्रतिकूल असलेलेही प्रांतिकमध्यें कमी नव्हते. ते मनांतून केळकरपक्षाचे असल्याचें सर्वांना माहीत होतें. तेव्हां केतकरांस विरोध करण्यासाठीं न. वि. गाडगीळ उमेदवार म्हणून उभे राहिले. गाडगीळ देखील पूर्वी केसरीपक्षाचे व प्रतिसहकारपक्षीय होते. कित्येक दिवस ते 'मराठ्या'च्या संपादकवर्गांत होते. परंतु त्यांच्या प्रकृतीला नेमस्त राजकारण पसंत नव्हतें. युवकचळवळीपासून ते थोडथोडे 'पुरोगामी' बनत चालले. त्यांचा स्वभाव त्यागी, सढळ व बोलका असल्यामुळें तरुण मुलांचा त्यांचे घरीं अड्डा असे. युवकचळवळीपासून ते युवकांचे पुढारी मानले जाऊं लागले. सत्याग्रह-युद्ध

सुरू होतांच आपल्या धाडसी स्वभावास अनुसरून ते चळवळींत पडले व त्यांना शिक्षाही झाली. पुढें प्रांतिकच्या राजकारणांत अग्रेसर होण्याची इच्छा बळावून ते श्री. केतकर यांना विरोध करण्यासाठीं उमेदवार म्हणून उभे राहिले.

त्याच सुमारास सेनापति बापट आपल्या दीर्घ मुदतीच्या कैदेंतून सुटले. खरें पाहिलें असतां बापटांचा प्रांतीय राजकारणाशीं कधींही कसलाही संबंध नव्हता. चळवळप्रसंगीं तर ते तुरुंगांत होते. मुळशी-प्रसंगीं त्यांनीं सत्याग्रहाची केलेली विकृति सर्वांस माहीत होती. तरीसुद्धां बापटांना प्रांताध्यक्ष करावें अशी टूम हरोलीकर, बाबूराव गोखले, गणेशशास्त्री जोशी वगैरे लोकांनीं काढली. नाथ घाणेकर, बुवा गोसावी वगैरे सातारकर मंडळींनीं तिला उचलून धरिलें. त्यांना वाटलें, " यामुळें भांडणें मिटतील." देवांच्या मनःस्थितीची स्पष्ट कल्पना कोणास नसल्यामुळें त्यांच्या सेवेचा व संघटनाचातुर्याचा प्रभाव कदाचित् सभासदांवर पडेल असें समजून बापटांच्या पराक्रमावरून आणि त्यागावरून त्या वेळीं प्रांतांत जें भ्रममूलक तेजोवलय त्यांच्याभोंवतीं निर्माण झालें होतें त्याचा फायदा घेऊन देवांना टांग मारण्याचा व्यूह त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं रचला व बापटांच्या नांवाचा प्रचार करण्यास सुरुवात केली. देव उमेदवार राहणारच नव्हते. परंतु बापटांना अध्यक्ष करण्याचें कबूल करून प्रांतिकच्या सभासदांनीं आपली लायकी लोकांच्या निदर्शनास आणिली. बापट उभे राहतांच केतकर व गाडगीळ बसले व बापट प्रांताध्यक्ष झाले.

प्रांतिकचे चिटणीस सी. गो. रानडे झाले. तडजोडीच्या कालांत परदेशी कापडावर निरोधन करण्याचा कार्यक्रम अमलांत आणावयाचा होता. बापटांनीं त्या कार्याकडे आपलें लक्ष पुरविलें. प्रथम त्यांनीं पुण्यांतच तळ ठोकला. नंतर ठाणें, रत्नागिरी वगैरे ठिकाणीं त्यांनीं दौरा काढला. दरम्यान पुण्यास गोगटेप्रकरण झालें. मुंबई इलाख्याचे त्या वेळचे कामचलाऊ गव्हर्नर हॉटसन यांनीं गृहमंत्रिपदावर असतांना सोलापुरास लष्करी अंमल घडवून आणिला होता त्या व इतर जुलमी प्रकारांचा राग मनांत ठेवून गोगटे नांवाच्या विद्यार्थ्यानें भर समारंभांत हॉटसनवर गोळी झाडली. हॉटसनसाहेब वांचले पण गोगटे

पकडला गेला. खालच्या कोर्टांत त्यानें खरें कारण सांगितलें; पण वरच्या कोर्टांत कोणाच्या तरी शिकवणीवरून त्यानें आपली भूमिका बदलली. शिक्षा व्हावयाची ती झालीच, परंतु सेनापति बापटांना त्या भूमिकेबद्दल तळमळ वाटून "हृदयस्थ भगवन्तानें" त्यांना मार्ग दाखविल्यामुळें गोगट्यांना "त्यांच्या खऱ्या आत्मिक उन्नतीचा मार्ग" दाखविण्याच्या उत्कट इच्छेला बळी पडून त्यांना जस्टिस वाडियाचें घर व येरवडा तुरुंग येथवर फुकटचे फेरे घालावे लागले. गोगट्यांना लिहिलेल्या पत्रांत ते एके ठिकाणीं म्हणतात, "स्वतः माझी मनापासून अशी इच्छा आहे कीं, राष्ट्रसभेच्या अहिंसात्मक कार्यक्रमाला पूर्णपणें खरा खरा वाव मिळाला पाहिजे आणि असें माझें मत असल्याकारणानेंच मीं महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षाची जागा पत्करिली." **—आमचे सेनापति.**

दौऱ्यावर असतांना गोगटेप्रकरणाविषयीं कोणी कांहींही सवाल केल्यास बापट उत्तर देत, "मला वैयक्तिक खून करणें मान्य नसलें तरीही इतरांना त्यांचा हृदयस्थ श्रीहरी जें कांहीं सांगेल त्याप्रमाणें वागण्याचा पूर्ण हक्क आहे. तो कुणीही काढून घेण्याची भाषा बोलूं नये. तसें करणें सत्य, अहिंसा व लोकशाही या तत्त्वांविरुद्ध होईल." गोगट्यांच्या पत्रांत त्यांनीं लिहिलें होतें, "अहिंसात्मक कार्यक्रमाच्या उपयुक्ततेबद्दल जर कुणाचा माझ्याशीं मतभेद झाला आणि त्यानें तत्त्व म्हणून हिंसामार्गाचें अवलंबन केलें तर तो एक तत्त्वप्रेमी माणूस आहे म्हणून त्याच्या कृत्याचें समर्थन करणें हें मी माझें कर्तव्य समजतों. कारण माझ्या मतें कोणत्याही कृत्याचा बरे-वाईटपणा त्या कार्याच्या मागें असलेला विचार व भावना यांच्यावर अवलंबून असतो." **—आमचे सेनापति.**

बापटांनीं पत्रांतच लिहून थांबायचें ! पण "तोंडपाटिलकी ? सेनापतीचा नि तिचा उभा दावा" अशी परिस्थिति असल्यामुळें जाहीर सभांतूनही त्यांनीं आपले विचार "प्रांजलपणें बोलून दाखविण्यास आरंभ केला."

"कॉंग्रेसचा अहिंसात्मक कार्यक्रमच आपण अंमलामध्यें आणला पाहिजे. पण हा कार्यक्रम त्रिकालाबाधित आहे कीं नाहीं असें जर मला आपण विचाराल तर मला माझ्या अंतःकरणांतर्गत श्रीहरीच्या आज्ञे-

प्रमाणें आपणांला असें सांगावें लागेल कीं तो तसा नाहीं. इतिहासाची तशी शिकवणूक नाहीं. जरूर तर माझ्या देशबांधवांच्या रक्ताचा गंगानदी-एवढा पूर वाहायला मी लावीन असें महात्माजींनीं गोलमेजांत इंग्लिश मुत्सद्द्यांना बजावलें. गोष्ट मला मान्य आहे. पण या गंगेशीं कधीं कधीं शत्रूच्या रक्ताच्या यमुनेचा व शत्रूला मदत करणाऱ्या स्वबांधवांच्या रक्ताच्या सरस्वतीचाही संगम व्हावा लागतो असें प्राचीन तसाच अर्वाचीन इतिहास सांगतो."

अहिंसेवरची ही मल्लीनाथी बापटांना प्रांताध्यक्ष करून त्यांचा गुणगौरव करणाऱ्या कार्यकर्त्यांना किती पटली तें माहीत नाहीं; परंतु सरकारला या " कोहिनूर " हिऱ्याचा प्रकाश असह्य झाला. रत्नागिरी येथील भाषणाबद्दल त्यांना नोव्हेंबरमध्यें पकडण्यांत आलें व सात वर्षांची सक्तमजुरी ठोठावण्यांत आली.

दरम्यान १८ एप्रिल रोजीं अर्विन गेले व वुइलिंग्डन आले. मजूर मंत्रिमंडळ जाऊन कॉन्झर्वेटिव्ह पक्ष अधिकारांत आला. त्याबरोबर सरकारचें सारेंच धोरण बदललें. अर्विनच्या आग्रहावरून व स्वतःला विश्वास नसतांही केवळ काँग्रेसची आज्ञा म्हणून महात्माजी २९ ऑगस्ट रोजीं विलायतेस रवाना झाले. ते गेल्यावर चितगांव व हिजली येथिल भयंकर प्रकार घडून आले. संयुक्त प्रांतांत बिकट आर्थिक स्थिति निर्माण झाली. नोकरशाही झाल्या पराजयाचा वचपा काढूं इच्छीत होती. लोकही समजले होते, कीं आपली तपस्या अजून पूर्ण झाली नाहीं. अजून बलिदान द्यावें लागेल.

तेव्हां तडजोडीचा काळ म्हणजे तीव्र तपस्येचा काळ होता. कार्यकर्त्यांनीं व्यक्तिशः तो कसा घालविला तें ज्याचें त्याला ठाऊक. प्रांतीय स्वरूपांत त्यांच्या कर्तबगारीचें वर्णन वर केलेंच आहे. न्यायान्यायाचा विचार न करितां विवेकबुद्धीला दाबून क्षुद्र वासनांना मनसोक्त वागूं दिल्यानें अनर्थपरंपरा ओढवली. सत्याग्रहयुद्ध हें संकुचित राजकारणाचा परिपाक नसून त्याचा आधार त्याग, संयम व सर्वोदयवृत्ति आहे, ही गोष्ट कार्यकर्त्यांनीं लक्षांत घेतली नाहीं. सामाजिक जबाबदारीच्या जाणिवेनें कार्यकर्ते वागले असते, तर कर्तव्याचा दुःखद वाटणारा मार्गही अंतीं हितकर झाला असता. परंतु विधि-घटित तसें नव्हतें.

---

# ५ हृदय-मंथन

१९२८ मध्यें तुरुंगवास घडला तेव्हांपासून देवांच्या हृदयांत एक प्रकारचें परिवर्तन घडून येत होतें. तुरुंगांत त्यांची आध्यात्मिक वृत्ति फार बळावली होती. ज्ञानेश्वरी व उपनिषदांचा अभ्यास त्यांनीं पुष्कळ केला होता व अरविंदबाबूंच्या ग्रंथांचेंही परिशीलन केलें होतें. त्यामुळें तुरुंगांतून मुक्त झाल्यावर लगेच आळंदीकडे त्यांचे पाय वळले. पुण्यांत आल्यावर त्यांनीं नारायणशास्त्री मराठ्यांना बोलावून आणून त्यांचेकडून ब्रह्मचर्याचीं व्रतें समजावून घेतलीं. 'स्वराज्य' कचेरीमध्यें नंतर आध्यात्मिक चर्चेचा अड्डाच बसूं लागला. आणि १९३० ची चळवळ सुरू होऊन जर देवांच्या अंगच्या स्वाभाविक वीरवृत्तीला चोदना मिळाली नसती तर हें आध्यात्मिक वेड त्यांना कोठें घेऊन गेलें असतें, सांगतां येणार नाहीं.

आचार्य जावडेकरांचेमुळें देवांची आचार्य भागवतांशीं ओळख झाली. स्वतंत्रपणें जावडेकरांप्रमाणें भागवतांनींही निष्कर्ष काढला होता कीं, महाराष्ट्रां-तील राजकारणाचे सूत्रधार होण्याची योग्यता देवांच्याच ठायीं आहे; व म्हणून गांधी-नेतृत्वाचा महाराष्ट्रांत जम बसवण्याच्या प्रयत्नांत देवांचें प्रांतीय नेतृत्व फार आवश्यक असून तें सिद्ध होण्यासाठीं महाराष्ट्रांतील सर्व असह-कारितावाद्यांनीं एकजुटीनें प्रयत्न केले पाहिजेत.

समाजांतील प्रतिष्ठित लोकांच्या व कार्यकर्त्यांच्या दृष्टीनें देव अगदीं साधारण व्यक्ति होते. अगाध विद्वत्ता, थोर खानदान किंवा विपुल संपत्ति या सर्वांचा त्यांच्या ठिकाणीं अभाव होता. पहिल्या दोन गोष्टींच्या अभावामुळें प्रतिष्ठित लोकांवर प्रभाव पडणें असंभवनीय होतें. तिसऱ्या गोष्टीच्या अभावामुळें राजकारण करण्यास साधनसंपत्ति जुळवितां येत नसे. महाराष्ट्रांत अगोदर धनिकवर्ग नाहींच. सार्वजनिक कार्यकर्त्याला त्याचे कमावते नातलग किंवा समाजांतील मध्यमवर्ग वर्गणीच्या रूपानें द्रव्य देऊन पोसतात ही महाराष्ट्राची प्रथा आहे. परंतु महाराष्ट्रांत सुरुवातीचीं दहा वर्षें केसरीपक्षा-सारख्या सधन, प्रतिष्ठित व संघटित पक्षाशीं झुंज खेळणें व ती अहर्निश

खेळणें ही सोपी गोष्ट नव्हती. देव निष्कांचन होते तसे पोटासाठीं व्यवसायही करीत नव्हते. कारण व्यवसायामागें दिवसाचा उत्तम वेळ खर्च करावा लागतो. देवगिरीकरांसारखा बुद्धिमान्, सच्चरित्र गृहस्थ देखील सेवेची इच्छा असूनही या नोकरीपायीं कुंठित झाला. परंतु स्वाभिमानास वश होऊन देवगिरीकरांनीं स्वकष्टानें निर्वाह करणें योग्य मानलें. लोकांचें ओशाळें होणें त्यांस आवडलें नाहीं.

ही एक मनोवृत्ति झाली. समाजाची चोवीस तास सेवा करणाऱ्या सेवकाला समाजानें पोसणें त्याचें कर्तव्य ठरतें. त्यांत मिंधेपणाची लाज सेवकाला वाटूं नये किंवा हा आपल्यावर भार आहे असें समाजाला वाटूं नये. देव सुरुवातीस प्रांतिकचे चिटणीस असतां अध्यक्ष केळकरांनीं त्यांस पगार सुरू केला होता; पण पुढें वैमनस्य उत्पन्न होतांच तो त्यांनीं बंद केला. देवांचे नातलग त्यांना मदत करण्याच्या ऐपतीचे नव्हते व त्यांनीं त्यांच्याशीं संबंधही ठेवले नव्हते. त्यांचे वडील देखील १९२५ पर्यंतच हयात होते. अशा वेळीं सुद्धां कांहीं काल त्यांच्या निर्वाहाची सोय खासगी रीतीनें झाली. परंतु ते १९३१ सालीं तुरुंगांतून परत येतांच त्यांच्या खासगी आयुष्यांतील एक दारुण घटना घडून आली व तीमुळें त्यांचा बराच काळ मानसिक संघर्षांत व क्लेशांत गेला.

तरुणवयांतच मनुष्याची साधक दशा सुरू झाली पाहिजे. नुसत्या साध्याच्या चर्चेंतच मस्त न राहतां साधनांचाही विचार केला पाहिजे; म्हणजेच जीवनाला योग्य वळण तो लावूं शकतो. त्यासाठीं अप्रमादी राहण्याची फार आवश्यकता असते. तसें न झालें तर तरुण आत्मवंचक बनून आयुष्यांत क्लेश उत्पन्न करितो. त्याच्या वृत्ति शुभ असतील तर थोड्या काळानें सुद्धां तो जागृत झाल्याविना राहणार नाहीं. परंतु या जीवनक्रान्तीच्या संधिकाळांत जुनें तोडून नवें सुरू करण्याच्या प्रयत्नांत थोड्याथोडक्या अडचणींचा व मानसिक वेदनांचा सामना करावा लागत नाहीं ! देवांच्या आयुष्यांत तसेंच झालें. परंतु ते कमकुवत किंवा अश्रद्धालु नव्हते. त्यांच्यांत विलक्षण दृढता होती. त्यामुळें त्यांनीं या प्रसंगांतून रस्ता काढण्यासाठीं खडतर प्रयत्न केले व पहिलें पाऊल म्हणजे स्वतःच्या निर्वाहाचें एकमात्र साधन तें सदोष असल्यामुळें त्यांनीं आपल्या हातानें दूर केलें.

यानंतर त्यांची कठीण अवस्था झाली. राजकारणांत ते फार पुढें गेले होते. आतां मागें पाऊल टाकणें अवघड होतें. किंवा केलेल्या पुरुषार्थावर पाणी सोडूनच निष्क्रमण करावयास मार्ग मोकळा होता. महाराष्ट्राबाबतचें देवांचें स्वप्न त्यांच्या दृष्टीसमोर सतत होतें. परंतु प्रांताचें नेतृत्व करणाऱ्याला जेथें स्वतःचें पोट भरण्याची अडचण उत्पन्न झाली तेथें तो समाजाचें काय कल्याण करणार ?

तुरुंगांत असतांना देवांची स्वामी आनंद यांच्याशीं खूप मैत्री जमली होती. स्वामी त्यांस नेहमीं महाराष्ट्राचें नेतृत्व घेण्यास सांगत व पैशाची मदत करण्याचें आश्वासन देत. परंतु देवांना आर्थिक मदतीबाबत स्वामींच्या शक्तीचा विश्वास कधींच वाटला नाहीं. त्यामुळें तुरुंगाबाहेर आल्यावरही त्यांनीं स्वामी आनंदांकडे कधींच गोष्ट काढली नाहीं. तिकडे प्रांतिक कमिटी-नेंही त्यांना उडवून लाविलें. देवांनीं महाराष्ट्राची जी सेवा केली होती तिच्या-बद्दल फलाकांक्षा त्यांनीं कधींच बाळगली नव्हती. परंतु अखिल महाराष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनें देवांच्या गुणांची व योग्यतेची कदर व्हावयास हवी होती तीही झाली नाहीं. तेव्हां देवांनीं ‘ वेळ अद्याप आली नाहीं ’ असें समजून मौनवृत्ति धारण केली.

परंतु अंतर्गत अडचणी वाढतच होत्या. त्यांतून मार्ग कसा काढणार ? त्यांच्या मानसिक क्लेशांची परमावधि होण्याचा प्रसंग येऊन ठेपला. त्यांचें मन कर्तव्याकर्तव्यतेच्या आंदोलनांत पडलें होतें. इलाज अजमावतां येईनात तेव्हां शांति मिळावी व चित्तशुद्धि व्हावी यासाठीं त्यांनीं चाळीस दिवसांचा उपवास सुरू केला.

आचार्य भागवत हे त्या वेळीं त्यांचे निकटवर्ति साथी होते. देवांविषयीं त्यांना पूर्ण सहानुभूति वाटत होती व त्यांच्यासाठीं त्या वेळीं भागवतांनीं वाटेल तो त्याग केला असता; परंतु देवांची अधिक कसोटी व्हावी अशी ईश्वराची इच्छा नव्हती. हितचिंतक मित्रांच्या उपदेशाविरुद्ध पण एका अटीवर देवांनीं उपवास सुरू केला होता. महात्माजींचा विलायतेला जाण्या-बाबत व्हाइसरॉयशीं पत्रव्यवहार चालू होता. योजना ढांसळून सत्याग्रहयुद्ध कधीं पुकारलें जाईल त्याचा नेम नव्हता. आणि युद्ध सुरू झाल्यास देवां-

सारखा मोहरा उपवास करीत बसणार हें प्रांतीय संघटनेच्या दृष्टीनें गैरहिताचें होतें; म्हणून देवांनीं वचन दिलें होतें कीं तसा प्रसंग आल्यास आपण उपवास सोडूं.

उपवासाच्या चौथेच दिवशीं मुंबईहून स्वामी आनंद स्वतः बातमी घेऊन आले कीं, "वाटाघाटी फिसकटल्या, चळवळ लवकरच सुरू होणार." आपली सामाजिक जबाबदारी लक्षांत घेऊन देवांनीं उपवास ताबडतोब सोडला, पण चळवळ कांहीं ताबडतोब घडून आली नाहीं. महात्माजींपुढें अखेरच्या पळास हार खाऊन व्हाइसरॉयनें त्यांच्या अटींस मान्यता दिली व महात्माजी विलायतेस निघून गेले. परंतु उपवास उगाच सोडला अशी हुरहुर देवांस लागली व भविष्यकाळीं कधीं तरी त्याची पूर्तता घडवून आणिली पाहिजे असा संकल्प त्यांनीं केला.

पुन्हा देवांपुढें प्रश्न उभा राहिला : पुढें काय? कोल्हापूरचे गो. वा. कुळकर्णी ऊर्फ दादा या वेळीं त्यांचेजवळ येऊन पोंचले होते. ते सालस व नेकीचे गृहस्थ असून मेहनती होते. त्यामुळें देवांस तशा व्यक्तीची गरज होतीच. शिवाय त्यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला आपलेकडे घेतली होती तिचेंही काम पाहण्यास लायक व्यवस्थापक हवा होता. आचार्य भागवतही त्या वेळीं त्यांचेजवळ होते. गो. दा. गोखले ऊर्फ भाऊ नांवाचे एक तरुण गृहस्थ, ज्यांनीं चळवळींत भाग घेऊन तुरुंगवास भोगला होता, त्यांचेजवळ येऊन राहिले होते. देवांचा पसारा वाढत होता; द्रव्याचीही आवश्यकता होती. द्रव्य आणावयाचें कोठून असा प्रश्न पडला. शेवटीं स्वामी आनंद मदतीस धांवले. त्या वेळीं महाराष्ट्र सेवा संघ नांवाची एक संस्था जमनालालजींच्या सदिच्छेनें स्थापन झाली होती. जमनालालजी तिचे अध्यक्ष आणि स्वामी आनंद व श्री. धोत्रे तिचे चिटणीस होते. संस्थेचा एक निधि होता. म. गांधी विलेपार्लें येथें गेले असतां त्यांस ५३,००० रुपयांची थैली देण्यांत आली होती. तिचा विनियोग हा निधि बनविण्यांत झाला. त्यांतून महाराष्ट्रांतील रचनात्मक कार्यकर्त्यांस मदत दिली जात असे. स्वामींनीं देवांस तिचे सभासद करून घेतलें व तिच्या निधींतून मासिक मदत देवविण्याची व्यवस्था केली तेव्हां देवांची आर्थिक अडचण कांहीं काळापुरती मिटली.

एवढें झालें तरी देवांची मनःस्थिति पालटली नाहीं. ते अधिकाधिक अंतर्मुख होत चालले. एकान्तसेवन, ग्रंथवाचन, स्नानसंध्या आणि विशिष्ट आहार हें त्यांचें जीवन होतें. त्यांच्याबद्दल मोठमोठ्या अपेक्षा बाळगणाऱ्या मित्रांना त्यांच्यांत झालेला हा पालट विचित्र वाटूं लागला. त्यांनीं पूर्वस्थितीवर यावें म्हणून त्यांनीं प्रयत्न चालविले परंतु यश येईना. सातारचे डॉ. आठल्ये त्यांच्या हितचिंतकांपैकीं एक होते. त्यांनाही देवांची वृत्ति पसंत पडली नाहीं. त्याबाबत त्यांचे कांहीं उद्गार कानीं आल्यामुळें देवांनीं पत्र लिहून "माझें कोठें चुकतें आहे?" अशी डॉ. आठल्यांस पृच्छा केली. डॉ. आठल्यांचें सविस्तर उत्तर वाचनीय असल्यामुळें तें येथें देण्यांत येत आहेः—

सातारा, ता. २४-११-३१

कृ. सा. न. वि. वि. परवांचें पोंचकार्ड पावलेंच असेल. अगदीं प्रथम लिहिणें इष्ट आहे कीं, श्री———च्या बोलण्यावरून आपलें कांहीं चुकतें आहे असें माझें मत असल्याचें आपल्याला वाटलें असल्यास तो गैरसमज आहे; तो दूर करावा.

आपण सध्यां स्वीकारलेली वृत्ति न आवडणें व ती चुकीचीच आहे असें म्हणणें ह्या दोन पूर्णपणें भिन्न गोष्टी आहेत.

श्री.———शीं बोलतांना मीं अशी प्रस्तावना केली होती कीं, "माझ्या-सारख्या सध्यां कांहीं विशेष करूं न शकणाऱ्या माणसास इतरानें अमुक करणें इष्ट आहे असें म्हणण्याचा सुद्धां अधिकार नाहीं." तथापि तुमचा व माझा मन-मोकळेपणाचा संबंध ध्यानांत घेतां माझ्या तुमच्याविषयींच्या अपेक्षा मीं—जवळ खुल्या अंतःकरणानें बोललों आणि त्या आजही ह्या पत्रांत लिहीत आहे. त्या लिहिण्यांत तुमची चूक दाखविण्याचा अथवा तुम्हीं अमुकच करावें असें म्हणण्याचा मला अधिकार पोंहोचतो अशी माझी समजूत नाहीं; असो.

आपण आपल्या सौजन्यास अनुसरून 'माझें कोठें चुकतें हें सांगा' असें लिहिलें आहे ह्याची मात्र मला पूर्ण जाणीव आहे.

१. आपण अगदीं प्रथम साताऱ्यांत आलांत तेव्हांपासून आपल्या सार्व-जनिक चारित्र्याकडे मी लक्ष देऊन पाहत आहे. महाराष्ट्राला, प्रचलित राज-कारणाला व परिस्थितीला धरून असणारा कोणी पुढारी नाहीं. आणि

म्हणून नवीन कार्यकर्त्यांपैकीं कोणाची तरी मान्यता जनतेच्या अंतःकरणांत वाढावी व त्याच्याकडून महाराष्ट्राला योग्य वळण मिळावें ही अपेक्षा. आणि आपल्या निष्ठायुक्त सार्वजनिक चारित्र्यामुळें आणि देशाकरितां आपण सर्व सांसारिक पाशांपासून मुक्त राहिल्यामुळें आपण हळूहळू जनतेला मान्य होऊं लागलांत. पुढें सत्याग्रहामध्यें आपण पुढाकार घेतल्यामुळें तर नव्या पिढीच्या अंतःकरणांत आपल्याविषयीं बलवत्तर आशा उत्पन्न झाल्या. आपण सुटून आल्यावर महाराष्ट्रीय तरुणांची संघटना होईल म्हणून कित्येक लोक चातका-प्रमाणें वाट पाहत होते. अजूनही कांहीं लोक वाट पाहत आहेत. अशा स्थितींत आपल्या ठिकाणीं सध्यां वसत असलेलें औदासीन्य व निराशेची छटा पाहून अनेक लोक निराश होऊं लागले आहेत; म्हणून मला आपलें औदा-सीन्य आवडत नाहीं.

२. गोलमेज परिषदेकडून म. गांधी परत आल्यावर हिंदुस्थानांत पुन्हा जोरा-चा सत्याग्रह होणार अशीं चिन्हें दिसत आहेत. पंजाब, बंगाल, संयुक्तप्रांत, गुजराथ, मद्रास इ० भागांत भिन्न भिन्न कारणांनीं सत्याग्रह पेट घेईल. त्या त्या प्रांतांत कोणाला तरी पुढारीपण असून तो तो पुढारी जनतेशीं संबंध ( नित्य-संबंध) ठेवून शक्य ती पुढची तयारी करीत आहे. गेल्या सत्याग्रहांत महाराष्ट्रानें जरी अनपेक्षित मर्दुमकी दाखविली तरी शिस्तीच्या दृष्टीनें अगदीं मोठ्या अधि-काऱ्यापासून सामान्य स्वयंसेवकापर्यंत अनेकांनीं लाजेनें माना खालीं घालाव्या लागतील अशा गोष्टी केल्या. शिवाय महाराष्ट्राचा अल्प सत्याग्रह मर्दुमकीचा झाला तरी त्याबद्दल आधीं विश्वास कोणासच नव्हता. महाराष्ट्राचें कांहीं जातिवंत शौर्य व महात्माजींची पुण्याई ह्यामुळें अनपेक्षित अशा गोष्टी घडून गेल्या. त्या गोष्टी विचाराच्या गणितांत बसत नाहींत असा पुनः दैवावर हवाला राहूं नये म्हणून आतांपासूनच महाराष्ट्रांत हालचाल होणें इष्ट असून आणि ती करण्याचें सामर्थ्य ( तुलनेनें ) तुमच्याइतकें इतरांत मला व्यक्तिशः दिसत नसल्यामुळें मला तुमचें औदासीन्य पटत नाहीं.

३. गुजराथ्यांच्या अथवा महात्माजींच्या नादानें व खेळवण्यानें महाराष्ट्र आपली manpower नाहींशी करीत आहे आणि पुनः कायदेभंग सुरू होण्याच्या वेळेस आम्ही इतिहासज्ञ, सूक्ष्मविचारशील, राजकारणपटु व विद्वान्

असें कांहीं महाराष्ट्रीय महाराष्ट्रीयांना कायदेभंगापासून मागें खेंचण्याचा आटो॰काट प्रयत्न करूं असा ध्वनि कांहीं कांहीं वर्तुळांतून निघूं लागला आहे. हा कुध्वनि बंद करून स्वार्थत्यागाचा योग्य ध्वनि महाराष्ट्रांत दुमदुमाविण्याचें कार्य त्वरेनें होणें जरूर आहे. हें महत्त्वाचें व जबाबदारीचें काम आपल्यासारख्यानें उत्साहानें मनावर घेतल्याशिवाय पार पडणार नाहीं असें वाटत असल्यामुळें आपल्या औदासीन्याबद्दल वाईट वाटतें.

४. ह्या सर्व मुद्द्यांवर आपलें असें उत्तर असावें (— च्या बोलण्यावरून व पत्राच्या रोखावरून) असें वाटतें कीं, "मी माझ्याकडून करतां येईल ती राष्ट्राची सेवा केली. राष्ट्राला माझी फारशी जरूरी दिसत नाहीं. माझी पात्रताच कमी असली पाहिजे. माझी पात्रता वाढली व लोकांना माझी जरूरी वाटली म्हणजे लोक माझी सेवा मागतील व मग मी ती करीन." ह्या विचारसरणींत आत्मनिरीक्षण आहे ह्यांत शंका नाहीं. परंतु ही विचारसरणी मला पटत नाहीं. कारण तुमची किंवा कोणाचीही पात्रता ओळखण्याची व राष्ट्रकार्याचें नेमकें महत्त्व जाणण्याची लोकांत तरी कोठें पात्रता आहे ? लोकमान्यांची, महात्माजींची पात्रता लोकांनीं एकदम कोठें जाणली ! परंतु दोघेही जनतेंत आपल्या असलेल्या पात्रतेसह सतत काम करीत राहिले. आणि सातत्यामुळेंच लोकांना त्यांची पात्रता पटली अथवा त्यांची सेवा पटूं लागली आणि जनतेनें त्यांना आपला पाठिंबा दिला. स्वतःचा अधिकार (पात्रता) वाढविण्यासाठीं परमेश्वराची प्रार्थना करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे असें आपण पत्रांत लिहिलें आहे तें अगदीं सत्य आहे. परंतु ही प्रार्थना जनतेंत कार्य करतां करतांच लोकमान्य व महात्माजी परमेश्वरापाशीं करीत राहिले. प्रार्थनेकरितां कांहीं आयुष्य निराळें काढून अधिकार वाढल्यावर जनतेची सेवा अधिक बरी होईल ही विचारसरणी बरी दिसत नाहीं. तुम्हीं आजपर्यंत जी जनतेची उत्कृष्ट सेवा केलीत ती करीत असतांना ह्या प्रार्थनेला कधीं व्यत्यय आला असेल असें मला वाटत नाहीं. किंबहुना माझ्या अल्प समजुतीप्रमाणें दरिद्रनारायणाची नित्यसेवा हा प्रार्थनेचाच एक प्रकार आहे. आणि प्रार्थनेच्या इतर प्रकाराला ही नित्यसेवा आड येत नसावी असें मोठ्यामोठ्यांच्या उदाहरणांवरून वाटतें. आणि आधीं प्रार्थना व इतर साधनांनीं कितीही अधिकार वाढविला तरी

तो तुलनेनें कोणापेक्षां तरी कमीच ठरणार; कारण जगांतील प्रत्येक माणूस कोणापेक्षां तरी मोठा व कोणापेक्षां तरी कमी असतोच. तेव्हां त्या अधिकार-वृद्धीला अंत नाहीं.......

६. ......महाराष्ट्राच्या परिस्थितीकडे पाहिलें असतां आपल्यासारखा कार्यकर्ता कोणत्याही समजुतीनें बाजूला राहणें परवडणारें नाहीं. आपला अहंभाव वाढविण्याकरतां मी हें लिहीत नसून जें प्रामाणिकपणें वाटत आहे तेंच लिहीत आहें. माझी अपेक्षा अशी कीं ज्या अर्थी आपण राष्ट्रसेवा करण्याकरतां संसारपाश स्वार्थत्यागपूर्वक तोडून टाकले अथवा लावून घेतले नाहींत, ज्या अर्थी लोकजागृति करण्याकरतां आपणाइतका लायक पुढारी महाराष्ट्रांत नाहीं, आणि ज्या अर्थी लवकरच सत्याग्रहयुद्ध सुरू होण्याचा संभव आहे, त्या अर्थी आपण पूर्वीप्रमाणें लोकांत घुसून, मिसळून, सतत विचारजागृति करून लोकांना योग्य दिशा दाखवीत राहावें. " कोणी वाडा बांध म्हटल्यास, आधीं पैसा, सामान, मजूर सर्व द्या म्हणजे मी वाडा बांधून देईन " असें आपण नेहमीं म्हणतां असें—नीं अनेकदां मला सांगितलें. आम्ही दुर्दैवी महाराष्ट्रीय आपल्याला विनंति करणार कीं, वाडा बांधण्यास लागणारें द्रव्य, सामान, माणसें इत्यादि सर्व तुम्हीच जमवा व वाडाही तुम्हीच बांधून द्या ! दुर्दैवानें आपली परिस्थिति अशी आहे खरी कीं, सर्व आपणच केलें पाहिजे. अगदीं लहान कार्यापासून मोठ्या कार्यापर्यंत हीच परिस्थिति आहे. लोकसेवेंत अनेक तपें गेल्यावर सर्व जुळवाजुळव इतरांकडून होते असें स्पष्ट दिसतें. तोंपर्यंत आपणच निगरगट्ट मनानें सर्व जुळवाजुळव करणें भाग आहे.......

अधिकारमापन, फलमापन, अपयश व अवहेलना यांचें मापन हीं मापनें करीत न बसतां असेल तें सामर्थ्य व सांपडेल तो क्षण सुखदुःख, यश-अपयश इत्यादि द्वंद्वांच्या पलीकडे राहून इष्ट मानलेल्या ( आणि सध्यां स्वातंत्र्याकडे ) कार्याकडे खर्ची घालणें आणि तसा तो घालवितां येणें ह्यांतच आत्मदर्शन आहे; ह्यांतच अंतःकरणाची शुद्धता आहे असें मला वाटतें.

* * *

सारांश, आपल्याजवळ आहे हें आत्मबल तुलनेनें पुष्कळ आहे. तें केवढेंही असो, त्याची राष्ट्राला प्रत्यक्ष कार्याच्या रूपानें जरूरी आहे. कार्य पुढें उभें

आहे. आपण सर्व निराशा व औदासीन्य टाकून पूर्वीप्रमाणें महाराष्ट्रांत हालचाल करावी, लोकजाग्रति करावी, वेळींच योग्य वळण द्यावें. जें आपण लोकांना प्रोत्साहन देतांना सत्य म्हणून सांगतों तेंच सत्य ( माझ्या समजुतीचें ) मी आपल्यापुढें ठेवीत आहें.

* * *

आपला,
वा. वि. आठल्ये

देवांचें लक्ष या वेळीं महाराष्ट्र सेवासंघाच्या पुनर्घटनेकडे लागलें होतें. जमनालालजी त्या वेळीं संघाचे अध्यक्ष होते, परंतु आपली जबाबदारी ते सोडूं इच्छीत होते. त्या समयीं ते गांधी सेवासंघाचेही अध्यक्ष होते व धोत्रे यांस महाराष्ट्र सेवासंघ सोडून गांधी सेवासंघाचे चिटणीस होण्याचा आग्रह करीत होते. देवांची इच्छा होती कीं महाराष्ट्र सेवा-संघाचें केन्द्र महाराष्ट्रांत राहून त्याचा विनियोग करण्याची जबाबदारी आपण स्वतः घ्यावी. या त्यांच्या सूचनेस कबूलीही मिळाली होती व तात्या देशपांडे यांस देवांनीं महाराष्ट्र सेवा-संघाचें काम सोंपविलें त्यासही मंजुरी मिळाली होती. या निधीच्या द्वारा महाराष्ट्रांत भरीव विधायक कार्यक्रम घडवून आणावा अशी देवांची मनीषा होती. पण ती पूर्ण होऊं शकली नाहीं.

१९३२ च्या जानेवारीच्या सुरुवातीस महात्माजी विलायतेहून परत आले व लगेच पकडले गेले. दडपशाही जोरांत सुरू झाली. त्याच सुमारास पनवेल येथें महाराष्ट्र प्रांतिक परिषद झाली. अणे अध्यक्ष होते. त्यांनीं अतिशय आवेशाचें भाषण करून सत्याग्रहाचें समर्थन केलें. अणे त्या वेळीं वर्किंग कमिटीचे सभासद होते व त्यांनीं आपल्या जबाबदारीची जाणीव उत्तम प्रकारें ठेविली.

महाराष्ट्र प्रांतिक कमिटी बापट तुरुंगांत गेल्यामुळें निर्नायक झाली होती. पनवेल येथें तिची बैठक भरली व पुढील भवितव्य लक्षांत घेऊन अध्यक्ष निवडण्याची आवश्यकता भासूं लागली. सर्वानुमतें देव हेच लायक ठरले व शांतिकालांत नसलें तरी युद्धकालांत देवांचें स्मरण होऊन त्यांच्या योग्य स्थानीं त्यांना बसवून प्रांतानें त्यांच्याविषयीं आपला गुणगौरव व्यक्त केला.

---

# ६ नायमात्मा बलहीनेन लभ्यः ।



दुसऱ्या लढ्याचे प्रसंगीं सरकारनें कार्यकर्त्यांना कांहींच करण्यास अवसर दिला नाहीं. १९३० च्या चळवळींत ज्यांनीं ज्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता किंवा संघटना करण्यास मदत केली होती त्या सर्वांस चटकन् कैद केलें. देव व त्यांचे सोबती पनवेलहून परत आले नाहींत तोंच पकडले गेले. साऱ्या हिंदुस्थानांत त्याप्रमाणें महाराष्ट्रांतही अशीच धरपकड झाली.

दोन महिन्यानंतर सर्वांना parole वर सोडण्यांत आलें. अर्थात् स्वाभिमानी लोकांनीं parole तोडून तुरुंगवास पतकरिला. देवांना या खेपेस दोन वर्षांची सजा झाली.

जानेवारी ६ व ७ तारखांस सरकारनें साऱ्या महाराष्ट्रांतील कार्यकर्ते आपल्या ताब्यांत घेतले. तालुक्यांतील कार्यकर्तेसुद्धां २५० ते ३०० पर्यंत एकदम पकडले गेले.

या दुसऱ्या लढ्यांत लोकांची मोठीच कसोटी झाली. सरकारनें भराभर मोठमोठे दंड ठोकण्यास व ते जबरदस्तीनें वसूल करण्यास सुरुवात केली. पहिल्या चळवळींत देशाचाही पहिला-वहिलाच उत्साह होता व सरकारही या अथवा त्या कारणामुळें इतकें कडक नव्हतें. या खेपेस साऱ्या संस्था तर गैरकायदेशीर बनविल्या गेल्याच; पण सत्याग्रही लोकांना मदत करणाऱ्यांना शिक्षा करण्यांत येईल अशी जाहीर ताकीद देण्यांत आली. तुरुंगांत बसण्याचा त्रास वाटत नव्हता, परंतु वित्ताचा नाश लोकांना भयानक वाटूं लागला. स्वतःविषयींही मनुष्य उदासीन राहूं शकतो. परंतु आपल्या बायकोमुलांबाबत किंवा कुटुंबाबाबत त्याला उदासीन राहणें कठीण जातें. स्वातंत्र्यदेवता जी किंमत बलिदानाच्या रूपानें मागत होती ती देण्यास लोक तयार नव्हते. सातारा जिल्ह्यांत पुष्कळ लोक Parole पाळूं लागले. नगर व रत्नागिरी जिल्ह्यांनीं मात्र चांगलें तेज दाखविलें.

१९३२ व १९३३ च्या चळवळी अयशस्वी कां झाल्या याची मीमांसा पुष्कळांनीं आपापल्या पद्धतीनें केली आहे. कोणी सरकारच्या कडक दडप-

शाहीचें कारण सांगतात तर कोणी लोक भित्रे ठरले असें विधान करितात. कॉंग्रेस-कार्यकर्त्यांत असत्य व प्रमाद शिरले होते असेंही कित्येकांचें म्हणणें आहे. दडपशाहीबाबत एवढेंच सांगावयाचें आहे कीं, पहिल्या चळवळींत शिरोडा, धारासणा, सोलापूर, वगैरे ठिकाणीं सरकारनें केलेली दडपशाही कमी खुनशी किंवा क्रूर नव्हती. परंतु तिनें कोणाचा उत्साहभंग झाला नाहीं. असत्य व दंभ दुसऱ्या चळवळीप्रमाणें पहिल्या चळवळींतही दिसून आले होते. जनतेच्या मानसशास्त्राचें ज्याला ज्ञान आहे तो सांगूं शकेल कीं, क्लेश व त्याग यांनीं भरलेली चळवळ सामान्य जनता दीर्घ मुदतीपर्यंत सतत करूं शकत नाहीं. हिंदुस्थानांतील जनता अगोदरच दीर्घकालीन गुलामगिरीमुळें पंगु झालेली आहे. तिच्यांत शिस्त व संघटना निर्माण करण्यास महात्माजींनीं पुरता काळही घेतला नाहीं. प्रयोग देखील अगदीं नवीन होता. आणि अधःपातास पोंहोचलेल्या लोकांकडून महात्माजी दैवी गुणांची अपेक्षा करीत होते. या सर्व गोष्टींचा साकल्यानें विचार करितां आणि ब्रिटिश साम्राज्यासारख्या संघटित, बलिष्ठ व धूर्त शक्तीशीं सामना करण्याचा प्रसंग लक्षांत घेतां, देश १९३२ च्या चळवळींत कां टिकूं शकला नाहीं त्याचें स्पष्टीकरण होईल. अर्थात् यांत समर्थनाचा उद्देश नाहीं. ज्याला स्वातंत्र्य हवें त्याला सर्व प्रकारचें बलिदान द्यावयास हवेंच. पहिल्या चळवळींत जनतेनें नेट धरला व आपली सर्व पुण्याई खर्चीं घातली, पण नंतरच्या चळवळींत तिचें सामर्थ्य लंगडें पडलें.

लोकांचा उत्साह व अभिनिवेश पूर्वीइतकाच कायम असता तर सरकारची दडपशाही त्यांनीं भेदून काढिली असती. परंतु तसें झालें नाहीं. समाजांत अनेक प्रकारचे घटक असतात; व प्रत्येक घटकाची इतरांवर प्रतिक्रिया होत असते. १९३० सालीं हे सारे घटक एका कल्पनेनें एक झाले होते त्यामुळें एक संघटित शक्ति निर्माण झाली होती. १९३२ सालीं आपापल्या अधिक-उण्या स्वार्थाला वश होऊन हे घटक चळवळींतून अंग काढून घेऊं लागले. त्यामुळेंही चळवळीचें नुकसान झालें.

या चळवळींत बहुतेकांना दीर्घ मुदतीच्या म्हणजे दीडदोन वर्षांच्या शिक्षा झाल्या व दंडही पुष्कळ झाले. महाराष्ट्रांत करबंदीची चळवळ फारशी

करण्यांत आली नाहीं त्यामुळें गुजरात किंवा कर्नाटकप्रमाणें शेतकऱ्यांच्या जमिनी जप्त झाल्या नाहींत. तडजोडीच्या कालांत महात्माजींनीं मिठाचा कायदा दुरुस्त करून घेतला होता, त्यामुळें मिठाचा सत्याग्रह पुनः सुरू करण्याची बाब राहिली नव्हती. जंगलसत्याग्रह करणें दोन गोष्टींनीं अशक्य झालें. प्रेरणा देणारे व चळवळ चालविणारे तुरुंगांत जाऊन बसले आणि शेतकरी तर अज्ञ होते व त्यांना दहशतही बसली होती. नाहीं म्हणावयास तुरुंगांत न जातां " मागें " राहून " काम " करण्याकडे कार्यकर्त्यांची प्रवृत्ति वाढती होती. त्यामुळें गुप्तमंडळें उदयास आलीं व छद्मवेषांत किंवा अज्ञात स्थळीं वास करून पोलिसांना चकविण्याकडे कार्यकर्त्यांचा कल जाऊं लागला.

चळवळ कशी तरी सप्टेंबरपर्यंत चालली. नंतर महात्माजींचा सुप्रसिद्ध पहिला हरिजन-उपवास झाला आणि हरिजन-चळवळीचें नांव पुढें करून सत्याग्रहाच्या चळवळींतून लोक अंग काढून घेऊं लागले. महात्माजींच्या तीव्र तपस्येमुळें त्यांचा हेतु सफळ झाला व येरवड्यांत हरिजन-सवर्णांचा " पुणें करार " घडून आला. परंतु महात्माजींच्या तपस्येचें फळ देश पचवूं शकला नाहीं; कारण त्यानें आपली शक्ति त्यांत खर्ची घातली नव्हती हें नंतर दिसून आलें. परंतु येरवडयाचीं दारें महात्माजींना त्यानंतर हरिजन-चळवळ करण्यास मोकळीं झालीं.

हिंदुस्थानांतील फार मोठा म्हणजे जवळ जवळ नऊ-दशांश भाग खेडयांतून वसला आहे. हा मोठा समूह जर बहुंशानें जागृत असता व आपल्या कर्तव्याची जाणीव होऊन चळवळींत पडता, तर माणसांची उणीव भरून निघाली असती व सरकारलाही या विरोधास तोंड देणें जड गेलें असतें. परंतु चळवळीचीं पाळेंमुळें इतकीं खोल गेलीं नव्हतीं. पहिल्या चळवळींत मोजक्या ठिकाणीं सामुदायिक सत्याग्रहांत ग्रामिण जनतेनें भाग घेतला खरा, परंतु तो बराचसा भावनावेगांत घेतला. सामाजिक न्याय मिळविण्यासाठीं समाजांतील प्रत्येक व्यक्तीकडून स्वार्थत्यागाचा कडेलोट होईल अशी अपेक्षा केली जाते ही गोष्ट त्यांच्या अंतःकरणांत बिंबली नव्हती. बागलाणांतील जंगलसत्याग्रहाचे वेळीं पोलीस शेतकऱ्यांचीं गुरें कोंडवाडयांत कोंडूं लागतांच शेतकऱ्यांना दहशत बसली हें प्रसिद्ध आहे. जुलमाचा प्रतिकार करण्यासाठीं

आपल्यांतील सारें नैतिक सामर्थ्य एकवटून उभें केलें पाहिजे व या कामीं भौतिक नफ्यातोट्याकडे यत्किंचित्सुद्धां लक्ष देतां कामा नये ही उच्च विचारसरणी सामान्य व्यवहारी मनुष्यांत कोठून असणार? चळवळींत द्रव्यसाहाय्य करणारे धनिक हरताळामुळें दुकानें पुनः पुन्हा बंद होण्याचा प्रसंग येतांच नुकसानीच्या कल्पनेनें भेदरून चळवळीशीं संबंध ठेवीनासे झाले. परदेशी कापडावर बहिष्कार पुकारला जातांच दुकानांतील माल व्यर्थ जाणार या भीतीनें अनेकांचीं धाबीं दणाणलीं. दारूगुत्त्यांवर निरोधन होतांच गुत्त्यांचे मालक खवळले.

'सैतानी' सरकारशीं नैतिक साधनांच्या बळावर लढतांना लढणाऱ्यांची नीति फारच उच्च दर्जाची असावी लागते. व्यक्ति उच्च आदर्शापर्यंत सुलभतेनें पोंहोचूं शकेल; पण समाजाला जागा करण्यास काळ लागतो आणि तो तितक्या उच्च कोटीला पोंहोचूं शकत नाहीं. तो न्यायाला सहानुभूति दाखवील, थोडीबहुत मदत करील, परंतु प्रचंड प्रमाणावर खुषीचा स्वार्थत्याग त्याजकडून होणार नाहीं. स्वतंत्र राष्ट्रावर परचक्र आलें असतां कायद्यानें व सक्तीनें राष्ट्रांतील लोकांकडून द्रव्य व मनुष्यबळ हीं खेंचून घ्यावीं लागतात त्यांतील मखवी हीच आहे. हिंदुस्थानांत कायदा उलट बाजूस होता. समाजाकडून खुषीच्या त्यागाची अपेक्षा केली जात होती; व त्या त्यागामागें भौतिक फायद्याची ऊर्फ स्वराज्याची जबरदस्त आकांक्षा नसती तर समाज इतक्या उत्साहानें चळवळ करण्यास पुढें आलाच नसता. नुसता कल्पनारम्य आदर्शवाद समाजास भुलवूं शकत नाहीं. व्यावहारिक फायद्याचें प्रलोभनही त्यास लागतें. असो.

महात्माजींच्या हरिजनचळवळीच्या प्रारंभानंतर देशांतील वातावरण बदलूं लागलें. महात्माजींच्या दुसऱ्या अटकेनंतर लवकरच मुंबईंत हिंदुमुसलमान-दंगेही भीषण रूपांत प्रकट झाले; ते कांहीं महिने चालू राहिले होते. सामुदायिक कायदेभंगांत मुंबईनें अतिशय नांव गाजविलें होतें. ती मुंबईच अंधेरनगरी बनली तेव्हां तिच्या नेतृत्वापासून प्रोत्साहन पावणाऱ्या आसपासच्या चळवळी निरुत्साही झाल्या. त्यांतच हरिजन-चळवळीची भर पडली. मे ७च्या सुमारास (१९३३) महात्माजींनीं २१ दिवसांचा हरिजन-उपवास सुरू केला. त्या

भयानक दिव्यानें देश हादरून गेला. महात्माजींची सुटका झाली व त्यांनीं पत्रक काढून सत्याग्रह कांहीं काल बंद ठेवण्यास राष्ट्रास आज्ञा दिली.

महात्माजी एका मानसिक संघर्षांतून जात होते. तुरुंगांत असतांना सुद्धां त्यांना बाहेरील प्रवृत्तींचा समाचार मिळत असे. त्यांना खेद वाटण्यासारखीं अनेक कारणें घडलीं. महाराष्ट्रांत तर या दरम्यान 'केसरी'नें "चळवळ बंद करा" असा टाहो चालविला होता. अर्थात् केसरीच्या मताला समाजांत आतां फारसें महत्त्व राहिलें नव्हतें. केसरीपक्षाचे जे लोक पहिल्या चळवळींत सामील झाले होते ते दुसऱ्या प्रसंगीं बहुशः दूरच राहिले. पुढें १९३२ च्या ऑक्टोबरमध्यें केळकर तिसऱ्या गोलमेज परिषदेसाठीं विलायतेस रवाना झाले, तेव्हां तर "विलायतेस जाऊन तेथील राजकारणी मुत्सद्द्यांबरोबर चार हात करण्यास" केळकरांसारखा 'चतुरस्त्र, हजरजबाबी व राजकारणांत मुरलेला' गृहस्थ जात असल्याबद्दल त्या सर्वांनीं त्यांचें अभिनंदन केलें. बुवा गोसाव्यांसारख्या केळकरांविषयीं अतोनात आदर बाळगीत असलेल्या कार्यकर्त्यास मात्र या प्रसंगानंतर सत्यस्थिति कळून आली व ते पुरते कॉंग्रेसवादी झाले.

अणे महात्माजींच्या हरिजन-उपवाससमयीं कॉंग्रेसचे कामचलाऊ अध्यक्ष होते. पूर्वीचे मित्र व साथीच परंतु अंगच्या स्वातंत्र्यलालसेमुळें आंदोलनांत पडलेले पाहून तरी केळकरांनीं त्यांना दूषण देऊं नये ! "जे आपल्या स्वार्थत्यागाला किंवा दुःखपात्रतेला मर्यादा ठेवीत नाहींत, ते सहजच पुढारी बनतात. आणि अशांच्याविषयीं मला आदर वाटतो. देशाचें पाऊल पुढें पडेल तें अशाच पुढाऱ्यांच्या हातून." –**गतगोष्टी**, (पृ.९६८), असें लिहिणारे केळकर अण्यांना "गांधींचा अंतेवासी शागीर्द" यासारखीं विशेषणें बहाल करतात व त्यांनीं कॉंग्रेसच्या आज्ञा खुषीनें पाळल्या त्या त्यांच्या वीरोचित शिस्तपालनावर कडवट टीका करितात (**गतगोष्टी**, पृ. ७५७–७६०) हें विचित्र दिसतें. अण्यांच्या यवतमाळनिवासी मित्रांनींच तिला परस्पर उत्तर दिलें. परंतु एकंदर चळवळीविषयीं केळकरांचे ग्रह किती दूषित होते तें यावरून स्पष्ट दिसतें. "आपण जें करणार नाहीं तें लोकांना करावयाला सांगणें माझ्या जिवावर येतें" हें केळकरांचें म्हणणें रास्त आहे. पण तसेंच जे स्वतः त्यागाच्या पराकोटीला जातात त्यांचा इतरांना त्यागाचा उपदेश

करण्याचा अधिकार ते कबूल करीत नाहींत याचें आश्चर्य वाटतें. "राजकीय चळवळींच्या दृष्टीनें तर माझ्यापेक्षां श्रेष्ठ असे पुढारी किती तरी झाले व आहेत" ही कबूली देणाऱ्या पुढाऱ्यासाठीं एक मधली स्थिति असते व ती म्हणजे मौनधारण होय. आपल्या हातून होत नाहीं, पण इतरांचा अधिकार आहे, तर त्यांच्या कर्तृत्वाच्या आड आपण कां यावें ? "आपण स्वतः मागें पडलों तरी चालेल, पण परघाताचें पाप आपल्या हातून घडूं नये अशीच माझी नेहमीं इच्छा असे." ही इच्छा शुभ आहे हें कोणीही कबूल करील. परंतु ही इच्छा असून सुद्धां प्रांताचा अवसानघात करण्यासारखें केळकरांच्या वाणींतून व लेखणींतून पुष्कळदां घडलें. याचें कारण त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे "मी बोलून-चालून टिळकांचा शिष्य व त्यांचा शेषाधिकारी— माझी विद्वत्ता, समाजांतील माझा दर्जा, माझें सार्वजनिक कार्य व सर्वसामान्य रीत्या एक पुढारी या नात्याची माझी पात्रता...... मी प्रांतिक पुढारी या पदवीला तर पोंचलों होतोंच, पण अखिल भारतीय पुढाऱ्यांपैकीं एक अशीही माझी गणना होती." —**गतगोष्टी** (पृ. ७२३). अशी स्वतःबद्दलची त्यांची मान्यता असल्यामुळें, "भांडण मिटवावयाला प्रायः मध्यस्थ तिऱ्हाईत उपयोगी पडतो" ह्या सूत्रवाक्याचा उपयोग करून ते वारंवार चळवळी बंद करण्याचा उपदेश करीत.

महात्माजींचा २१ दिवसांचा उपवास पूर्ण झाल्यावर पुणें येथें कॉंग्रेस कार्यकर्त्यांची मोठी परिषद भरली. बहुतेक पुढारी तुरुंगांत होते. बाहेर असलेल्यांना बोलावून पुढें कोणतें धोरण स्वीकारावें याबाबत चर्चा झाली. अणे राष्ट्रपति असल्यामुळें हजर होतेच. त्यांनीं केळकरांसही परिषदेस हजर राहण्याचें निमंत्रण दिलें. परिषदेंत साधकबाधक चर्चा झाली. केळकरांचा पहिल्याच दिवशीं अपमान झाल्यामुळें ते चिडून गेले. कोणी तरी त्यांच्या येण्यास आक्षेप घेतला, कारण ते तुरुंगांत गेले नव्हते. असो.

कांहीं लोकांनीं चळवळ थांबविण्याची सल्ला दिली तर कित्येकांनीं जोरानें पुढें चालविण्याची. महात्माजी अवलोकन करून आपल्या निर्णयावर आले होते. "ही अखेरची लढाई आहे. स्वराज्य मिळविल्याखेरीज मी पुन्हा आश्रमांत येणार नाहीं;" अशी प्रतिज्ञा करून निघालेले महात्माजी थोड्या-

थोडक्यानें नाउमेद थोडेच होणार होते? हरिजनप्रकरणांत प्राणांचा पण लावून हिंदुसमाजाचें अभेदत्व कायम राखणारे महात्माजी चळवळीची शक्ति त्यामुळें वाढल्याचें मानीत होते. त्यांनीं सांगितलें, " मला स्पष्ट दिसत आहे कीं, जनता लढण्यास तयार आहे; पुढारी कच खात आहेत. गुप्तमंडळ्यांनीं चळवळीची नीति बिघडवून टाकिली आहे. कॉंग्रेस कमिट्यांच्या कोणाही अधिकाऱ्यानें तुरुंगाबाहेर राहतां कामा नये. पुढचा मार्ग वैयक्तिक सत्याग्रह राहील." सामुदायिक चळवळीचें दर्शनी सामर्थ्य कितीही असलें तरी तींत अशुद्धि घुसण्याचा अनिवार्य संभव असतो हें महात्माजींस माहीत होतें; व म्हणून शुद्धीकरणासाठीं हें नवीन तन्त्र त्यांनीं योजिलें व यज्ञकुंडांत स्वतःस अत्यंत पवित्र व प्रिय वाटणाऱ्या आश्रमसंस्थेची आहुति दिली. पुढें तेही आपल्या आश्रमवासियांसमवेत एका मध्यरात्रीं कसे पकडले गेले, हरिजन-चळवळीच्या संबंधीं त्यांनीं पुन्हा उपवास कसा सुरू केला व पुन्हा त्यांची बिनशर्त कशी सुटका झाली वगैरे प्रकरण ख्यात आहेच. सुटकेनंतर महात्मा-जींनीं आपणांस हरिजन-चळवळीस वाहून घेतलें व राजकीय सल्लामसलत मात्र खासगी रीतीनें ते देऊं लागले. वैयक्तिक कायदेभंग फारसा चालला नाहीं. कारण त्याचें तत्त्व जाणूं शकणारे बहुतेक सर्व अगोदरच तुरुंगांत जाऊन बसले होते. उरलेसुरले कार्यकर्ते गेले; परंतु तुरुंगांत जाऊन सुटलेले लोक पुन्हा फारसे गेले नाहींत. समुदायांतील माणसें तर अज्ञानच होतीं. तेव्हां महात्माजींनीं खूप विचार करून शेवटीं ७ एप्रिल १९३४ रोजीं कायदे-भंगाची चळवळ मागें घेण्याची घोषणा जाहीर पत्रक काढून केली.

---

# ७ जीवनपाथेय

नित्याच्या जीवनांत सुद्धां आनंद देणाऱ्या किंवा विचार करावयास लावणाऱ्या अनंत गोष्टी असतात. परंतु रोजच्या कार्यक्रमांत व्यग्र असणाऱ्या मनुष्यप्राण्यास डोळे वर करून त्यांचेकडे पाहण्यास फुरसद कोठें असते ?

प्रातःकालचें सुभग दृश्य व सायंकाळचे रमणीय रंग रोज पाहिल्यानें त्यांत नाविन्य वाटत नाहीं. आकाशांतील गूढ नाटक समजून घेण्याची कोणाला तरी इच्छा होते ? एकान्त गायन किंवा कावळ्या-चिमण्यांचे कलरव तरी कोणाचे कान वेधून घेतात ? नेहमींच मिळणाऱ्या गोष्टी अतिपरिचयानें शिळ्या होतात.

परंतु तुरुंगांत गेल्यावर ? अरे ! तेथें तर दोन्ही वेळच्या संध्याप्रकाशाचें स्मरण सारखें होत असते. कोंबड्याचें आरवणें, मांजरांचें म्यांव म्यांव, झाडांवरून किंवा छपरावरून पळणाऱ्या खारी, भाकऱ्या पळविणारे वानर—सर्वोविषयींच प्रेम व कुतूहल वाटतें. तुरुंगांतील नीरस जीवन सरस कसें करावें याची विवंचना साऱ्यांनाच लागते. रोजनिशी नियमितपणें लिहिण्याची संवय लागते, काव्यगीतें स्फुरूं लागतात, कधीं आपल्या हातून न घडलेले प्रयोग करावेसे वाटतात आणि अद्‌भुत कथानकें सुचत असतात. ज्या माणसांबद्दल बाहेर उदासीन वृत्ति वा दूषित ग्रह असतात, त्यांच्याबद्दल प्रेम वाटूं लागतें; आणि प्रत्येक गोष्टींत काव्य दिसून येतें. बाहेर उच्छृंखल असणारा मनुष्य तुरुंगांत शांत बनतो. अथवा बाहेर समुदायांत सतत गुरफटूं इच्छिणारा तुरुंगांत एकान्तसेवी बनतो. असे अनेक चमत्कार तुरुंगांतील मायासृष्टींत होत असतात.

आंदोलन-दरम्यानचा तुरुंगांतील काळ हा महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांच्या आयुष्यांतील महत्त्वाचा काळ म्हटला पाहिजे. चोवीस तास अष्टौप्रहर एकमेकांच्या सहवासांत " राजद्वारे स्मशाने च " घालविण्याची संधि देवानें अथवा दैवानें म्हणा— या विविधक्षेत्रांतील अनेक वृत्तींच्या शेंकडों माणसांस

आणून दिली. जेल-जीवनांत त्या सर्वांना अंतर्मुख होण्याची संधि मिळाली, एकमेकांस जाणून घेऊन भविष्यकालीन बेत रचण्यास अवकाश मिळाला. जुन्या संस्कारांना उजळा देणें व नव्यांची पारख करणें याही गोष्टींना भरपूर वेळ मिळाला. मतपरिवर्तन करण्यासही अनेक प्रसंग उपस्थित झाले. नेहमीं प्रकृतिविमुख असणाऱ्या अरसिक मनुष्याला याहून दुसरी सुसंधि कोणती मिळाली असती !

नियमितपणें आहार-विहार करणारा मनुष्य आजारी पडणारच नाहीं. यदाकदाचित् पडला तरी आजारांतसुद्धां नियमपालन करणारा मनुष्य आजार गेल्यावर ताजातवाना झाला पाहिजे. त्याप्रमाणें जेलवास संपल्यावर जो मनुष्य ताज्या दमाचा होऊन येणार नाहीं. तो जीवनकला साध्य करूं शकला नाहीं असेंच म्हटलें पाहिजे.

तुरुंगांत कार्यकर्त्यांच्या जीवनांत अनेक फेरफार झाले. कित्येक गेले तसे आले. कित्येक बदलून आले. कित्येक शिकून आले तर कित्येक विसरून आले मानवी मानसशास्त्राची अतर्क्य गति ! दुसरें काय ?

तुरुंगांत तीन भेद होते:—अ, ब, क असे तीन वर्ग होते. अ वर्ग फारच वरिष्ठ वर्गांतील लोकांना मिळे. अर्थात् महाराष्ट्रांतील मध्यम अथवा गरीब वर्गांतील लोकच तुरुंगांत गेल्यामुळें अ वर्ग अगदीं थोड्यांच्याच वांट्यास आला. कांहीं ब वर्गांत व पुष्कळसे क वर्गांत ढकलले , गेले. पहिल्या व दुसऱ्या चळवळीचे वेळीं सर्व प्रकारचे सुशिक्षित-अशिक्षित, लहान-मोठे, पंडित-मूर्ख, उद्योगी-जड असे लोक एकसमयावच्छेदेंकरून आंत गेले व एकत्रच राहिले; त्यामुळें तुरुंगांतही एक प्रकारची विविधता आली होती. या बिनगुन्हेगार, एरवीं सरकारचे कायदे पाळणाऱ्या लोकांना तुरुंगांत डांबण्यांचा प्रसंग आल्यावर जेलच्या पोटार्थी अधिकाऱ्यांनीं व अडाणी शिपायांनीं त्यांच्याशीं कसें वागावें ? त्यांना काय काम द्यावें ? सर्वच विषय कुतूहलाचा होता. पण हाल सोसण्यासाठीं आंत गेलेले हे प्रतिष्ठित नागरिक कसे वागले हा अधिक महत्त्वाचा प्रश्न आहे.

महात्मा गांधींवर टीका करणारे लोक नेहमीं म्हणतात कीं, " तुरुंगांत मिळणाऱ्या सवलती, सुखसोई यांच्यामुळें तुरुंगवास हा एक खेळ होऊन

बसला होता.” वीराच्या हातीं मृत्यु हेंही एक खेळणेंच होत असतें. तसा तुरुंगवास हा खेळ झाला असेल; पण तेथें सुखसोई मिळत असत्या तर टीकाकारही कधींच आंत प्रविष्ट झाले असते! पण तसें तें झालें नाहीं. नाशिक तुरुंगांत अमृतलालला ज्या सुखसोई मिळाल्या त्याबद्दल जेलर रोश व जॅक्सन यांना कांहीं महिन्यांची सजा भोगावी लागली. येरवड्यांतील 'मास्कोविच्'चे हंटर व शिपायांनीं दिलेल्या गचांड्या, तुरुंगांतील चक्की व बेड्या ह्या सर्व सुखसोईच असतील, तर वैयक्तिक सत्याग्रहाला माणसें कमी पडलीं नसतीं. प्रत्येक बाबीला शुक्ल-कृष्ण बाजू असतातच. जेथें तुरुंगाच्या अधिकाऱ्यांकडून सौजन्य दाखविलें गेलें तेथें कैद्यांची उमदी व तेजस्वी वर्तणूक आणि चळवळीची प्रतिष्ठा हींही कारणीभूत झालीं आहेत. श्री. विनोबा भावेसारखा संतपुरुष तुरुंगांत असतां कोणता अधिकारी त्याच्यापुढें नतमस्तक होणार नाहीं? जे पुढें साऱ्या मुंबई इलाख्याचे मुख्य प्रधान झाले त्या माननीय खेरांकडे कोणता तुरुंगाधिकारी आदरपूर्वक पाहणार नाहीं? सत्याग्रहाची चळवळ ही चोरडाकूंची चळवळ नव्हती. समाजांत जे सज्जनांकडूनही वाहवा मिळवितात व जनसेवेच्या कार्यांत नेहमीं मग्न असतात अशाच श्रेष्ठ, त्यागी पुरुषांकडून आत्मबलिदान करवून त्यांचें नैतिक वजन 'सैतानी' सरकारावर आणण्याचा, व साऱ्या जगापुढें या राक्षसी साम्राज्यशाहीचें खरें रूप उघडें करण्याचा या चळवळीचा हेतु होता. अर्थात् तुरुंगांत गेलेले सारेच हजारों लोक महान् योग्यतेचे होते असें नाहीं. परंतु समाजांतील या थोर सेवकांचें उदाहरण पाहून संस्कार पावलेले, आपल्याही शक्तीप्रमाणें स्वराज्यसंपादनाच्या पुण्यकार्यांत लहानमोठी आहुति देऊं इच्छिणारे, असंख्य अज्ञात पण भले लोक या चळवळींत होते. वरील थोर सेवकांप्रमाणें तेही समाजाचे घटकच होते; व समाजाच्या उत्थानांत त्यांनाही जी भूमिका घेतां आली ती त्यांनीं घेतली. पण ते शिखरावरचे दगड नसले म्हणून काय झालें? भिंतीचा फार मोठा हिस्सा त्यांनींच व्यापिला होता! दुर्दैवांत सांपडलेल्या राष्ट्राच्या उद्धारासाठीं त्यांच्या धर्मानें त्यांना दिलेल्या संस्कारानुरूप त्यांस जशी बुद्धि सुचली तसे ते वागले; पण आपल्या राष्ट्राला त्यांनीं आपली निष्ठा अर्पण केली, हा कांहीं कमी गौरव नव्हे. अनेक लोकांच्या जीवनाचा कमी विकास झालेला असेल; पण रोजचें शान्त, सुखी जीवन सोडून अज्ञात

ठिकाणीं दुःखाचा संविभाग करण्यासाठीं गेलेल्या त्या वीरांचा त्याग सात्त्विक नव्हता असें कोण म्हणेल ? असो.

तुरुंगाबाहेर आणि तुरुंगांत दिवस व रात्री इतका फरक आहे. दिवसा ईश्वराच्या दोनच कृति दिसतात, पृथ्वी व सूर्य; तर रात्रीं अनंत ब्रह्मांडें दिसतात. त्याचप्रमाणें तुरुंगाबाहेर स्वतःशिवाय मनुष्यास कांहीं दिसत नाहीं. तुरुंगांत स्वतःशिवाय अनेक व्यक्तींचा—जीवात्म्यांचा साक्षात्कार होतो. मनुष्य स्वतःलाही अधिक चांगल्या प्रकारें जाणूं शकतो. देशासाठीं खडतर तुरुंगवास भोगून आलेले महापुरुष जगापासून दीर्घकाल बहिष्कृत राहूनही निरुत्साही न बनतां उलटे अमर आशावाद व बलवती आत्मशक्ति घेऊन परत कसे येतात त्याचें रहस्य या गोष्टींत सांपडेल.

नाशिक, येरवडा, बेळगांव, धुळें, ठाणें, रत्नागिरी, विसापूर वगैरे तुरुंग अशा हजारों सेवकांची तपोभूमि बनले होते. वावटळीप्रमाणें एकाएकीं उद्भवल्यासारख्या वाटलेल्या चळवळींत आवेगासरसें पडून कांहीं काल बद्धस्थितींत जातांच अंतर्दृष्टि उघडून त्यांनीं " अध्ययन " करण्यास प्रारंभ केला.

सत्याग्रहाचें तत्त्व तरी साऱ्यांसच कोठें पुरतें माहीत होतें ? महात्माजींचें जीवन, विचार, सिद्धान्त, विधायक कार्यक्रम, सत्याग्रहाचें गूढ रहस्य व प्रकट शक्ति यांचें आकलन सर्वांसच कोठें झालें होतें ? परंतु जेथें विनोबा भावे, जावडेकर, भागवत, आचार्य कालेलकर, किशोरलाल मशरूवाला यांसारखे तत्त्वज्ञानी व विद्वान् लोक जाऊन बसले तेथें शिष्यांना काय तोटा ? धुळ्याच्या तुरुंगाचा तर आश्रम बनला होता. कारण विनोबाजीसारखी श्रेष्ठ विभूति तेथें वास्तव्य करीत होती. महाराष्ट्रांत महात्माजींना कडवे विरोधक भेटले तसे महाराष्ट्रांतूनच त्यांना श्रेष्ठ, प्रतिभासंपन्न व चारित्र्यवान् शिष्यही लाभले. महात्माजींच्या अनुयायांत विनोबाजींपेक्षां उच्चतर अधिकाराचा सच्छिष्य सांपडणें कठीण आहे. विनोबाजी एक अद्वितीय व्यक्ति आहेत. ते व त्यांचे दोघे कनिष्ठ बंधु बाळकोबा व शिवाजी यांनीं आपलें सारें जीवन गांधीकार्यास अर्पण केलें आहे. एकाच कुटुंबांतील सारेच सत्पुत्र आजन्म ब्रह्मचर्य पाळून श्रेष्ठ आश्रमधर्माचा स्वीकार करणारे असे क्वचितच सांपडतील. तिघेही बहुश्रुत; विद्वान व कलावंत असे आहेत. विनोबांनीं विधायक कार्य-

क्रमाला आत्मा दिला. त्याला सचेतन केलें. त्याला शास्त्रीय पद्धतींत बसविलें. खादीशास्त्राचें तंत्र विनोबांनीं प्राच्य मनोभूमिकेस शोभेशा पद्धतीनें रचून भारतास अर्पण केलें. खरोखर विनोबांची कामगिरी अतुलनीय आहे. त्यांनीं तकलींत काव्य आणलें. महात्माजींचें सत्यअहिंसात्मक तत्त्वज्ञान त्यांनीं बुद्धियोगांत बसविलें. भारताच्या प्राचीन वैराग्यवैभवाचे ते वारस आहेत. त्यांची निःस्पृह वृत्ति आणि अखंड कर्मयोग यांनीं त्यांस तापस-श्रेष्ठाच्या योग्यतेस चढविलें आहे. त्यांचें कार्य बृहन्महाराष्ट्रांतच वर्षानुवर्षें चाललें आहे; परंतु महाराष्ट्रांतील गांधीविचारांच्या लोकांना त्यांच्यापासून स्फूर्ति मिळते. त्यांनीं " महाराष्ट्रधर्मांत " गांधीतत्त्वज्ञानावर भाष्यें केलीं. प्रसंगीं नागपूर शहरांत जाऊन भरसभेंत कित्येक दिवस सर मोरोपंत जोशी यांशीं सामना केला. असा अधिकारी पुरुष धुळ्याच्या तुरुंगांत असतां तेथेंही त्यांनीं आश्रमीय वातावरण उभें करून सर्वांस श्रेष्ठ हृदयधर्माची दीक्षा दिल्यास नवल तें काय ! त्यांचीं प्रवचनें ऐकण्यास जेलरही जाऊन बसे आणि सानेगुरुजीं-सारखा प्रतिभासंपन्न विद्वान् विनोबाजींचीं " गीताप्रवचनें " लिहिण्यांत " लेखकु " होऊन बसला तर यांत आश्चर्य तें कसलें ?

आचार्य कालेलकर हें महाराष्ट्रानें महात्माजींस अर्पण केलेलें दुसरें विद्वद्रत्न होय. या रसिक लेखकानें महात्माजींची विचारधारा असंख्य प्रवाहांनीं रमणीय व मधुर भाषाशैलींतून फैलाविली. त्यांनीं आपल्या आयुष्याचा बराच-सा भाग गुर्जरभूमींत गुर्जर भाषेंतून जनतेची सेवा करण्यांत व्यतीत केला. सत्याग्रहसमयीं गुजरात विद्यापीठाची ( ज्याचे ते आचार्य होते ) फार मोठी आहुति दिली गेली. सत्याग्रह थांबल्यावर कालेलकरांची सेवा महाराष्ट्रालाही मिळूं लागली. विनोबाजींना सानेगुरुजी, त्याप्रमाणें कालेलकरांना भाई डांगे हे लेखक मिळाले.

नाशिक जेलमध्यें देव, खेर, जावडेकर, गाडगीळ, गोरे, खाडिलकर वगैरे होते. तेथें वादविवादाला व चर्चेला नित्य ऊत येई. तुरुंगांत असतां समाज-वादी व साम्यवादी वाङ्मय भरपूर वाचावयास मिळे आणि मग वाद चालत.

येरवड्याच्या कँप जेलमध्यें गुजरातमधील पुष्कळ आश्रमपंथीय सज्जन होते.

आचार्य भागवत यांनाही कांहीं काळ तेथें ठेवण्यांत आलें होतें. तेथेंही गांधी-तत्त्वज्ञानावर नित्य चर्चा व व्याख्यानें होत.

गंगेला ज्याप्रमाणें अनेक नद्या येऊन मिळतात त्याप्रमाणें या भारतवर्षांत अनेक विचारप्रवाह आले. जुन्या कालीं ते धर्मांच्या रूपानें येत असत; अर्वाचीनकालीं वाङ्मयरूपानें येत आहेत. अगदीं अलीकडील विचारप्रवाह म्हणजे समाजवाद. १९३० पूर्वींच त्याचा प्रवेश होत होता. मुंबईसारख्या शहरांतून साम्यवादी युवक आपल्या पंथाचा प्रचार करीत होतेच. दरम्यान स्वातंत्र्ययुद्ध सुरू होतांच उत्साही तरुण भावनावेगांत तिकडे धांवले. साम्य-वाद्यांना सत्याग्रही तत्त्वज्ञान कबूल नसल्यामुळें ते चळवळीपासून फटकून राहिले. सत्याग्रही तत्त्वज्ञान हा प्राचीन आर्यसंस्कृतीचाच परिपाक आहे, त्यामुळें तो देशीच आहे. समाजवादी तत्त्वज्ञान हें परदेशी आहे, अर्वाचीन यन्त्रयुगांतील दुष्ट अन्यायांचा प्रतिकार करण्यासाठीं निर्माण झालेलें आहे. हिंदुस्थानांत, अथवा ग्रंथाच्या दृष्टीनें संकुचित क्षेत्र घेऊन महाराष्ट्रांत म्हणूं— १९२० नंतरची पिढी संमिश्र संस्कार घेऊन आली होती. जुने आदर्श, जुनी संस्कृति, जुने राष्ट्रपुरुष तिच्या दृष्टीपासून दूर जात होते. शाळा-कॉलेजांतील निःसत्त्व आणि हीनश्रद्ध शिक्षण, भिन्नभिन्न रुचींच्या व विचारांच्या अध्या-पकांनीं नियत केलेली परस्परविरोधक विचारांच्या वाङ्मयाची खिचडी, आणि हिंदी समाजाशीं किंवा जीवनाशीं कोणत्याही प्रकारें संबंध न ठेवणारें, हिंदी गूढ प्रश्नांची आत्मीयपणें चर्चा कधींच न करणारें साहित्य यांच्या अपचनानें विद्यार्थिमानसांत एक प्रकारची विकृति पैदा झाली होती. तिचे परिणाम या-नंतर दिसून येऊं लागले. सत्याग्रहाच्या चळवळीचें शुद्ध स्वरूप न समजल्या-मुळें पुष्कळांनीं तिच्यांत पाखंड निर्माण केलें हें मागें सांगितलेंच आहे. त्यांतच तुरुंगांत महिन्यांचे महिने घालविण्याचे प्रसंग येतांच व चळवळीला ओहोटी लागतांच तरुणांच्या मनांत जोराची प्रतिक्रिया सुरू झाली.

गांधी विचारप्रणाली मुख्यतः संयमावर उभारली आहे. तिचा रोख मानवी कर्तव्यें पार पाडण्याकडे आहे हेंही मागें सांगितलेंच आहे. नवी संस्कृति मानवी हक्कांची घोषणा करीत आली व त्यामुळें सारें तंत्र उलटा विचार करूं लागलें. व्यक्ति श्रेष्ठ कीं समाज श्रेष्ठ या चर्चेंतून समाज श्रेष्ठ या टोंकाकडे लोक

पोंहोचले व समाजाच्या सर्वतोपरित्वासाठीं व्यक्तीचें जीवन बांधलें गेलें. अर्थात् भारतीय सर्वसमन्वयकारी संस्कृति– जींत व्यक्ति व समाज या दोहोंनाही महत्त्वाचें स्थान आहे–मागें पडली. यान्त्रिक युगानें समाजाची केलेली उलथापालथ, तिच्यामुळें समाजासमोर येऊन उभे राहिलेले यक्षप्रश्न यांचा उलगडा या नव्या विचारसरणींतून होईल असा कल बहुतेकांचा होऊं लागला. त्यामुळें गांधीविचारसरणी फार मागासलेली, आत्मस्तंभक अशी वाटूं लागली. व्यक्तिविकासाला संयम ही गोष्ट अवरोधक आहे असें वाटूं लागलें. खऱ्या स्वराज्यांत खासगी मालमत्तेचाच निग्रह, धर्मांवरच निरोधन आणि वैराग्यवृत्तीचा मात्र संयम केला जावा अशीं मतें प्रतिपादण्यांत येऊं लागलीं.

तुरुंगांमध्यें अनेक वृत्तींचे व लायकीचे लोक गेले होते. कांहींत बुद्धीचें प्राबल्य होतें तर कित्येक श्रद्धेचे जीव होते. आणि फार मोठा वर्ग अर्धवटांचा होता. बुद्धिवादी म्हणविणारे समाजवादाकडे वळले, श्रद्धापरायण 'गांधीवाद' समजो न समजो, त्यालाच चिकटून राहिले; पण अर्धवटांची केंविलवाणी स्थिति झाली. अधिकारी लोक जोरजोरानें वाद करीत असतां अनधिकाऱ्यांना कांहीं कुतूहलानें, तर कांहीं आदरानें दुरूनच ऐकत बसावें लागे. वादाचा निकाल लागता तर आपलीं मतें ते निश्चित करते; पण निर्णय कधीं येतच नसे. त्यामुळें आपलीं मतें त्यांचीं त्यांनाच कळत नसत. एकदां एक बरें वाटे, एकदां दुसरें. तरीसुद्धां या वादविवादामुळें सर्वांच्या मनःस्थितीला एक विचित्र वळण लागलें. दोन्ही विचारप्रणालींतील शब्द त्यांनीं पकडले आणि अर्थ न जाणतां किंवा जीवनांत प्रयोग करण्याच्या भानगडींत न पडतां वादविवादपटु म्हणून कीर्ति मिळविण्याच्या लालसेनें ते हृदयांत शंका व मुखांत शब्दजाल अशा थाटांत रस्तोरस्तीं फिरूं लागले.

तरी देखील कित्येक खरोखरीची तळमळ लागलेले जीव तुरुंगांत शांति मिळवून बाहेर पडले. हरिभाऊ जोशी बरेच दिवस अनिश्चित मनःस्थितींत होते. तुरुंगांतून पहिल्या खेपेस बाहेर आले तेव्हां ते "हिंदुसभावादी"च होते. पुढें दोन गोष्टी घडून आल्या. चिरनेरप्रकरणामुळें ते पुन्हा चळवळींत पडले. त्यांनीं आरोपींसाठीं खूप खटपट केली, फंड मिळविला, स्वतः तुरुंगांत गेले. या कामीं त्यांना केसरीपक्षाकडून विशेष मदत मिळाली नाहीं. गोळीबार-

चौकशी कमिटीचे कामीं श्री. जमनादास मेथा यांनीं परिश्रम केले. तडजोडीच्या काळांत महात्माजींनीं खटले व दंड मागें घेवाविले. तेव्हांपासून त्यांना कॉंग्रेस-बद्दल आपुलकी वाटूं लागली. त्यांची मनोभूमिका तयार होतच होती. तेवढयांत पुढें तुरुंगांत जावडेकरांचा सत्सहवास मिळाला. त्यांच्या संगतींत हरिभाऊ 'गांधीनिष्ठ कॉंग्रेसमन' बनले.

पटवर्धनबंधु, गोरे, खाडिलकर, जोशी ही मंडळी समाजवादाकडे झुकली. गोरे, खाडिलकर, जोशी ही मंडळी तर युवकसंघांतीलच होती. ते टिळक किंवा गांधी यांपैकीं कोणत्याहि पंथांतून संस्कार घेऊन आले नव्हते. त्यामुळें त्यांची निष्ठा यांपैकीं एकाही पंथाला दिली नव्हती. त्यांनीं पुढें नवीन पंथ स्वीकारला. अर्थात् सर्वच कोंकणचे असल्यामुळें 'कोंकणी संस्कृतीची' छाप थोडीबहुत त्यांच्यांत असावी. परंतु वर्षें लोटतांच पुढची पिढी मागलीपेक्षां शहरास अधिक जवळ करते व मातृभूमीस दूर म्हणविते. जोशी व खाडिलकर यांचें जीवन कष्टाचेंच होतें. वडिलांची आर्थिक स्थितिही ठीक नव्हती. खाडिलकर तर अगदीं लहानपणीं पोरके झाले होते. वयाच्या १४ व्या वर्षी त्यांनीं कांहीं दिवस नोकरी केली. पुढें शिक्षणासाठीं वार लावले ते मॅट्रिक होईपर्यंत चालले. आर्थिक गांजणुकीनें मनुष्य प्रचलित समाजपद्धतीचा द्वेष्टा तरी बनतो किंवा अध्यात्मप्रवण तरी बनतो. अध्यात्माच्या गोष्टी युवकचळवळीच्या प्रणेत्यांस शोभणाऱ्या नव्हत्या. तेव्हां प्रचलित समाजपद्धतीचा द्वेष ही दुसरी तड झाली. अर्थात् व्यक्तीची प्रकृति हीही एक महत्त्वाचें अंग आहे. खाडिलकरांचा श्री. कृ. प्र. खाडिलकरांशीं आप्त-संबंध असल्यामुळें व खाडिलकर घराण्याच्या उज्ज्वल चारित्र्याचे संस्कार त्यांच्यावर झाल्यामुळें त्यांच्या स्वभावांत व दृष्टिकोणांत थोडी सौम्यता आली. उलट जोशींचा दृष्टिबिंदु कडवा बनला.

पटवर्धनबंधूंना श्रीमंत घराण्यांत जन्म घेण्याचें भाग्य प्राप्त झालें होतें. बनारसला त्यांचें उच्च शिक्षण झालें. खडतर जीवनांतील विषम परिस्थितीचे तडाखे त्यांना कधींच मिळाले नाहींत. त्यामुळें समाजांतील चालू परिस्थितीविरुद्ध खवळून उठण्यासारखी त्यांची अंतःप्रवृत्ति नव्हती. तृप्त व शांत भूमिकेवरून ते जगाकडे पाहत होते, आणि बुद्धिनिष्ठ

राहून जागतिक प्रश्नांचें परिशीलन करीत होते. अच्युतराव पटवर्धन यांनीं कॉलेजांत अर्थशास्त्र हा विषय घेतला होता. त्यांना भांडवलवाल्यांचें अर्थशास्त्र शिकविण्यांत आलें होतें. १९३० च्या जागतिक मंदींत तें अर्थशास्त्र गडगडलें तेव्हां अच्युतरावांची श्रद्धाही डळमळून त्यांनीं समाजवादी अर्थशास्त्राचा व तत्त्वज्ञानाचा आश्रय केला. पटवर्धनबंधु हे नगरच्या सुप्रसिद्ध कै. श्री. हरिभाऊ पटवर्धनांचे चिरंजीव. उभयबंधूंवर लहानपणापासून थिऑसॉफी संप्रदायाचे खूप संस्कार झाले होते व डॉ. ॲनी बेझंट यांचा सहवासही त्यांना लाभला होता. अच्युतरावांनीं तर श्री. कृष्णमूर्तींबरोबर परदेशीं प्रवासही केला होता. त्यांच्या हृदयांत या श्रीमंती तत्त्वज्ञानामुळें तृप्ति व संतोषाची भावना जोंवर होती तोंवर ते राजकारणांत पडले नव्हते. पण वातावरणांतूनही कधीं कधीं धक्के मिळतात. असंतोषाचा धक्का बसतांच पुरुषार्थाची वासना जागी होते. प्रथम वडील बंधु रावसाहेब पायीं चालत विलेपार्लेंच्या छावणींत पोंचले. अच्युतराव बनारसला शिक्षक होते. ते नंतर आले. दोघेही बंधु चळवळींत पडले परंतु ते गांधीविचारप्रणालीपासून विमुखच राहिले. पहिली प्रेरणा स्वातंत्र्याची होती, नंतरची पक्षसंघटनेची; पण ती कथा पुढें येईल.

भाई गोरे हे मध्यमवर्गातील एका सुखवस्तु गृहस्थांचे एकुलते एक चिरंजीव होते. त्यांना उच्च शिक्षण सुलभपणें मिळालें; त्यामुळें त्यांनाही समाजांतील विषम परिस्थितीशीं झगडा करण्याचा प्रसंग आला नाहीं. तरी सुद्धां समाजवाद त्यांच्या बुद्धीला पटल्यामुळें ते तिकडे वळले.

जावडेकर सत्याग्रह व समाजवाद यांचा समन्वय करूं पाहत होते, तर भागवत गांधीवादाचे एकान्तिक पुरस्कर्ते होते. नाथ घाणेकर समाजवादी बनले ते बुद्धीला पटून; आणि पुष्कळसे तरुण या बुद्धिमान् कार्यकर्त्यांच्या संगतींत आल्यामुळें, कित्येक गांधीविचारप्रणाली न समजल्यामुळें, तर कित्येक समाजवादी होण्यांत गांधीजींवर मात करून प्रतिष्ठा मिळवितां येते असेंही मानून समाजवाद "बोलूं" लागले.

बाळूकाका कानिटकरांसारख्या आजन्म सेवकांवरही जेलवासाचा परिणाम झाला. बाळूकाकांनीं पुण्यांत राहून व चिंचवड येथील पाठशालेतर्फे देशाची खूप सेवा केली. महात्माजींची विचारसरणी त्यांनीं पुस्तकें, माला,

संस्था, वगैरेंच्या मार्फत महाराष्ट्रांत पसरविण्याची खूप खटपट केली. तडजोडीच्या काळांत त्यांनीं चांबळी गांवीं एक आश्रमही काढला होता. पुष्कळ वर्षे त्यांनीं पुणें शहर व जिल्हा कमिट्या आपल्या पक्षाच्या ताब्यांत ठेविल्या होत्या. पण तुरुंगांत राहणें त्यांना असह्य होऊन आपलें जीवन तुरुंगांत सडत असल्याची तक्रार त्यांनीं केली. त्यांत गांधीविचारांतील ही बाजू त्यांना पटत नसल्याचें आढळून आलें. त्यांची श्रद्धा कमी पडली.

तिकडे देवांची मनःस्थितिही चमत्कारिक झाली होती. दास्ताने, ठकार, आपटेगुरुजी, बाळूभाई, आप्पासाहेब पटवर्धन वगैरे गांधीवाद्यांचे मोहरे तुरुंगांत जाऊन पुन्हा कट्टर गांधीवादी म्हणूनच बाहेर आले. देवांचें हृदय व डोकें यांत द्वंद्व सुरू झालें. हृदयाची निष्ठा महात्माजींकडे होती; तर डोकें समाजवादाकडे ओढलें जात होतें. विशेष म्हणजे लोकसंग्रहाची अनावर इच्छा त्यांना समाजवादी बनत चाललेल्या बुद्धिमान् तरुणांना हातांतून दूर जाऊं देण्याविरुद्ध भर घालीत होती. तुरुंगांत असतांना तुरुंगाबाहेर गेल्यावर कामाची आंखणी कशी करावी याची योजना करण्यांत त्यांचें डोकें सदैव गुंतलेलें असे. त्यामुळें त्या तरुणांशीं मैत्री करून त्यांना महाराष्ट्राच्या संघटनेच्या कामीं लावण्याचा बेत त्यांनीं रचला व जावडेकरांच्या साहाय्यानें भावी कार्यरेखाही त्यांनीं जुळविली. ती पुढें दिली आहे :—

## महाराष्ट्रांतील पुढील कार्याची दिशा

ज्या लोकांनीं १९२०–२१ सालापासून म. गांधी व राष्ट्रीय सभा यांच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्रांत आपल्या शक्तीप्रमाणें कार्य करण्याचा प्रयत्न केला आहे त्यांनीं पुढील दहा वर्षांतील प्रांतसंघटनेसंबंधीं कांहीं तरी निश्चित कार्यक्रम आंखून घेणें आज अवश्य झालें आहे. असा ठराविक कार्यक्रम आंखून पुढील दहा वर्षे काम झाल्यास या पिढींतील लोकांनीं आपलें मातृभूमीसंबंधींचें कर्तव्य अल्पांशानें तरी केल्यासारखें होणार आहे. याकरितां पुढील तीन प्रकारच्या संस्थांची आवश्यकता आहेः—

( १ ) वर्तमानपत्र.
( २ ) आजन्म राष्ट्रसेवकांची संस्था.
( ३ ) जनता संघटित करण्याचीं कांहीं केन्द्रें–निदान प्रत्येक जिल्ह्यांत एक.

यांपैकीं तिसरें कार्य कांहीं ठिकाणीं ग्रामसंघटनेच्या स्वरूपानें सुरू झालें असून महाराष्ट्र-सेवा-संघातर्फे निघणाऱ्या आश्रमामार्फतही थोडासा प्रारंभ झाला आहे. तें अधिक करावें.

दुसरें काम एकदम सुरू होणें कठीण दिसलें तरी आठ-दहा वर्षांच्या आंत ही गोष्ट करणें अशक्य नाहीं. हें कार्य या पिढीनें केल्यास पुढील पिढीला या संस्थेचा उपयोग खात्रीनें होईल.

वर्तमानपत्र :—याची फार आवश्यकता असून तें ताबडतोब काढलें पाहिजे. त्याचें धोरण सामान्यतः पुढीलप्रमाणें असावें :—

( १ ) राष्ट्रीय सभेचें धोरण महाराष्ट्राला समजावून देणें व त्याचा प्रसार करणें.

( २ ) राष्ट्रीय स्वातंत्र्य व सत्याग्रह.

( ३ ) सामाजिक व आर्थिक समता.

( ४ ) समाजसत्ताक लोकशाहीचें राजकीय ध्येय प्रसृत करावें व तें प्रत्यक्ष प्रतिकार व सत्याग्रह या मार्गांनीं साध्य करण्याचें धोरण जाहीर करावें.

( ५ ) शेतकरी व कामकरी यांच्या संघटना व सहकारी संस्था यांना पाठिंबा द्यावा. त्यांत नैतिक उन्नतीवर विशेष भर द्यावा. यांच्यामार्फत वर्गद्वेष वाढविण्याचा प्रयत्न करूं नये. तथापि या वर्गांत आपल्या हक्कांची जाणीव उत्पन्न करावी.

( ६ ) कौन्सिलांतील कार्य किंवा कौन्सिलासंबंधींचें धोरण राष्ट्रीय सभेच्या धोरणास धरून होईल अशाविषयीं प्रयत्न करणें.

* * *

ही योजना कितपत सफळ झाली हें पुढें पाहावयाचें आहे.

देवांचे जुने सोबती भुस्कटे यांच्यांत अनेक स्थित्यंतरें झालीं. त्यांचें एकंदर जीवन खडतर झालें. त्यांचें लहानपण व दुय्यम शिक्षण जमखिंडींत झाल्यावर ते कांहीं काल समर्थ विद्यालयाचे प्रौढ विद्यार्थी होते. तें विद्यालय बंद झाल्यावर पोटासाठीं त्यांनीं खासगी धंदे केले. कांहीं दिवस केसरी ऑफिसांत ते लोकमान्य टिळकांचे लेखक होते; पुढें लोकसंग्रहांत कामास लागले. तेथेंच त्यांची व देवांची ओळख झाली. तेव्हांपासून मुळशीप्रकरण, असहकारितेची चळवळ, स्वराज्य पत्र व सत्याग्रह या सर्व प्रवृत्तींत दोघेही बरोबर काम करीत होते. भुस्कुट्यांत त्यागवृत्ति व चिकाटी फार असून स्वतःस पटेल त्या तत्त्वा-

साठीं वाटेल ते हाल सोसण्याची त्यांची तयारी असते. दारिद्याच्या भरीस मोठ्या कुटुंबाचा भारही त्यांच्या शिरावर होता. तरीसुद्धां त्यांनीं आपलें देश-सेवेचें असिधाराव्रत अखंड चालविलें. पूर्वी ते सनातनी होते, नंतर भक्तिमार्गी बनले; त्यांतून पुढें असहकारितावादी होऊन तुरुंगांत गेल्यावर त्यांचा कल समाजवादाकडे झुकूं लागला. यानंतर त्यांचा मार्ग देवांपासून वेगळा झाला.

वैयक्तिक कायदेभंगांत या राजकारणी पुरुषांपैकीं ज्या फार थोड्यांनीं भाग घेतला, त्यांत आप्पासाहेब पटवर्धन, ठकार, देवगिरीकर, लक्ष्मीबाई ठुसे वगैरे होते. डॉक्टर लागू तर १९३२ च्या चळवळींतही सामील नव्हते. त्यांना धंदा चालवावयाचा होता म्हणून स्थानबद्धतेचा हुकूम त्यांनीं पाळला. परंतु चळवळीला सतत आर्थिक मदत ते करीत राहिले. त्यांनीं व श्री. बापूसाहेब गुप्ते यांनीं चळवळीचीं सूत्रें गुप्तपणें चालविलीं. आचार्य लिमये आजारी होऊन यवतला कांहीं काळ राहिले होते. परंतु त्यांनीं वैयक्तिक सत्याग्रह केला व तीन महिन्यांची सजा भोगली. लिमयांत दोन वृत्ति होत्या. एक चळवळी तर दुसरी चिंतनपर. अतिशय बुद्धिमान् असून व अंगीं कर्तबगारी असूनही कांहीं ध्येयवाद मनांत धरून त्यांनीं आपल्या आयुष्यास विशिष्ट वळण लाविलें होतें. परंतु त्यांच्या आजारानें त्यांना बेजार केलें व जीवनकार्य सुरळीतपणें पार पडूं दिलें नाहीं.

तुरुंगांत असतां देव व जावडेकर यांनीं ठरविलें कीं, आपल्या मतप्रचारा-साठीं आपणांस एक वर्तमानपत्र चालविलें पाहिजे. देवांनीं वर्तमानपत्राचे प्रयोग दोनदां केले होते व ते त्यांच्या अंगावर शेकले होते. ‘स्वराज्य’ पत्र देव १९२८ सालीं तुरुंगांत गेल्यावर कसें तरी चाललें होतें. भुस्कुटे संपादक बनले व गाडगीळांसारख्या कित्येक हितचिंतकांनीं पत्रास आर्थिक मदतही केली. परंतु १९३० सालीं तें बंद पडलें. नंतर तुरुंगांतच काल गेला. महात्माजींनीं वैयक्तिक सत्याग्रह सुरू केला परंतु तो अयशस्वी होण्याचीं लक्षणें दिसूं लागलीं. दरम्यान नव्या सुधारणांचा कायदा तयार होत होता. तुरुंगांत देव व जावडेकर यांनीं नव्या सुधारणांचा अभ्यास करून, त्या अमलांत येतांच निवडणुकींत कॉंग्रेसनें भाग घ्यावा एतदर्थ चळवळ करण्याचें ठरविलें होतें व त्यासाठींही प्रचार करण्यास त्यांना वर्तमानपत्राची आवश्यकता होती.

मागें सांगितलेंच आहे कीं १९२० च्या चळवळींत असहकारितेचे

संस्कार घेऊन जी नवी पिढी जन्मास आली तिनें १९३० सालीं काम दिलें. पूर्वीच्या पिढीचे लोक १९२० च्या चळवळींत पराङ्मुख बनले. जे तिच्यांत पडले ते केवळ राष्ट्रवादी होते म्हणून पडले. महात्माजींच्या अहिंसा-तत्त्वाची शक्ति जुन्या व नव्या कोणत्याही कार्यकर्त्यांस उमगली किंवा पटली नव्हती. अहिंसा-सिद्धान्त सामाजिक पायावर क्रान्तिकारक चळवळीच्या रूपांत कसा व्यक्त करितां येईल याची कल्पना कोणासच नीटशी झाली नव्हती. त्यामुळें मनापासून अहिंसाशास्त्रावर श्रद्धा ठेवणारे फारच विरळा होते. देवांची श्रद्धा देखील ते विधायक कार्यक्रमाकडे १९२४ नंतर विशेष लक्ष घालूं लागले तेव्हांपासून बसूं लागली. १९२८ सालीं ते अहिंसावादावरील आपली श्रद्धा जाहीर करूनच तुरुंगांत गेले. परंतु आप्पासाहेब पटवर्धनांसारखे प्रकृत्याच सौम्य व भक्तवृत्तीचे सेवक सोडल्यास फारच थोड्यांनीं अहिंसेस हृदयानें वरिलें होतें. १९३० च्या चळवळीनंतर या सर्वांत परिवर्तन होऊं लागलें व महात्माजींच्या अंतःस्फूर्तीचा भरींवपणा त्यांच्या प्रत्ययास आला. जावडेकरांसारखे समाजवादी सत्याग्रही बनून अहिंसेवर त्यांची श्रद्धा बसली. याच्या उलट भुस्कुट्यांची वृत्ति पूर्वीची अहिंसावादी होती ती जाऊन साम्यवादी होऊं लागली. युवक-चळवळींतले तरुण तर नुसते स्वातंत्र्यवादीच होते. सत्याग्रहांतून स्वातंत्र्यप्राप्ति होईल अशी आशा त्यांस वाटत होती. सत्याग्रहाची चळवळ अयशस्वी झालेली दिसतांच त्याची मीमांसा त्यांनीं अशी केली कीं, ती शास्त्रशुद्ध नव्हती; वर्गकलहावर उभारली नव्हती; सर्व वर्ग तींत प्रविष्ट झाले होते; त्यामुळें शेवटीं ती सफळ झाल्यास आपल्या वर्गाचें नुकसान होईल या जाणिवेच्या भीतीनें श्रीमंत वर्गानें धोका देऊन आपलें अंग आयत्या वेळीं तींतून काढून घेतलें व म्हणून चळवळ तोंडघशीं पडली. तेव्हां चळवळ यशस्वी करणें असेल तर श्रीमंत वर्गाला विश्वासांत न घेतां त्याशीं विरोध करण्यासाठीं श्रमजीवी वर्गांत संघटना निर्माण करून साम्राज्यशाही व भांडवलशाही यांस तोंड देण्यास एक जबरदस्त साधन निर्माण केलें पाहिजे, तरच चळवळ यशस्वी होईल. तुरुंगांतून सुटल्यावर याच प्रकारच्या संघटनाकार्यास आपण लागलें पाहिजे असा बेत त्या तरुण समाजवाद्यांनीं केला.

दरम्यान मुंबईस श्री. सदानंद एक मराठी वृत्तपत्र काढूं इच्छीत होते. त्यांना उत्तम संपादक हवा होता. देवांनीं ठरविलें कीं जावडेकरांनीं सुटल्यावर मुंबईस जाऊन संपादक व्हावें व वर्तमानपत्रांतून आपल्या कल्पनांचा प्रचार करावा. समाजवाद देशांत स्थायी होणार अशी देव व जावडेकर या दोघांचीही कल्पना होती. पण 'समाजवाद' याचा अर्थ दोघेही दोन प्रकारें करीत होते. परंतु वर्तमानपत्राचा रोख अंतीं समाजवादाचा प्रचार करण्याकडे असावा अशी योजना होती.

खेरांच्या मार्फत देवांनीं सदानंदांकडे शिफारस केली. 'लोकशिक्षणां'त जावडेकरांचे लेख वाचून श्री. न. र. फाटक यांचाही चांगला ग्रह झाला होता. त्यांनींही सदानंदांकडे त्यांच्याबद्दल शब्द टाकला. जावडेकर १९३३ च्या नोव्हेंबरांत सुटले. ते मुंबईस जाऊन 'नवशक्ति'चे संपादक बनले. फेब्रुवारींत 'नवशक्ति' सुरू झाली. तात्या देशपांडे व भुस्कुटे हेही त्यांना जाऊन मिळाले. जावडेकर लेखक खरे, पण त्यांना दैनिक चालविण्याचा अनुभव नव्हता. त्यांची वृत्तिही तत्त्वज्ञान्याची होती. त्यामुळें नवशक्तीचे संपादकीय लेख लिहिण्यापलीकडे त्यांच्यावर जबाबदारी विशेष नव्हती हें बरें झालें.

जावडेकरांना वर्तमानपत्रांतून लिहिण्यापेक्षां पुस्तकें लिहिणें आवडतें. उथळ वृत्तपत्रव्यवसाय त्यांच्या वृत्तींत नाहीं. त्यांची प्रकृति खोल व गंभीर आहे. उथळ वृत्तीचे मुत्सद्दीही त्यांना आवडत नाहींत. पूर्वी त्यांनीं टिळक व अरविंदबाबू यांच्या ग्रंथांचें खूप परिशीलन केलें होतें. त्यांना वाटे कीं, जगाला देण्यासारखें तत्त्वज्ञान वेदान्तांत आहे. १९३० च्या चळवळीनंतर सत्याग्रहाचें जीवनव्यापी तत्त्वज्ञान त्यांना पटलें व तोच संदेश जगास देण्यासारखा आहे असें त्यांना वाटूं लागलें.

बरीच मंडळी १९३४ च्या सुरुवातीस सुटली. परंतु वैयक्तिक सत्याग्रहांत भाग घेण्याचा प्रसंग कोणास फारसा आला नाहीं. महात्माजींनीं एप्रिलमध्यें चळवळ मागें घेण्याचें जाहीर करितांच " पुढें काय ? " हा प्रश्न सर्वांपुढें येऊन पडला.

---

# ८ जुन्या राजवटीचे भग्नावशेष

तत्त्वतः पाहिल्यास खालसा राज्य व संस्थानी राज्यें हीं एकच आहेत. परंतु त्यांच्यांत फरकही तितकाच आहे. 'राजा कालस्य कारणम् ।' या विधानाप्रमाणें संस्थानी राज्यांतील प्रजा-जीवनावर संस्थानिकांच्या अनियंत्रित राज्यकारभाराची छाप विशेषेंकरून दिसून आल्याशिवाय राहत नाहीं.

एक काळ असा होता कीं, सामान्य जनतेलाच नव्हे तर विचारी लोकसेवकांनाही देशी राज्यांबद्दल व राजांबद्दल प्रेम वाटे. जुन्या हिंदवी स्वराज्याचे ते अवशेष आहेत असें त्यांना वाटे. वरिष्ठ साम्राज्यसत्तेच्या खालसानीतीवर हिंदी लोकसेवकांनीं कडक टीका केली आहे. जुलमी म्हणून प्रसिद्ध असलेल्या देशी राजांवर जेव्हां जेव्हां साम्राज्यसत्तेनें कायदेशीर आरोप ठेवून खटले चालविले किंवा त्यांना पदच्युत केलें, तेव्हां तेव्हां हिंदी लोकांनीं राजांना सहानुभूति देऊन सरकारवर प्रखर टीका केली आणि सरकारचा रोष स्वतःवर ओढून घेतला आहे. टिळक-आगरकरांना पहिला कारावास संस्थानिकाप्रीत्यर्थ झाला.

परंतु आतां बदलत्या काळाचीं लक्षणें स्पष्ट दिसत आहेत. 'देशी राज्यें नष्ट करावींत' असें जोरदारपणें प्रतिपादन करणारा एक वर्ग राष्ट्रांत निर्माण झाला आहे. जे लोक तितकें स्पष्ट म्हणत नाहींत ते मनांतून देशी राजांबद्दल सहानुभूति मुळींच बाळगीत नाहींत. वऱ्हाड प्रांत परत आपल्या राज्यांत सामील करून घेण्याची खटपट निजाम करीत असतां, खुद्द वऱ्हाडांतील व बाहेरील लोकांनीं मोठी चळवळ करून खालसा राज्यांतच वऱ्हाड ठेवावा अशी ओरड केली. खुद्द संस्थानांतील बुद्धिधन, मानधन व कर्तृत्ववान् लोक संस्थानें सोडून खालसा राज्यांत जात असतात. राज्यांतील मनुष्यधन याप्रमाणें बाहेर जात असतां, राज्याला क्षयरोग झाल्याची कळा प्राप्त झालेली दिसते. आणि देशी राजांना पुष्कळदां आपले दिवाण किंवा वरिष्ठ नोकर बाहेरून आणावे लागतात त्याचें कारण काय ?

देशी राज्यांतून आजच्या सुधारणा किंवा सुधारणेचीं नवीन साधनें कमी आहेत, द्रव्य कमावण्यास भरपूर सोयी नाहींत, शिक्षणसंपादनाची संधि मिळत नाहीं वगैरे अनेक कारणें या खुशीच्या निर्वासनामागें असतील. परंतु मुख्य कारण हेंही संभवतें कीं, स्वतंत्र प्रकृतीच्या प्रजेला देशी राजांचें राजनैतिक धोरण बिलकूल मंजूर नसल्यामुळें लोक संस्थानें सोडून बाहेर जात असावे.

कसेंही असो, संस्थानी प्रजा व खालसा प्रजा यांतील भौगोलिक अंतर काल्पनिक रेघेनेंच मारल्यासारखें असल्यामुळें, खालसांतील परिस्थितीचा व घटनांचा परिणाम संस्थानी प्रजेवरही होत असतो. संस्थानी प्रजेला तिचे राजेच मायबाप! त्या मायबापांचे अधिराजे जे ब्रिटिश, त्यांच्या खालसांतील सरकारला कॉंग्रेसनें यशस्वी विरोध करितांच, संस्थानी प्रजेलाही संघटनेचा आधार वाटूं लागला. खालसा प्रजेच्या पावलांवर पावलें टाकण्याची उमेद ती बाळगूं लागली. आणि नवीन युगांतील विलक्षण अस्त्र जें 'सत्याग्रह' त्याच्या यशाची खात्री पटतांच संस्थानी प्रजेनें आपल्यावरील दडपशाहीचा प्रतिकार करण्याकरितां त्याचा वारंवार उपयोग करून दाखविला व कित्येक प्रसंगीं तो यशस्वीही झाला. संस्थानांतील अनियंत्रित राजसत्तेमुळें व कित्येक वेळीं होणाऱ्या अनागोंदी कारभारामुळें खालसापेक्षां संस्थानांतील प्रजेला सत्याग्रहाचे प्रयोग करण्याची संधि अधिक मिळूं शकते.

कॉंग्रेसचें देशी राज्याबाबतचें धोरण पूर्वीपासून तटस्थ होतें. हल्लीं कॉंग्रेसच्या परवांपर्यंतच्या तटस्थपणाबद्दलचें खापर महात्माजींच्या डोक्यावर फोडण्याकडे खालसांतील व देशी संस्थानांतील सर्व नव्याजुन्या कार्यकर्त्यांची प्रवृत्ति आहे. पण त्या बाबतींत लोकमान्य टिळकांचें मतही विचारांत घेण्यासारखें आहे. आठवणी खंड २ यांत श्री. वामन रामचंद्र नाईक यांनीं आपला व टिळक यांचा एक उद्‌बोधक संवाद दिला आहे. १९१४ सालीं लोकमान्य मंडालेहून पुण्यास परत आले तेव्हां नाइकांनीं त्यांची भेट घेतली. " बोलतां बोलतां लोकमान्यांनीं "तुमच्या देशी संस्थानांत सुधारणा केव्हां घडून येणार?" अशी पृच्छा केली. मी म्हणालों, 'आपण व देशांतील इतर पुढारी संस्थानांकडे लक्ष देत नाहींत. एवढेंच नव्हे तर कॉंग्रेस ब्रिटिश इलाख्यापुरतीच असल्यामुळें तींत देशी संस्थानांबद्दल प्रश्नच येण्याचें कारण नाहीं असें म्हणून

संस्थानांसंबंधानें काँग्रेसमध्यें कोणी विचारच्च करीत नाहीं. अशी वस्तुस्थिती असल्यामुळें देशी संस्थानांत सुधारणा केव्हां होणार हें सांगणें माझ्यासारख्याला फारच कठीण आहे. याबद्दलची तोड आपणच काढून त्यासंबंधीं चळवळ सुरू कराल तरच कांहीं आशा वाटते?' यावर टिळक म्हणाले, 'तुमचें म्हणणें खरें आहे. देशी संस्थानांचा प्रश्न इतक्यांत काँग्रेसमध्यें आणतां येत नाहीं. कारण सध्यां ब्रिटिश सरकारशीं झगडण्यांत आमची सर्व शक्ति खर्ची पडत आहे; अशांत दुसऱ्या भुतांना जागे करण्यापेक्षां त्यांना आणखी कांहीं दिवस तरी गोंधळ घालूं द्यावा. स्वराज्य हातीं आल्यावर या संस्थानिकांना योग्य मार्गावर आणणें कठीण नाहीं'."

* * *

काँग्रेसचें तंत्र महात्माजींच्या हातीं येतांच त्यांनीं आपल्या पद्धतीप्रमाणें संस्थानांसंबंधींच्या धोरणाचें स्पष्टीकरण केलें. सत्याग्रहाची चळवळ स्वाश्रयी व स्वावलंबी असली पाहिजे हें मुख्य तत्त्व आहे. मुळशीची चळवळ पुढेंपुढें मुळशीबाहेरील लोकांनीं चालविल्यामुळें तिचा नंतर फार्सच झाला. तद्वत् संस्थानांतील प्रजा प्रबुद्ध होऊन उठली नाहीं तोंपर्यंत काँग्रेसनें आगांतुकी करून तेंही क्षेत्र अडवणें धोक्याचें झालें असतें, अशी महात्माजींची विचारसरणी होती. विधायक कार्यक्रमाच्या अंगीं क्रांतिकारक शक्तीचें बीज आहे याबद्दल पक्का विश्वास असल्यामुळें महात्माजींनीं संस्थानांतून विधायक कार्यक्रमाचा प्रचार करण्यास शेवटपर्यंत उत्तेजन दिलें व प्रसंगीं राजांचीही मदत मागितली. या धोरणाचें फल हल्लीं दिसून येत आहे. असो.

* * *

महाराष्ट्रापुरतें म्हणावयाचें म्हणजे देशी संस्थानांतील कार्यकर्ते फार जुन्या काळापासून प्रबुद्ध झाले. संस्थानांतील जनतेची संघटना करण्यास अवकाश लागला तरी, संस्थानी कार्यकर्ते काँग्रेसशीं तिच्या बाल्यकाळापासून नित्यसंबंध ठेवीत. दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानी प्रजेचे हितसंबंध पाहणारी एक 'हितवर्धक सभा' सन १९२१ मध्यें स्थापली गेली. श्री. वामनराव पटवर्धन तिच्या आद्य संस्थापकांपैकीं एक होते. या सभेनें वेळोवेळीं परिषदा भरवून, प्रचार करून, वेगवेगळ्या संस्थानांतील जुलमांमुळें प्रजेला असह्य झालेले प्रश्न हाताशीं

धरून, प्रजेची संघटना करण्याचें कार्य केलें व कित्येक वेळां प्रजेमार्फत लढेही चालविले. या लढ्यांचा उद्देश कधींही स्वराज्यप्राप्तीचा नव्हता. स्थानिक व मर्यादित क्षेत्रांपुरत्या गाऱ्हाण्यांचा निकाल करण्यासाठीं प्रजेंचे ते तात्कालिक प्रयत्न होते. त्यांपैकीं मिरज संस्थानांतील सारावाढीबाबतचा रयतांचा सत्याग्रह, भोर संस्थानांतील जंगल व इतर सत्याग्रह, सांगली संस्थानांतील सत्याग्रह, आजरें येथील सत्याग्रह हे सर्व प्रसिद्ध आहेत. स्थानिक तक्रारींबद्दल श्रीमंतांकडे दाद मागण्यासाठीं रयतेनें पुष्कळ चळवळी केल्या व क्लेशही सोसले. काळ जातांच स्थानिक गाऱ्हाण्यांचें महत्त्व जाऊन त्याऐवजीं संस्थानिकांच्या आधिपत्याखालीं जबाबदार राज्यपद्धति मिळावी या उद्देशानें चळवळी करण्याकडे प्रजेची प्रवृत्ति वळली व ती गोष्ट क्रमप्राप्तच होती.

दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेनें महाराष्ट्र व कर्नाटक मिळून एकंदर २२ संस्थानें आपल्या कक्षेंत घेतलीं होतीं. कोल्हापूरच्या ९ मांडलिक जहागिरीही त्यांतच समाविष्ट होत्या. सभेनें या सर्व संस्थानांतून सार्वजनिक चळवळी करण्यास प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष सतत मदत केली. त्या सभेमार्फत श्री. पटवर्धन, श्री. नरसिंह चिंतामण केळकर, प्रो. गणेश रघुनाथ अभ्यंकर, श्री. बाळकृष्णपंत शिखरे वगैरे कार्यकर्त्यांनीं परिषदा, वर्तमानपत्रें, चौकशी-कमिट्या वगैरे साधनांच्या योगानें संस्थानी प्रजेंत खूप जागृति करण्याची खटपट केली आणि खालसांतही संस्थानी प्रजेचा प्रश्न प्रामुख्यास आणिला. देशी राजांनीं ब्रिटिशांच्या छत्राखालीं आपल्या प्रजेवर जे जुलूम चालविले होते– अन्यायी करवाढ, अमर्याद खासगी खर्च, नागरिकस्वातंत्र्याची गळचेपी, लोकोपयोगी गोष्टींत राज्याचा पैसा खर्च करण्याऐवजीं तो चैनबाजींत उधळणें, न्यायखात्यांत ढवळाढवळ करणें– या सर्वांविरुद्ध प्रजेला संघटितपणें राज्यसत्तेला विरोध करण्याची आवश्यकता भासत होती. अर्थात् निःशस्त्र प्रजेला संघटित प्रतिकार करण्याची आवश्यकता भासल्यावर संघटनेसाठीं साधना करणेंही क्रमप्राप्त होतें. दुर्दैवाची गोष्ट हीं कीं, खालसांत महात्माजींनीं कॉंग्रेसचीं सूत्रें हातीं घेण्यापूर्वी चळवळीचें जें स्वरूप होतें तेंच स्वरूप संस्थानांतील चळवळींचेंही परवांपरवांपर्यंत राहिलें. प्रजेंत अहिंसात्मक प्रतिकारशक्ति निर्माण होण्यास जी पूर्वतयारी करावी लागते ती विधायक कार्यक्रमाच्या

पायावर केली पाहिजे. परंतु संस्थानी चळवळीचीं सूत्रें ज्या व्यक्तींच्या हातीं होतीं ते सर्व जुन्या मताचे होते. महात्माजींच्या विधायक कार्यक्रमावर त्यांचा खरा विश्वास नव्हता. त्यामुळें चळवळी पुष्कळदां फोल झाल्या. कित्येक प्रसंगीं प्रजाक्षोभ उत्कट स्वरूपांत प्रकट झाला तरी लोखंडाचे चणे खाण्याचा प्रसंग येतांच प्रजेचे दांत पडलेले आढळून आले आणि दडपशाही जोरानें चालू होतांच प्रजेंतील उत्साह थंडावला.

मिरज संस्थानांतील सारावाढीबाबत जो सत्याग्रह १९२८ सालीं झाला त्यास महात्माजींनीं 'सुंदर सत्याग्रह' हें नांव देऊन त्याचा गौरव केला. हा सत्याग्रह चालवून दाखविण्याचें श्रेय श्री. बालकृष्ण विनायक शिखरे व श्री. पुंडलीकजी कातगडे यांस दिलें पाहिजे. मिरजेच्या अधिपतींनीं वचन मोडलें, धमक्या दिल्या, भेदनीतीचा आश्रय केला; परंतु रयतांनीं नेट धरल्यामुळें त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं मिरज सरकारनें दडपशाहीचे शस्त्र काढलें व रयतेचे कित्येक पुढारी फितविले. संघटना ढिली पडली. पण शेवटीं दोन्ही पक्षांनीं देवाणघेवाण करून प्रकरण मिटविलें. रयतेच्या शक्तीची मर्यादा पाहून पुढाऱ्यांनीं चळवळ मागें घेतली यांत त्यांचें व्यवहारचातुर्य दिसून आलें.

भोर संस्थानांतही स्थानिक तक्रारींवरून सत्याग्रह झाले. त्यांपैकीं हिरडा-सत्याग्रह, कादवे-सत्याग्रह, जंगल-सत्याग्रह हे प्रसिद्धीस आले. कादवे-सत्याग्रहाचा परिणाम थोडाबहुत होऊन लोकांच्या तक्रारी अंशतः दूर झाल्या. हिरडा-सत्याग्रह व जंगल-सत्याग्रह हे फार गाजले. त्या प्रसंगीं रयतेनें कायदेभंग देखील केला. श्री. गोपीनाथपंत पोतनीस व श्री. शेटे यांनीं या कामीं फारच स्वार्थत्यागपूर्वक सेवा केली व प्रजेसाठीं खूप मेहनत घेतली. त्याबद्दल त्यांना कारावासाचें बक्षीस मिळालें व त्यांच्या घरादारांची विल्हेवाट लागली. भोर संस्थानांत दडपशाहीचा वरवंटा सुरू झाला आणि रयतेच्या मनांत भीति उत्पन्न करण्यासाठीं दंडनीतिचें विविध दर्शन करविण्यांत येऊं लागलें. त्याचा परिणाम कित्येक वेळां दिसून आल्याशिवाय राहिला नाहीं.

इचलकरंजी जहागिरींतील आजरें तालुक्यांत सारावाढ जाहीर होतांच तेथील रयतेनें सत्याग्रह सुरू केला. मिरजेचे श्री. बाळकृष्णपंत शिखरे व

श्री. दि. वा. दिवेकर तेथील चळवळीचे सल्लागार होते. तत्पूर्वी मुंबई कौन्सिलांतील तुकडे-बिल मागें घेण्यांत आलें होते व मुंबई इलाखा शेती-संघाची स्थापना झाली होती. बार्डोलीच्या यशानें हिंदभूमि दुमदुमत होती आणि शेतकरी अन्यायी सारावाढीविरुद्ध ठिकठिकाणीं उठत होते. आजऱ्याची सारावाढ महाराष्ट्रांत फार गाजली व खालसा मुलखांतील सर्व प्रजापक्षीय वर्तमानपत्रांनीं व कार्यकर्त्यांनीं रयतेच्या या चळवळीला पाठिंबा दिला. आजऱ्यांतील एक उत्साही कार्यकर्ते श्री. जोशी यांनीं खूप मेहनत घेऊन खेडोपाडीं फिरून रयतेंत जागृति केली आणि शेतकऱ्यांची शक्तिशाली संघटना करून श्रीमंतांची खात्री करून दिली कीं, रयतेची न्याय्य मागणी फेटाळणें कठीण जाईल. तेव्हां श्रीमंतांनीं पोक्त विचार करून तडजोड केली.

सन १९३० मध्यें भारतीय आंदोलन सुरू होतांच अनेक संस्थानांतून शेंकडों लोक चळवळींत भाग घेण्याकरितां खालसा मुलखांत आले व त्यांनीं उत्कृष्टपणें शिपाईगिरी केली. खालसा मुलखांतील चळवळीचा परिणाम संस्थानी प्रजेवर कल्पनेबाहेर झाला व संघटनेचें काम यानंतर अधिक पद्धतशीरपणें चालू झालें.

औंध, फलटण, सांगली, सावंतवाडी वगैरे कित्येक हाताच्या बोटांवर मोजण्याइतक्या संस्थानांचे अधिपति आपल्या इतर बांधवांपेक्षां अधिक विचारक्षम व प्रजाहितैषी निघाले; त्यामुळें तिकडील प्रजेला सुधारणासोपानावर अधिक वेगानें प्रगति करितां आली. परंतु सर्वसाधारणपणें खालसा प्रजेप्रमाणें संस्थानी प्रजेचा प्रगतिमार्ग कांटेरी व धोक्याचा आहे; आत्मबलिदान दिल्याशिवाय आणि वर्षानुवर्षें सेवेंत रक्त आटविल्याशिवाय प्रजेची संघटना करणें अशक्य आहे अशीच प्रतीति दिवसानुदिवस येत आहे.

---

# खंड तिसरा

# मं
# थ
# न

## आत्मलक्षी प्रयोजन

युद्धोत्तर-कालास सुरुवात होत आहे.

एक गोष्ट नमूद केली पाहिजे कीं, याच्या आरंभकालांत मी महाराष्ट्रांत येऊन दाखल झालें व तीही देवांची सहकारिणी म्हणून. १५ जुलै १९३४ पासून देवांशीं कार्यनिमित्तानें जो संबंध आला तो अजून वाढताच आहे. महाराष्ट्रांतील राजकारणाचीं निरनिराळीं अंगें यापुढें जवळून पाहावयास सांपडलीं. त्यामुळें यापुढील दर्शन केवळ परस्मैपदी राहणार नाहीं. माझ्या मनःप्रवृत्तींची छाया पुढील चित्रणावर दिसून येईल. पण त्याला इलाज नाहीं.

# १ युद्धानंतरचे शांतिमंत्र

१९२० सालच्या चळवळीनंतर नवा महाराष्ट्र जन्मास येऊं पाहत होता. दश-वार्षिक संघर्ष हा प्रसववेदनांचा काळ होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. १९३० नंतर नवा महाराष्ट्र जन्मास आला.

भूतकाळांतील परिस्थिति पार बदलून गेली होती. बहुजनसमाज जागा झाला होता. समाजरूपी विराट् पुरुषाचें मस्तकच चेतनायुक्त होतें असें नाहीं; तर त्याचे हातपाय सुद्धां चळवळ करूं लागले होते. व्यक्तीची व समाजाची शक्ति वृद्धिंगत करणारीं दोन महान् सामाजिक कर्तव्यें बहुजनसमाजानें पुरीं पाडलीं होतीं : यज्ञ आणि तप. या दोन कर्तव्यांचें पालन करण्यासाठीं प्रांतानें खूप झीज सोसली होती. या तपांतून व यज्ञांतून नवें सर्जन झालें. नवे विचार दाखल झाले. या विचारांचें पुढें मंथन सुरू झालें. शक्तीचा अजमास होऊं लागला. नवे प्रयोग करण्याची वृत्ति पसरत चालली.

या चळवळीनंतर एक गोष्ट निश्चितपणें सिद्ध झाली. महाराष्ट्र पूर्णपणें कॉंग्रेसचा झाला. महाराष्ट्रांतील चळवळ कोणा एका वर्गानें वा जातीनें चालविली नव्हती. राजकारणांत एरवीं भाग न घेणाऱ्या बहुसंख्य साऱ्या जातींनीं या सामाजिक यज्ञांत आपापली आहुति टाकिली. परिणामीं यज्ञाचें फल त्यांना मिळालें. त्यांचा पुरुषार्थ वाढला.

ज्यांनीं यज्ञ व तप हीं आचरिलीं नाहींत ते क्षीणप्रभ झाले. "क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति" अशी त्यांची अवस्था झाली. या यज्ञमहोत्सवाच्या तेजापुढें जुनें राजकारण कृत्रिम व वाक्प्रचुर वाटूं लागलें. राष्ट्रव्यापी चळवळीच्या योगानें साऱ्या जाति व वर्ग एका समान भूमिकेवर येऊन सर्वांमध्यें बलवान् सहकार निर्माण झाला. त्यामुळें महाराष्ट्रांतील ब्राह्मण-ब्राह्मणेतर-वादांसारखे वाद आपोआप मागें पडले.

चळवळ मागें घेतल्यावर महात्मा गांधींनीं ग्रामोद्धाराचें काम हातीं घेतलें. हरिजनोद्धाराची चळवळ तर त्यांनीं चालू केलीच होती. तिच्यापायीं त्यांना सनातनी म्हणविणाऱ्या लोकांकडून तीव्र विरोध पोंचत होता. त्यांचा हरिजन-

दौरा चालू असतां पुण्यास त्यांचा सात दिवस मुक्काम होता. पुणें नगरपालिकेनें त्यांस मानपत्र देण्याचें ठरविलें आणि त्याचा स्वीकार करण्यास ते जाण्यापूर्वी त्यांचीच मोटर समजून प्रथम आलेल्या एका मोटरीवर बॉम्ब फेंकण्यांत आला. जगन्नाथपुरी या क्षेत्रांत तर त्यांच्या जिवावर बेतली होती. परंतु तत्त्वासाठीं देहार्पण करण्याची तयारी असल्यामुळें महात्माजींनीं अशा संकटांची पर्वा केली नाहीं.

राजकारणापुरतें सांगावयाचें म्हणजे महात्माजींनीं स्वतःशिवाय इतरांना कायदेभंग करण्याची मनाई केली. महात्माजी आपल्या विधायक कार्यक्रमावर अढळ होते. सार्वत्रिक सत्याग्रह पुकारण्याची लायकी केवळ विधायक कार्यक्रम निष्ठापूर्वक पाळण्यानेंच येईल असा त्यांचा विश्वास कायम होता. परंतु डॉ. अन्सारी, डॉ. बिधानचंद्र रॉय, बॅ. भुलाभाई वगैरे पुढारी कायदेमंडळांत प्रवेश करून नवीन सुधारणांस खीळ घालण्याचा कार्यक्रम कॉंग्रेसपुढें ठेवण्याबद्दल महात्माजींना वैयक्तिक कायदेभंगाची चळवळ त्यांनीं मागें घेण्यापूर्वीच गळ घालीत होते. विधायक कार्यक्रमाचें महत्त्व राष्ट्रीय सभेंतील बुद्धिमन्तांस अजून पटलें नव्हतें. खेरीज सत्याग्रहकालांत दडपशाहीस मंजुरी देणारे कायदे-मंडळांतील आपलेच हिंदी लोक समाजद्रोही बनून जगभर त्यांनीं राष्ट्राची नाचक्की केली अशीही तक्रार त्यांनीं पुढें आणिली. कॉंग्रेसमधील बुद्धि-मन्तांनीं कायदेमंडळें अडवावीं आणि कट्टरांनीं विधायक कार्यक्रम अंमलांत आणून बाहेरील जनमताची शक्ति कायदेमंडळांतील आपल्या बांधवांच्या मागें उभी करावी असा युक्तिवाद त्यांनीं चालविला. महात्माजींनीं पाहिलें कीं पार्लमेंटरी वृत्ति पुन्हा उचल खात आहे. तेव्हां आपल्या नेहमींच्या उभयान्वयी धोरणास अनुसरून त्यांनीं अन्सारी-रॉय प्रभृतींचें बोलणें कबूल केलें; व स्वराज्य-पक्षाप्रमाणें वेगळा पक्ष न काढितां कॉंग्रेसच्याच आधिपत्याखालीं पार्लमेंटरी बोर्ड स्थापन करून निवडणुकी लढविण्याच्या कार्यास आपली संमति दिली.

कॉंग्रेसनें निवडणुकी लढविण्याचें ठरवितांच महाराष्ट्रांत वादळ उठलें. " अगदीं इकडचें थोबाड तिकडे फिरविल्याप्रमाणें भवितव्यतेनें कॉंग्रेसच्या धोरणांत परिवर्तन घडवून आणिलें ", याबद्दल आनंद व्यक्त करीत असतां " गांधींच्या बगलेंतल्या थोड्या निवडक पुढाऱ्यांनींच तें सर्व काम आपल्या

हातीं घेतलें......डॉ. अन्सारींनीं अगदीं एका बाजूस रांचीसारख्या ठिकाणीं खासगी कूट जुळवून हवें तसें धोरण आंखलें... विशेषतः महाराष्ट्रांतील जुन्या स्वराज्यपक्षाच्या आम्हां महाराष्ट्रीय पुढाऱ्यांना या खासगी सभेला निमंत्रण न द्यावें व मुद्दाम वगळावें" (**गतगोष्टी**), याबद्दल अणे (व इतर प्रतिसह.पक्षीय) यांना राग आला. १९३३ च्या ऑक्टोबरांत केळकरपक्षानें मुंबईस लोकशाही स्वराज्यपक्षाची स्थापना केली होती. कांहीं दिवस केळकर त्या पक्षाचे अध्यक्ष होते. नंतर अणे झाले. अण्यांचीं कौन्सिल-प्रवेशाबाबतचीं मतें अजून कायम होतीं. काँग्रेसनें कौन्सिल-प्रवेश मान्य केल्यामुळें त्यांना आनंद वाटावा; परंतु जातीय निर्णयाबाबत काँग्रेसचें धोरण त्यांना पसंत नव्हतें. ते व मालवीय यांनीं जातीय निर्णयाशीं झगडण्यासाठीं अखिल भारतीय पक्ष काढण्याचें ठरविलें; व दोघांनींही वर्किंग कमिटीचे राजीनामे सादर केले.

याप्रमाणें अखिल भारतीय पायावर कौन्सिल-प्रवेश चालू करण्याचें ठरल्यावर वरिष्ठ कायदेमंडळाच्या निवडणुकी नोव्हेंबरांत होणार असल्यामुळें महाराष्ट्रांतही तिचे प्रतिध्वनि उमटणें स्वाभाविक होतें. महाराष्ट्रांत काँग्रेस-पक्ष विजयी होऊन निघाला होता. १९३४ नंतर महाराष्ट्रांत काँग्रेस-शिवाय कोणत्याच पक्षास महत्त्व राहिलें नाहीं. महाराष्ट्र प्रांतिकचे अध्यक्ष देव हेच होते. आणि चळवळ थांबली तरी ती पुन्हा पुढें मागें सुरू होणारच आहे—मध्यंतरींच्या काळांत संघटनेचें कार्य विशेष जोरदारपणें केलें पाहिजे असें मनाशीं ठरवून ते त्या कार्याला लागले.

देवांना दोन्ही दिशांनीं संघटना करावयाची होती. विधायक कार्यक्रमास चालना द्यावयाची होती व कौन्सिल-प्रवेशाचा कार्यक्रम काँग्रेस तिकिटावर यशस्वी करून दाखवावयाचा होता.

१९३० पूर्वीं प्रांतभर पांगलेले असहकारितावादी चळवळीच्या काळांत देहानें व मनानें पुष्कळ जवळ आले होते. चळवळीचे अनेक फायदे झाले. त्यांपैकीं एक म्हणजे महाराष्ट्रांतील गांधीविचारप्रणालीला मानणाऱ्या कार्यकर्त्यांना परस्परपरिचय व सहकार्याच्या दृष्टीनें ती मोक्षदा ठरली. त्यांच्या हृदयांत अखंड धर्मयुद्धाची ज्योति तिनें तेवत ठेवली व संघटनात्मक कार्याची महती त्यांना पटवून दिली. आंदोलन सुरू होईपर्यंत महात्मा गांधींसारख्या

श्रेष्ठ विभूतीच्या व्यक्तिमत्त्वाचाच काय तो प्रभाव त्यांच्या जीवनावर पडला होता. यानंतर चळवळीच्या प्रभावामुळें त्यांच्यांतील पूर्वीचा विमनस्कपणा जाऊन त्यांच्यांत संवादी भावना निर्माण झाल्या.

महाराष्ट्रांत महात्माजींचें नेतृत्व मान्य करणाऱ्या लोकांतही भेद होते. जे त्यांचें नेतृत्व मान्य करीत होते ते सारेच त्यांची विचारप्रणाली कबूल करीत नव्हते. महात्माजींचीं जीवनव्यापी सत्य-अहिंसा तत्त्वें मान्य असलेले लोक फारच थोडे होते. यांपैकीं बहुतेक लोक आश्रमीय वृत्तीचे असून कमित्यांच्या राजकारणांत न पडतां केवळ विधायक कार्यक्रम करीत राहणें पसंत करीत. आप्पासाहेब पटवर्धन, बाळूभाई मेहता, अण्णासाहेब सहस्रबुद्धे वगैरे मंडळी अशा प्रकारची होती. उलट देव, दास्ताने वगैरे कार्यकर्ते महात्माजींचीं तत्त्वें मानणारे असूनही राजकारणांत पडलेले असत. एके ठिकाणीं आश्रम काढून विधायक कार्य करीत बसणें त्यांच्या स्वभावांत नव्हतें. त्यांचें आश्रमीय जीवन त्यांच्याबरोबरच फिरत असे. राजकीय क्षेत्रांत काम करीत असतांच आपल्या शक्तीचा, बुद्धीचा व चारित्र्याचा विकास होत जाईल अशी त्यांची भावना असे. याव्यतिरिक्त तत्त्वांना महत्त्व न देणाऱ्या पण राष्ट्रपुरुष या दृष्टीनें इतर कोणीच तुल्यबल नसल्यामुळें महात्माजींचें नेतृत्व मानणाऱ्या व त्यांच्या क्रान्तिकारक शक्तीवर पूर्ण विश्वास ठेवणाऱ्या कार्यकर्त्यांचा एक फार मोठा समूह महाराष्ट्रांत होता. ते कॉंग्रेसवादी होते.

तुरुंगांतून सुटल्यावर देवांनीं बेळगांव येथें हरिजन-दौरा चालू असतांना महात्माजींची गांठ घेतली. प्रांतीय राजकारणाचीं सूत्रें हातीं घेण्यास त्यांना महात्माजींनीं अनुज्ञा दिली. ती मान्य करून देव महाराष्ट्रांत परत आले व त्यांनीं काम सुरू केलें.

---

# २ खेड्यांकडे वळा

दांडीकूच होण्यापूर्वी सुमारें नऊ महिने मी मुंबईहून साबरमतीच्या सत्याग्रहाश्रमांत येऊन दाखल झालें होतें. वैयक्तिक सत्याग्रह सुरू होईपर्यंत महात्माजींनीं मला युद्धांत पडण्याची आज्ञा दिलीच नव्हती. जेव्हां आश्रमाची आहुति देण्याचा प्रसंग आला तेव्हां मलाही स्वराज्यमंदिरांत जाण्याची संधि मिळाली.

१ जुलै १९३४ रोजीं अहमदाबाद सेंट्रल जेलमधून आम्ही आश्रमीय भगिनी व इतरही बहुतेक राजकीय कैदी असलेल्या भगिनी सुटलों. महात्माजींची भेट घेण्यास आम्ही भावनगरला गेलों होतों. आश्रम तर दग्ध झालाच होता. पुढील कार्याच्या दृष्टीनें महात्माजी खेड्यांत जाऊन कार्य करण्याची सल्ला सर्व अनुयायांस देत होते. मला तें तुरुंगांतच माहीत झालें होतें व सुटल्यावर ग्रामसेवेस स्वतःस वाहून घेण्याचें मीं ठरविलें होतें. कार्यपद्धति निश्चित झाल्यावर क्षेत्राचाच प्रश्न होता. महाराष्ट्रांत जाऊन कार्य करण्याचा निश्चय मीं केला व महात्माजींची अनुज्ञा मिळविली.

महाराष्ट्रांत जावयाचें ठरविलें पण तो प्रांत मला साफ अपरिचित होता. चळवळीपूर्वीची महाराष्ट्रीय राजकारणाबाबतची माहिती उल्हासदायक नव्हती. तरीसुद्धां महाराष्ट्रांतच जाण्याचा निश्चय मीं केला व माझे मित्र 'नवाकाळ'चे श्री. धुरंधर यांस मार्गदर्शन करण्याबद्दल मीं पत्रद्वारें विनंति केली.

त्यांचें तावडतोब उत्तर आलें कीं, " महाराष्ट्रांत तुम्हांला काम करावयाचें असेल तर गांधीनिष्ठा, कर्तृत्व व चारित्र्य यांनीं युक्त असे एकच गृहस्थ तुम्हांला मदतगार होऊं शकतील व ते म्हणजे श्री. शंकरराव देव हे होत. मीं त्यांचेकडे तुमच्याबद्दल गोष्ट काढिली. त्यांचाही विचार एक आश्रम काढावयाचा असून ते तुम्हांला आपल्या आश्रमीय मंडळींत समाविष्ट करून घेण्यास राजी आहेत."

पुढील गोष्टी क्रमशः देण्याची आवश्यकता नाहीं. १५ जुलै १९३४ रोजीं मुंबईत देवांची पहिली भेट होऊन बोलणें झालें व त्याच दिवशीं संध्याकाळीं मी महाराष्ट्राच्या राजधानींत प्रवेश केला.

५ ऑगस्ट रोजीं सासवड येथें आमचा आश्रम स्थापन झाला. सुरुवातीस आचार्य भागवत, भाऊ गोखले, शहा नांवाचा एक विद्यार्थी व मी इतकी मंडळी होतों. नंतर कांहीं दिवसांनीं डॉ. आठवले हे आश्रमास येऊन मिळाले.

* * *

विधायक कार्यक्रम करण्याच्या देवांच्या मनीषेचें सासवड येथील आश्रम हें एक प्रतीक होतें. ग्रामोद्योग व खादी यांच्या चळवळीचें तें केन्द्र व्हावें व अशा विधायक कार्याच्या संस्थांचें साऱ्या प्रांतभर जाळें पसरून टाकावें अशी त्यांची उत्कट इच्छा होती. एकान्तसेवन, अध्यात्म व वाचन यांची आवड असूनही देवांना राजकारण सोडून आश्रमांत राहणें शक्य झालें नाहीं. त्यांच्या प्रकृतींत दोन परस्परविरोधी वृत्ति कधीं कधीं उत्कटतेनें दिसून येतात. त्यांची लढाऊ वृत्ति त्यांना रजोगुणी बनविते. त्यांची अध्यात्मवृत्ति त्यांना लोकांत मिसळूं देत नाहीं व एकान्ताची आवड उत्पन्न करिते. असो.

* * *

सासवडला आश्रम सुरू झाला. त्यास गांधीसेवासंघाकडून आर्थिक मदतीचें आश्वासन मिळालें. देव आश्रमांत राहत नसल्यामुळें अर्थात् त्यांच्या निर्वाहाचा प्रश्न उपस्थित झालाच. चोवीस तास विनावेतन काम करणाऱ्या सेवकास उदरनिर्वाहाचा विचार तर केलाच पाहिजे ! १९३१ मध्यें महाराष्ट्र-सेवासंघाकडून देवांना मदत मिळत होती. परंतु नंतर महाराष्ट्र-सेवासंघ गांधी-सेवा-संघांत प्रविष्ट झाला. देवांना गांधीसेवासंघाकडूनही स्वतंत्रपणें मदत मिळाली असती, परंतु देवांनीं ती घेतली नाहीं. त्याचीं दोन कारणें होतीं. देवांचें म्हणणें असें होतें कीं, गांधीसेवासंघाचे चालक वर्ध्यासारख्या दूर ठिकाणीं बसून महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांवर देखरेख करितात तें योग्य नाहीं. महाराष्ट्रांतील परिस्थिति विलक्षण असल्यामुळें महाराष्ट्रीय सेवकांसाठीं स्वतंत्र संघ असावा, स्वतंत्र फंड असावा व त्याचें चालकमंडळ महाराष्ट्रांतच असावें. देवांचें दुसरें म्हणणें हें कीं, " १९३०–३२ च्या चळवळींत महाराष्ट्रांतील शेंकडों कार्य-

कर्त्यांनीं स्वदेशप्रीतीच्या अभिनिवेशांत खडतर तपस्या व त्याग करून आपल्या संसाराचें वाटोळें करून घेतलें आहे. चळवळ संपल्यावर किती तरी कार्यकर्ते अन्नास मोताद होऊन कठीण परिस्थितींत दिवस काढीत आहेत. जोंवर अनेकांची ही दशा आहे, तोंवर मीं गांधीसेवासंघांतून मिळणाऱ्या आपल्या वेतनावर निश्चिंतपणें कां उदरनिर्वाह करावा ?"

त्यामुळें देवांनीं संघाकडून आर्थिक मदत कधींच घेतली नाहीं. "महाराष्ट्राला माझी सेवा हवी असेल तर महाराष्ट्रानेंच मला पोसलें पाहिजे" असा वीरोचित निर्णय देवांनीं घेतला व त्याबरहुकूम तेव्हांपासून आतांपर्यंत त्यांनीं आपलें आयुष्य घालविलें ! आजमितीसही देवांचा योगक्षेम लोकाश्रयावरच चालला आहे.

* * *

देवांच्या सोबत्यांपैकीं तात्या देशपांडे, जावडेकर, भुस्कुटे हे मुंबईत 'नवशक्तीं'त काम करण्यास गेल्याचें मागें सांगितलेंच आहे. भुस्कुटे परळ विभागांत राहूं लागले. तुरुंगांत असतांना त्यांचा कल समाजवादाकडे झुकलाच होता. परळला राहूं लागल्यावर साम्यवाद्यांच्या सहवासांत ते पुरते साम्यवादी बनले. मानवी मनांत कोठें तरी पराकोटीचा जालीमपणा असला व शत्रूशीं सामना करितांना मानवतेच्या पायावर व्यवहार होऊंच शकत नाहीं अशी कल्पना झाली कीं, तो मनुष्य साम्यवादीच बनणार. तसें भुस्कुट्यांचें झालें.

१९३२-३३ च्या चळवळींत पुण्याचें टिळक महाविद्यालय व ठिकठिकाणच्या राष्ट्रीय शाळा सरकारनें बेकायदेशीर ठरविल्या होत्या. त्यामुळें त्यांतील शिक्षकवर्ग वेगवेगळ्या क्षेत्रांतून पांगला गेला ! शिक्षकांना चळवळीमध्यें महत्त्व आल्यामुळें ते राजकीय क्षेत्रांत शिरून राजकारण करूं लागले किंवा ग्रामसेवेस वाहिले गेले. टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचें आयुर्वेद विद्यालय मात्र भरभराटीस येत होतें. महाविद्यालयाच्या राष्ट्रीय शिक्षण प्रसारक मंडळांत बदल झाला होता. पुष्कळ वर्षें केळकर त्याचे अध्यक्ष होते. एका दशाच्या शिक्षकवर्गांत जावडेकर व भागवत हे विसंवादी सूर निर्माण होतांच केळकरांना असंतोष वाटूं लागला. जावडेकर 'लोकशिक्षण' मासिकांतून केळकरांच्या धोरणावर कडक टीका करीत, त्याचेंही त्यांना वैषम्य वाटे.

त्यांनीं लागू व लिमये यांस आग्रहानें सांगितलें कीं, "या दोन गृहस्थांना काढून टाका. मी तुम्हांला यांच्याबद्दल दोन उत्तम एम्. ए. झालेले गृहस्थ देतों." जावडेकर व भागवत यांनीं महाविद्यालयाची सेवा करून त्यांत जें नवचैतन्य निर्माण केलें होतें तें विचारांत घेतां त्यांना काढून लावणें अयोग्य होतें. उलट मंडळाचे आजन्म सभासद होण्याचा अधिकार त्यांना प्राप्त झाला होता व त्याप्रमाणें लागू व लिमये यांनीं त्या दोघांस १९३१ मध्यें मंडळाचे आजीव सभासद करून घेतलें. यानंतर केळकरांनीं आपल्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला.

१९३४ मध्यें जावडेकर 'नवशक्तीं'त दाखल झाले, तर भागवत सासवड येथील आश्रमांत प्रविष्ट झाले. १९३० च्या सत्याग्रहसंग्रामांतच त्यांची पत्नी व एकुलता एक मुलगा वारल्यामुळें ते पूर्ण मोकळे झाले होते.

लिमये यांनीं पुष्कळ वर्षें टिळक महाविद्यालयाच्या मुख्याध्यापकाचें काम केलें. १९३० च्या सुमारास ते आजारी झाल्याचें व वैयक्तिक सत्याग्रहांत भाग घेऊन त्यांनीं तीन महिने कारागृहवास भोगल्याचें मागें सांगितलेंच आहे. लिमयांची बुद्धिमत्ता उच्च दर्जाची असून त्यांना विलायतेस I. C. S. ची परीक्षा देण्याची संधि मिळणार होती. परंतु त्यांच्या स्वदेश-भक्तीनें त्यांना आपली 'करियर' बुडविण्यास भाग पाडलें. हा लिमयांचा फार मोठा त्याग म्हटला पाहिजे. तात्या देशपांडे, देवागिरीकर, देव यांच्याप्रमाणें तेही देशसेवेच्या उद्देशानें अविवाहित राहिले. विद्यालयाची त्यांनीं निर्वेतन सेवा केली. ते उत्कट ध्येयवादी असून 'निरीहता' हा त्यांचा मुद्रालेख आहे. त्यांच्या मित्रमंडळांत त्यांच्या योग्यतेविषयीं फार मान आहे. लिमये, डॉ. लागू, बुवा गोसावी, डॉ. दातार, अतीतकर, स. के. भावे या सर्वांचा एक मित्राचारी गट आहे. हे सारेजण १९३० नंतर गांधी-विचार-प्रणाली-कडे अधिक झुकले. यद्यपि देवांच्या सहकारी मंडळांत त्यांचा प्रवेश झाला नव्हता.

१९३४ च्या मार्चमध्यें आचार्य रवडे यांचें अपघातानें देहावसान झालें, तेव्हां आचार्य लिमये यांनीं त्यांचें चरित्र लिहून प्रसिद्ध केलें. महाराष्ट्र त्यांच्यासारख्या त्यागी व निष्ठावंत सेवकाला दुर्दैवानें अकालीं मुकला.

डॉ. लागू चळवळ संपल्यानंतर राजकारणांत पडले. आयुर्वेद विद्यालयाची जबाबदारी त्यांच्या शिरावर असतांना, कौटुंबिक भार वाहात, उद्योगधंदा सांभाळून देखील त्यांनीं राजकारण सोडलें नाहीं. १९३४ मध्यें ते हवेली तालुक्याचे अध्यक्ष झाले.

बुवा गोसावी साताऱ्यास राजकारण चालवूं लागले. जिल्हा कमिटीचे ते अविभाज्य अंग बनले.

श्री. ठकार हे वैयक्तिक सत्याग्रहांतून सुटल्यावर पश्चिम खानदेशच्या जिल्हा कमिटीचे अध्यक्ष बनले. त्यांचें केंद्र यानंतर धुळें शहर झालें. सवाई मुकटीचें खादीकेंद्र चालू होतेंच. अण्णा सहस्रबुद्धे १९३४ च्या जानेवारींत सुटले, ते बिहारच्या धरणीकंपग्रस्तांची सेवा करण्यास गेले. पुढें ते जुलैंत परत येऊन महाराष्ट्र प्रांतिकचे एक चिटणीस बनले. १९३५ च्या जानेवारींत अण्णा महाराष्ट्र चर्खा-संघाचे चिटणीस झाले.

बाळूभाई मेहता १९३४ च्या मार्चमध्यें तुरुंगांतून सुटले. ठकारांप्रमाणें तेही चळवळीपूर्वीपासून प्रांतिकचे सभासद होते, इतकेंच नव्हे तर पनवेल परिषदेपूर्वीं प्रांतिकचे उपाध्यक्षही होते. १९२१ ते १९३६ पर्यंत मधला थोडा काल सोडून ते जिल्हा कमिटीचे अध्यक्ष होते. १९३६ नंतर त्यांनीं प्रांतिकच्या राजकारणांत फारसें मन घालण्याचें सोडून दिलें. परंतु तोंपर्यंत प्रांतीय घडामोडींत त्यांनीं देवांना पूर्ण पाठिंबा दिला. चळवळ संपल्यावर त्यांचें लक्ष ग्रामसेवेकडे वेधलें व ता. ४ एप्रिल १९३५ रोजीं त्यांनीं पश्चिम खानदेशांत कासारें येथें 'सेवामंदिर' स्थापिलें.

बाळूभाईनीं कांहीं चांगलीं पुस्तकेंही लिहिलीं. १९३०त 'खादीमीमांसा' व 'वैभवशाली हिंदुस्थान' हीं पुस्तकें लिहिलीं. तुरुंगांत असतांना श्री. राधाकृष्णन् यांच्या एका पुस्तकाचें भाषांतर त्यांनीं 'हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें' या नांवानें केलें.

दास्ताने डिसेंबर १९३३ मध्यें सुटले. त्यांच्या पत्नी व मुली १९२८ ते १९३३ पर्यंत वर्ध्यास होत्या. विनोबांच्या प्रेरणेनें वारूबाईनीं वर्ध्यातील आश्रमांत तीन वर्षें मुलींची शाळा चालविली. दास्ताने सुटून १५ दिवस

वर्ध्यास राहून आले. वर्ध्यास महात्माजींनीं ग्रामसेवेच्या संस्था स्थापण्याचा उपक्रम केला होता, गांधीसेवासंघासही महत्त्व येत होतें. महाराष्ट्रांतील ठकार, बाळूभाई, आप्पासाहेब पटवर्धन, वगैरे कार्यकर्ते त्याचे सदस्य बनत होते. दास्ताने तर पूर्वीपासून अवैतनिक सदस्य होतेच. लवकरच ते संघाच्या कार्यकारी मंडळांत प्रविष्ट झाले. ग्रामोद्योगाकडे लक्ष पुरविण्याचें त्यांनीं ठरविलें. एरंडोल येथील हातकागदांच्या कारखान्याचें पुनरुज्जीवन करण्याची खटपट त्यांनीं चालविली.

आप्पासाहेब पटवर्धन यांनींही सुटून आल्यावर स्वतःस राजकारणांत गुरफटून घेतलें. जिल्ह्याच्या राजकारणांत ते विशेष मन घालूं लागले. जिल्ह्यांतील कार्यकर्ते सुटून आल्यावर जिल्ह्यांत काँग्रेसचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न सर्व एकविचारें करूं लागले. तथापि आप्पांना खेडेगांवाची आवड असल्यामुळें त्यांनीं आंबेरी येथेंच आपलें केन्द्र स्थापिलें. तेथें त्यांचा आश्रम होता व खादीवर पूर्ण निष्ठा असल्यामुळें त्यांच्या प्रवृत्तिमालेचा खादी हा सूर्य राहिला.

हरिभाऊ जोशी १९३५ पर्यंत सुटले नाहींत. देवगिरीकर चळवळीनंतर राजकारणांत अधिक लक्ष घालूं लागले व पुणें शहर आणि जिल्हा कमिटीच्या अध्यक्षपदावरही विराजमान झाले. त्यांची लिहिण्याची हौस वाढतीच होती.

आपटेगुरुजी १९३४ च्या जानेवारींत सुटले. तुरुंगांत त्यांनीं खूप लेखन व वाचन केलें. त्यांची प्रकृति फार बिघडली होती. त्यांच्या गैरहजिरींत त्यांच्या शूर पत्नीचे फार हाल झाले. पण राधाबाईनीं हिंमत न सोडतां स्वतः कमावून खाल्लें. त्या उत्तम नर्स आहेत. आपट्यांचीं खाजगी व राजकीय सर्व कामें त्यांनीं सांभाळलीं. आपट्यांनीं शाळा चालवायची नाहीं असें अगोदरच ठरविलें होतें. १९३४ मध्यें परत आल्यावर त्यांनीं येवल्यास 'विनयमंदिर' स्थापिलें. जमनालालजींनीं मदत केली. खरे व ल. ब. कुलकर्णी हे त्यांचे सहकारी होते. येवल्यांत काँग्रेसचें कार्य करून शिवाय चिंचोडी येथेंही ग्रामसेवा त्यांनीं सुरू केली. १९३५ सालीं ते तालुका काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष झाले.

अतीतकर, बाळूकाका, हरिभाऊ फाटक वगैरे मंडळीही यथाकाल तुरुंगांतून सुटून येऊन घरीं बसली होती व सुचेल ती धडपड करीत होती. चळवळीनंतर पुष्कळांच्या जीवनांत उलटापालट झाली, विचारांतही बदल

झाले. ज्यांची श्रद्धा अढळ होती आणि विचारपूर्वक जे तुरुंगांत गेले होते ते परत येतांना वाढती श्रद्धा व उमेद घेऊन बाहेर आले. ज्यांच्या कांहीं अपेक्षा होत्या, ते त्या अपेक्षा सुफलित न झाल्यामुळें कडू अथवा निराश बनले. भावनावेगांत चळवळींत पडलेले अनुतापानें दग्ध झाले. ज्या कित्येक लोकांच्या संसाराची वाताहात झाली होती ते कॉंग्रेसला शिव्याही देऊं लागले. महात्माजींनीं चळवळ सुरू करितांना सर्वांना बजावलें होतें कीं, त्यांच्या प्रपंचाचा भार कॉंग्रेसवर टाकण्याची अपेक्षा कोणीही बाळगूं नये. समंजस उमजले; अज्ञ लोकांत गैरसमज निर्माण झाले. कित्येक उमाळ्याच्या भरांत आपल्या नोकऱ्या सोडून चळवळींत पडले होते त्यांचे हाल झाले; आजीविकेचा प्रश्न आ पसरून समोर उभा राहिला. मूळचेच संपन्न लोक करावासानंतरही सुखी राहून मान्यताही पावले तें दृश्य या गरीब, कंगाल पण हाल सोसून आलेल्या लोकांस असह्य झालें. कित्येकदां त्यामुळें लोक खुनशी बनून कॉंग्रेसचा द्वेष करूं लागले, तर कित्येक साम्यवादी बनून साऱ्या भांडवलवाल्यांना व समाजाला शिव्या देऊं लागले. अशीं अनेक स्थित्यंतरें समाजांत दिसून आलीं.

१९२० च्या चळवळीनंतर महाराष्ट्रांत त्यागी, साधें व सेवापरायण जीवन कंठणाऱ्या विधायक कार्यकर्त्यांचा फार मोठा वर्ग निर्माण झाला होता. १९३० नंतर स्थिति पालटली. शाळा-कॉलेजें सोडून तुरुंगांत गेलेला विद्यार्थिवर्ग राजरोसपणें पुन्हा शाळा-कॉलेजांत जाऊं लागला. कौन्सिलवाल्यांनीं पुन्हा कौन्सिलाकडे तोंडें वळविलीं. वकीलांनीं वकीली सुरू केली, कांहींनीं माफी मागितली. गाडगीळांसारख्या कांहींनीं तडफदार उत्तरें देऊन कोर्टास चूप बसविलें; राष्ट्रीय शाळा जवळजवळ बंद पडल्या. महात्माजींनीं खेड्यांत जाऊन राहण्याची शिफारस सर्वांस केली व विधायक कार्यक्रम पुन्हा कसोशीनें चोखाळण्यास सांगितलें. या शिफारशीचा परिणाम एवढाच झाला कीं महात्माजींचे जुने शिष्यच खेड्यांतून बसले. नव्यांनीं शहरांत बसून जनतासंबंधाच्या नांवानें मजूरचळवळी व किसानचळवळी सुरू केल्या. युवकचळवळींत उदय पावलेले बहुतेक लोक समाजवादी किंवा साम्यवादी बनले व चरख्यांच्या आणि ग्रामसफाईच्या कार्यक्रमाची हेटाळणी करूं लागले.

पुन्हा एकदां महात्माजींनीं विधायक कार्यक्रम करून स्वतःची व जनतेची शक्ति वाढविण्याचा उपदेश केला. महात्माजींच्या कल्पना स्वच्छ होत्या; परंतु नव्या कार्यकर्त्यांना त्या पटल्या नाहींत. तुरुंगांत त्यांनीं सामुदायिक चळवळीचीं आधुनिक साधनें पुस्तकांत वाचून काढिलीं होतीं. अर्वाचीन युगाच्या वातावरणाला तीं शोभेशीं होतीं. अध्यात्माची त्यांना आवश्यकता वाटत नव्हती. जीवनसिद्धींत स्वतःस पराभूत झालेले पाहून पश्चिमेकडील उगवत्या श्रमजीवींच्या राष्ट्राचा आदर्श स्वीकारल्यास आपला उत्कर्ष होईल अशी अटकळ त्यांनीं बांधली आणि राजकारणांत अद्यतन शास्त्रीयता आणण्यासाठीं पक्ष-संघटना करण्याचें ठरविलें.

---

# ३ कॉंग्रेसमधील नवा पक्ष

पं. जवाहरलालजी १९२५–२६ च्या सुमारास रशियांत जाऊन आले ते समाजवादी विचारसरणी घेऊनच आले होते. देशांतील तरुणांसमोर त्यांचा आदर्श होता. त्यांचें खानदान, पाश्चात्यांपासून त्यांनीं उचललेली उच्च संस्कृति, त्यांचे मोहक शिष्टाचार, समाजशुद्धीबद्दल त्यांना वाटत असलेली तळमळ यांहींकरून त्यांनीं हिंदुस्थानांतील सुशिक्षित तरुणांच्या हृदयांत आपल्याबद्दल खोल ठसा उमटविला होता. लाहोर कॉंग्रेसचे अध्यक्ष झाल्यानंतर अर्थातच त्यांचा दर्जा वाढला. सत्याग्रहाची चळवळ त्यांच्या अमदानींत झाल्यामुळें त्यांची लोकप्रियताही वाढली. लाहोर कॉंग्रेसच्या व्यासपीठावरून त्यांनीं जी घोषणा केली ती पुढील दशकाचा मुद्रालेख ठरली:—

"श्रद्धा व स्थैर्य यांचें युग (The Age of Faith and Stability) आज संपलें आहे. आतां प्रत्येक गोष्टीची चिकित्सा करण्याचा काळ प्राप्त झाला आहे. धर्मसंस्था, समाजसंस्था, राज्यसंस्था व कुटुंबसंस्था यांपैकीं प्रत्येक संस्थेच्या आधारभूत तत्त्वांची आमूलाग्र छाननी करण्यास सर्व जगानें सांप्रत सुरुवात केली आहे."

इतकें सांगून हिंदुस्थानांतील प्रजेनेंही त्याच मार्गास लागावें अशी शिफारस त्यांनीं केली. अर्थात् नवीन विचारपद्धतीचा स्वीकार करतांना आपली संस्कृति व परिस्थिति लक्षांत घेण्यासही त्यांनीं सुचविलें. आंधळेपणानें कोणाही राष्ट्राचें अनुकरण करणें त्यांना मान्य नव्हतें.

अहिंसेच्या सामर्थ्याबद्दल व तिच्या व्यावहारिकत्वाबद्दल त्यांना खात्री नव्हती. परंतु १९३० च्या सत्याग्रहसंग्रामाचा प्रभाव त्यांस कळून चुकला तेव्हां आनंदातिशयानें बेहोष होऊन जवाहरलालजींनीं महात्माजींस पत्र लिहिलें, "माझ्या देशांतील सर्व स्त्री-पुरुष-बालक-बांधवांचा मला अभिमान वाटत आहे आणि अहिंसेच्या अमोघ शक्तीवर माझा विश्वास बसला आहे."

जवाहरलालजी क्रान्तिवादी असले तरी अराजक नाहींत. त्यांना शिस्तीचें व व्यवस्थेचें महत्त्व अतोनात वाटतें.

१९३२ च्या लढ्याच्या असफलतेची कारणमीमांसा प्रत्येकानें आपापल्या-परी केली. महात्माजींनीं वैयक्तिक सत्याग्रह सुरू केला तेव्हां जवाहरलालजी कैदेंत होते. महात्माजींचा हरिजन-दौरा चालू असतांना पंडितजींची सुटका झाली व ते महात्माजींना भेटूनही आले. दोघांच्याही विचारसरणींत मूलभूत विरोध होताच. परंतु चळवळ अजून थांबली नव्हती व महात्माजींची सेनापति-त्वाची जबाबदारी तेव्हांही कायम होती. जवाहरलालजी पुनश्च आपल्या प्रांतांत गेले. दरम्यान बिहारमध्यें भूकंप झाला. पंडितजींनीं पीडितांची सेवा केली; तरी सुद्धां विद्यमान् परिस्थितीबाबत त्यांच्या मनांत असंतोष धुमसत होता. वैयक्तिक सत्याग्रह फार दिवस चालणार नाहीं अशीं लक्षणें दिसतच होतीं. कॉंग्रेसमधील अनेक लोकांनीं दाखविलेली ढिलाई व ध्येयवादाचा ऱ्हास यामुळें पंडितजींस कांहीं जोरदार कार्यक्रम राष्ट्रापुढें ठेवण्याची कल्पना सुचली. कॉंग्रेसमध्यें नवीन कल्पनासृष्टींत वावरणाऱ्या तरुण लोकांचा एक वर्ग वाढत होता. ते सारे तरुण समाजवादी विचारपद्धतीचे होते. साम्यवाद्यांची निष्ठा सोव्हिएट रशियाकडे होती; तर समाजवादी लोक कॉंग्रेसशीं निष्ठा बाळगून होते. परंतु कॉंग्रेसचें यंत्र ढिलें झालें आहे; तें वेगवान्, समर्थ व प्रभावी करावें अशा इच्छेनें कॉंग्रेसमध्येंच एक नवा पक्ष स्थापण्याची कल्पना त्यांनीं काढली. जवाहरलालजींनीं तीस पाठिंबा दिला व फेब्रुवारी १९३४ च्या अखेरीस मुंबईस अखिल भारतीय समाजवादी पक्षाची स्थापना झाली.

जवाहरलालजींची जनतेच्या प्रातिनिधिक घटना-सभेची (Constituent Assembly) कल्पना समाजवादी पक्षानें उचलून धरली. स्वयंसत्ताक प्रांतांचें फेडरेशन, असें हिंदी राज्यघटनेचें स्वरूप असावें व भाषासंस्कृति, आर्थिक परिस्थिति आणि राज्यकारभाराची सोय इतक्या गोष्टी लक्षांत घेऊन प्रांतांची पुनर्घटना करावी असें त्यांचें मत होतें.

संस्थानांतील लोकांच्या इच्छेनुरूप त्यांचे स्वतंत्र प्रांत बनविणें वा इतर प्रांतांत त्यांस समाविष्ट करणें; राज्यसंस्थेनें कोणत्याही धर्माला पाठिंबा न देणें; जातिभेद, पंक्तिभेद, स्त्री-पुरुषभेद यांस फांटा; महत्त्वाच्या व मुख्य मुख्य धंद्यांचें राष्ट्रीकरण; प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत; परदेशी व्यापाराची सत्ता फक्त राज्यसंस्थेकडे; सहकारी तत्त्वावर विक्रीची व्यवस्था; जमिनीची

मालकी राज्यसंस्थेच्या हातीं; सामुदायिक व सहकारी शेतीला उत्तेजन, शेतकरी-कामकऱ्यांचें कर्ज रद्द करून टाकणें; नागरिक-स्वातंत्र्य, मुद्रण-स्वातंत्र्य भाषणस्वातंत्र्य, किमान मजुरी इत्यादि अनेक उद्देश त्यांच्या कार्यक्रमांत घालण्यांत आले होते.

आपली कार्यपद्धति त्यांनीं दोन गोष्टींवर उभारली : (१) तत्त्वांचा प्रचार व (२) मजूर, शेतकरी, युवक, आणि स्त्रिया यांचे संघ स्थापणें. लहान लहान धंदेवाल्यांनाही आपल्या संघांत सामील करून घेण्याची त्यांची मनीषा होती. काँग्रेसमधील मध्यम-वर्गाचें नेतृत्व काढून तें क्रांतिकारी समाजवाद्यांच्या हातीं द्यावें व सर्व काँग्रेस-संस्था एक बलिष्ठ साम्राज्यविरोधी शक्ति करावी असा त्यांचा उद्देश होता.

याप्रमाणें संघ स्थापन झाला नाहीं तोंच दहा-बारा दिवसांत पंडितजींना, त्यांनीं कलकत्ता येथें केलेल्या भाषणाबद्दल सरकानें पकडून १२४ अ कलमाखालीं दोन वर्षांची कैद ठोठावली. यामुळें आरंभापासून त्यांच्या मार्गदर्शनाचा व नेतृत्वाचा फायदा संघाला मिळाला नाहीं. तथापि आचार्य नरेंद्र देवांसारखे विद्वान्, सच्चरित्र कार्यकर्ते संघाला लाभले व जयप्रकाश नारायण हे बुद्धिमान् गृहस्थ अनेक वर्षें त्याचे चिटणीस होऊन राहिले. पं. जवाहरलाल मात्र या संघाचे सभासद कधींच झाले नाहींत. दिवस जातां जातां देशांतील अनेक बुद्धिमान्, उमदे व कर्तबगार तरुण या संघांत प्रविष्ट झाले व त्यामुळें संघाचा लौकिक वाढला. हे सारे सभासद काँग्रेसचे देखील सभासद असत. त्यामुळें काँग्रेसच्या वजनाचाही त्यांच्या मतप्रचाराला उपयोग झाला.

महाराष्ट्रांतील युवक-चळवळींतील बरेचसे तरुण या समाजवादी संघाचे सभासद बनले. असा एखादा संघ स्थापन झाला पाहिजे, असें विधान जावडेकरांनीं १९३१ मध्यें 'लोकशिक्षणां'तील आपल्या एका लेखांत केलें होतें. संघ स्थापन झाल्यावर ते स्वतः जरी त्याचे सभासद झाले नाहींत तरी महाराष्ट्रांतील समाजवाद्यांना त्यांचेकडून नेहमीं सहानुभूति व सल्ला हीं मिळत गेलीं. जवाहरलालजींचा परिचय महाराष्ट्राला प्रथम करून देण्याचें कार्य जावडेकर यांनींच केलें. त्यांची विचारसरणी आध्यात्मिक पायावर उभारलेली असल्यामुळें त्यांना महात्माजींची सत्याग्रहाची अहिंसक भूमिकाही तत्त्वतः पटली होती.

त्यामुळें त्यांनीं महात्माजी व जवाहरलालजी यांच्या विचारसरणींतील मुख्य तत्त्वें घेऊन त्यांवर आपल्या सत्याग्रही समाजवादाची उभारणी केली व लेख आणि व्याख्यानद्वारा ते त्यांचा प्रचार करीत राहिले. अखिल भारतीय समाजवादी संघाला जवाहरलालजी ज्याप्रमाणें सतत वैचारिक मार्गदर्शन करीत गेले त्याचप्रमाणें जावडेकर महाराष्ट्रांतील समाजवाद्यांना मार्गदर्शन करीत गेले. युवकसंघाचे अध्यक्ष श्री. गाडगीळ हे मात्र संघाचे सभासद झाले नाहींत. परंतु व्याख्यानांतून समाजवादी मतें प्रतिपादूं लागले. कॉलेजपासून गाडगीळांवर युरोपियन इतिहासाचा परिणाम झाला होता. आंतरराष्ट्रीय राजकारणाचाही अभ्यास त्यांनीं केला होता. १९३० च्या चळवळींत ते पडले पण अहिंसावाद त्यांना कधींच पटला नव्हता. पर्वती-सत्याग्रहानंतर जेध्यांशीं त्यांचा परिचय अधिक होत गेला. १९३० च्या चळवळींत ते दोघे एकाच तुरुंगांत एकत्र राहिल्यावर तो वाढला. तुरुंगांतही गाडगीळांनीं खूप ग्रंथ वाचले, आणि विचार-वाचनान्तीं सामान्य लोकांस संस्कृति ( Culture ) दिली पाहिजे या मुद्द्यावर ते आले.

समाजवादी संघ सुरू होण्याच्या सुमारास सोलापुरास गिरण्यांतून प्रचंड संप झाले. बेकारी वाढत होती; त्यांत सुशिक्षित बेकारांची भर पडली. तेव्हां संघातर्फे मतप्रचाराबरोबरच भांडवलशाहीच्या निषेधार्थ व “ बेकारी-दिन ” उजविण्यासाठीं सभा भरविण्यांत येऊं लागल्या. 'दिन उजवणें' हें चळवळीच्या काळांत अंगवळणीं पडलेंच होतें. समाजवादी संघानें तें पुढें चालू केलें. श्रमजीवी लोकांत असंतोष प्रादुर्भूत होण्यासाठीं सभांतून व्याख्यानें व निदर्शनार्थ मिरवणुका यांचा सुकाळ होऊं लागला.

पुढें महात्माजींनीं चळवळ मागें घेतली. त्यांनीं जीं कारणें तत्प्रीत्यर्थ दाखविलीं तीं वाचून तुरुंगांत जवाहरलालजी क्षुब्ध झाले. सत्याग्रहांत भाग घेणाऱ्या सर्वांवर नालायकीचा शिक्का मारण्यांत आला होता, तें त्यांना आवडलें नाहीं. महात्माजींची श्रेष्ठ नैतिक व आध्यात्मिक भूमिका राजकीय भूमिकेशीं त्यांना विसंगत वाटली व एकदां आपल्या पत्नीच्या आजारानिमित्त ते कांहीं काळापुरते बाहेर आले असतां त्यांनीं महात्माजींना एक जोरदार पत्र लिहिलें व आपला मतविरोध दर्शविला. समाजवादी कार्यकर्तेही थोड्या-

फार प्रमाणांत प्रतिक्रिया दर्शवूं लागले. महात्माजींच्या वैयक्तिक प्रभावाचा परिणाम राजकारणांतील सत्य वस्तु दाबली जाण्यांत होतो, राजकारणांत धर्माची लुडबुड नको, अशा प्रकारची तक्रार जाहीरपणें होऊं लागली. जवाहरलालजींच्या पत्राचा रोख अशा रीतीनें प्रकट होऊं लागला व पुढें कालान्तरानें ते सुटून आल्यावर आपल्या चरित्रांत त्यांनीं ही गोष्ट स्पष्टही केली. एवंच, काँग्रेसमध्येंच विचारसरणीला पुन्हा फांटे फुटूं लागले.

---

# ४ संहतिः कार्यसाधिका ।

पाटणा येथें १८ व १९ मे रोजीं अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीची बैठक होऊन कौन्सिलप्रवेशाचा ठराव पास झाला. त्या बैठकींत देव हजर होते. वरिष्ठ कायदेमंडळाच्या निवडणुकी नोव्हेंबरांत होणार होत्या. त्यांसाठीं महाराष्ट्रांतून मुसलमानेतर मतदारसंघातर्फे दोन उमेदवार उभे करणें भाग होतें. देव निवड करूं लागले.

महाराष्ट्राची राजकीय व सामाजिक परिस्थिति लक्षांत घेतां हें काम अवघड तसें नाजूकहि होतें. कॉंग्रेसचें बहुमत घडवून आणण्यास विरोधक शक्तींशीं समेट घडवून आणणें अपरिहार्य होतें. निवडणुकींत दोन पक्षांपासून विरोध होण्याचा संभव होता. लोकशाही स्वराज्यपक्ष व ब्राह्मणेतरपक्ष.

कौन्सिलप्रवेश व मंत्रिपदस्वीकार ह्या गोष्टी जुन्या प्रतियोगी सहकारपक्षास व आतांच्या लोकशाही पक्षास प्रिय असल्यामुळें सकृद्दर्शनीं कॉंग्रेसनें कौन्सिलप्रवेशाचें स्वीकारलेलें धोरण लोकशाही पक्षास पसंत पडावयास हवें होतें. परंतु तसें झालें नाहीं. कारण असें सांगण्यांत आलें कीं कॉंग्रेसनें जातिनिर्णयाबाबत जी भूमिका घेतली ती लोकशाही पक्षाच्या दृष्टीनें देशहितास विघातक अशी होती; परंतु जातीय निर्णयाचा प्रश्न नसता तरी लोकशाही पक्षाचे कॉंग्रेसशीं जमलें असतें किंवा नाहीं याची शंका आहे. कारण राजकीय क्षेत्रांत दोन्ही पक्षांचे दृष्टि-बिंदु उत्तर-दक्षिण ध्रुवांइतक्या अंतरावर होते. कॉंग्रेसमधील शिस्तीचा आग्रह तर लोकशाही पक्षाला मान्य झालाच नसता. सत्याग्रहाची वेळ येतांच कायदेमंडळांतील जागांचे व मंत्रिपदांचे राजीनामे देण्याची आज्ञा कॉंग्रेसकडून झाली असती तर ती त्या पक्षाला कितपत पसंत पडली असती याची शंकाच आहे. व्यक्तिशः संपूर्ण खादी वापरणारे कित्येक सज्जन लोकशाही स्वराज्यपक्षांत होते; परंतु कौन्सिलांतून खादी, ग्रामोद्योग, वर्धा-शिक्षण वगैरे महात्माजींच्या 'डोक्यांतून' वेळोवेळीं निघणाऱ्या मौलिक गोष्टींचा विधायक कार्यक्रम म्हणून पुरस्कार करण्याचें त्या लोकांस कितपत

पसंत पडलें असतें तें सांगतां येणार नाहीं “ साबरमतीच्या हुंड्या ” आणि “ अलाहाबादचीं पार्सलें ” नाकारणारे “शेगांवचीं फर्मानें” कशीं शिरसावंद्य करूं शकले असते ? पुण्यास लोकशाही स्वराज्यपक्षाची खाजगी सभा भरून “ कॉंग्रेसचा सभासद असण्याची अट फार जाचक आहे म्हणून ती काढून टाकावी ” असा ठराव पास झाला होता. तोही त्या पक्षाची मनोवृत्ति स्वच्छ दाखवीत होता. राजकीय क्षेत्रांतील मानापमान व विरोधवैर विसरणें कठीण जातें. तेथें अहंकार पणाला लागलेला असतो. जनसेवेचा आदर्श मनांत बाळगून कार्य करणारा मनुष्य साधु बनेल; परंतु सत्ताभिलाषी मनुष्याचे किंवा पक्षाचे रागद्वेष उथळ कसे असतील ? साध्य, साधन व प्रकृति हीं सर्वच भिन्न असल्यामुळें समेट घडून आला नाहीं हें स्वाभाविकच झालें.

वरिष्ठ कायदेमंडळाच्या निवडणुकींच्या वेळीं केळकर व देव यांनीं खूप चर्चा करून तडजोडीचा प्रयत्न केला. दोन उमेदवारांपैकीं एका उमेदवाराबाबत दोन्ही पक्षांची कबुली होती. एक उमेदवार ब्राह्मणेतर असावा यावर दोहोंचें एकमत होतें. पण जोडीला कोणी उभें राहावें यांत दुमत झालें. केळकरांना तिकीट द्यावें असें केळकरपक्षाचें मत होतें. परंतु देवांना वाटत होतें कीं, “ सत्याग्रह-युद्धानंतर जो नवा महाराष्ट्र उदयास आला होता त्याचा प्रतिनिधि उभा करणें जरूर आहे व म्हणून न. वि. गाडगीळ यांस वरिष्ठ कायदेमंडळासाठीं उभें करावें आणि केळकरांनीं वडील-कीच्या नात्यानें स्वतः होऊन तरुण पिढीचा अशा प्रकारें गौरव करावा व खुद्द गाडगीळांचें नाव सुचवावें. ” त्या समयीं गाडगीळ मध्यप्रांतांत शिवणी येथील तुरुंगांत होते. देव त्यांना भेटले व त्यांनीं आपली कल्पना गाडगीळांस सांगितली. गाडगीळांनीं उभें राहण्यास नकार दिला. कारण “ तें कॉंग्रेसचें काम नव्हतें ”. त्यांनीं खेरांचें नांव सुचविलें. देवांनीं कळविलें कीं, “ खेर वर्षभर राजकारणांत पडणार नाहींत. पण तुम्हांला उभें करण्यास महात्माजींनीं ‘हुकूम’ दिला आहे.” यावर गाडगीळ कबूल झाले. पुढें ते लौकरच सुटून आले.

ब्राह्मणेतर उमेदवाराबाबत केशवराव जेधे यांचें नांव सुचविण्यांत आलें. जेधे ब्राह्मणेतरपक्षापैकीं नव्या पिढीचे लोकप्रिय पुढारी होते. त्यांच्या घराण्याचा

लौकिक, वडील बंधूबद्दलचा सर्वसाधारण आदर, Land fragmentation ऊर्फ तुकडे-बिलाबाबत जेधेकुटुंबानें केलेली स्वार्थत्यागी सेवा, यांहींकरून ब्राह्मणेतरसमाजांत त्यांचें वजन होतेंच. परंतु १९३० च्या चळवळींत भाग घेऊन, सर्वांत मोठा दंड सोसून व तुरुंगांत जाऊन जेध्यांनीं समाजांत प्रतिष्ठा मिळविली होती. ब्राह्मणेतरसमाज जो चळवळींत पडला त्याला जेधे व विठ्ठल रामजी शिंदे यांचा पुढाकार व सहानुभूति हीं कारणीभूत झालीं होतीं. काँग्रेसमध्यें ब्राह्मणेतर बहुसंख्येनें शिरतांच काँग्रेसचें क्षेत्र विस्तृत झालें, तिच्यांतील संकीर्णता नाहींशी झाली आणि म्हणून काँग्रेसच्या तिकिटावर निवडणूक जिंकण्याची उमेद काँग्रेस-कार्यकर्त्यांना वाटूं लागली. ब्राह्मणेतर उमेदवार उभा करावयाचा परंतु तो नेकीचा व सच्चरित्र असावयास पाहिजे होता. केशवराव जेध्यांसारखा नेकीचा, शूर आणि त्यागी सेवक ब्राह्मणेतर-समाजांत सांपडणें कठीण होतें. त्यामुळें देवांनीं त्यांचीच निवड केली; इतरांनीं— केळकरांनींसुद्धां त्यांचें समर्थन केलें.

खुद्द जेध्यांना ही गोष्ट पसंत पडली नाहीं. त्यांच्या प्रकृतीला सत्याग्रह-युद्ध आवडे; पण स्थानिक सभा, कायदेमंडळें यांचे सभासद होऊन त्यांतून भाषणें करणें पसंत नव्हतें. ते अगोदर कबूली देतच नव्हते; परंतु देवांनीं फार गळ घातली व वडील बंधूंनींही पसंती दर्शविली तेव्हां ते कबूल झाले.

नंतर दुसऱ्या उमदेवाराचें नांव निश्चित करण्यासाठीं टिळकस्मारक-मंदिरांत निवडणूक-मंडळाची सभा भरली. देवांनाच नांव सुचविण्यासाठीं सांगण्यांत आलें. देवांनीं गाडगीळांसच कां उभें केलें पाहिजे तें सभासदांस समजावून सांगितलें. तेव्हां त्यांची निवड कायम करण्यांत आली व लोकशाही स्वराज्य-पक्षाचा विरस झाला. तेव्हां त्या पक्षाच्या लोकांनीं सुप्रसिद्ध व्यापारी वालचंद हिराचंद यांना पाठिंबा देण्याचें ठरविलें. मुंबईस जमनादास मेहता त्यांच्यातर्फे उभे होतेच. वालचंदशेठ स्वतंत्रपणें उभे होते, पण निवडून आल्यास त्यांनीं जातीय निर्णयास विरोध करण्याचें वचन दिलें होतें.

नंतर निवडणुकीची मोहीम सुरू झाली. काँग्रेसची प्रतिष्ठा व लोकप्रियता खरी; परंतु निवडणुकी लढविणें म्हणजे द्रव्याचीही आवश्यकता असते. वालचंद शेठजींसारख्या लक्षाधीशाशीं टक्कर खाणें ही कमी गोष्ट नव्हती.

गाडगीळ-जेध्यांना प्रतिस्पर्धी इतरही लोक होते. सरदार पाटणकर, गुंजाळ व बटाणे हे ते होत. परंतु जेध्यांचा लौकिक व लोकप्रियता लक्षांत घेतां आणि सत्याग्रहयुद्धानंतर कॉंग्रेसची बहुजनसमाजावर पडलेली छाप विचारांत घेतल्यास जेध्यांच्या यशाबद्दल कोणास फारशी शंका वाटत नव्हती. प्रश्न गाडगीळांचाच होता आणि एकट्या देवांनींच त्यांना हट्टानें उभें केलें होतें. तेव्हां गाडगीळ निवडून येण्यांत महाराष्ट्रांत कॉंग्रेसची कसोटी होणार होती.

निवडणुकीच्या निमित्तानें प्रांतभर पुढाऱ्यांचे दौरे झाले. सत्याग्रह चळवळ थांबली तरी लोकांना इरेस पेटविणारी निवडणुकीची चळवळ कमी सामर्थ्यवान् नव्हती. या प्रचाराच्या निमित्तानें महाराष्ट्रभर खेड्यांपाड्यांतून कॉंग्रेसचा जोरदार प्रचार झाला. सर्व सुरळीत झालें आणि यश कॉंग्रेसचे पदरांत पडलें. वालचंद हिराचंदसारखा कर्तृत्ववान् व्यापारी उमेदवार असतांही महाराष्ट्रानें शंभर टक्के यश मिळविलें. या वेळीं महाराष्ट्रांतील व्यापाऱ्यांच्या कॉंग्रेसनिष्ठेची कसोटी झाली. लोकांनीं बहुमतानें जेधे-गाडगीळ यांस निवडून दिलें. देव महात्माजींस भेटले तेव्हां महात्माजींनीं कौतुकाचे उद्गार काढले, “ देव, महाराष्ट्रने तो गहजब किया ! ”

महाराष्ट्राचा पूर्वेतिहास लक्षांत घेतां या यशाबद्दल सर्वांस शंका वाटणें स्वाभाविक होतें. परंतु सत्याग्रहसमयीं जागृत झालेला महाराष्ट्र हा पूर्वीचा संकीर्ण महाराष्ट्र नव्हता ! त्या महान् प्रजाकीय चळवळीनें अपंग, श्रमजीवी लोकांना राष्ट्रीयतेचे पाठ शिकविले होते. त्या असंख्य लोकांचा स्वाभिमान जागृत केला होता. प्रांताचें “ एकाकी पौरुष ” जाऊन त्या ठिकाणीं ‘संहतिः कार्यसाधिका ’ या सूत्राचा महिमा दिसूं लागला होता. कॉंग्रेसमध्यें नवें जीवन, नवा जोम प्रविष्ट झालीं होतीं. महाराष्ट्राचा कायापालट झाला होता !

# ५ व्यापक संघटना ?



मुंबईच्या काँग्रेस-अधिवेशनांत अखिल भारतीय ग्रामोद्योग संघाची स्थापना करण्यांत आली. विधायक कार्यक्रमांत आणखी एक भर पडली. जेव्हां राजकीय चळवळ चालू नसते, तेव्हां महात्माजी राजकारणाबद्दल एक शब्दही न बोलतां सामाजिक सेवेच्या रूपानें देशाच्या आर्थिक शक्तींत वाढ करूं इच्छितात. त्यांच्या अहिंसेच्या कल्पनेला पोषक असा तो कार्यक्रम असतो. परंतु त्याचें दर्शनी स्वरूप बुद्धिवादी म्हणविणाऱ्या कित्येकांना नापसंत व त्रासदायक वाटतें. महात्माजी देशांतील बहुसंख्य शेतकऱ्यांच्या जीवनाच्या दृष्टीनें विचार करीत असतात. शेतकऱ्यांच्या झोंपड्या, त्यांचीं तुकडेवजा शेतें, त्यांचें अन्न, त्यांचें भीषण दारिद्र्य व त्यांची मनोभूमिका यांचा विचार करून त्यांना तात्काल मदतीच्या दृष्टीनें त्यांनीं चर्खा, ग्रामोद्योग, ग्रामसफाई व गोपालन या शांतिकालांतील चळवळी उभ्या केल्या. याउलट समाजवादी किंवा साम्यवादी यांची नजर शहरांकडे असल्यामुळें शहरी "संस्कृती"ला अनुलक्षून औद्योगिक क्षेत्रांतल्या मजुरांच्या आवश्यकतांचा ते विचार करीत. अर्थात् खेड्यांच्या पुनर्घटनेचा विचार त्यांस कसासाच वाटे. औद्योगिक युगाचें वर्चस्व शहरांवर पडलें आहे तें खेड्यांवरही यावें व तशा दृष्टीनें साऱ्या समाजाची पुनर्घटना व्हावी अशी त्यांची विचारसरणी होती.

असंतोषाची मीमांसाही दोन्ही दृष्टींनीं भिन्न होती. अहिंसावादी दृष्टि स्वतःच्या अपूर्णतेबद्दल असंतोष मानण्यास शिकवीत होती; तर भौतिकवादी दृष्टि प्रचलित परिस्थितीबद्दल असंतोष पसरविण्यास सांगत होती. अहिंसावादी दृष्टि आपल्या देशापुरतेंच क्षेत्र अडवून बसली होती; भौतिकवादी साऱ्या जगाचा वेध घेत होती.

जवाहरलालजी यांस प्रथम प्रथम वाटे कीं, "आपण व आपले सोबती महात्माजींवर वजन आणून हळूहळू त्यांना समाजवादी दिशेकडे नेऊं; आणि त्यांनीं स्वतःही म्हटलें होतें कीं, तशा दृष्टीनें मार्ग सांपडल्यास आपण धीमे

धीमे जाण्यास तयार आहोंत. त्या वेळीं मला महात्माजी समाजवादाची मूलभूत भूमिका स्वीकारतील ही गोष्ट अपरिहार्य वाटली होती; कारण प्रचलित अवस्थेंतील हिंसा, अन्याय, नासधूस आणि दुःख यांतून निघण्यास दुसरा मार्ग नव्हता. पद्धतीबाबत मतभेद कदाचित् होईल, पण ध्येयाबाबत होणार नाहीं असें मला तेव्हां वाटत असे. पण आतां मला कळून चुकलें कीं, गांधीजींचे आदर्श आणि समाजवादी ध्येय यांत मूलभूत फरक आहेत."—**जवाहरलालजींचें आत्मचरित्र**, पृष्ठ २५५.

तो एक काळ असा आला होता कीं, काँग्रेसमधील कार्यकर्त्यांतच परस्परांबद्दल गैरसमज उत्पन्न झाले होते. तात्त्विक मतभेदाबाबत एवढेंच सांगावयाचें कीं, ते स्वाभाविक होते. महात्माजींची उच्च आदर्शवादी भूमिका बहुजनसमाजास झेपली नसली तर त्यांत आश्चर्य नव्हतें. महात्माजी बोलून चालून अध्यात्मवीर पडले. त्यांचें मानस साधनांच्या उत्कटतेनें भारून गेलें होतें. अहिंसामूलक विश्वकुटुंबकवाद जनसमाजांत स्थापन करणें हेंच त्यांचें ध्येय त्यांनीं मानलें आहे. परंतु अहिंसेच्या मागून येणारी त्याग आणि वैराग्य यांची पार्श्वभूमि सामान्य जनतेला अवघडच वाटणार. समाजाची वृत्ति निवृत्तिपरायण कोठून असणार ? बहुजनसमुदायाच्या अन्नवस्त्राचा प्रश्न घेऊन महात्माजींनीं तो जेथपर्यंत लढविला, तेथपर्यंत सर्व वर्ग त्यांच्यामागें आले. कारण जनतेची उठावणी करतांना राजकीय सत्तेचीही संघटना होत होती व परकीय सत्तेला शह मिळत होता. या चळवळींत बुद्धिवादी, पराक्रमी, सधन आणि महत्त्वाकांक्षी या सर्वच लोकांना खाद्य मिळत होतें. म्हणून अमुक मर्यादेपर्यंत ते महात्माजींना साथ देत गेले. जेव्हां निरिच्छ सेवेचा व अज्ञातवासाचा समय आला तेव्हां साऱ्यांचीच परीक्षा झाली.

साम्यवादी लोक काँग्रेसपासून अलग राहिले होते व काँग्रेसला ते 'बूर्जवा संस्था' म्हणत. महात्मा गांधी हे हिंदी भांडवलशाहीच्या हातचें एक साधन आहे, असाही युक्तिवाद ते करीत. काँग्रेसमध्यें जी नवीन विचारसरणी यानंतर सुरू झाली तिचे प्रवर्तक गांधी-विचारप्रणाली मान्य करीत नसले, तरी महात्माजींच्या हेतूबद्दल शंका बाळगीत नव्हते; त्यांची विचारसरणी त्यांना मागासलेली वाटत असली, तरी महात्माजींत प्रचंड क्रांति घडवून आणण्याची

शक्ति आहे हें ते जाणत होते. परंतु मुंबई-कॉंग्रेसनंतर महात्माजींनीं राजकारणांतून अंग काढून घेतांच चमत्कारिक परिस्थिति उभी राहिली. महात्माजींची तात्त्विक भूमिका संपूर्णपणें मान्य करणारे लोक राजकारण सोडून खेड्यांतून विधायक कार्यक्रमांत मग्न झाले; आणि नुसतें त्यांचें नेतृत्व मानणारा फार मोठा वर्ग आपापल्या सांसारिक कृत्यांत मग्न झाला. केवळ राजकारणांत पडलेले राष्ट्रवादी लोक आणि समाजवादी लोक यांचाच पुढें विशेष संबंध येत गेला आणि कॉंग्रेसमध्यें तड पडूं लागली.

असहकारितेच्या चळवळीनंतर केळकर-पक्ष व असहकारितावादी पक्ष यांत सामना होत असतां दुसरा पहिल्यास प्रतिगामी, कालमाहात्म्य न जाणणारा, सुस्त व स्वार्थी अशीं नांवें देई. बरोबर हींच विशेषणें समाजवादी या केवळ राष्ट्रवाद्यांस व गांधी-विचारसरणीच्या लोकांस लावूं लागले. समाजवाद्यांचें म्हणणें असें होतें कीं, “आम्ही कालाच्या गतीबरोबर चालत आहों. त्याच्या प्रवाहाला अडवून तुम्ही कालाचा ओघ मागें फिरवूं शकणार नाहीं. तेव्हां त्याच्याबरोबर जो यंत्रवाद येत आहे, तो स्वीकारल्याशिवाय इलाज नाहीं. यंत्रवादही स्वीकारा व त्याचे भीषण दुष्परिणाम समाजाला ज्या शासनपद्धतीमुळें भोगावे लागत आहेत, ती नष्ट करा म्हणजे सुखाची परमावधि होईल.”

तात्त्विक भूमिकेवरूनच वाद चालला असता, तर विशेष कांहीं झालें नसतें. परंतु राजकीय क्षेत्रांत नुसती तात्त्विक भूमिका फार काळ राहूंच शकत नाहीं. कारण ‘सत्ता’ हें अंतिम साध्य असतें. ती कबजांत आणिल्याशिवाय तत्त्वांचाही प्रचार होत नाहीं. त्यामुळें समाजवादी पक्षाचा रोख हळूहळू कॉंग्रेस संस्था ताब्यांत घेण्याकडे वळूं लागला. आणि तें अपरिहार्य होतें.

अर्थात् कॉंग्रेसमधील इतर कार्यकर्ते कसे मुग्ध बसणार ! कॉंग्रेस प्रभावी बनली होती. तिला या स्थितीस आणण्यास शेंकडों लोकांनीं अनेक वर्षें आपली सेवा काया-वाचा-मनसा दिली होती. ते थोडेच हातचें तन्त्र जाऊं देणार ?

समाजवादी कार्यकर्ते तरुण होते, उत्साही होते, बुद्धिमान् होते, नव्या दमाचे होते; त्यांच्यांत चोवीस तास सार्वजनिक कार्य करण्याची उमेद होती. उलटपक्षीं जुने कार्यकर्ते पुष्कळसे गतानुगतिक, पोटाचा व्यवसाय करून

फुरसतीच्या वेळीं राजकारण करणारे, स्वतःच्या पंथाबाबत फारसा अभिनिवेश न बाळगणारे असे होते. केवळ पैसा अगर विद्वत्ता यांच्या जोरावर लोकमान्यता मिळविण्याचे दिवस गेले होते. शिवाय कित्येक जुन्या सधन पुढारी म्हणविणाऱ्यांनीं १९३२च्या चळवळींत पॅरोल दिल्यामुळें किंवा स्थानबद्धतेच्या हुकुमाचा भंग न केल्यामुळें, त्यांच्या प्रतिष्ठेस कमीपणा आला होता. ज्यांनीं कायदे मोडून हाल सोसले त्यांपैकीं पुष्कळजण १९२० पासून कार्य करीत आलेले होते. त्यांची प्रकृति ठरीव झाली होती. त्यामुळें १९३० च्या चळवळीनंतर जन्मास आलेल्या नवीन चौकटींत ते बसूं शकत ना; साताऱ्च्या नाथ घाणेकरांस किंवा पुण्याच्या भाई भुस्कुट्यांस सोडून दिल्यास जुने कार्यकर्ते जुन्या वळणाचेच राहिले व नव्या जमान्यांत "सुस्त" किंवा "स्वास्थ्यप्रिय" ठरले. ज्यांचा व्यवसाय पुष्कळसा शहरांत होता, ते खेड्यांत जाऊं शकले नाहींत; आणि त्यांना शहरांत राहून महात्माजींचें नवें फर्मान (ग्रामीण जीवनाचें) अमलांत आणणें अशक्य होतें. त्यामुळें त्यांच्यावर दांभिकपणाचाही आरोप करण्यांत येऊं लागला.

गोष्ट अशी होती कीं, सरकारविरुद्ध कार्य करणाऱ्या शक्तींचे प्रवाह चळवळ थांबल्यामुळें अवरुद्ध झाले. ते आपसांतच परस्परांविरुद्ध कलह माजवूं लागले. नवीन निघणारे कार्यक्रम समाजाच्या शक्तीला पोषक न होतां विघातक होत गेले. समाजवाद्यांचा रोखही कॉंग्रेस-तन्त्र आपल्या हातांत आणण्याच्या महत्त्वाकांक्षेमुळें इतर पक्षीयांवर आघात करण्याकडे गेला व त्यामुळें आपसांत विरोध उत्पन्न झाला.

मुंबई-कॉंग्रेसनंतर दोन वर्षें म्हणजे फैजपूर-कॉंग्रेस आणि प्रांतीय कायदेमंडळांच्या निवडणुकी होऊन जाईपर्यंतचा काळ साधारणपणें गोडींतच गेला. नवे व जुने कार्यकर्ते यांत देव हे मधला दुवा होते. कांहीं काळपर्यंत देवांचें धोरण समाजवाद्यांशीं सहकार्य करून प्रांतीय संघटना घडवून आणण्याचें होतें. त्यांची बुद्धिमत्ता, कर्तृत्वशक्ति व उत्साह यांचा महाराष्ट्रास जास्तींत जास्त उपयोग व्हावा अशी इच्छा धरून देवांनीं त्यांना राजकीय क्षेत्रांत आपले सहकारी बनविण्यास सुरुवात केली. परस्परसहयोगामुळें कलहाला स्थान राहणार नाहीं, राजकारणांतील एकांगीपण नाहींसें होईल व राजकीय जीवनाचा

उत्कर्ष होईल अशी त्यांची कल्पना होती. कल्पना ठीक होती पण प्रत्यक्ष आचारांत एक दोष राहिला. देवांचे जुने सोबती या कल्पनेला अनुकूल होते किंवा नाहीं तें जाणून घेण्याचा प्रयत्न त्यांनीं केला नाहीं. सहयोग व्यक्ती-व्यक्तींत किंवा पंथापंथांत होऊं शकतो. एका पंथांतील एकच व्यक्ति दुसऱ्या पंथाशीं सहयोग करूं शकत नाहीं. अन्यपंथीयांकडून अविश्वास व स्वपंथीयां-कडून बहिष्कार असा परिणाम शेवटीं येण्याचें भय असतें. आणि राजकारणांत तर 'निष्ठा' ( Loyalty ) ही गोष्ट अव्वल दर्जाची असते.

खुद्द देवांचा राजनीतिविषयक धोरणाबाबत निश्चय झाला नव्हता. त्यांचें मन आंदोलनांत पडलें होतें. महात्माजींनीं आगींत उडी टाकावयास सांगितलें असतें तर त्यांनीं तात्काळ उडी टाकली असती. परंतु महाराष्ट्राची संघटना करण्याची व तत्प्रीत्यर्थ लोकसंग्रह करण्याची त्यांची तळमळही जबरदस्त होती. जुने सोबती आपलेच आहेत पण नव्यांना आपण जबाबदारीची जाणीव देऊन वश करूं अशा दृष्टीनें त्यांनीं मुंबई-कॉंग्रेससाठीं अखिल भारतीय समितीचे महाराष्ट्रांतील प्रतिनिधि निवडते वेळीं आपल्या कार्डांत समाजवाद्यांचीं नांवें घातलीं व त्यांना मतें देण्यास प्रांतीय सभासदां-ना आग्रह चालविला. त्याचा परिणाम विपरीत झाला. जुने सोबती भडकले. नगर येथील प्रांतिकच्या बैठकींत बाळूकाकांनीं देवांना विरोध केला. मतदारां-बाबतची खादीची अट काढून टाकण्यास देवांनीं ठराव आणिला होता. त्यामुळेंही जुन्या लोकांचीं मनें दूषित झालीं. 'देव समाजवादी बनले' असाच समज आप्पासाहेब पटवर्धनांसारख्या शुद्धबुद्धीच्या कार्यकर्त्यांचा देखील झाला. डॉ. लागूंचें नांव देवांनीं आपल्या कार्डांत घातलें नव्हतें. त्यांची देवांच्या कार्यांत सहयोगी होण्याची इच्छा होती. लागू व त्यांचें मित्रमंडळ हें १९३० पासून गांधीविचारप्रणाली मान्य करूं लागलें होतें हें मागें सांगि-तलेंच आहे. त्या मंडळाला पुरतें आपलें करून घेण्याची संधि देवांनीं त्या वेळीं दवडली. लागू स्वतंत्रपणें उभे राहिले व निवडून आले. या कार्डाचा फार गवगवा होऊन राष्ट्रपति वल्लभभाईपर्यंत तें प्रकरण गेलें व सरदारांनीं ' देवांचें कृत्य गैरकायदेशीर नव्हतें तरी शहाणपणाचेंही नव्हतें,' असा निर्णय दिला. १९३४ नंतर आपल्या पक्षाची संघटना करण्याचें कार्य

देवांनीं करावयास हवें होतें, तें वेळींच झालें नाहीं. केवळ कार्याच्या दृष्टीनें नव्हे, तर व्यक्तिमत्त्वाच्या दृष्टीनेंही देव महाराष्ट्रांतील गांधीनिष्ठ कार्यकर्त्यांना आपलेकडे ओढूं शकले नाहींत. परस्परविश्वास किंवा सांघिक मैत्री वाढविण्याची कांहींच योजना त्यांनीं केली नाहीं व हातचें सोडून पळत्याच्या मागें लागले, त्यामुळें व्यापक संघटना तर झाली नाहींच; उलट तिच्याप्रीत्यर्थ त्यांनीं केलेले प्रयत्न विफल ठरले.

समाजवादी पक्षाच्या कार्यक्रमाप्रमाणें "काँग्रेसचें नेतृत्व क्रांतिकारी समाजवादाच्या हातीं येण्यासाठीं काँग्रेसमध्येंच मार्क्सानुयायी समाजवाद्यांचा संघटित पक्ष असण्याची आवश्यकता होती." "दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे असें म्हणतां येईल कीं, या समयीं आमचाच पक्ष हें काम पुरें करूं शकेल. काँग्रेसांतर्गत साम्राज्यविरोधी शक्तींचें अलग दृढीकरण बहुंशीं आमच्या पक्षाच्या शक्तीवर आणि दक्षतेवर अवलंबून आहे." (अखिल भारतीय काँग्रेस समाजवादी पक्षाचा कार्यक्रम.)

अशी एकंदर समाजवादी पक्षाची दृष्टि असल्यामुळें महाराष्ट्रांतील समाजवादी तिला अपवाद नव्हते. त्यामुळें काँग्रेसपेक्षां त्यांची निष्ठा त्यांच्या पक्षाकडे अधिक होती. काँग्रेसमध्यें झालेले सर्वच ठराव त्यांच्या दृष्टिबिंदूशीं जमत नसत. मग देवांचे राजकारणी किंवा महाराष्ट्रांतील काँग्रेससंघटनेबाबतचे विचार त्यांच्या विचारांशीं सर्वस्वीं कसें जुळावे ? त्यामुळें समाजवाद्यांची एकान्तिक निष्ठा देवांना कधींच मिळूं शकली नाहीं.

समाजवाद्यांना सुरुवातीस तरी त्यांच्या पक्षाची शिफारस होती कीं, "काँग्रेसच्या निवडणुकींत कमिट्या किंवा अधिकारपदें यांचा ताबा घेण्याची उत्सुकता त्यांनीं दाखवितां कामा नये, आणि समंजसपणें काम करावें". त्यामुळें प्रारंभीं तरी पक्षाला कडवेपणाचें स्वरूप आलें नाहीं. महाराष्ट्रांतील प्रमुख समाजवादी चांगल्या कुळांतले, सुशिक्षित, उत्साही व मनमिळाऊ असल्यामुळें त्यांची छाप सर्वसाधारणपणें चांगली पडली. महाराष्ट्राबाहेरील कित्येक प्रांतांतून पक्षापक्षांत कलह सुरू झाले होते किंवा परस्परसहयोग नव्हता, तेव्हां महाराष्ट्रांत वेगळेंच दृश्य दिसत होतें. जनतासंबंधाच्या, काँग्रेस-प्रचाराच्या आणि संघटनेच्या बहुतेक चळवळी समाजवादी व गांधीनिष्ठ

हे परस्परांशीं सहयोग करूनच देवांच्या नेतृत्वाखालीं करीत होते. रचनात्मक कार्य करणारे स्वतंत्रपणें खेड्यांतून आपलें काम करीत. परंतु कॉंग्रेसचें अधिकृत कार्य करणारे राजकारणी कार्यकर्ते आपापल्या पक्षाविषयीं दुराग्रह न धरितां एकल काम करीत होते. लक्षांत घेण्यासारखी गोष्ट म्हणजे कराची-कॉंग्रेसमधील समाजवादी कार्यक्रमासच विशेष चालना मिळत गेली आणि त्या वेळीं तत्पर कार्यकर्ते, प्रामुख्यानें समाजवादीच, पुढें सरले आणि अधिकृत पक्षाची कार्याच्या किंवा चुरशीच्या दृष्टीनें अशी स्वतंत्र संघटना होण्यास कारणच उपस्थित झालें नाहीं. त्यामुळें फारसा कोणाकडून विरोध न होतां काम सुरळीतपणें चालू राहिलें.

---

# ६ तपस्या फळास आली !



१३ जानेवारी १९३५ रोजीं महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीची पहिली बैठक देवांच्या अध्यक्षतेखालीं पुणें येथें भरली. नवीन वर्षासाठीं देव हेच अध्यक्ष निवडले गेले. तात्या देशपांडे यांस देवांनीं नवशक्ति कचेरींतून मुद्दाम महाराष्ट्रांत बोलावून आणिलें होतें. त्यांस प्रांतिकचे चिटणीस करण्यांत आलें. स. के. भावे हे सहचिटणीस नेमले गेले.

प्रांतिकला कार्यकर्मिणी बनविण्याची आकांक्षा मनांत धरून, देवांनीं एका वर्षासाठीं मोठा कार्यक्रम आंखला. तालुका कमिट्या ठिकठिकाणीं स्थापणें, काँग्रेससाठीं ५०,००० सभासद मिळविणें, खादीधारित्वाच्या अटीची अंमलबजावणी करविणें, ग्रामोद्योगांस उत्तेजन देणें व राजेन्द्रनिधि गोळा करणें इत्यादि कार्यें प्रांतापुढें ठेवण्यांत आलीं होतीं. देवांनीं एक राजकारणी खुबी केली. राष्ट्रपति राजेन्द्रप्रसाद यांस महाराष्ट्रांत दौरा करण्यास आमंत्रण दिलें. या गोष्टीचा विलक्षण परिणाम घडून आला. महाराष्ट्रांतील जनतेंत प्रचंड उत्साह पसरला. महाराष्ट्राची काँग्रेसनिष्ठा व्यक्त करण्यास साऱ्या जनतेनें सहयोग दिला. जनतेची मनोवृत्ति (Mass mentality) ओळखण्याचें अपूर्व कौशल्य देवांनीं त्या समयीं दाखविलें. राजदर्शनानें भारून जाऊन प्रजा पागल बनते; कारण महोत्सव व विभूतिपूजा ही प्रजेची प्रकृतिच आहे. तिला अनुसरून उत्थानाच्या असंख्य योजनांनीं जें काम झालें नसतें तें राष्ट्रपतींच्या शुभागमनानें झालें. राष्ट्रपति, त्यांचे चिटणीस श्री. कृपालानी, देव व देशपांडे यांनीं महाराष्ट्रांतील अकरा जिल्ह्यांतून दौरा काढला. त्याचा परिणाम राष्ट्रपतींच्या मनावर कसा काय घडून आला त्याचें चित्र राष्ट्रपतींच्या पुढील पत्रावरून कळून येईलः—

“ महाराष्ट्रांतील माझा दौरा, शारीरिक दृष्टया थोडा त्रासदायक झाला तरी यशस्वी झाला याबद्दल मला आनंद होत आहे. प्रत्येक ठिकाणीं काँग्रेससंबंधीं दिसून आलेला उत्साह आणि काँग्रेसकार्य करण्याविषयीं कार्यकर्त्यांची

तत्परता पाहून माझ्या अंतःकरणाला अति आनंद वाटला. निःस्वार्थ सेवा व त्याग करण्याची महाराष्ट्राची शक्ति किती मोठी आहे याची मला जाणीव आहे; आणि या दृष्टीनें कॉंग्रेसची संघटना बळकट करण्याची सध्यां तुम्हां कार्यकर्त्यांना उत्तम संधि आहे असें मला वाटतें......"

या शिफारसपत्रानें महाराष्ट्राच्या राजकीय कर्तृत्वावर पूर्वी जी काळिमा आली होती ती धुऊन निघाली. महाराष्ट्रानें आपली कॉंग्रेसनिष्ठा सिद्ध केली.

* * *

महाराष्ट्रांत कॉंग्रेसचें स्वतःचें असें वजनदार वर्तमानपत्र असावें अशी कॉंग्रेसकार्यकर्त्यांची फारां दिवसांपासूनची इच्छा होती. ती यापुढें जोरानें वाढीस लागली.

जेधे-गाडगीळांच्या निवडणुकीचें काम श्री. देवगिरीकरांवर सोपविलें होतें. सातहि जिल्ह्यांत प्रचाराची योजना करणें, प्रसिद्धि करणें, वगैरे गोष्टी करीत असतां त्यांना प्रसिद्धीची आबाळ क्षणोक्षणीं जाणवे. वृत्तपत्रें विशिष्ट प्रसिद्धीकरतां पैसेहि मागूं लागलीं. तेव्हां आपल्या पक्षाचें वृत्तपत्र असणें ही गोष्ट अत्यंत आवश्यक वाटूं लागली. निवडणुका संपल्यावर श्री. देवगिरीकर एके दिवशीं श्री. देवांकडे गेले व वृत्तपत्राबद्दल त्यांनीं बोलणें केलें. एक लिमिटेड कंपनी काढावी व भांडवल उभारावें अशी ही योजना होती. श्री. हरिभाऊ जोशी हे तुरुंगांतून सुटून आल्यावर त्यांच्याकडे मॅनेजिंग डायरेक्टरचें काम सोपवावें व श्री. अतीतकरांकडे छापखान्याची व्यवस्था द्यावी वगैरे विचार त्यांनीं व्यक्त केले. श्री. देवांना ही कल्पना पसंत पडली. नंतर श्री. गाडगीळ, जेधे वगैरे पुढाऱ्यांची पसंती या योजनेला मिळाली. नाशिक येथें महाराष्ट्र प्रांतिकची सभा भरली असतां त्या सभेंत श्री. देव, देवगिरीकर, गाडगीळ वगैरेनीं या योजनेची कल्पना सभासदांना दिली. सर्वांनीं आपापल्या जिल्ह्यांतून भाग विकण्याचें कबूल केलें. त्या वेळीं आजारी असलेले अतीतकर हे बरे झाले व हरिभाऊ जोशीहि सुटले. ते दिवस कॉंग्रेसला अनुकूल नव्हते, त्यामुळें छापखाना मिळणें, कचेरीला जागा मिळणें कठीण जात होतें. श्री. देवगिरीकरांच्या मार्फत चित्रशाळेचे मॅनेजर श्री. शंकरराव जोशी यांच्याबरोबर बोलणीं होऊन कांहीं

महिने त्यांनीं अंक छापून देण्याचें कबूल केलें. श्री. देवांनीं श्री. जावडेकर, श्री. फडके, श्री. देशपांडे या नवशक्तींतील मंडळींनीं लोकशक्तींत यावें असा प्रयत्न केला व तो यशस्वीही झाला. केसरी ऑफिसांतून श्री. पां. वा. गाडगीळ हे जावडेकरांच्या स्नेहामुळें लोकशक्तींत आले. तसेंच सातारचे राजाभाऊ भावे हेही वाङ्मयाची बाजू सजविण्याकरतां लोकशक्तींत आले. चित्रशाळेबरोबर केलेला करार लवकर संपणार असल्यामुळें स्वतःची जागा व स्वतःचा छापखाना उभारण्याची जरूरी भासूं लागली. पुण्यांत पुष्कळ जागा पाहण्यांत आल्या. शेवटीं श्री. देवगिरीकरांच्या भाच्यांची जागा लांब मुदतीनें घेण्यांत आली. आणि एक यंत्रहि खरेदी करण्यांत आलें. श्री. वि. कृ. साठे यांनीं त्या बखळीवर इमारत बांधण्याचें काम हातीं घेतलें व श्री. देवांच्या हस्तें इमारतीचा पाया घालण्यांत आला. या इमारतीचा उद्घाटनसमारंभ राष्ट्राध्यक्ष राजेंद्रप्रसाद यांचे हस्तें करण्यांत आला. त्यानंतर पं. जवाहरलाल नेहरूंसारख्या मोठमोठ्या पुढाऱ्यांनीं लोकशक्तीला भेटी देऊन शुभ शुभाशीर्वादही दिले. पुढें प्रांतिक निवडणुकीचे वेळीं द्विसाप्ताहिक लोकशक्तीचें दैनिकांत रूपांतर झालें.

या सालीं महाराष्ट्रांत २८२५८ कॉंग्रेस-सभासद झाले. राजेन्द्रनिधि जवळ जवळ तीस हजार रुपये जमला, त्यामुळें प्रांतिकचें काम संघटितपणें करण्यास मोठीच मदत मिळाली. याशिवाय राजबन्दी, क्वेट्टा-भूकंप व कर्नाटक-गुजरात-मदतीसाठीं म्हणून इतरही लहान फंड जमले. जुन्नर व एरंडोल येथें हातकागदाचे कारखाने सुरू करण्यांत आले. प्रांतिकच्या व्यवहारासाठीं तेच कागद वापरण्याचा दंडक घालण्यांत आला. त्या वर्षी श्रमवर्गणीचा नियम असल्यामुळें कॉंग्रेस अधिकाऱ्यांनीं खेड्यांतून वेळोवेळीं सफाई केली. पंढरपूर येथें कार्तिकी वारीचे समयीं फार मोठ्या प्रमाणावर खादी व स्वदेशी प्रदर्शन भरविण्यांत आलें व अशींच प्रदर्शनें इतर कांहीं जिल्ह्यांतून झालीं.

शेतकऱ्यांच्या प्रश्नांचा विचार करण्याकरितां प्रांतिकच्या कार्यकारी मंडळानें शेतकी कमिटी नेमली. तिनें प्रांतांतून दौरा काढून माहिती गोळा केली. आचार्य लिमये, अच्युतराव पटवर्धन, गोरे, खाडिलकर, दांतवाला वगैरे मंडळी तींत होती.

डिसेंबरअखेरीस काँग्रेसचा सुवर्णमहोत्सव येत होता. तोही प्रांतभर उत्साहानें उजवण्यांत आला. सत्याग्रहाच्या चळवळीनंतर महाराष्ट्रांतील बहुजनसमाजांत— खेड्यांपाड्यांतून सुद्धां काँग्रेसनें आपलें स्थान निश्चित व अढळ स्थापल्याचें सिद्ध झालें. चळवळ मागें घेण्यांत आली यामुळें काँग्रेसच्या प्रतिष्ठेस यत्किंचितही धक्का बसला नाहीं.

दरम्यान भाई जोशींना एका भाषणाबद्दल अटक झाली व दोन वर्षांची सजा मिळाली. समाजवादी विचारसरणीचा प्रचार करण्यासाठीं पुण्यासारख्या शहरांतून नैमित्तिक अभ्यासमंडळें भरत. अखिल भारतीय समाजवादी पक्षाला जोडलेली एक प्रांतीय शाखा पुण्यांत स्थापन झाली होती. 'लोकशक्तीं'तून सुद्धां समाजवादावर लेख येत असत. भाई रॉय यांना सोडावें म्हणून चाललेल्या चळवळींत पुणेंकर समाजवाद्यांनींही भाग घेतला. समाजवाद ही त्या काळची एक फॅशनच झाली होती. इतकी कीं, महात्माजींवरही त्या वादाचा मारा होऊं लागला व "मीही आपल्यापरी समाजवादी आहें" असें जाहीर करणें त्यांना भाग पडलें.

फेब्रुवारींत महात्माजींची एका हिंदी पत्रपंडितानें घेतलेली मुलाखत प्रसिद्ध झाली. तिचा सारांश देणें अयोग्य होणार नाहीं:—

महात्माजी म्हणाले, "स्वातंत्र्यप्राप्तीप्रीत्यर्थ सविनय कायदेभंगाच्या शस्त्राचा उपयोग करण्यांत यावा असें मला अद्यापिही वाटतें. कायदेमंडळांवर माझा मुळींच विश्वास नाहीं. बऱ्याच एकनिष्ठ काँग्रेसभक्तांची कायदेमंडळाविषयींची प्रवृत्ति मी पालटवूं शकलों नाहीं. म्हणूनच मीं कायदेमंडळाच्या प्रवेशास मान्यता दिली. तथापि ही काँग्रेसवाली मंडळी कायदेमंडळांतून कांहीं भरींव कार्य करतील असें मला मुळींच वाटत नाहीं.

"मी समाजवादी असलों तरी माझी समाजवादाची कल्पना इतर समाजवाद्यांहून अगदीं भिन्न स्वरूपाची आहे. त्यांना मान्य असणाऱ्या वर्गयुद्धावर माझा मुळींच विश्वास नसून, त्याची जरूरी आहे असेंही मला मुळींच वाटत नाहीं. अत्याचारी मार्गांचा अवलंब करून संस्थानिक व जमीनदार यांची सत्ता लुबाडून घेण्याचा प्रयत्न करण्यांत आला तर मी निःसंशय त्यांच्या मदतीस धांवेन. माझ्या अनत्याचाराच्या ब्रीदास अनुसरून तसें करणें माझें

कर्तव्यच ठरतें. जनतेच्या हातीं कायदे करण्याचा हक्क एकदां आल्याबरोबर त्यांना योग्य ते कायदे मंजूर करून घेतां येतील; म्हणूनच वर्गयुद्ध नको.

" हिंदुस्थानांत कित्येक पिढ्या तरी प्रभावी बोल्शेविक क्रांति घडून येणार नाहीं असें मला वाटतें; तथापि ही आपत्ति आलीच तर मी साम्राज्यशाही-बरोबर टक्कर देण्याच्या उपायांचाच अवलंब करीन."

सर्वसाधारण जनता काँग्रेसमधील पक्षभेदाबाबत मुग्ध होती. हरिजन-चळवळीमुळें कित्येक सनातनी राष्ट्रवादी काँग्रेस सोडून गेले. महाराष्ट्र हरिजन-सेवासंघाचे अध्यक्ष प्रथम सर्व्हंट्स् ऑफ् इण्डिया सोसायटीचे श्री. देवधर होते. त्यांच्या मृत्यूनंतर सॉ. खेर झाले.

चळवळीनंतरच्या कालांत प्रांतीय राजकारणांत जे अनेक फेरफार झाले त्यामुळें कित्येक जुन्या काँग्रेसभक्तांचीं अंतःकरणें दुखावलीं. त्यांपैकीं एक बाळूकाका हे होते. बाळूकाकांनीं वर्षानुवर्षें काँग्रेसचें कार्य त्रास सोसून केलें होतें. चळवळींतही त्यांनीं खूप पुढाकार घेतला होता. परंतु लोकशाहीपद्धती-वर कार्य करीत असतां विशेषतः राजकीय कार्यकर्त्यांत जी एक उदार, सहिष्णु व चिवट मनोवृत्ति असावी लागते ती नसल्यास किंवा कमी प्रमाणांत असल्यास संघर्षाचे प्रसंग अनेकवार येतात. घटना माणसांची पर्वा न करितां त्यांच्या डोक्यावरून जातात; माणसांना दबलें जावें लागतें. तसेंच कित्येक कार्यकर्त्यांचें झालें. नवीं माणसें, नव्या कल्पना उदयास येत होत्या. पूर्वीचें वातावरण झपाट्यानें बदलत होतें. १९१० तील वातावरण १९२० नंतर राहिलें नाहीं. १९२० चें १९३० नंतर राहिलें नाहीं. कालचे विद्यार्थी आज पुढारी बनत होते. माणसांत चिकित्साबुद्धीचा अतिरेक होत होता. समाजां-तील श्रद्धाबुद्धि डळमळूं लागली होती. धर्म किंवा ग्रंथ श्रद्धेय वाटणें म्हणजे आंधळेपणाची सीमा असेंच मत व्यक्त केलें जाऊं लागलें आणि साहित्याचा दर्जा इतक्या खालच्या दर्जास पोंचला कीं, त्यांतून कल्पनांचें दारिद्य दिसूं लागलें.

देवांच्या प्रयत्नांनीं प्रांतिक कमिटीचें स्वरूप पालटत होतें. तिचा पूर्वीचा केवळ वाचाळपणा कमी होऊन ती कार्यकर्ती बनूं लागली होती, तिला वळण-ही लागत होतें. जबाबदारीची जाणीव झाल्याखेरीज कर्तृत्वशक्तीचा विकास

होत नसतो. प्रांतिकची संघटना वाढलेली पाहतांच देवांनीं अनेक वर्षांची आपली आकांक्षा पुरी करून घेण्याचें ठरविलें. १९२४ पासून " महाराष्ट्रांत काँग्रेस बोलवा " असा आग्रह त्यांनीं चालविला होता. परंतु तत्कालीन महाराष्ट्र प्रांतिकच्या सभासदांनीं ती गोष्ट मनावर घेतली नव्हती. या घटकेस परिस्थिति बदलली होती. ते स्वतः प्रांतिकचे अध्यक्ष होते. त्यांच्याभोंवतीं लायक, उद्यमी व उत्साही कार्यकर्त्यांचा गराडा पडला होता. महाराष्ट्रांतील जनता जागृत झाली होती व तिनें एकमतानें काँग्रेसचें नेतृत्व मान्य केलें होतें. त्यामुळें १९३६ साल उजाडतांच– लखनौ येथील अधिवेशनास जाण्यापूर्वी– देवांनीं नवीन वर्षाच्या प्रांतिकच्या सभेंत महाराष्ट्रांत काँग्रेस बोलावण्याचा ठराव पुढें आणला व सभासदांनीं एकमतानें त्यास पाठिंबा दिला.

यानंतर देवांनीं इतर प्रांतीय पुढाऱ्यांना व राष्ट्रपतींना पत्रें पाठवून महाराष्ट्राच्या आमंत्रणास त्यांचा पाठिंबा मागितला. चाळीस वर्षेपर्यंत महाराष्ट्रांत अधिवेशन झालें नव्हतें. त्यामुळें व १९३० च्या सत्याग्रहांत महाराष्ट्रानें जें तेज दाखविलें त्यानें प्रसन्न होऊन राष्ट्रपतींनीं व इतर पुढाऱ्यांनीं आपल्या पाठिंब्याचीं आश्वासनें देवांस दिलीं. त्याप्रमाणें लखनौ येथें महाराष्ट्राच्या वतीनें पुढील वर्षाच्या अधिवेशनासाठीं रीतसर आमंत्रण देण्यांत येतांच त्याचा स्वीकार करण्यांत आला.

परंतु लखनौ येथें आणखी एक यश देवांसाठीं विधात्यानें योजून ठेविलें होतें. अधिवेशन पार पडतांच राष्ट्रपति जवाहरलाल यांनीं वर्किंग कमिटींत महाराष्ट्राचे प्रतिनिधि म्हणून देवांस घेतल्याचें जाहीर केलें आणि या गौरवाबद्दल महाराष्ट्रानें देवांचा जयजयकार केला.

महाराष्ट्राच्या पंचदशवार्षिक तपस्येचें फळ अशा रीतीनें मिळालें. जोडीस अच्युतराव पटवर्धन या महाराष्ट्रीय कार्यकर्त्यास समाजवादी संघाचे एक प्रतिनिधि म्हणून वर्किंग कमिटींत घेतल्यानें महाराष्ट्राचा आनंद दुणावला आणि या शुभशकुनानें विशेष उत्साहित होऊन अधिवेशनाची तयारी करण्यास कार्यकर्ते पुढें सरसावले.

---

# ७ महाराष्ट्राचा अभिनव प्रयोग

**समानमस्तु वो मनः । समाना हृदयानि वः ॥**

कॉंग्रेस-अधिवेशन महाराष्ट्रांत यशस्वी करण्याचे प्रयोजन निघतांच प्रांतांतील सर्व कार्यकर्त्यांना एकत्र सहकार करण्याची संधि देणारें काम मिळालें. चाळीस वर्षें महाराष्ट्रास या कामाचा अनुभव आला नव्हता. वृद्ध कार्यकर्ते कॉंग्रेसला दुरावले होते. नवी पिढी अननुभवी होती. श्रद्धा ठेवून महाराष्ट्रांतील कार्यकर्ते कामास हात घालूं पाहत होते. महाराष्ट्राच्या विशिष्ट शक्तीचा नवा अवतार प्रकट होणार होता.

या वर्षी महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं दुष्काळ पडला, त्यामुळें देखील अडचण उभी राहिली. लखनौ कॉंग्रेसनंतर फक्त आठ महिन्यांत अधिवेशनाची तयारी करावयाची होती. कारण फेब्रुवारी १९३७ मध्यें प्रांतिक कायदेमंडळांच्या निवडणुकी लढविण्याचें ठरलें होतें. देव, गाडगीळ, जेधे, अच्युतराव पटवर्धन व रमणिकराय मेहता यांचें पार्लमेंटरी बोर्ड बनविण्यांत आलें होतें. पुढें श्री. देवगिरीकर यांस बोर्डाचे चिटणीस नेमण्यांत आलें. मतदारांच्या याद्या करण्याचें व नवे मतदार नोंदविण्याचें काम झपाट्यानें सुरू झालें. निवडणुकी कॉंग्रेसनिष्ठ भूमिकेवरूनच लढविल्या जाव्या अशी देवांनीं जाहीर विनंति केली.

या वर्षी शेतकरी परिषदाही ठिकठिकाणीं भरविण्यांत आल्या. जेधे व गाडगीळ यांनीं बहुतेक परिषदांचें अध्यक्षस्थान स्वीकारून शेतकऱ्यांचीं दुःखें वेशीवर टांगण्याचा प्रयत्न केला. लखनौच्या जनता-संबंध कमिटीच्या प्रश्न-पत्रिकेस उत्तरें पुरविण्याचें काम देवगिरीकर, घाणेकर व अच्युतराव पटवर्धन यांच्या कमिटीनें केलें. हिंदी भाषेचा प्रचार महाराष्ट्रांत करण्याच्या दृष्टीनें देवांनीं आचार्य कालेलकर यांस महाराष्ट्रांत बोलाविलें. त्यास अनुमति देऊन ते आले. पंधरा दिवस दोघांनीं प्रांतांत दौरा काढला व जिल्हानिहाय प्रतिनिधि नेमले आणि त्यांच्यामार्फत ठिकठिकाणीं हिंदी शिक्षणाचे वर्ग सुरू झाले.

काँग्रेसचे ४५ हजार सभासद झाले. कारण प्रचारही खूप होत होता. महाराष्ट्रांत अधिवेशन होणार या कल्पनेनेंही प्रांताचें औत्सुक्य वाढत होतें. पुण्यांत दोन महत्त्वाच्या गोष्टी घडल्या. राष्ट्रपति जवाहरलाल यांनीं २१ मे रोजीं पुण्यास भेट दिली व नागरिकस्वातंत्र्यसंघ स्थापण्याचा प्रयत्न केला. दुसरी गोष्ट म्हणजे संपूर्णानंद यांचे अध्यक्षतेखालीं युवकपरिषद भरली. त्या वेळीं भाई जोशी हेही कैदेंतून सुटले होते.

जवाहरलालजींचे भेटीचे वेळीं प्रांतिकचे सारे सभासद हजर होते त्यामुळें प्रश्नोत्तरें व विचारविनिमय यांस वाव मिळाला. समाजवाद हा एक नवीन कुतूहलाचा विषय होता आणि यंदांचे राष्ट्रपति तर समाजवादी म्हणून प्रसिद्ध होते. शेतकऱ्यांच्या आर्थिक दैन्याच्या प्रश्नापासून तों अस्पृश्यतेच्या सवालापर्यंत सर्वांवर पंडितजींनीं 'समाजवाद' हाच एक तोडगा सुचविला. पंडितजी राष्ट्रपति झाल्यापासून त्यांनीं समाजवादाचा प्रचार देशभर जोरांत चालविला होता. पंडितजींचा दर्जा, व्यक्तिमत्त्व व मार्गदर्शन यांचा फायदा समाजवाद्यांना मिळत होताच. पण त्यामुळें काँग्रेसपेक्षां काँग्रेसबाहेरील पक्ष, विशेषतः भांडवलवाले भयभीत होत होते. पंडितजी स्वतः समाजवादी पक्षाचे सभासद नव्हते, पण सभासद नसतांनाच त्यांनीं त्याचें कार्य जोरानें चालविलें होतें. पुण्याच्या भेटींत त्यांनीं महाराष्ट्रीय समाजवादी कार्यकर्त्यांना भेट दिली. कांहीं उत्साही सभासदांनीं काँग्रेसमधील अधिकृत ऊर्फ 'गांधीवादी'पक्षाच्या नालायकीचा उल्लेख करून त्याला अधिकारच्युत करून समाजवादी पक्षाची स्थापना त्याचे जागीं केल्यानें काँग्रेस अधिक पुरोगामी होईल असा अभिप्राय दर्शविला. परंतु अंड्यांतून बाहेर पडल्याबरोबर सूर्यमंडळाचा भेद करूं इच्छिणाऱ्या या गरुडाच्या बच्च्यांना पंडितजींनीं समजाविलें कीं, "अजून आपणांस पंख फुटले नाहींत!"

दुसऱ्याच दिवशीं पुण्यांत प्रांतिकची बैठक झाली व काँग्रेसच्या अधिवेशनाबद्दल चर्चा झाली. आतांपर्यंतचीं सर्व अधिवेशनें शहरांतून झालीं होतीं. महात्मा गांधींनीं खेड्यांच्या उद्धाराची चळवळ सुरू केल्यामुळें काँग्रेस खेड्यांत भरविण्याची अपूर्व कल्पना देवांनीं व त्यांच्या सहकाऱ्यांनीं आपल्या मनांत योजली होती. दोन महिन्यांपूर्वीं सावली येथें भरलेल्या गांधीसेवासंघाच्या

संमेलनांत देव महात्माजींसमोर पैज खाऊन आले होते कीं, "महाराष्ट्रांत कॉंग्रेसचें ग्रामीण अधिवेशन करून दाखवीन." परंतु देवांची ही कल्पना कित्येक महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांस मनापासून भयानक वाटली. कांहीं झालें तरी महाराष्ट्र कंगाल प्रांत आहे, पैशाचें पाठबळ नाहीं, अनुभव नाहीं, ग्रामीण अधिवेशन अजूनपर्यंत हिंदुस्थानांत कोठेंच घडून आलें नव्हतें; महाराष्ट्रांत कॉंग्रेस-नेतृत्व नुकतेंच कोठें प्रस्थापित झालें होतें. अशा परिस्थितींत हें पहिलेंवहिलें अधिवेशन अयशस्वी ठरलें असतें, तर महाराष्ट्राच्या फजितीला पारावार राहिला नसता. पुन्हा आत्मविश्वासाची उणीवही कित्येक कार्यकर्त्यांस भासत होती. परंतु देवांच्या वीरवृत्तीस अचाट कामांस हात घालणें अधिक मानवतें. त्या प्रसंगीं त्यांना पाठबळ देणारे कित्येक वेडे ध्येयवादी कार्यकर्तेही निघाले. कल्पनेच्या अपूर्वतेनेंही कित्येकांस मोहिनी पडली; परंतु बैठकींत कडाक्याचा वादविवाद झाल्याविना राहिला नाहीं. पैसा, सोई, आरोग्य, राजकारण या सर्वांच्या दृष्टीनें खेड्यांत कॉंग्रेस भरविणें गैरसोईचें असल्याचें विधान विरोधकांनीं केलें. देवांनीं शेवटचें भाषण करून भीतीचीं कारणें खोडून टाकिलीं व अखेर बहुमतानें खेड्यांत कॉंग्रेस भरविण्याच्या धोरणाचा प्रचंड विजय झाला. आणखी एका ठरावानें कॉंग्रेस पूर्वखानदेश जिल्ह्यांत भरवावी असें ठरलें; व फैजपूर हें ठिकाणही मुक्रर झालें.

प्रांतिकने बहुमतानें निर्णय घेतांच आपसांतील मतभेद बाजूस सारून सारे कार्यकर्ते एकदिलानें फैजपूरचें अधिवेशन यशस्वी करण्याच्या कामास लागले. स्वतः देव पूर्वखानदेशांत जाऊन जागेची पाहणी करून आले. फैजपूरनजीकची जिराइती जमीन पसंत करण्यांत आली. सुमारें १०० एकर जमीन शेतकऱ्यांपासून करारावर घेण्यांत आली; प्रांतिकचे चिटणीस तात्या देशपांडे यांनीं फैजपूर येथें ठाणें दिलें व अधिवेशनाची तयारी सुरू झाली.

परंतु काम चालू होतांच अडचणी सारख्या येतच राहिल्या. कार्यकर्त्यांच्या सहनशीलतेची व चिकाटीची फार मोठी परीक्षा झाली. सरकारी अधिकाऱ्यांतर्फे कॉंग्रेसच्या कामांत अडथळे येऊं लागले. कलेक्टर प्रतिकूल मनोवृत्तीचे होते. फैजपूरचे धनिक लोक सरकारचा कल पाहून आपलीं कुळें जे शेतकरी त्यांस जमिनी कॉंग्रेसला देऊं नयेत म्हणून चिथावूं लागले.

त्यामुळें घाबरून कांहीं शेतकरी जमिनी परत मागूं लागले. तरी सुद्धां एक वृद्ध शेतकरी भक्कम मिळाला. त्यानें सर्वांत मोठा असा आपल्या जामिनीचा हिस्सा कॉंग्रेसकार्यकर्त्यांच्या स्वाधीन केला. त्या उदाहरणानें दुसरे कित्येक शेतकरी शांत झाले. तिकडे कॉंग्रेसविरोधी इतर पक्षांनीं खोडसाळ प्रचार चालविलाच होता. "फैजपूरला पाण्याची सोय नाहीं; इंजिनियरांनीं जमीन नापसंत केली आहे. पाऊस पडून अधिवेशन मध्येंच समाप्त करावें लागेल." इत्यादि बातम्या हवेंत उडूं लागल्या. त्या सर्वांचें निराकरण करून, स्थानिक लोकांच्या मनांतील भीति घालवून, कॉंग्रेसयंत्राला चालना देण्याचें काम दास्ताने व देशपांडे यांवर पडलें होतें व तें त्यांनीं उत्कृष्ट-पणें बजावलें.

महाराष्ट्रांत चाळीस वर्षांनीं कॉंग्रेस-अधिवेशन भरत आहे व तेंही ग्रामीण होणार आहे ही बातमी प्रसृत होतांच देशभर कुतूहल माजलें. खुद्द महात्मा-जींनीं "महाराष्ट्र उद्यमी कार्यकर्त्यांचें पोळें आहे" असे धन्योद्गार काढून महाराष्ट्राचा गौरव केला. त्यामुळें तर लोकांना विशेषच उत्साह वाटला.

अखिल भारतीय चर्खासंघ, अखिल भारतीय ग्रामोद्योगसंघ, शांतिनिकेतन-चे कलावंत श्री. नंदलाल बोस व महाराष्ट्राची नैतिक शक्तिमूर्ति श्री. विनोबाजी या सर्वांनीं या प्रयोगास पूर्णपणें सहयोग दिला. या अधिवेशनाच्या निमित्तानें त्रिदळ महाराष्ट्रांतील सर्व कॉंग्रेस व विधायक क्षेत्रांतील कार्यकर्त्यांना एकत्र आणून कामास लावण्याची देवांची कल्पना होती, ती पूर्णपणें सफळ झाली. पूर्वखानदेशांतील अधिवेशन हें शेतकऱ्यांचें अधिवेशन करावें या कल्पनेनें श्री. सुकाभाऊ चौधरी यांनीं चाळीस पन्नास स्त्री-पुरुष शेतकरी मंडळीं-ना बरोबर घेऊन जिल्ह्यांतून पायीं दौरा आरंभिला. त्यांच्या या अभिनव पदयात्रेनें व प्रचारानें समाजात विलक्षण जागृति झाली. नंतर आणखी एक शक्ति कॉंग्रेसला मिळाली. ती म्हणजे अमळनेरचे सुप्रसिद्ध गुरुजी साने हे होत.

"कोंकणी संस्कृतीं"त वाढलेले सानेगुरुजी १९३० च्या चळवळीपर्यंत कोणास माहीत नव्हते. १९२० च्या चळवळींत त्यांना भाग घेण्याची इच्छा होती; परंतु त्यांच्या वडिलांच्या हरकतीस मान देऊन ते स्वस्थ राहिले.

अमळनेरचें विद्यार्थिबोर्डिंग त्यांनीं अनेक वर्षें चालविलें. सत्याग्रही साहित्य निर्माण करणारे ते पहिले महाराष्ट्रीय होत. त्यांच्या लेखणींत व वाणींत विलक्षण ओज व भावना असतात. ते केवळ बुद्धिमान् नाहींत– भक्त आहेत. त्यांचें अध्ययन व्यापक व खोल असून त्यांनीं ऐतिहासिक वाङ्मयाचा खूप अभ्यास केला आहे. त्यांच्यांत औदार्य भरपूर आहे. ते साधुवृत्त आहेत. अशा या प्रभावी शिक्षकाच्या हाताखालून शेंकडों विद्यार्थी तयार होऊन गेले व त्यांच्या जीवनावर सानेगुरुजींच्या संस्कारांची कायमची छाप पडली. १९३० मध्यें त्यांनीं बोर्डिंग सोडलें. " लाहोरला स्वातंत्र्याचा ठराव झाला व माझ्या हृदयांत उजाडलें " असे उद्गार त्यांनीं स्वतःच काढले आहेत. बहुजन-समाजाला हालवून सोडण्याची शक्ति त्यांच्यांत आहे. राष्ट्रीय शिक्षणांत पड-लेल्या मंडळींत साने अपूर्व आहेत. त्यांची साहित्यिक निवड उच्च दर्जाची असते. १९३० च्या चळवळींत त्यांनीं खानदेशाला हालवून सोडलें आणि हीच प्रभावी शक्ति आतां फैजपूरसमयीं कार्यास प्रवृत्त झाली. मग खानदेश-ची जनता भावनावेगानें उचंबळून कॉँग्रेसचें अधिवेशन यशस्वी करण्यास बद्धपरिकर झाली यांत नवल तें काय !

कर्मधर्मसंयोगानें महाराष्ट्राच्या कांहीं जिल्ह्यांतून या वर्षीं अवर्षण पडलें. अधिवेशनासाठीं द्रव्याचीही आवश्यकता होतीच. नवीन प्रयोग असल्यामुळें तूट येण्याचाही संभव होता. कंगाल महाराष्ट्रानें पैसे कोठून आणावे ! महा-राष्ट्रांत सधन व्यापारीवर्ग असा नाहींच. अचानक अनपेक्षितपणें मदत मिळाली !

२० सप्टेंबर रोजीं कॉँग्रेसच्या स्वागतमंडळाची पहिली बैठक फैजपूर येथें श्री. अच्युतराव पटवर्धन यांचे अध्यक्षतेखालीं भरली होती. सभेंत देशपांडे यांनीं फैजपूर येथील शेतजमीन बिगरशेतीचे कामासाठीं उपयोगांत आणण्या-ची परवानगी सरकारनें दिली असल्याचें जाहीर केलें. पुढें खर्चाचा व तुटीचा प्रश्न आला असतां, यावलचे श्री. माधवराव देशपांडे यांनीं स्वागतसमितीला तूट आल्यास ती भरून काढण्यास आपण वीस हजार रुपयांची देणगी देत आहोंत असें जाहीर केलें.

आणि मग पांच मिनिटें टाळ्यांचा कडकडाट झाला व महात्माजींचा

जयजयकार करण्यांत आला. धर्मभावना कोणाच्या हृदयांत केव्हां व कशी स्फुरेल तें सांगणें कठीण आहे.

याच बैठकींत एकमतानें देवांची स्वागताध्यक्षाचे जागीं निवड झाली. धनाजी नाना चौधरी हे सर-चिटणीस निवडले गेले व नगरचे पु. ह. पटवर्धन यांची स्वयंसेवकदलाधिपति म्हणून नेमणूक करण्यांत आली.

यानंतर अधिवेशनाची तयारी सुरळीतपणें चालू झाली.

* * *

अधिवेशनाची तयारी चालू असतांना महाराष्ट्रांत आणखीही राजकारण शिजत होतें. प्रांतिकच्या निवडणुकी कॉंग्रेसतर्फे लढविल्या जाणार होत्या; त्यासाठीं मतदार-नोंदणीचें, प्रचाराचें आणि संघटनेचें कार्य चाललेंच होतें. लोकशाही स्वराज्यपक्षाशीं तडजोड करण्याचा प्रयत्न करावा असें ठरून देव यांस त्यासंबंधीं सर्वाधिकार देण्यांत आले. २६ जुलै रोजीं अणे, केळकर व देव यांनीं एकत्र बसून वाटघाट केली व तडजोड होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. तडजोड झाल्यास लोकशाही स्वराज्यपक्षाची जरूरी राहिली नसती. कॉंग्रेसशीं मिळतें घेऊन आपल्या पक्षाची समाप्ति करावी असें म्हणणारे कित्येक त्या पक्षांत होते. परंतु १ व २ ऑगस्ट रोजीं टिळकपंथीयांची बैठक टिळकस्मारक-मंदिरांत चालून, पक्ष ठेवावा व कॉंग्रेसशीं तडजोड करूं नये असेंच बहुमतानें ठरलें. तेव्हां केळकरांनीं आपला राजीनामा सादर केला व ते यानंतर पक्षाचे साधारण सभासद राहिले. पुढें लोकशाही स्वराज्यपक्षानें आपले कांहीं उमेदवार कॉंग्रेसचे प्रतिस्पर्धी म्हणून उभे केले आणि स्वमतप्रचारार्थ 'राष्ट्रमत' नांवाचें दैनिक श्री. वालचंद कोठारी यांच्या संपादकत्वाखालीं चालू केलें.

———

# ८ आजकालचे प्रश्न

दरम्यान महाराष्ट्राच्या रंगभूमीवर दोन चित्तवेधक प्रवेश घडले. एक म्हणजे अस्पृश्यांच्या धर्मांतराबाबत डॉ. आंबेडकर यांनीं ठोकलेली आरोळी व तिची महाराष्ट्रीय जनतेवर झालेली प्रतिक्रिया, आणि दुसरी म्हणजे लोकशाहीपक्षातर्फे कॉंग्रेसनिष्ठ महिलांवर धरण्यांत आलेलें शस्त्र.

*  *  *

अस्पृश्यतेचीं मुळें हिंदुसमाजांत फार खोल गेलीं आहेत तरी त्याची जाणीव सुधारकांना नव्हती असें नाहीं. महाराष्ट्रांत अस्पृश्यतेविरुद्ध मोहीम करणारे अनेक सत्पुरुष होऊन गेले. ब्रिटिश अमलापूर्वी एकनाथ-तुकारामां-सारखे सत्पुरुष 'सर्वांभूतीं ईश्वर' पाहण्याची शिफारस समाजाला करीत होते. परंतु अस्पृश्यतेविरुद्ध त्यांनीं सामाजिक चळवळ सुरू केल्याचा पुरावा सांपडत नाहीं. ब्रिटिश अमलानंतर देखील अस्पृश्यता आपल्या समाजावर कलंक आहे, असें म्हणणारे रानडे, भांडारकर यांसारखे सुधारक निघाले; परंतु प्रत्यक्ष चळवळ अशी स्व. ज्योतीबा फुले, श्री. विठ्ठलराव शिंदे अशाच दोनचार लोकांनीं केली. संस्थानिकांपैकीं श्री. सयाजीराव गायकवाड. श्री. शाहू छत्र-पति वगैरेनीं अस्पृश्य समाजांतील व्यक्तींना मदत करून, छात्रवृत्ति देऊन समाजापुढें येण्यास त्यांस उत्तेजन दिलें. तथापि हे सारे प्रयत्न स्पृश्यांचे झाले. त्यांतही प्रत्यक्ष प्रवृत्ति करणारे ब्राह्मणेतर सुधारक होते हें लक्षांत ठेवण्या-सारखें आहे. खुद्द अस्पृश्यांतूनही जागृतीची व स्वतःस सुधारण्याच्या प्रबळ इच्छेची आवश्यकता होती. त्याप्रमाणें अस्पृश्यांतील पहिले स्वजाति-उद्धारक गोपाळ बाबा वलंगकर हे निघाले. ते रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली येथले राहणारे होते. जातभाईच्या सेवेसाठीं वलंगकरांनीं संन्यास घेतला व कीर्तनें करून "अस्पृश्यता ही मनुष्यनिर्मित आहे, देवनिर्मित नाहीं;" अशी घोषणा केली. महाराष्ट्रांतील अस्पृश्यांत संख्येनें व बुद्धिबलानें महारजाति हीच श्रेष्ठ आहे. पेशवेकालीं महारलोक गांवकी करीत व त्यांचें एक स्वतंत्र पथक मराठ्यांच्या

सैन्यांत होतें. ब्रिटिश अमदानींत देखील प्रथम त्याच जातींत जागृति फैलावली. ब्रिटिश लष्करांत महार-पलटणी आहेत. वलंगकरांच्या चळवळीनें महार-समाजांत खूप जागृति झाली. त्यांच्याकडून स्फूर्ति पावलेले शिवराम जानबा कांबळे यांनीं पुण्यांत रीतसर संस्था स्थापून व वाचनालय उघडून अस्पृश्योद्धाराच्या कार्यास आरंभ केला. त्यांच्याविषयीं अशी गोष्ट सांगतात कीं, एकदां रे मार्केटसमोर मद्यपाननिषेधाची जंगी सभा भरून, लोकमान्य, खाडिलकर वगैरे मंडळी उपस्थित असतां, कांबळे यांनीं आपणांस बोलण्याची परवानगी मिळावी म्हणून अध्यक्षांकडे चिठी पाठविली व तींत स्वतः महार असल्याचा उल्लेख केला. अध्यक्षांनीं चिठी टिळकांस दाखविली. टिळकांनीं कांबळे यांस व्यासपीठावर आपल्या शेजारीं बसवून त्यांचें भाषण करविलें.

कांबळ्यांना पुढें सयाजीराव महाराजांची मुलाखत मिळाली व त्यांनीं अनेक प्रकारें आपल्या समाजांतील दुष्ट रूढि दूर करून त्याची सुधारणा करण्याचा प्रयत्न चालविला. कांबळ्यांनंतर विठ्ठल रामजी शिंदे यांनीं अस्पृश्यसमाजांत विद्याप्रचार करण्याचें कार्य आरंभिलें. त्यांचें कार्य लवकरच इतक्या वाढीस पोंचलें कीं, मुंबईशिवाय मद्रास, बंगाल, बिहार, मध्यप्रांत वगैरे प्रांतांतूनही त्यांच्या 'निराश्रित सहाय्यकारी मंडळ' संस्थेच्या शाखा पसरल्या. शिंद्यांनीं अस्पृश्यांबरोबर पंक्तिभोजन करण्यासही सुरुवात केली.

श्री. भाऊराव पायगौडा पाटील या जैन गृहस्थांनींही अस्पृश्यांची कांहीं वर्षें सतत सेवा केली. त्यांनीं मुख्यतः अस्पृश्य मुलांस शिक्षण देण्याचें व त्यांना स्पृश्य जातींच्या मुलांबरोबर एकाच बोर्डिंगांत ठेवण्याचे प्रयत्न केले. श्री. माटे मास्तर यांनीं श्री. हरिभाऊ फाटक यांच्या मदतीनें पुण्यांत मांगवाड्यांत व मंगळवारांतील महारवाड्यांत १९१९-२० सालीं हरिजन-शाळा काढल्या.

१९१७ पर्यंत अस्पृश्यांच्या चळवळीस धार्मिक, शैक्षणिक वा सामाजिक रूप होतें. मॉंटेग्युसाहेब हिंदुस्थानांत आले तेव्हां अस्पृश्यांच्या एका शिष्टमंडळानें त्यांची भेट घेऊन, जातवार राजकीय हक्कांची मागणी केली. त्यानंतर अस्पृश्यसमाजांत राजकीय जागृति फैलावूं लागली. १९२६ पर्यंत श्री. घोलप यांच्या नेतृत्वाखालीं अस्पृश्यांच्या अनेक चळवळी झाल्या. सर नारायण चंदावरकर, शाहूमहाराज वगैरेंची त्यांस सक्रिय मदत असे. घोलप हे मुंबई

कायदेमंडळांत अस्पृश्यांच्या राखीव जागेचे सभासद होते. त्यांना मदत करणारे निकाळजे व इतर मंडळी होती.

१९२३ सालीं गायकवाड सरकारच्या मदतीनें अनेक आंग्ल-पदव्याविभूषित होऊन डॉ. आंबेडकर विलायतेहून मुंबईत आले व त्यांनीं आपल्या पुढारीपणाखालीं मुख्यतः महार व तदनुषंगानें इतर अस्पृश्य जातींची संघटना करण्यास सुरुवात केली. त्यांनीं "बहिष्कृतहितकारिणी" नांवाची संस्था स्थापिली; तीस मुंबईतील थोर थोर हिंदु व इतर गृहस्थांनीं मदत केली. सोलापूरला त्यांनीं अस्पृश्य विद्यार्थ्यांकरितां एक वसतिगृह सुरू केलें. परंतु नुसत्या विधायक कार्यक्रमानें डॉक्टरमजकुरांचें समाधान होण्यासारखें नव्हतें. त्यांच्या जीवनांत स्पृश्य समाजाकडून कित्येक वेळां मानहानि सहन करण्याचे प्रसंग आले होते, त्यामुळें त्यांचें मन एकंदर स्पृश्यसमाजाबद्दल कडू बनलें होतें. त्यांनीं वर्तमानपत्रें व भाषणें यांतून हिंदु समाजावर कडक टीका करण्यास सुरुवात केली. एकदां भरसभेंत त्यांनीं मनुस्मृति जाळली.

"बहिष्कृत भारत" नांवाच्या पत्रांतून त्यांनीं उद्दामवृत्तीचें लेखन चालू ठेवल्यामुळें स्पृश्यवर्गाला त्यांच्याविषयीं सहानुभूति न वाटतां उलटा क्रोध येऊं लागला. पुढें महाड येथें चवदार तळ्यावर सत्याग्रह करण्याची कल्पना डॉ. आंबेडकरांस सांगण्यांत आली. महाडचा सत्याग्रह फार गाजला. पण शेवटीं कलेक्टरनीं १४४ कलम लागू केल्यामुळें आंबेडकरांनीं माघार घेतली. तरी देखील आंबेडकरांची कीर्ति झाली व अस्पृश्य, विशेषतः महार त्यांच्या भजनीं लागले. पुण्यास १९२९ सालीं कांबळे व राजभोज यांनीं पर्वती-सत्याग्रह केला त्यास स्पृश्य हिंदूंचीही मदत होती. परंतु आंबेडकरांनीं त्याशीं आपला संबंध ठेवला नाहीं. त्यांनीं नाशिक येथील प्रसिद्ध काळ्या रामाच्या देवळांत सत्याग्रह घडवून आणला पण तोही अयशस्वी ठरला. हे सत्याग्रह अपयशी ठरले तरी आंबेडकरांचें नांव मशहूर होऊन, इंग्रज सरकारला अस्पृश्यांचा एक 'पुढारी' सांपडला व त्याला त्यानें गोलमेज परिषदेचे वेळीं मोठ्या इतमामास चढवून हिंदूंत फाटाफूट करण्याचा आपला राजकारणी बेत सिद्धीस नेला.

पुढें येरवडा तुरुंगांत महात्माजींना अनशन करावें लागलें त्या समयीं,

आंबेडकरांची समजूत घालण्यास पुढारी गेले असतां "ही राजकारणी डुरकावणी आहे" अशा प्रकारचे उद्गार काढून, शेवटीं आंबेडकर महात्माजींच्या थोर व्यक्तिमत्त्वानें दिपून 'पुणें करारा'स कसे कबूल झाले ती कथा प्रसिद्ध आहेच. महात्माजींनीं हरिजनोद्धाराची चळवळ हातीं घेतांच ती महाराष्ट्रापुरती न राहतां अखिल भारतीय स्वरूपाची बनली व अनेक क्षेत्रांतून काम करूं लागली. परंतु आंबेडकरांचा असंतोष कायम राहिला. अस्पृश्यतेचा दीर्घकालीन इतिहास लक्षांत घेतां 'करार' होतांच दोनचार वर्षांत अस्पृश्यता कायमची नष्ट होणें व्यवहारी दृष्ट्या सुद्धां कसें अशक्य होतें तें पोरही सांगू शकलें असतें. परंतु महात्माजी आपली सारी पुण्याई खर्चीत असतां आणि प्रांतोप्रांतीं शाखा-संस्था उभारून, फंड मिळवून, ठक्करबाप्पांसारख्या अविश्रान्त श्रम करणाऱ्या अनेक सेवकांस कामास लावून अहिंसक पद्धतीनें या पापाशीं झडगत असतां, त्यांच्या सद्धेतूबद्दल शंका घेणें कोणाहि सामान्य माणसाच्यानें झालें नसतें. डॉक्टरमजकूर दिवसेंदिवस उतावळे बनत चालले. तशांत प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुकी जवळ येत होत्या. डॉक्टरांना उमेदवारी करावयाची होती. तेव्हां जनतेंत प्रचार करून मतें मिळविण्याचें कामही त्यांच्या दृष्टीसमोर होतेंच. महाराष्ट्रांत सर्वांत शक्तिशाली पक्ष कॉंग्रेसच होता. कॉंग्रेसमध्यें प्रविष्ट होऊन सेवक-सैनिक बनणें डॉक्टरांना पसंत झालेंच नसतें. आपला पुढारीपणा कायम राखावयास स्वतंत्र पक्ष काढला पाहिजे. डॉक्टरांनीं स्वतंत्र मजूर पक्ष काढला, त्यांत स्पृश्यही दाखल केले. आणि कॉंग्रेसची प्रतिष्ठा कमी करावी या हेतूनें "हिंदूंच्या छळानें त्रासून आम्ही आतां धर्मांतर करणार. कॉंग्रेसनें पुणें-करार मोडला. ती वचनें पाळीत नाहीं." अशी घोषणा त्यांनीं केली. अर्थात् समाजांत गडबड उडाली, हिंदु-सभावाल्यांचें धाबें दणाणलें; कॉंग्रेस थंडच होती, परंतु मद्रासचे अस्पृश्य-पुढारी रा. ब. राजा यांचा आंबेडकरांशीं मतभेद झाला. अस्पृश्यांतही दुमत झालें. डॉ. मुंजे यांनीं आंबेडकरांस शीखधर्म स्वीकारण्याची सल्ला दिली व त्यांच्याशीं खासगी करार केला. तो बाहेर येऊन त्यावर बरीच आरडाओरड झाली; परंतु डोंगराच्या या प्रसववेदना शेवटीं पोकळ ठरल्या. आंबेडकरांनीं धर्मांतर केलें नाहीं. मात्र कांहीं दिवस

वर्तमानपत्रांना खाद्य मिळालें; आणि लोभी परधर्मीय मिशनऱ्यांची धांवपळ झाली. असो.

* * *

इंग्रज कवि Cowper यानें अभिमानानें एके ठिकाणीं लिहिलें आहे:—

Slaves cannot breathe in England
They touch our shore and their shackles fall !

स्वदेशांतील हवेचा सुद्धां इतका प्रभाव कीं, तिचा श्वास पोटांत गेला नाहीं तोंच गुलाम स्वतंत्र होतात! स्वतंत्र भारतासंबंधीं सुद्धां आपणांस असे गौरवाचे उद्गार काढतां येतील काय ? जेव्हां आर्यावर्त स्वतंत्र होता तेव्हांही अनार्य, दस्यु, चाण्डाल इत्यादि बहिष्कृत जाति होत्याच. पुढें पुढें तर ह्या रोगाचीं मुळें इतकीं खोल रुतलीं कीं मानवी समतेच्या घोषणा करीत आलेल्या इस्लामी व ख्रिस्ती संस्कृति येथें आल्यावर त्याच्या संसर्गानें भ्रष्ट झाल्या व त्यांच्याही समाजांत हें पाप शिरलें.

प्राचीन आर्यांनीं श्रमविभाग केला, फलविभाग केला नाहीं किंवा संस्कृतीचाही विभाग केला नाहीं. त्यामुळें समाजाचा फार मोठा भाग दलित व पतित राहिला. पूर्वजांची परंपरा हिंदु लोकांनीं शतकानुशतकें पुढें चालविली. स्पृश्यांतील दलित लोक केवळ दलित होते; परंतु अस्पृश्य दलित असूनही पतित आणि तिरस्कार-पात्र ठरले.

महाराष्ट्रांत ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांत फार मोठें अंतर असल्याबद्दलची चर्चा मागें आलीच आहे; परंतु ब्राह्मण व अस्पृश्य यांतील अंतर कसें मोजावें ? बुद्धिचतुर ब्राह्मणांनीं धर्माच्या नांवाखालीं समाजांत अशुद्धि पेरली व तिचें पापरूपी फलही या त्यक्त लोकांनाच खाऊं घातलें. इतिहासांत या उदाहरणाला तोड नाहीं.

परंतु महाराष्ट्रांतील हवा स्वातंत्र्याच्या सुवासानें दरवळली आहे. महाराष्ट्रांतील नद्यांनीं स्वातंत्र्यवीरांना जीवन पुरविलें आहे. त्यामुळें महाराष्ट्रांतील दलित समाजांत जागृति लवकर होते. महाराष्ट्रांतील अस्पृश्यांपैकीं महारजाति तर बुद्धिसामर्थ्यांत ब्राह्मणांनाही हार जाणार नाहीं. पिढ्यान्‌पिढ्या

महारांनीं गांवकी केली आहे; प्राचीन व मध्ययुगीन स्थानिक स्वराज्याच्या कारभारांत भाग घेतला आहे; शिपाई म्हणूनही सेवा केली आहे. तिच्यांत ब्राह्मणांची बुद्धि व क्षत्रियांचें बाहुबल आहे. अशाही जातीला दडपलें जातांच, दाबलेली ज्वाला वर उसळून येते त्याप्रमाणें तिचा आत्मा प्रज्वलित होऊन उठला. डॉ. आंबेडकर हें त्या जातीला फुटलेलें तोंड होय. शिक्षणानें प्रबुद्ध होतांच त्यांनीं बरोबर समतेची मागणी केली. मराठी साम्राज्य महाराष्ट्रापुरतें तरी नष्ट करण्यांत महार पलटणींनीं इंग्रजांस मदत केली होती. त्यामुळें महारांना स्वतःच्या कर्तबगारीबद्दल आत्मविश्वास कां वाटणार नाहीं ? मराठ्यांप्रमाणें महार हेही महाराष्ट्राच्या गुरुत्वमध्याचाच एक हिस्सा आहेत. ते दयेची मागणी मुळींच करणार नाहींत. "आमचा हक्क आम्ही घेणार" हा त्यांचा बाणा राहील. आणि उदयोन्मुख होण्यास तरी अंगचेंच पाणी आवश्यक असतें. वीर्यशाली पुरुष किंवा समाज लवकर उत्कर्षास पोंचतो. त्यामुळें महाराष्ट्रांतील अस्पृश्यांत जागृति जितकी लवकर होईल व आत्मोद्धारासाठीं ते जितकी धडपड करतील तितकें इष्टच आहे.

नवविचारांचा वारा समाजांतील सर्वच लोकांना स्पर्श करून गेल्यामुळें समाजांतील प्रत्येक वर्गास स्वत्वाची जाणीव होऊं लागली आहे. राजकीय हक्काची जाणीव समाजाच्या सर्व घटकांना होणें यांत लोकशाहीचें बीज आहे. राष्ट्र स्वतंत्र व्हावें म्हणून तळमळणाऱ्या काँग्रेसजनांना स्वतःपासून फटकून वागणाऱ्या समाजाच्या वर्तणुकीचें आश्चर्य वाटूं नये. ब्राह्मणेतरांचें उदाहरण या बाबतींत दिग्दर्शन करणारें आहे. काँग्रेसनें जोंपर्यंत शेतकऱ्यांचे प्रश्न आत्मक्लेश भोगून सोडवून दाखविले नाहींत, तोंपर्यंत ब्राह्मणेतरांनाही काँग्रेसचा विश्वास वाटत नव्हता. प्रत्यक्ष कार्यानें संशयनिरसन झालें. अस्पृश्यांच्या बाबतींत कायद्याच्या मदतीशिवाय किंवा साम्राज्यविरोधी चळवळ केल्याशिवाय सुद्धां करतां येणाऱ्या अशा अनेक गोष्टी आहेत. त्या जर स्पृश्य-समाज आज करून दाखविणार नाहीं, तर स्वराज्यांत करून दाखवील या आश्वासनांत अर्थ काय ? १९२७ सालीं डॉ. आंबेडकर हे स्वराज्य पत्राच्या कचेरींत आले होते. त्या वेळीं देव व जावडेकर यांनीं त्यांच्याशीं खूप चर्चा केली होती. आंबेडकरांनीं साफ सांगितलें कीं, "आमचा सामाजिक दर्जा तुम्ही आतां

कबूल करीत नसाल तर स्वराज्यांत तो कराल हा विश्वास आम्हांस वाटत नाहीं. त्यापेक्षां इंग्रजी राज्यांत मिळत असलेला दर्जा काय वाईट ?" ही विचारसरणी स्वाभाविक आहे व तीबद्दल अस्पृश्यांस दोष देण्याचें कारण नाहीं.

काँग्रेसबाहेरील समाजाची गोष्ट जाऊं द्या. खुद्द काँग्रेसमधील चार आणे वर्गणीदारांचा जो मोठा समुदाय आहे त्याला तरी अस्पृश्यता-निवारणाचें काम पटविण्याचें कार्य काँग्रेस-सेवकांनीं कितीसें केलें आहे ? राजकीय चळवळीइतकें सामाजिक चळवळीचें महत्त्व महाराष्ट्रीय काँग्रेस-कार्यकर्त्यांना फारसें वाटत नाहीं. महाराष्ट्र-हरिजन-सेवकसंघाचे अध्यक्ष कै. देवधर असतांनां काँग्रेसजन त्यांना किती सक्रिय मदत करीत ? पुढें श्री. खेर झाले व आतां श्री. बर्वे आहेत. पण खेर हरिजनसेवेचें पवित्र कार्य करीत असतां त्यांच्याकडे दृष्टिपात करण्याची फुरसत ज्यांना नव्हती, ते खेर मुख्य प्रधान झाल्यावर हक्कानें " मागण्या " करण्यास त्यांचेकडे धांवले. बर्व्यांना तर रात्रंदिवस टाहो फोडावा लागत आहे. पण हरिजनसेवेंत 'चुरचुरीत' असें कांहीं नसल्यामुळें लोकांस तींत गोडी वाटत नाहीं व तिचें महत्त्वही कळत नाहीं. परकीय गुलामीची तरवार डोक्यावर लटकत असतांही पायाखालच्या प्राण्याला चिरडून टाकण्याचें समाज सोडीत नाहीं. म्हणजे सापाच्या भक्ष्यस्थानीं पडत असतांना माशी गिळणाऱ्या बेडकाप्रमाणें समाजाची स्थिति आहे. असो.

हिंदुसमाजाच्या शक्तीचा व स्वास्थ्याचा ऱ्हास करणारी अस्पृश्यता स्वतःच नाशाच्या पंथाला लागली आहे यांत शंका नाहीं. तिनें धर्माचें रूप घेतल्यामुळें जनता फसली गेली होती; व अजूनही ही विषमता लवकर जात नाहीं. परंतु महाराष्ट्रांत सर्वसाधारण समाजाची न्यायबुद्धि लवकर जागृत झाली आणि महात्मा गांधी व काँग्रेस यांनीं आपली तपश्चर्या महाराष्ट्रांतील आजपर्यंत होऊन गेलेल्या कित्येक प्रभावी धर्मपुरुषांच्या तपश्चर्येशीं एकत्रित करून हें शुभ कार्य पुढें चालविलें. महात्माजींची तपश्चर्या महाराष्ट्रांतच जाज्वल्य रूपानें प्रकट झाली व पुणें करार घडून आला हें विशेष होय.

* * *

महात्मा गांधींच्या तपश्चर्येनें ज्याप्रमाणें अस्पृश्य व दलित लोकांचा उद्धार

करणारें जबरदस्त आंदोलन सुरू झालें, त्याचप्रमाणें अपंग व परावलंबी बनलेल्या स्त्रीवर्गांत निर्भयता व आत्मविश्वासाचें वातावरण निर्माण झालें. महाराष्ट्रापुरता स्त्रीसमाजाचा इतिहास लिहावयाचा म्हणजे महाराष्ट्रांतील सर्व सुधारकांनीं स्त्रीशिक्षणाला उचलून धरिलें इतकेंच नव्हे, तर त्याला सक्रिय मदत केली. प्रथम प्रथम शिक्षण घेणाऱ्या स्त्रिया ब्राह्मणवर्गांतीलच असत. पुढें हळूहळू इतर वर्गांतील स्त्रियाही शिक्षण संपादूं लागल्या. परंतु स्वतःच्या जबाबदारीवर सार्वजनिक कामांत पडणाऱ्या स्त्रिया सुरुवातीस फारशा नसत. स्त्रियांच्या ज्या संस्था समाजसेवा करण्यास म्हणून निघाल्या त्या संकुचित स्वरूपाच्या होत्या. साऱ्या समाजाची सेवा करण्यापेक्षां स्वतःचीच स्थिति सुधारण्याकडे त्यांची वृत्ति होती. मोठमोठे सामाजिक प्रश्न हाताळणें त्यांना शक्य नव्हतें. कारण आत्मविश्वासाच्या अभावीं त्यांची शक्ति मर्यादित होती. शिवाय स्त्रीस्वभावांतील भिडस्तपणा आणि स्त्रियांची आर्थिक परवशता, त्याचप्रमाणें कौटुंबिक अगतिकता हींही कारणें होतीं.

१९२० नंतर महात्माजींच्या प्रेरणेनें स्त्रिया राजकारणांत पडूं लागल्या. महात्माजींनीं समता आणि अहिंसा हीं महान् तत्त्वें हिंदी सामाजिक क्षेत्रांत दाखल केलीं. दोन्ही तत्त्वें स्त्रियांपुरतीं तरी उत्साह-प्रेरक ठरलीं. महाराष्ट्रांत कित्येक स्त्रियांनीं मुळशी सत्याग्रहांत भाग घेतला होता. राजकीय चळवळीचें हें वैशिष्ट्य आहे कीं, तींत सुशिक्षित-अशिक्षित, ब्राह्मण-ब्राह्मणेतर सर्व व्यक्ति भाग घेऊं शकतात– नव्हे बहुजनसमाजाचा अंतर्भाव हाच राजकीय चळवळीचा आधार आहे. त्यामुळें राजकीय चळवळीचें स्वरूप व्यापक व प्रजाकीय बनतांच स्त्रियांच्या कर्तृत्वाला वाव मिळाला. १९२० नंतर पुण्यांत स्त्रियांची सूत कमिटी स्थापन झाली. महाराष्ट्रांत स्त्रियांची कॉंग्रेसनिष्ठ अशी संस्था हीच होती व तिच्यामार्फत श्री. सत्यभामाबाई कुवळेकर व श्री. आनंदीबाई जोगळेकर या पुढाऱ्यांचीं व्याख्यानें वगैरे घडवून आणवीत. १९३० च्या चळवळींत पुष्कळ स्त्रिया तुरुंगांत गेल्या. यशोदाबाई भट, पार्वतीबाई ठकार, राधाबाई आपटे वगैरे स्त्रियांनीं पुरुषांच्या बरोबरीनें प्रचारकार्य केलें. परंतु स्वतःच्या एकटीच्या जबाबदारीवर लोकसंघटनेचें काम करणारी स्त्री अजून पुढें आली नव्हती. बऱ्याच स्त्रिया आपापल्या पतीच्या आसऱ्यानें कामें करीत.

त्यांत त्यांना थोडीबहुत तालीम मिळे. महाराष्ट्रांतील उच्च शिक्षण घेतलेल्या स्त्रिया राजकीय क्षेत्रापासून विन्मुख होत्या. कधीं थोडें लेखन, कधीं क्वचित् भाषण, शिक्षणसंस्थांतून समारंभ घडवून आणणें, आणि मुंबईच्या इंडियन वुइमेन्स कौन्सिल, वुइमेन्स कॉन्फरन्स असल्या बडेजावी संस्थांतर्फे वर्षांतून एकदां महिला-परिषदा भरविणें याखेरीज म्हणजे दरिद्रनारायणाच्या सेवेचा, दैनंदिन काबाडकष्टाचा, किंवा देशाभिमानाचा द्योतक असा कोठलाही राजकीय कार्यक्रम करण्यास त्या पुढें होत नसत. महिलासंस्था स्थापणें म्हणजे बॅडमिंटन कोर्ट उघडणे किंवा शिवण-भरतकामाचे वर्ग सुरू करणें; यापुढें स्त्रिया पाऊल-भरसुद्धां गेल्याच नाहींत. पिढ्यान्‌पिढ्या कुटुंबाच्या मर्यादेबाहेर सेवाक्षेत्राची कल्पनाच त्यांना मिळाली नसल्यामुळें आणि आर्थिक दृष्टया परावलंबी जीवन घालवण्याचीच संवय झाल्यामुळें समाजासाठीं त्याग व कष्ट सोसण्याकडे त्यांची वृत्ति जाईना. सुशिक्षित स्त्रियांना श्रीमंत पतीची तरी इच्छा असे, किंवा मोठ्या पगाराची नोकरी तरी मिळावी असें वाटे. आपण निभ्रान्त असावें, सुरक्षित असावें हीच एक जोरदार भावना त्यांत अंतःकरणाच्या बुडाशीं असे. या वृत्तीला सामाजिक परिस्थितिही पुष्कळ अंशीं कारणीभूत होती यांत शंका नाहीं. महाराष्ट्र या बाबतींत सर्वसाधारणपणें सनातनी वृत्तीचा असल्या-मुळें स्त्रियांना सार्वजनिक जीवनांत प्रवेश करण्यास प्रोत्साहन न देतां उलट अडथळा करतो. समाजाकडून स्त्रियांना कसल्याही गोष्टींत अभय मिळत नसतें. स्त्रियांचे प्रश्न आत्मीयपणें समजून घेण्याचा प्रयत्न समाज करीत नसतो. नाणावलेले अनेक पुरुष कमी दुर्व्यसनी किंवा विषयासक्त नसतात, परंतु समाजांत ते निर्भय असतात. स्त्रियांच्या बाबतींत पुरुषांची अतिशय अनुदार वृत्ति असते. इंग्लंडांत जाऊन युरोपियन स्त्रियांशीं लग्न करणारे किंवा खुद्द हिंदु-स्थानांतही परजातीय स्त्रीशीं लग्न करणारे सुशिक्षित कमी नाहींत; परंतु त्यांचा छळ सार्वजनिकरीत्या झाला नाहीं. पण कु. मालिनी पाणंदीकर या सुशिक्षित स्त्रीनें एका मुसलमान गृहस्थाशीं विवाह करतांच महाराष्ट्र व मुंबईतील वर्तमान-पत्रांनीं त्याचा भयंकर गाजावाजा करून वधूला सळो कीं पळो करून सोडलें व त्या प्रकारानें इतर अनेक शिकणाऱ्या मुलींना त्रास भोगावा लागला.

१९३० नंतर अशी एक परिस्थिति निर्माण झाली कीं, स्त्रियांना राजकीय

क्षेत्रांत कांहीं ना कांहीं निमित्तानें पडावें लागलें. राजकारण हें अशा प्रकारचें कार्य आहे कीं तें सतत चालू ठेवावें लागतें. महात्मा गांधींनीं स्त्रियांस रचनात्मक कार्याकडे आपलें ध्यान विशेष देण्यास शिफारस केली तरी शहरांतून काम करणाऱ्या स्त्रियांना वेळोवेळीं समाजांत जाणें भागच होतें. १९३५ मध्यें लक्ष्मीबाई ठुसे यांनीं पुण्यांतील कॉंग्रेसनिष्ठ स्त्रियांस संघटनात्मक रीतीनें काम करण्यास सोपें जावें म्हणून स्त्रीसेविकासंघ काढिला. नवा संघ काढण्याचें कारण जुनी महाराष्ट्र-भगिनी-मंडळ संस्था फर्मानशाहीच्या काळांत बेकायदा ठरली होती. या संघाच्या संचालिका न. वि. गाडगीळ यांच्या पत्नी श्रीमती आनंदीबाई या होत्या. श्री. सुशीलाबाई जावडेकर या त्याच्या चिटणीस होत्या. इतरही कित्येक स्त्रिया त्या संघामार्फत पुण्यांत काम करीत असत. त्यांची संख्या, कार्यक्षेत्र व शक्ति सारीं मर्यादितच होतीं. परंतु हळूहळू स्त्रीसमाजांत जाग्रति घडवून आणून संघाचें कार्य विस्तृत करण्याचा त्यांचा मनोदय होता.

फैजपूरला अधिवेशन करण्याचें ठरतांच स्वयंसेविकादल उभारण्याची आवश्यकता भासलीच. ही संघटना कोणाच्या जबाबदारीवर सोंपवावी याचा देवांना विचार पडला. कार्याचें स्वरूप प्रांतीय होतें आणि महाराष्ट्रांत जेथें पुरुषांनाच कॉंग्रेसचा प्रचार करणें वर्षानुवर्षें अवघड वाटलें तेथें स्त्रियांत प्रचार करणें किती क्लिष्ट व निराशाजनक काम वाटण्याचा संभव होता तें वर्णन करून सांगण्याची आवश्यकता नाहीं. स्वयंसेवकांच्या दलाचे संचालक पु. ह. पटवर्धन यांनीं देवांस माझें नांव सुचविलें; परंतु मीं विधायक कार्यक्रम करण्याचा निश्चय करून आश्रमांत स्थिर असल्यामुळें, या चळवळ्या कामास मी कबूल होईन अशी देवांची कल्पना नव्हती. तरी सुद्धां आचार्य भागवत यांच्या प्रोत्साहनानें त्यांनीं धीर केला व मला विचारलें. यद्यपि मला त्या कार्याचा अनुभव किंवा गोडीहि नव्हती तरी त्यांची नड पाहून मीं रुकार दिला व जबाबदारी शिरावर घेतली.

काम स्वीकारल्यानंतर देवांनीं कांहीं स्थूल कल्पना मला दिल्या व सारें काम स्वतःच्याच हिंमतीवर व अक्कलहुशारीवर करण्यास सांगून ते मोकळे झाले. ऑगस्टपासून डिसेंबरअखेरपर्यंत मीं दौरे, लेख, व्याख्यानें वगैरे

द्वारा प्रांतभर आंदोलन केलें व शेवटीं प्रयत्न सफळ होऊन महाराष्ट्रीय महिलांनीं प्रांताचें नांव उज्ज्वल केलें ही सारी गोष्ट खरी; परंतु महाराष्ट्रांत एका स्त्रीनें जबाबदारीपूर्वक अशा मोठ्या संघटनेच्या कार्यांत पडण्याचा तो पहिलाच प्रसंग असल्यामुळें प्रांतांतील समाजावर त्याचा एकंदर परिणाम व प्रतिक्रिया काय घडून आली हें सांगणं होतकरू समाजसेविकांच्या दृष्टीनेंही मनोरंजक तसें फायद्याचेंही होईल.

महाराष्ट्रांतील जनतेसमोर जाहीरपणें येण्याचा तो पहिलाच प्रसंग होता. मुंबईंत माझा जन्म गेला. परंतु तेथील वातावरण व महाराष्ट्रांतील, विशेषतः पुण्यांतील वातावरण फार वेगळें आहे. स्त्रियांनीं पुढें येऊन सामाजिक व राजकीय क्षेत्रांत पडावें असें आजकाल बहुतेक सारे लोक म्हणतात. परंतु पुरुषांनीं सार्वजनिक कार्यांत पडणें व स्त्रियांनीं पडणें यांत अंतर तर आहेच. सामान्य स्त्रीला संकुचित वृत्तीच्या समाजांत पुढें येणें धोक्याचें वाटेल अशीच महाराष्ट्रांतील आजच्या समाजाची मनोवृत्ति आहे. आणि म्हणून स्त्रिया पुढें येण्यास बिचकत असल्या तर त्यांत आश्चर्य नाहीं.

अंमलदार-सेविकांचें शिबिर पुण्यास २० ऑक्टोबर रोजीं निघणार होतें. त्याच्यांत होणाऱ्या शिक्षणक्रमाची प्रसिद्धि मीं दौऱ्यावर निघण्यापूर्वी ( १२ सप्टेंबर ) प्रसिद्ध केली होती. त्यांतील कांहीं भाग व एकदोन शिक्षक यांचें निमित्त करून 'राष्ट्रमत' या पत्रानें " शिबिर-संघ व संचालिका " या सर्वांवर शिंतोडे उडविण्यास सुरुवात केली. राष्ट्रमत हें लोकशाही स्वराज्यपक्षाच्या उमेदवारांच्या प्रचारार्थ निघालेलें नैमित्तिक पत्र होतें. स्वमतप्रचार करतांना तात्त्विक भूमिका घ्यावी लागते ही भावना बहुतेक प्रचारकांतून कमीच दिसून येते. जनता अगदींच मूढ नसते. विशेषतः निरपेक्ष सेवा करणाऱ्या कार्यकर्त्यांशीं कृतघ्न बनणें जनतेच्या प्रकृतींत नसतें. परंतु सेवाच नाहीं तेथें प्रचार दुसरा काय करावयाचा? दुसऱ्या पक्षाची कुचेष्टा हाच मार्ग शेवटीं उरतो. काँग्रेसच्या कार्यकर्त्यांची कुचेष्टा आजपर्यंत चालूच होती. पण स्त्रियांपर्यंत संबंध येऊन पोंचला नव्हता. आतां स्त्रिया सार्वजनिक कामांत पडूं लागतांच निंदकांना फावलें.

कार्यकर्त्यांच्या चारित्र्यावर शिंतोडे उडवून जनतेंत त्यांच्याबद्दल अविश्वास

उत्पन्न करण्याची प्रथा पश्चिमेकडेही आहे. परंतु तिकडील रिवाज व परिस्थिति आपल्याकडील रिवाजाहून व परिस्थितीहून भिन्न असल्यामुळें तिकडील स्त्रिया अधिक निर्भय असतात. नुकत्याच कोठें येथील स्त्रिया थोडथोड्या बाहेर पडताहेत तोंच त्यांच्यावर हा प्रहार पडणार ही कल्पना कोणासच नव्हती. समाजांतील खालच्या थरावरचे लोक आपसांत भांडण झाल्याबरोबर एकमेकांस परस्परांच्या आईवरून अपशब्द बोलतात, तोच क्रम या सुशिक्षित समाजानेंही स्त्रियांची नालस्ती करून विरुद्ध पक्षाविषयीं जनतेचें मत कलुषित करण्यांत अनुसरला, असेंच म्हणावयास नको काय ?

खरी वीरवृत्ति आडून कधींच प्रहार करणार नाहीं; धर्मयुद्ध करण्यांतच प्रतिष्ठा मानील. परंतु भ्याडवृत्ति धर्माला अधोगतीला पोंहोचविते. उन्नत हृदयच तेजस्वी भावना पचवूं शकेल. पामर हृदयाला त्यांची ओळख कोठून असणार ?

चाळीस वर्षांनीं महाराष्ट्रांत येत असणाऱ्या अधिवेशनांत असे अपशकुन येत गेले, तेव्हां कार्यकर्ते व विशेषतः नव्याच कार्योन्मुख स्त्रिया साशंक व क्वचित् भयभीत झाल्या. पुण्यांत शिबिर उघडल्यास तें उधळून लावण्याची धमकीही कांहीं प्रतिपक्षीयांकडून देण्यांत आली. एक सार्वजनिक इमारत विश्वस्तानें देऊं केली होती; तीही देण्याचें त्यानें नंतर रहित केलें. पुण्याबाहेर शिबिर उघडावें अशी सल्ला मला देण्यांत आली. परंतु गीतेनें शिकविलेला निष्काम कर्मयोग हा आपल्या आत्म्याच्या उन्नतीसाठीं आहे, बाह्य कसोटीसाठीं नाहीं ही माझ्या अंतःकरणाची खात्री असल्यामुळें व माघार घेण्यांत स्त्रीसमाज एक महत्त्वाचा पाठ शिकूं शकणार नाहीं हें लक्षांत घेऊन मी पुण्यांतच शिबिर काढण्याचें ठरविलें व ईश्वरीकृपेनें तें उत्तम प्रकारें तडीसही गेलें.

दरम्यान आनंदीबाईनीं व मीं आपल्या सहीनें श्री. अणे यांचेकडे पत्र पाठवून राष्ट्रमतांतील खोडसाळ प्रचाराबद्दल त्यांचा अभिप्राय विचारला. ते त्या वेळीं लोकशाही स्वराज्यपक्षाचे अध्यक्ष होते. त्यांच्या बाळबोध, सुसंस्कृत व मानधन हृदयाला त्या प्रचारामुळें घरे पडले. त्यांनीं मनःपूर्वक स्त्रियांची माफी मागितली व आपला राजीनामा पक्षाकडे पाठविला. त्यांनीं हजार बोधवचनें सांगूनही जो परिणाम घडून आला नसता तो या एका कृतीनें झाला ! त्यांच्या राजीनाम्यामुळें लोकशाही स्वराज्य पक्षाचें नैतिक बळ संपुष्टांत

आलें. पक्षाचा नैतिक आधारस्तंभ तेच होते. लो. टिळकांच्यामागून त्यांचीच शक्ति त्यांच्या पक्षापुरती प्रभावी होती.

यानंतर एकही शक्ति अशी राहिली नाहीं कीं, जी जागृत स्त्री-शक्तीच्या आड येऊं शकली असती. फैजपूरच्या अधिवेशनांत शेंकडों स्त्रियांनीं उत्कृष्टपणें सेवा केली. त्याचप्रमाणें स्त्री-सेविका-संघातर्फे अनेक स्त्रियांनीं "मतदारसंघ मोहिमे"त खूप काम केलें.

महात्माजींनीं म्हटलें, "तूं अबला नाहींस, शक्तिरूपिणी आहेस. तुझ्या-योग्य वाटेल तें काम तूं करीत रहा."

अंधेरनगरींत महिला-जगताला हा संदेश दीपप्रकाशाप्रमाणें भासला !

# ९ फैजपूरची फत्ते !



**विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः ।**
**प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥**

मागें वर्णिल्याप्रमाणें फैजपूरच्या अधिवेशनास अनेक अडचणी येत गेल्या. अखिल महाराष्ट्रांतलें सारें कॉंग्रेसतंत्र या समर्थी तावून निघालें. प्रांतासमोर दुहेरी कार्य होतें. अधिवेशन यशस्वी करणें आणि निवडणुकी यशस्वी करून दाखविणें. अधिवेशन खेड्यांत नेल्याबद्दल कित्येक 'शहरी' आत्मे नाराज झाले होते. त्यांच्या कर्तृत्वास वाव न मिळाल्याबद्दल त्यांची कुरकूर आंतून चाललीच होती. शहरांत अधिवेशन भरल्यास शहर सोडण्याचा प्रसंग येतच नाहीं. परंतु खेड्यांत भरल्यास त्या नीरस, एकान्त व जंगली जागेवर महिन्यांचे महिने जाऊन बसणें कोणास आवडेल ? शिवाय व्याख्यानबाजीचें राजकारण करण्यास चटावलेले कार्यकर्ते खेड्यांत काय म्हणून बसतील ? अधिवेशनासाठीं पैसे गोळा करणें, जिल्ह्यांतून संघटना करणें, स्वागतसमितीचे सभासद बनाविणें हीं कामें कांहीं थोडीं नव्हतीं. परंतु अनुभव आला कीं, कांहीं थोडे अहोरात्र काम करणारे कार्यकर्ते सोडल्यास सेवकांत कार्यप्रवणता अल्प आहे. विधायक कार्यक्रमाची तपस्या हातून घडलीच नाहीं, मग अंगीं तितिक्षा व सहिष्णुता कोठून बाणणार ?

लोकांस निवडणुकीचा मात्र विशेष उत्साह होता. करण त्यांत अंतःकरणांतील उथळ वृत्तींचें समाधान होण्यास भरपूर जागा होती. महाराष्ट्रांत ५६ उमेदवार उभे केले होते. निवडणूक करितांना बहुजनसमाजांतील म्हणजे ब्राह्मणेतरवर्गांतील उमेदवार विशेष निवडण्याची काळजी बोर्डानें घेतली होती. इलाज नव्हता. कॉंग्रेस प्रभावी बनत चालली तशी ती लोकांस आकर्षूं लागली. उमेदवारांनीं कॉंग्रेसची सेवा यापूर्वी केली आहे किंवा नाहीं, देशासाठीं हालअपेष्टा सोसल्या आहेत किंवा नाहीं, शिस्तीच्या कसोटीस सारे उतरतील किंवा नाहीं, याची तपासणी कसोशीनें करण्यांत आली नाहीं.

निवडणुकीचा खर्च थोडा फार करण्याची ताकद व अधिक मतदार मिळवितां येण्याची शक्यता आणि त्यासाठीं महाराष्ट्रांतील जात्यभिमानी गटांचें समाधान करून त्यांचा विश्वास काबीज करण्याइतकी पात्रता मिळविली म्हणजे पुष्कळ झालें, ही बोर्डाची मनोवृत्ति होती. महाराष्ट्रांत दहा वर्षे लाथाळी चालवून जनतासंबंध वाढविलाच नाहीं, सेवाकार्य करून बहुजनसमाजाचा विश्वास संपादन केला नाहीं, त्याची परिणाति अशीच होणें अपरिहार्य होतें.

उमेदवारांचें बरेंचसें लक्ष आपल्या निवडणुकीकडे लागणें साहजिकच होतें. कॉंग्रेसपेक्षां व्यक्तिहिताकडेच त्यांची दृष्टि अधिक खिळली. त्यामुळेंही अधिवेशनाच्या कामास हवी तितकी मदत मिळेना.

देवांची परिस्थिति तर फारच चमत्कारिक झाली होती. वर्किंग कमिटीचे सभासद या नात्यानें अखिल भारतीय राजकारणही त्यांस बघावें लागे. प्रांताचे अध्यक्ष म्हणून प्रांतीय संघटना पाहावी लागे. स्वागतमंडळाचे अध्यक्ष म्हणून अधिवेशनांत येणाऱ्या अडचणी, कार्यकर्त्यांतील आपसांतले मतभेद, कॉंग्रेसद्वेष्ट्यांच्या विरोधी टीका या सर्वांचें निराकरण त्यांस करावें लागे. त्यांच्या पायांवर चक्र फिरत होतें. त्यांतच अस्मानीसुलतानीचा फेरा आला आणि नोव्हेंबरमध्यें फैजपूर येथें पर्जन्यवृष्टि होऊं लागली व तीही मुसळधार!

संकटाच्या प्रसंगीं मनुष्याच्या खऱ्या शक्तीचा आविर्भाव होतो. सोबती अधिवेशन लांबणीवर टाकण्याचा आग्रह करीत असतांही, देवांनीं आपला निश्चय कायम टिकविला व डिसेंबरांतच अधिवेशन घडवून आणिलें.

या अपूर्व प्रयोगांत विनोबाजींचें नैतिक पाठबळ समर्थ ठरलें. त्यांची सारी अध्यात्मशक्ति या वेळीं देवांच्या मागें उभी होती. त्यामुळें कटु प्रसंग विशेष न येतां सर्व काम वेळीमेळीनें झालें. वीस दिवसांत फैजपूरच्या रानांत गंधर्व-नगरी निर्माण झाली! महाराष्ट्रांतील अकरा जिल्ह्यांतील लोकसेवक व बृहन्-महाराष्ट्रांतील त्यांचे बांधव या सर्वांनीं फैजपुरास आपलें सेवासामर्थ्य अर्पण करून हा महान् यज्ञ सिद्धीस नेला! पराक्रमाची शर्थ केली!!

* * *

डिसेंबरची २८ तारीख उजाडली. त्या दिवशीं संध्याकाळीं मोठ्या अधिवेशनास सुरुवात झाली!

फैजपूरच्या पवित्र भूमीवर महाराष्ट्रीयांचा जणूं वर्षारंभाचा मंगल उत्सव साजरा होत होता. स्वादाला कडू पण परिणामीं आरोग्यदायक अशा कडू-निंबाचें भक्षण करून महाराष्ट्राची जनता महोत्सव करीत होती.

सारा भारतवर्ष फैजपूरला लोटला होता. चाळीस वर्षांनीं भरणारें 'मराठ्यां'-च्या भूमींतील हें अपूर्व व अभिनव अधिवेशन पाहण्यास आसेतुहिमाचल देशांतील लोक जमले होते.

पुढाऱ्यांची मिरवणूक मंडपांत प्रविष्ट झाली तेव्हां मंगलवाद्यें वाजत होतीं. व्यासपीठावर राष्ट्रपति जवाहरलाल उभे राहतांच महाराष्ट्र-रमणीनें राष्ट्रगीत सुरू केलें. सर्वांनीं उत्थानपूर्वक त्याचें स्वागत केलें.

स्वागताध्यक्ष श्री. शंकरराव देव धीरोदात्त पावलें टाकीत मनोऱ्यावर चढले. त्यांना आपलें भाषण वाचावयाचें होतें.

वरून त्यांनीं चौफेर नजर टाकली. चहूंबाजूंस अफाट समुद्र पसरला होता. महाराष्ट्रांतील पर्वतांचीं उत्तुंग शिखरें त्यास वेष्टून गगनाचा भेद करीत होतीं. आकाशांत अस्तगिरीवरून सूर्य अनेक रंगांनीं आपलें दरबारी वैभव मिरवीत होता. महाराष्ट्रांतील शाहीरांनीं वर्णन केलेलें सृष्टीचें सौंदर्य प्रेक्षकाच्या दृष्टीला पावन करीत होतें. महाराष्ट्र कंगाल असला तरी त्याची वाणी कंगाल नाहीं ! महाराष्ट्र पहाडी असला तरी त्याचें हृदय कठोर नाहीं !! महाराष्ट्राची जमीन खडकाळ असली तरी स्वातंत्र्यवीर आणि चारित्र्यावान् संत यांची महाराष्ट्रांत वाण नाहीं !!!

तें दृश्य पाहत असतां देवांचें हृदय अभिमानानें भरून आलें. " त्यांचा " महाराष्ट्र समोर पसरला होता. महाराष्ट्रांतील लहानथोर सर्व व्यक्ति तेथें भक्तिभावानें उपस्थित होत्या. आपल्या आयुष्यांतील नव्या दमाचीं अनेक वर्षें त्यांनीं व त्यांच्या सोबत्यांनीं विलासांत वा ऐषआरामांत न घालवितां, ज्या महाराष्ट्राच्या उत्थानासाठीं खडतर क्लेश भोगण्यांत घालविलीं, तो महाराष्ट्र आज प्रसन्नचित्तानें त्यांच्या मनोदयाशीं समरस होऊन तेथें जमला होता. स्वातंत्र्य-संग्रामांत त्यानें आपल्या अनेक तरुणांचें उष्ण रक्त ओतलें होतें. वर्षानुवर्षें नवसंदेशाच्या प्रचारार्थ कायाक्लेश सोसणारे अनेक प्रयोगवीर त्यानें राष्ट्राला अर्पण केले होते. आपली भव्यता, आपली दृढता, आपलें शौर्यवीर्य या सर्वांचा नजराणा घेऊन खरा महाराष्ट्र आज " गांधीबाबां "च्या दर्शनासाठीं

केवळ कांदाभाकरीची शिदोरी बांधून तेथें प्राप्त झाला होता. आणि याच महाराष्ट्राला उद्देशून देव आज आपल्या हृदयांतील उर्मींना वाट करून देणार होते.

तें मनोवेधक चित्र पाहत असतां देवांचें हृदय कृतार्थतेनें भरून गेलें आणि जन्मांतील सारा शीण नाहींसा झाल्याचा अनुभव आला. भूतकालांतील भांडणें, द्वेष, मानसिक वेदना, मानहानि, पराजय सारें कांहीं वर्तमानकालांतील विजयोत्सवासमोर लुप्त झालें. महाराष्ट्रधर्माचा दिव्य संदेश त्याच्या गिरि-गव्हरांतून पुन्हा प्रकट झाला होता. महाराष्ट्राचे जनहिततत्पर, सेवापरायण, निर्मळ कार्यकर्ते वर्षानुवर्षें तो संदेश जनतेला देत आले होते. त्यांच्या सेवेचें बीज आज साक्षात् दिसत होतें. कोणाही सुधारलेल्या राष्ट्राला ज्याचा गौरव वाटेल असा तो समाजसेवकगण त्या अफाट जनसमुदायाशीं एकरूप होऊन गेला होता!

देवांचे मनोरथ आज बारा वर्षांनीं पूर्ण झाले होते. 'महाराष्ट्रांत कॉंग्रेस आणली पाहिजे' हें आपलें उद्दिष्ट त्यांनीं सिद्धीस नेलें होतें. त्यांची श्रद्धा फळास आली! महाराष्ट्रांतील खरी जनता जागृत झाली. तिच्या सरळ हृदयानें त्यांच्या हांकेला 'ओ' दिली. राष्ट्रकार्याच्या प्रसंगीं त्याच शक्तीनें त्यांना हात दिला. तिला विद्याबुद्धीची तालीम मिळाली नव्हती, "शिक्षण" मिळालें नव्हतें, प्रतिष्ठेची तिला कदर नव्हती; पण तिच्यांत श्रद्धा-भक्ति होती. सरकारचा व सावकारांचा रोष सहन करूनही अधिवेशनाला आपली शेत-जमीन देण्यास तिचे पुत्र डरले नाहींत. कायदा, शास्त्र त्यांस अवगत नव्हतें; पण ते खरे महाराष्ट्राचे पुत्र होते. हृदयप्रामाण्याला साक्षी ठेवून आपल्या एकमेव पुढाऱ्याचें दर्शन घेण्यास— त्याचे अमृतनिस्यंदी शब्द झेलण्यास— ते आले होते.

आणि देवांच्या हृदयांत आणखी एक आनंददायी गोष्ट स्फुरत होती, कॉंग्रेसमधून निघून गेले असतांही त्यांच्या प्रियदर्शी नेत्यानें या ग्रामीण अधिवेशनाच्या मनोवेधक देखाव्यानें प्रसन्न होऊन देवांस आश्वासन दिलें होतें कीं, "मी आज बोलणार आहें."

त्या गौरवाच्या कल्पनेनें देवांचें हृदय कंपन पावत होतें. महाराष्ट्राच्या तपस्येचाच तो प्रभाव नव्हता काय!

महाराष्ट्राचे पुढारी म्हणविणाऱ्यांनीं सतत दहा वर्षे महाराष्ट्राच्या नांवावर कॉंग्रेसला विरोध केला आणि "गुजराती बनियाचें" नेतृत्व मानणार नाहीं असा हेका चालविला. परंतु त्या महात्म्याची तपश्चर्या प्रबळ पडली! युक्तिवादानें हे ऐकत नाहींत असें पाहून, तो संग्रामवीर होऊन आला आणि त्यानें मगरूर महाराष्ट्राचें वीरहृदय आपल्या अमोघ सामर्थ्यानें जिंकून घेतलें.

चारी दिशांस महात्माजींच्या नांवाचा जयजयकार दुमदुमत होता. महाराष्ट्राचें हृदयकमल उत्फुल्ल होऊन गेलें होतें. भावनावश होऊन तो अफाट जनसमुदाय हेलकावे खात होता. देवांचें हृदयही त्या चैतन्याच्या तरंगांवर ताल देऊं लागलें!

पुन्हा एकदां देवांनीं त्या भव्य दृश्यावर आपली नजर टाकली आणि त्यांच्या नेत्रांत कृतज्ञतेचे अश्रु उभे राहिले!!

---

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | ६ | महाराष्ट्राच्या | महाराष्ट्राचा |
| ,, | २१ | संप | एकी |
| ४ | १० | भरताच्या | भारताच्या |
| ,, | ११ | १९०० | १९२० |
| १४ | २५ | सरल्यावर | सारल्यावर |
| १५ | २ | असल्यामुळें | असल्यास |
| २४ | १८ | स्थापनेनंतर | स्थापनेपूर्वीच |
| ५० | ८ | तीर्थयात्रा | तीर्थयात्रां |
| ७८ | १ | कृषिवल | कृषीवल |
| ७९ | ३ | श्रीसमर्थ्यांच्या | श्रीसमर्थांच्या |
| ,, | ६ | पुनरुस्थाना | पुनरुत्थाना |
| ११५ | १४ | खुद्द महाराष्ट्रांत | पुण्यांत |
| १२७ | ५ | धुसगूस | धुडगूस |
| १३२ | ५ | आध्यामिक | आध्यात्मिक |
| १३७ | २२ | करविलें | करवलें |
| १३८ | २१ | मुलासत | मुलाखत |
| १४१ | ९ | भारताः | मानवाः |
| १४४ | १७ | भरून | भारून |
| १५१ | ३ | अन्नयाग | अन्नत्याग |
| १५२ | ११ | नसल्या | नसत्या |
| १५५ | ५ | प्रकाशन | प्रकाशित |
| १६२ | १ | या संस्थांची | टिळक महाविद्यालयांची |
| ,, | १२ | दापोडी | दापोली |
| १६३ | ६ | विनय-मांदिर | टिळक विद्यालय |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| १७५ | २५ | अभिजात्य | आभिजात्य |
| १७९ | १२ | निस्पृहः | निःस्पृहः |
| १८८ | २३ | देशशक्ति | देशभक्ति |
| १९५ | २६ | कळणार | करणार |
| २०२ | २१ | नहावद | नटावद |
| २४५ | २० | बनले | होते |
| २५० | १० | फर्जतल्ली | फर्जन्दली |
| २५३ | २१ | राजकरणी | राजकारणी |
| २७२ | ६ | विद्यापीठाचा | महाविद्यालयाचा |
| ” | ७ | विद्यापीठाच्या | महाविद्यालयाच्या |
| २८५ | ३ | विनय-मंदिरांतील | टिळक विद्यालयांतील |
| ३०६ | ३ | सांगतों | सांगतां |

---